## सुगमोपाय



## स्फुट कविता

# प्रस्तावना

॥ श्रीराम ॥

१

## श्रीश्रेष्ठांचें चरित्र

**समर्थ देव समर्थ भाव । तरि सामर्थ्या आलें गौरव ।**
**ज्याचिया चरितश्रवणें रौरव । चुकती पातकियांचे हि ॥** भ ५६।१५

**श्रीरामी मिनला निज दास । ह्मणोनि रामीरामदास ।**
**नाम ठेवीत सर्वेश । गंगाधरपंतांचें ॥**,

उद्धवसुत

श्रीसमर्थांचे वडील बंधु श्रीश्रेष्ठ होत. यांना च श्रीरामीरामदास ह्मणत. त्याचें चरित्र लिहिण्यास साधनें असावीत तितकीं नाहींत. स्वतंत्र असें त्यांचें एकादें चरित्र नाहीं, निदान अजून उपलब्ध तरी नाहीं. श्रीसमर्थांचीं जीं काहीं चरित्रें उपलब्ध झालीं आहेत त्यांच्या सहाय्यानें, प्रस्तुत ग्रंथांत त्यांची जी कविता छापली आहे तिच्या अनुरोधानें व त्यांच्या जन्मभूमीच्या दर्शनानें मनावर जे संस्कार होतात ते विचारांत घेऊन श्रीरामीरामदासाचें चरित्र लिहिण्याचा प्रयत्न करावयाचा आहे.

यांचे मूळपुरुष कृष्णाजीपंत, गोत्र जमदग्नि, सूत्र आश्वलायन, उपनाम ठोसर हे प्रथम बेदर प्रांतीं राहात होते. राज्यक्रांती व दुष्काळ यांना त्रासून त्या प्रांतांतील बरेच गृहस्थ गंगातीरास आले, त्यांत शके ८८४ त कृष्णाजीपंत हि कुटुंबासुद्धा येऊन गंगेच्या दक्षिण तीरास मौजे हिवर येथें प्रथम राहिले. त्यांना पांच पुत्र होते, पैकीं चौघांनीं एकंदर अठ्ठेचाळीस गांवीं कुळकर्ण व जोशीपणाची वृत्ति संपादन केली. पांचवे पुत्र दशरथपंत यांनीं हिंवऱ्यापासून तीन कोसांवर गंगेच्या उत्तरेस पड पाढर पडली होती तेथें नवीन गांव वसविला. त्या पाढरीचें पूर्वीचें नांव वज्गाव होतें, यांनीं वसाहत केल्या-

वर त्या ठिकाणाचें नांव जांब असें ठेविलें. जांबेमुद्धां नवीन च बारा गांवांची वृत्ति त्यांनीं मिळविली. त्यांच्या पासून एकविसावे पुरुष सूर्याजीपत, हे च समर्थ आणि श्रेष्ठ यांचे वडील होत.

या घराण्यांतील बावीस पिढ्यांच्या पूर्वजांनीं श्रीराम आणि सूर्य यांची उपासना केली होती. त्या उपासनावृक्षाला सूर्याजीपत व राणुबाई यांच्या पोटीं गंगाधर व नारायण अशीं दोन फळें आलीं. सामान्य फळांप्रमाणें हीं फळें नव्हत. याची गोडी शाश्वत आहे. नारायणफळाच्या आस्वादाचा अनुभव महाराष्ट्रांतील आबालवृद्धांस आहे च. श्रेष्ठफळ जे गंगाधर त्याची गोडी या ग्रंथाच्या द्वारें आधुनिक महाराष्ट्रास प्रथम चाखावयास मिळत आहे. महाराष्ट्राच्या भाविक मनाला या हि ,फळाचें वेड लागल्यावांचून राहणार नाहीं अशी माझ्या मनाला पूर्ण उमेद आहे.

गंगाधर हे च रामीरामदास ऊर्फ श्रेष्ठ व नारायण हे च रामदास ऊर्फ समर्थ. पहिले सूर्याचा अंश व दुसरे मारुतीचा अंश होत. सूर्य आणि मारुती यांनीं सूर्याजीपत व राणादेवी यांच्या पोटीं जन्म घ्यावा यांत काय आश्चर्य आहे ? बावीस पिढ्याचें पुण्यबल तर सग्रहीं होतें च, पण तशांत यांची तपश्चर्या हि फार दांडगी होती. महिपती आपल्या संतविजयांत पहिल्या च अध्यायांत ह्मणतात.:—

आतां ऐका देऊनि चित्त । गंगातीरीं पंचक्रोशींत ।
जांब क्षेत्र असे निश्चित । जगविख्यात जाणती ॥ १८ ॥
तेथील कुळकर्णी भगवद्भक्त । नामाभिधान सूर्याजीपंत ।
राणुबाई स्त्री निश्चित । भ्रतारआज्ञेत सर्वदा ॥ १९ ॥
गृहस्थाश्रमी असोनि जाण । परमार्थसाधनीं त्याचें मन ।
वाचेसी नेम केला त्यानें । असत्य वच न बोले ॥ २० ॥
मध्यान्ह समयासी आला कोणी । तरी तो विष्णुसमान मानी ।
अधिकारपरत्वें पूजोनि । अन्नदानीं उदार ॥ २१ ॥
सर्वा भूतीं दया निश्चितीं । विष्णुभक्तांची परम प्रीति ।
साधु संत घरासी येती । तरी आदर करिती तयांचा ॥२२॥
पुराण आणि हरिकीर्तन । दोघांसी आवडे चित्तांतून ।
काया वाचा आणि मनांतून । सूर्यउपासन करितसे ॥ २३ ॥

प्रातःकाळीं करोनि स्नान । वासरमणीसी अर्घ्यदान ।
आरक्त सुमनें रक्तचंदन । यथाविधीनें मंत्रोक्त ॥ २४ ॥
आदित्यहृदय स्तोत्रपठण । नित्य करीत पारायण ।
अखंड वासरमणीचें ध्यान । निज प्रीतीनें अंतरीं ॥२५॥
इतुकें करोनि साचार । घालित सहस्र नमस्कार ।
तेणें तेजाची शक्ति फार । यास्तव अंतर पडेना ॥ २६ ॥
बारा सहस्र जप नित्य । करित असे एकाग्रचित्त ।
बारा वर्षें लोटतां सत्य । साक्षात् आदित्य भेटला ॥ २७ ॥

प्रत्यक्ष सूर्याचें दर्शन होतां च सूर्याजीपंतांची वृत्ति तटस्थ झाली. वर माग, ह्मणून आज्ञा झाली तेव्हां, भक्तिरहस्यांत ह्मटल्याप्रमाणें, सूर्याजीपंत ह्मणतात:-

योग याग दान दमन । कर्म धर्म वेदाध्ययन ।
उग्र तप शताग्नि धूम्रपान । करितां ऐसा न भेटसी ॥ भ.५०-४७
जो तूं ब्रह्मादिकां दुर्लभ । तो तूं मजपासीं उभा सुलभ ।
अतःपर थोर कोण लाभ । कृतार्थ जालों स्वामी ॥ भ.५०-४८

अनंत ब्रह्मांडीं विषय निर्विषय सुख ।
ते तुजपासूनि पावती तवाभिमुख ।
तो तूं प्रत्यक्ष उभा मजसन्मुख ।
अतःपर काय मागों स्वामी ॥ भ. ५०-४९
आपुलें स्वात्मत्व दिधलें दासा ।
अतःपर काय मागों श्रीनिवासा ।
तुजवेगळें कांहीं रुचे या मानसा ।
तरी तूं च साक्षी भगवंता ॥ भ. ५०-५०

सूर्याजीपंतांना आदित्यापाशीं कांहीं च मागावयाचें नव्हतें, पण राणादेवीच्या इच्छेस्तव तुह्मांस दोन भगवद्भक्त पुत्र होतील असा सूर्यनारायणानें आशिर्वाद दिला.

माझ्या अंशें होईल जाण । तो प्रपंच परमार्थ साधील दोन ।
तुमचे सेवेसी अनुदिन । निज प्रीतीनें सर्वदा ॥ ४४ ॥
तया धाकुटा वैराग्यशील । जो मारुतीचा अंश केवळ ।
भक्तिज्ञानेंकरूनि प्रबळ । विश्व सकल उद्धरील ॥ ४५ ॥

त्याप्रमाणें शके १५२७ विश्वावसु नाम संवत्सरीं मार्गशीर्ष वद्य त्रयोदशीस गंगाधरांचा व शके १५३० कीलक नाम संवत्सरीं चैत्र शुद्ध नवमीस बरोबर श्रीरामजन्मसमयीं नारायणाचा जन्म झाला.

श्रीसमर्थांचे वेळीं श्रीराणादेवीस डोहळे झाले होते, तेव्हां त्या

गिरिकंदरें मज आवडती । घरें मंदिरें मज नावडती ॥

मुख्य प्राणनाथ मी सर्वव्यापक । मजला प्रिय येक श्रीरघुनायक ॥

सर्व माया मिथ्या बाजीगारी ।
काय तुह्मीं हे मानिली खरी ।
आत्माराम मी येक सत्य चराचरीं ।
नित्य शाश्वत निरंजन ॥

असे उद्गार काढीत, त्यावरून सूर्याजीपतांनीं सिंचनार्थ गंगोदक आणवावें असा विचार केला तों,

राणादेवी ह्मणे मज आणणें कृष्णेचें उदक ।
गंगाधर बंधु सिंचणें गंगोदकें ॥

तात्पर्य, गंगातीरीं श्रेष्ठ राहणार व कृष्णातीरीं समर्थ जगदुद्धाराचें कार्य करणार असा भाव त्यांनीं सुचविला.

उभयता पुत्रांना घेऊन श्रीराणुबाई श्रीएकनाथमहाराजांच्या दर्शनास पैठणास गेल्या असता, आमचे हातून घडावयाचें कार्य राहिलें तें हे उभयता तुमचे पुत्र शेवटास नेतील असें ह्मणून नाथमहाराजांनीं शके १५२१ सौम्यनाम संवत्सरीं फाल्गुन वद्य ६ स आपला अवतार समाप्त केला, इत्यादि हकिकत हनुमंतस्वामींनीं समर्थांच्या बखरींत दिली आहे; पण हा भेटीचा प्रसंग अयथार्थ असावा असें वाटतें. श्रीक्षेत्र पैठणास नाथमहाराजांच्या वंशजांपैकीं नानाबुवा यांच्या दप्तरात एक जुना कागद होता त्यावर पुढील श्लोक होते.

॥ श्री यकनाथा ॥

## नाथनिर्याण श्लोक

शालीवाहन पंधरा शत शके येकागळी विंशती ।
वर्षों नाम विकार मास वरवा फाल्गून षष्ठ्यामती ।

पष्ठि वासर भानु या शुभ दिनीं निर्याण स्वच्छंदता ।
पावे श्रीगुरु येकनाथ प्रभु हा साम्राज्यसायोज्यता ॥१॥
भूबाहुशरचंद्रमा शक विधि क्षेत्रि तिजा जो क्रमे ।
अब्दामाजि विकारि नाम फरवी मीन गृही संक्रमे ॥
षष्ठी फाल्गुन वद्य मित्रभ शशि वज्राख्य वाणिज्यते ।
पावे श्रीगुरु येकनाथ प्रभु हा साम्राज्यसायोज्यते ॥ २ ॥

भू=१. बाहु=२. शर=५. चंद्रमा=१. ही संख्या उलटी वाचली म्हणजे १५२१ शक येतो.

हे दोन श्लोक पैठणास आबालवृद्धांच्या मुखीं असून नाथमहाराजांचा समाधिशक आजपर्यंत अनिश्चित रहावा हें आश्चर्य आहे. नाथांच्या समाधीच्या लहानशा दारावर कांहीं अक्षरें आहेत, पण तीं आतां अगदीं अस्पष्ट झालीं आहेत. प्रथम तीं आह्मांस बरोबर लागलीं नाहींत, परंतु वरील श्लोक गांवांत मिळाल्यावर त्यांच्या अनुरोधानें तीं अक्षरें लावण्याचा प्रयत्न केल्यास

॥ श्रीएकनाथ प्रा ॥ भूबाहुशरचंद्रमा शक वि ॥
॥ धी क्षेत्री तिजा जो ॥
॥ नाम

इतकीं अक्षरें लागतात. समाधीच्या दारावर हीं अक्षरं कोरलेलीं असल्यामुळे नाथांच्या समाधिशकाविषयीं वास्तविक शंका उरत नाहीं. वरील दोन श्लोक कृष्णदयार्णवकृत आहेत असें ह्मणतात. कृष्णदयार्णव न चुकले असल्यास न कळे ! असो.

गंगाधर आणि नारायण यांचा विद्याभ्यास सूर्याजीपंतासारख्या आचारविचारसंपन्न सत्पुरुषाच्या देखरेखीखालीं कसा झाला असेल याची कल्पना करणें फारसें कठीण नाहीं. गंगाधरांचा विवाह त्याचे वयाच्या सातव्या वर्षी झाला. त्यांस आंबडकर देशमुखांची* कन्या केली होती. ही प्रपंचाची बाजू झाली. श्रेष्ठांना परमार्थाचा लाभ कसा झाला हे आतां पहावयाचें.

* हें देशमुखांचें घराणें अजून आंबडास सुप्रसिद्ध आहे. रा. विनायकराव यांजकडे हनुमंतस्वामीकृत समर्थांच्या बखरीची शके १७५१ तील प्रत मिळाली. याशिवाय जास्त उपयुक्त कांहीं कागद मिळालें नाहींत हें दुर्दैव होय.

श्रेष्ठांना व समर्थांना प्रत्यक्ष श्रीरामाचा अनुग्रह झाला होता. भक्तिरहस्यांत नमन करितांना पहिल्या प्रकरणांत श्रेष्ठ ह्मणतात च,

तो मद्गुरु जगद्गुरु समर्थ । भावें चि भेटला श्रीरघुनाथ ।
मस्तकीं ठेऊनि पद्महस्त । स्वस्वरूप प्रकाशिलें ॥ १६ ॥

श्रेष्ठांना हा अनुग्रह १५३६ त फाल्गुन शुद्ध ११ स झाला असें हनुमंतस्वामी ह्मणतात, पण हा शक बरोबर नसावा असें वाटतें. तिसगांव-*मठपति दिनकर यांचा " स्वानुभवदिनकर " नांवाचा अप्रतिम ग्रंथ " श्री रामदास आणि रामदासी " मालेंतील सहावा भाग ह्मणून प्रसिद्ध होणार आहे. महाराष्ट्राच्या व त्यांतल्या त्यांत श्रीसमर्थसंप्रदायांतील भक्तांच्या गांठीं अपार पुण्य होतें ह्मणून असला बहुमोल ग्रंथ महाराष्ट्रास उपलब्ध झाला आहे. दिनकरांना खुद्द श्रीसमर्थांचा अनुग्रह शके १५७६ त झाला. याचा अर्थ असा कीं दिनकरांना बरा च काळ श्रीसमर्थांचा सहवास घडला होता. श्रीसमर्थांनीं आपला अवतार समाप्त केल्याचा शक १६०३ हा सर्वांना माहित च आहे. तत्पूर्वी २७ वर्षे दिनकरांना अनुग्रह झाला होता. अशा दिनकरांनीं शके १६१६ त " स्वानुभवदिनकर " ग्रंथ लिहिला, तेव्हां हा ग्रंथ किती विश्वासार्ह आहे हें मीं सांगावयास पाहिजे असें नाहीं. सदरहु अमूल्य ग्रंथांत श्रेष्ठ व समर्थ यांच्या अनुग्रहाविषयीं सोळाव्या कलापांत जो भाग आला आहे तो वाचकांस प्रसंगानुसार येथें च सादर करितों.

गौतमीचा उत्तर तीरीं जांबेसी । ग्रामलेखनाधिकार पितयासी ।
पिता गोदेसी गेला स्नानासी । तवं नवल वर्त्तलें मागें ॥ ४६ ॥
निजगृहीं असतां नारायण । तवं दूतवेषें आला येक वानरगण ।
तेणें परम क्लेशी करून । बाह्यप्रदेशासी नेलें ॥ ४७ ॥
वय तरी वर्षें अकरांचें । परंतु पदरीं जन्मांतरपुण्य साचें ।
योगभ्रष्ट तेणें निवृत्तीचें । चळण न घडे कदापि ॥ ४८ ॥

---

* नगरापासून चवदा कोस तिसगांव आहे. मठ जीर्ण झाला आहे. जीर्णोद्धार करण्याचें श्रीगुरुभक्तिपरायण गोविंदबुवा यांनीं योजिलें आहे; परंतु मठाला उत्पन्न नसल्यामुळें झोळीवांचून अन्य साधन नाहीं. सदरहु ग्रंथ व दिनकर आणि त्यांचे पुत्र रामचंद्र यांची इतर कविता हीं रा. अमृत बापुजी रसाळ, शिक्षक, शेवगांव, जिल्हा नगर यांचे मार्फत आह्मांस मिळाली.

दूतें झोले देत बाह्यप्रदेशीं । नेलें तेणें नारायण भयभीत मानसीं ।
होऊनि पाहे तवं दृष्टीसी । अपूर्व कौतुक देखिलें ॥ ४९ ॥
मेघश्यामरूप क्षत्रीवेषें । सिबीकेमाजीं बैसलीं स्त्रीपुरुषें ।
सभंवतें निजगण यथासंतोषें । उभे असती दोहीं भागीं ॥ ५० ॥
तवं यासी नेऊनि पुढें उभें केलें । पिता कोठें आहे ह्मणौनि पुसिलें ।
रचपुतिभाषा वाक्य बोलिलें । आणि वेष ही तैसा चि ॥ ५१ ॥
येणें पितृवर्त्तमान सांगितलें । तवं प्रभूनें जवळी पाचारिलें ।
मस्तक कुरवाळूनि येक पत्र दिधलें । निजकरें नारायणासी ॥५२॥
निजमुद्रांकित पत्र करीं लाधतां चि । अवस्था पालटली नारायणाची ।
थरथरां कांपत तेणें सर्वांगाची । वेगडी वळली ॥ ५३ ॥
वाचा जातसे बेंबळपणें । हांसे रडे नाचे सत्राणें ।
शब्द बोलवेना निर्वळपणें । उगा चि टकमकां पाहातसे ॥ ५४ ॥
अंग कांपतसे थरथरां । विस्मयें दाटलासे सैरा ।
घामेजोनि अति घाबिरा । रडे पडे आक्रंदें ॥ ५५ ॥
क्षणें हांसे क्षणें रडे । उड्या मारी क्षणें पडे ।
इतुकियामाजी निजनिवाडें । कौतुक देखे निजदृष्टीं ॥ ५६ ॥
तवं मूर्ति देखिली घवघवीत । मेघश्याम प्रभा लखलखीत ।
घामांकीं जानकी शोभत । पाठीसीं सौमित्र भरत ॥ ५७ ॥
तया सेजीं उभा शत्रुघ्न । पुढें उभा वीर हनुमान ।
अकस्मात वांहाडुळी येऊन । इतुकें देखे तत्काळीं ॥ ५८ ॥
ऐसें देखेना जवं अकस्मात । तवं श्रीरामें मस्तकीं ठेऊनि कृपाहस्त ।
महावाक्य उपदेशूनि त्वरित । हनुमंतासी निरविलें ॥ ५९ ॥
ते समइं दिग्मंडळ दणाणिलें । तेणें नारायणाचें सर्वांग थरारिलें ।
ह्मणे काय ब्रह्मांड कोसळलें । मजवरी ये काळीं ॥ ६० ॥
ह्मणौनि थरथरां असे कांपत । तेणें दांतखिळी बैसों पाहात ।
सभंवतें टकमकां अवलोकित । तवं भुभुःकार देखिला ॥ ६१ ॥
इतुकियामाजी अकस्मात । विज्जुसारिखें लखलखीत ।
निजांगीं दिव्य वस्त्र वेष्टीत । सीतनिवारणार्थ ॥ ६२ ॥
वस्त्र रंगाथिलें अति मनोहर । आरक्त शोभा मंडित सुंदर ।
इर्मुंजीसारिखें सपरिकर । दिव्य तेजें विलसे ॥ ६३ ॥

सव्य करीं पत्र राममुद्रांकित । वाम करीं अर्द्धचंद्र बाण राम देतें ।
इतुकियामाजी तत्काळ जाली गुप्त । राममूर्ति निजांगें ॥ ६४ ॥
इतुकें जवं क्षणमात्रें हों न सरे । तवं नारायणासी पडलें अंधारें ।
वाचा स्तब्ध होऊनि येक संवत्सरें । निजसमाधीं तटस्त ॥ ६५ ॥

असो पिता आणि ज्येष्ठ बंधु गृहासी आले ।
गृहीं धाविरेपणें वर्त्तमान येकिलें ।
जे येक दूत येऊनि नारायणासी नेलें ।
परम क्लेशीकरूनि ॥ ६६ ॥

मग येकतक्षणीं धांविनले । बाह्यप्रदेशीं पाहात चालिले ।
तवं अकस्मात येकायेकी देखिलें । ब्रह्मारण्यांत नारायणा ॥ ६७ ॥
पाहाती तवं चकित मानसीं । वाचा कुंठित निश्चयेंसीं ।
बोलवितां नाना प्रयत्नेंसीं । परि न बोले चि सर्वथा ॥ ६८ ॥
तवं नागरिक लोक पातले । कित्तेकीं कित्तेक तर्क केले ।
ह्मणती यासी निश्चयें झडपिलें । झाली असे भूतबाधा ॥ ६९ ॥
कोण्ही ह्मणती ब्रह्मराक्षस । कीं लागली झोटिंगाची टापस ।
कोण्ही ह्मणती अहो यास । मुंज्या लागला निश्चयेंसीं ॥ ७० ॥
येक ह्मणती लागली मायराणी । कीं ते असेल सटवीची झडपणी ।
यासी पंचाक्षरी आणूनि । रक्षा करा झडकरी ॥ ७१ ॥
ऐसे बहुतांचे बहु तर्क जाले । बहुतीं बहुत उपाय केले ।
परंतु तितुके हि व्यर्थ गेले । येक हि उपाय चालेना ॥ ७२ ॥
मग सर्व हि होऊनि निवांत । उचलूनि निजगृहासी आणित ।
तवं तें वस्त्र देखिलें अकस्मात । अर्द्धचंद्र आणि पत्र ॥ ७३ ॥

त्यावरी सकळ लोकांसी आज्ञा दिधली ।
पितयानें मूठ उकलूनि पाहिली ।
तवं पत्रावरि मुद्रा देखिली ।
श्रीरामनामांकित ॥ ७४ ॥

पुढें पत्रार्थासी जवं वाचिती । तवं दोघांस हि समाधि अवचिती ।
प्राप्त होऊनि तटस्त होती । स्वानुभवसुखें ॥ ७५ ॥
पिता निजसमाधिसुख लाधोनि । देह ठेऊनियां तत्क्षणीं ।
साम्राज्यपदसुखासनीं । निज वैकुंठीं वास्तव्य ॥ ७६ ॥

**ज्येष्ठ बंधु जो कां गंगाधर। त्यासी पत्र वाचितां समाधि साचार।**
**तेणें हि लेखणी वाहोनि रघुवीर। प्रसन्न केला निजभावें॥ ७७॥**
**असो यावरी + + + +** वगैरे.

ज्याची जशी बुद्धि असेल त्याप्रमाणें तो या उताऱ्याचा अर्थ करील. ऐतिहासिक दृष्टीने अथवा परमार्थदृष्टीनें अथवा सांप्रदायाच्या दृष्टीनें, कोणत्या हि दृष्टीनें या उताऱ्याचा विचार केला तरी तो क्षणोक्षणीं वाचावा असें वाटणार नाहीं असा वाचक विरळा! हा उतारा मोठा आहे पण तो महत्वाचा आहे. त्यावरून पुष्कळ गोष्टींचा निःशंकपणें निर्णय करण्यास हरकत नाहीं. श्रीसमर्थांना अनुग्रह झाला तो कसा, कोठें व केव्हां हें यावरून निश्चित होतें. अनुग्रह झाला त्यावेळीं समर्थ अकरा वर्षांचे होते ह्मणजे शके १५४१ त त्यांना अनुग्रह झाला आणि तो जात्रेस च झाला. दुर्मुजी रंगाचे वस्त्र त्यांना अर्पण केलें तें या च वेळीं. अनुग्रहानंतर एक वर्षपर्यंत श्रीसमर्थांनीं मौन धारण केलें होतें. सूर्याजीपंत व श्रेष्ठ या उभयतांस तें श्रीरामनामांकित पत्र वाचतां च समाधिसुखाचा अनुभव मिळाला. सूर्याजीपंतांनी तर तत्काळ देह च ठेवून वैकुंठवास पत्करिला. श्रेष्ठांनीं लेखणी ठेवून ह्मणजे कुळकर्णपणाची आशा सोडून श्रीरामाची एकनिष्ठपणें सेवा चालविली. त्यावेळीं श्रेष्ठांचें वय, अर्थात्, तेरा किंवा चवदा वर्षांचें होते. या ओव्यातील बाकीचा भाग 'अनुभवी यासी च भासे। येरा गथागोवी'। होय.

याच सुमारास श्रीसमर्थांचे पुढील अवतारचरित्र श्रीश्रेष्ठांस कळून चुकलें होतें. "समर्थप्रताप" या नांवाचा एक ग्रंथ सभेस उपलब्ध झाला आहे. समर्थसंप्रदायांत "स्वानुभवदिनकर" ग्रंथाची जी योग्यता तितकी च, किंबहुना एका दृष्टीनें ज्यास्त योग्यता या ग्रंथाची आहे. वेणीस्वामींच्या परंपरेंतील गिरिधरस्वामी यांनीं हा "समर्थप्रताप" वर्णिला आहे. मोगलाईंत बीड येथें त्यांचा मठ आहे. त्यांची समाधि हि बीडास आहे. समाधीवर जो लेख आहे त्यावरून गिरिधर हे शके १६५१ त समाधिस्त जाले असें होते. त्यांनीं लहानपणीं श्रीसमर्थांस प्रत्यक्ष पाहिलें होते व त्यास त्यांचा काहीं काळ सहवास हि घडला होता. अशा गिरिधरांनी वर्णिलेला "समर्थप्रताप" किती हृदयंगम असेल याची तूर्त वाचकांनीं कल्पना करावी. या गिरिधराच्या कवितेचे प्रस्तुत भागाएवढे तीन भाग होतील, इतकी ती अफाट आहे; असो.

समर्थप्रतापांत गिरिधर ह्मणतात:—

समर्थांचें भविष्य अवतारमहिम्न ।
ग्रामाधिपतिरूपें श्रीरघुवीरें जाण ।
गंगाधरपंतांकरवीं लेहून ।
रात्रीं वटवृक्षातळीं दिधलें ॥ २—३४
गंगाधरस्वामी तीन दिवस समाधिस्त राहे ।
समर्थचरित्रपत्रें हस्तीं घेऊनियां ॥ २—३५

तथापि श्रेष्ठांवर या वेळीं सर्व प्रपंचाचा भार पडल्यामुळें समर्थांचें लग्न करण्याचा प्रापंचिक जनांप्रमाणें ते विचार करूं लागले. पुढें काय झालें हें सर्वांना विदित च आहे.

ऐसें कोठें नाहीं हो वर्तलें ।
पूर्वी अवतारादिकांसी न जालें ।
मायामोहिनीनें ब्रह्मादिकां भुलविलें ।
नाना पुराणें आह्मीं ऐकिलीं ॥
समर्थदेवें ख्याती केली ।
सांगायासी ऐकायासी गोष्टी जाली ।
मूळ हनुमानमूर्ति प्रत्यया आली ।
समर्थमाता बोलिली तें जालें ॥

श्रेष्ठांना अत्यंत वाईट वाटलें. "वैराग्याचा भाग्यवाटा धाकट्या भावानें घेऊन प्रपंचाचा सडतर वाटा समर्थांनीं थोरल्यास दिला", असें मोठ्या प्रेमानें श्रेष्ठ ह्मणाले, त्यावेळीं त्यांचे डोळे पाण्यानें भरून आले.

गृहस्थाश्रमीं ऐशा मूर्ति । निर्माण होती पुण्यकीर्ति ।
पुत्रपौत्राभिवृद्धि सत्कीर्ति । गंगाधरस्वामी विस्तारिजे तुह्मी ॥

असें ह्मणून आतेष्टांनीं श्रेष्ठांचें सांत्वन केलें. राणादेवीची काय अवस्था झाली असेल ती वर्णन च करावयास नको. माता च ती. खुद्द श्रीसमर्थ च ह्मणत आहेत,

वीट नाहीं कंटाळा नाहीं । आलस्य नाहीं त्रास नाहीं ।
इतुकी माया कोठें चि नाहीं । माते वेगळी ॥ दा. १७–२–२७.

नाना उपाधी वाढऊं जाणे । नाना मायेनें गोऊं जाणे ।
नाना प्रीति लाऊं जाणे । नाना प्रपचाची ॥ दा १७-२-२८

त्या मायेला बळी पडले नाहींत असे एकटे समर्थ च.,

येथवर श्रीश्रेष्ठाचें चरित्र थोडें फार तरी सागता आलें, परतु यापुढचें त्याचे चरित्र लिहिण्यास मुळीं च साधन नाहीं म्हटलें तरी चालेल शके १५४२ पासून पुढें पन्नास वर्षांवर अधिक काळ श्रेष्ठानीं कसा घालविला हें कळण्याला काहीं मार्ग नसावा याचें वाईट वाटतें नाहीं म्हणायाला शके १५६६ चे सुमारास एकदा व शके १५७६ चे सुमारास दुसऱ्यादा श्रीसमर्थ जाबेस आले होते, त्या वेळचा थोडासा वृत्तान्त व एक दोन वेळा उभयता बधूचा जो परव्यवहार झाला तो, इतकी च काय ती माहिती ह्या पन्नास वर्षांतील देता येणार आहे. श्रेष्ठानीं भक्तिरहस्य ग्रथ शके १५९० त लिहिला. त्या ग्रथावरून श्रेष्ठाविषयीं काहीं अनुमानें काढता येण्यासारखीं आहेत, परतु तीं या प्रकरणात न देता श्रेष्ठाच्या कवितेसबधानें पुढील प्रकरण लिहावयाचें आहे, त्यात देणें बरें.

पुरश्चरण व तीर्थयात्रा सपवून श्रीसमर्थ शके १५६६ चे सुमारास जाबेस आले. " हा भिक्षा घेऊन जाणारा गोसावी नव्हे " हे समर्थांचे शब्द चोवीस वर्षांनीं कानीं पडता च "कोण, माझा नारोबा आला कीं काय ?" असा आतुरतेचा प्रश्न राणुबाईनीं करिता च "होय, आई हा मी च आलों" असें ह्मणून समर्थांनीं आईच्या पायावर मस्तक ठेविलें. नारोबासारख्या पुत्राचा वियोग झाल्यामुळें मातु श्रीचे डोळे रडरडून गेले होते, त्यामुळें समर्थांचें भव्य स्वरूप त्याना अवलोकन करता येईना, ह्मणून त्या कष्टी झाल्या त्यानीं नारोबाच्या मुखावरून नुसता हात फिरविला तों त्याची ती भव्य दाढी हातास लागली, तेव्हा "नारोबा तू बहुत थोर झालास, तुजेला मी आता कोणत्या दृष्टीनें पाहू " असे दु खाचे उद्गार मातु श्रींनीं काढिले मात्र तों च समर्थांनीं आईच्या नेत्रावरून हात फिरवून त्याना दिव्य दृष्टि दिली। आईच्या नजरेस नारोबाची भव्य मूर्ति पडली व त्याबरोबर च त्या मूर्तीचें सामर्थ्य हि तीस कळून आलें. नारोबा, ही भूतचेष्टा कोठें शिकलास ह्मणून मातुश्रींनीं प्रेमानें विचारल्यावरून समर्थांनीं त्या भूताचें सविस्तर वर्णन करून शेवटीं त्याचें नाव सागितलें—

सर्वां भूतांचें हृदय । नाम त्याचें रामराय ।
रामदास नित्य गाय । तें चि भूत गे माय ॥

मायलेकरांची ही भेट होत आहे तों आंत श्रेष्ठ संध्या करीत होते, त्यांस समजलें कीं नारोबा बाहेर आले आहेत. यज्ञोपवीत हातांत धरून तसे च ते बाहेर आले ! समर्थांनीं श्रेष्ठांच्या चरणीं मस्तक ठेविलें व श्रेष्ठांनीं त्यांना उचलून पोटाशीं धरिलें! त्या भेटीला उपमा श्रीराम आणि भरत यांच्या च भेटीची होय!

श्रीसमर्थ कांहीं काळ जांबेस राहून पुन्हा जाण्याचा विचार करूं लागले, तेव्हां मातुःश्री बहुत श्रमी जाल्या. त्यावरून समर्थांनीं मातुःश्रीस कपिलगीता सांगून त्यांना परम समाधानाची जोड करून दिली ! याचें नांव पुत्र ! आरंभीं समर्थांनीं आईला कष्टविलें खरें, परंतु तें आरंभींचे कष्ट दिले ह्मणून च अखेरीस त्यांना मातुःश्रीला कैवल्यपदाची प्राप्ति करून देतां आली!

यानंतर पुन्हा एकदां श्रीसमर्थ शके १५७६ चे सुमारास जांबेस आले होते, असा उल्लेख स्वानुभवदिनकरांत सांपडतो व त्यास समर्थप्रतापांत पुष्टि मिळते. तुपाच्या घागरीची जी गोष्ट आहे ती या भेटीचे प्रसंगीं घडली. या हि भेटीच्या वेळीं मातुःश्री होत्या. राणुबाईनीं देह ठेवल्याची मित्ती हनुमंतस्वामींनीं दिली आहे ती शके १५७७ ची ज्येष्ठ शुद्ध ३ होय. दरम्यान श्रीसमर्थांकडून आलेल्या पत्रांपैकीं दोन पत्रें हनुमंतस्वामींनीं बखरींत दिलेलीं आहेत, तीं श्रेष्ठांच्या वर्णनपर असल्यामुळें येथें देणें अवश्य आहे.

## पहिलें पत्र.

सकळ तीर्थांचें माहेर । सकळ गुणांचें भांडार ।
सकळ विद्येचा सागर । स्वरूप तुमचें ॥ १ ॥
तूं धीरपणें मेरु । तूं उदारपणें जळधरू ।
तूं गंभीरपणें सागरु । पीयूषाचा ॥ २ ॥
तूं पवित्रपणें वैश्वानरु । तूं समर्थपणें ईश्वरु ।
तूं प्रतापाचा दिनकरु । धगधगायमान ॥ ३ ॥
तूं सकळतीर्थांचें यश । तूं उंच आकाश ।
तूं मायेचा मूळपुरुष । सकळकर्ता ॥ ४ ॥
तूं विष्णूचें मूळस्थान । तूं योगियांचें ध्यान ।
तूं वेदशास्त्रांचें मथन । सार वेदांताचें ॥ ५ ॥

तूं सकळ सत्याचा साक्षी । अनंत माया तुझे कुक्षी ।
तुमचें निजरूप लक्षी । ऐसा कवणु ॥ ६ ॥
झुंजवायूसी आकळावें । गगन वोलांडूनि जावें ।
महातेजासी आच्छादावें । कवणेपरी ॥ ७ ॥
सप्तपाताळा तळवटीं । एकवीस स्वर्गाचे शेवटीं ।
पवाडा करीत ऐसी पोटीं । हांव कैंची ॥ ८ ॥
वसुंधरा ही एकसरी । घालोनियां मस्तकावरी ।
अंतरीक्ष गमन करी । ऐसा कवणु असे ॥ ९ ॥
आवर्णोदकाचा अंत । कैसा घ्यावा तो अद्भुत ।
तुमचे स्वरूपाचा निश्चितार्थ । कवण करी ॥ १० ॥

## दुसरें पत्र.

सकळ तीर्थांचें सार । सत्य स्वरूप निर्विकार ।
तुमचें चित्त तदाकार । निरंतर ॥ १ ॥
विमळ ब्रह्मपरायण । सगुण भक्तिसंरक्षण ।
विशेष वैराग्यलक्षण । तुमचे ठायीं ॥ २ ॥
मुक्त क्रियेचा अनादरु । स्वधर्मकर्मी अत्यादरु ।
आग्रहनिग्रहाचा विचारु । तो हि नसे ॥ ३ ॥
नसे कामनेचा लेश । जयंत्या पर्वांचा हव्यास ।
अंतरीं आवडे विशेष । हरिकथा निरूपण ॥ ४ ॥
तुमचे देह सार्थकाचे । सर्वदा परोपकाराचे ।
भगवंतें निर्मिलें बहुतांचें । समाधान ॥ ५ ॥
तुमचे चि वाग्विलासें । बहु पाखंड नासे ।
संशयातीत प्रकाशे । विमळ वस्तु ॥ ६ ॥
सन्मार्गीचा कैपक्षी । अनमार्ग करणें अलक्षी ।
लोक पावती प्रत्यक्ष । समाधान ॥ ७ ॥
दक्षता आणि चातुर्यता । वित्पन्नता आणि लीनता ।
उत्तम गुण सर्वज्ञता । तुमचे ठायीं ॥ ८ ॥
तुमचें स्वरूप वर्णवेना । ह्मणोनि देहाची वर्णना ।
युक्त अयुक्त मित्र जना । क्षमा केली पाहिजे ॥ ९ ॥

सर्वां भूतांचें हृदय । नाम त्याचें रामराय ।
रामदास नित्य गाय । तें चि भूत गे माय ॥

मायलेकरांची ही भेट होत आहे तों आंत श्रेष्ठ संध्या करीत होते, त्यांस समजलें कीं नारोबा बाहेर आले आहेत. यज्ञोपवीत हातांत धरून तसे च ते बाहेर आले ! समर्थांनीं श्रेष्ठांच्या चरणीं मस्तक ठेविलें व श्रेष्ठांनीं त्यांना उचलून पोटाशीं धरिलें! त्या भेटीला उपमा श्रीराम आणि भरत यांच्या च भेटीची होय!

श्रीसमर्थ कांहीं काळ जांबेस राहून पुन्हा जाण्याचा विचार करूं लागले, तेव्हां मातुःश्री बहुत श्रमी जाल्या. त्यावरून समर्थांनीं मातुःश्रीस कपिलगीता सांगून त्यांना परम समाधानाची जोड करून दिली ! याचें नांव पुत्र ! आरभीं समर्थांनीं आईला कष्टविलें खरें, परंतु ते आरभींचे कष्ट दिले ह्मणून च अखेरीस त्यांना मातुःश्रीला कैवल्यपदाची प्राप्ति करून देतां आली!

यानतर पुन्हा एकदां श्रीसमर्थ शके १५७६ चे सुमारास जांबेस आले होते, असा उल्लेख स्वानुभवदिनकरांत सापडतो व त्यास समर्थप्रतापांत पुष्टि मिळते. तुपाच्या घागरीची जी गोष्ट आहे ती या भेटीचे प्रसंगीं घडली. या हि भेटीच्या वेळीं मातुःश्री होत्या. राणुबाईनीं देह ठेवल्याची मित्ती हनुमतस्वामींनीं दिली आहे ती शके १५७७ ची ज्येष्ठ शुद्ध ३ होय. दरम्यान श्रीसमर्थांकडून आलेल्या पत्रांपैकीं दोन पत्रें हनुमंतस्वामींनीं बखरींत दिलेलीं आहेत, तीं श्रेष्ठांच्या वर्णनपर असल्यामुळें येथें देणें अवश्य आहे.

### पहिलें पत्र.

सकळ तीर्थांचें माहेर । सकळ गुणांचें भांडार ।
सकळ विद्येचा सागर । स्वरूप तुमचें ॥ १ ॥
तूं धीरपणें मेरु । तूं उदारपणें जळधरू ।
तूं गंभीरपणें सागरु । पीयूषाचा ॥ २ ॥
तूं पवित्रपणें वैश्वानरु । तूं समर्थपणें ईश्वरु ।
तूं प्रतापाचा दिनकरु । धगधगायमान ॥ ३ ॥
तूं सकळतीर्थांचें यश । तूं उंच आकाश ।
तूं मायेचा मूळपुरुष । सकळकर्ता ॥ ४ ॥
तूं विष्णूचें मूळस्थान । तूं योगियांचें ध्यान ।
तूं वेदशास्त्रांचें मथन । सार वेदांताचें ॥ ५ ॥

तूं सकळ सत्याचा साक्षी । अनंत माया तुझे कुक्षी ।
तुमचें निजरूप लक्षी । ऐसा कवणु ॥ ६ ॥
झुंजवायूसी आकळावें । गगन वोलांडूनि जावें ।
महातेजासी आच्छादावें । कवणेपरी ॥ ७ ॥
सप्तपाताळा तळवटीं । एकवीस स्वर्गांचे शेवटीं ।
पवाडा करीन ऐसी पोटीं । हांव कैंची ॥ ८ ॥
वसुंधरा ही एकसरी । घालोनियां मस्तकावरी ।
अंतरीक्ष गमन करी । ऐसा कवणु असे ॥ ९ ॥
आवर्णोदकाचा अंत । केसा घ्यावा तो अद्भुत ।
तुमचे स्वरूपाचा निश्चितार्थ । कवण करी ॥ १० ॥

## दुसरें पत्र.

सकळ तीर्थांचें सार । सत्य स्वरूप निर्विकार ।
तुमचें चित्त तदाकार । निरंतर ॥ १ ॥
विमळ ब्रह्मपरायण । सगुण भक्तिसंरक्षण ।
विशेष वैराग्यलक्षण । तुमचे ठायीं ॥ २ ॥
मुक्त क्रियेचा अनादर । स्वधर्मकर्मीं अत्यादरु ।
आग्रहनिग्रहाचा विचारु । तो हि नसे ॥ ३ ॥
नसे कामनेचा लेश । जयत्या पर्वाचा हव्यास ।
अंतरीं आवडे विशेष । हरिकथा निरूपण ॥ ४ ॥
तुमचे देह सार्थकाचे । सर्वदा परोपकाराचे ।
भगवंतें निर्मिलें बहुतांचें । समाधान ॥ ५ ॥
तुमचे चि वाग्विलासें । बहु पाखंड नासे ।
संशयातीत प्रकाशे । विमळ वस्तु ॥ ६ ॥
सन्मार्गांचा कैपक्षी । अनमार्ग करणें अलक्षी ।
लोक पावती प्रत्यक्ष । समाधान ॥ ७ ॥
दक्षता आणि चातुर्यता । वित्पन्नता आणि लीनता ।
उत्तम गुण सर्वज्ञता । तुमचे ठायीं ॥ ८ ॥
तुमचें स्वरूप वर्णवेना । म्हणोनि देहाची वर्णना ।
युक्त अयुक्त मित्र जना । क्षमा केली पाहिजे ॥ ९ ॥

सर्वा भूतांचें हृदय । नाम त्याचें रामराय ।
रामदास नित्य गाय । तें चि भूत गे माय ॥

मायलेकरांची ही भेट होत आहे तों आंत श्रेष्ठ संध्या करीत होते, त्यांस समजलें कीं नारोबा बाहेर आले आहेत. यज्ञोपवीत हातांत धरून तसे च ते बाहेर आले! समर्थांनीं श्रेष्ठांच्या चरणीं मस्तक ठेविलें व श्रेष्ठांनीं त्यांना उचलून पोटाशीं धरिलें! त्या भेटीला उपमा श्रीराम आणि भरत यांच्या च भेटीची होय!

श्रीसमर्थ कांहीं काळ जांबेस राहून पुन्हा जाण्याचा विचार करूं लागले, तेव्हां मातुःश्री बहुत श्रमी जाल्या. त्यावरून समर्थांनीं मातुःश्रीस कपिलगीता सांगून त्यांना परम समाधानाची जोड करून दिली! याचें नांव पुत्र! आरंभीं समर्थांनीं आईला कष्टविलें खरें, परंतु तें आरंभींचे कष्ट दिले ह्मणून च अखेरीस त्यांना मातुःश्रीला कैवल्यपदाची प्राप्ति करून देतां आली!

यानंतर पुन्हा एकदां श्रीसमर्थ शके १५७६ चे सुमारास जांबेस आले होते, असा उल्लेख स्वानुभवदिनकरांत सांपडतो व त्यास समर्थप्रतापांत पुष्टि मिळते. तुपाच्या घागरीची जी गोष्ट आहे ती या भेटीचे प्रसंगीं घडली. या हि भेटीच्या वेळीं मातुःश्री होत्या. राणुबाईंनीं देह ठेवल्याची मित्ती हनुमंतस्वामींनीं दिली आहे ती शके १५७७ ची ज्येष्ठ शुद्ध ३ होय. दरम्यान श्रीसमर्थांकडून आलेल्या पत्रांपैकीं दोन पत्रें हनुमंतस्वामींनीं बखरींत दिलेलीं आहेत, तीं श्रेष्ठांच्या वर्णनपर असल्यामुळें येथें देणें अवश्य आहे.

## पहिलें पत्र.

सकळ तीर्थांचें माहेर । सकळ गुणांचें भांडार ।
सकळ विद्येचा सागर । स्वरूप तुमचें ॥ १ ॥
तूं धीरपणें मेरु । तूं उदारपणें जळधरू ।
तूं गंभीरपणें सागरु । पीयूषाचा ॥ २ ॥
तूं पवित्रपणें वैश्वानरु । तूं समर्थपणें ईश्वरु ।
तूं प्रतापाचा दिनकरु । धगधगायमान ॥ ३ ॥
तूं सकळतीर्थांचें यश । तूं उंच आकाश ।
तूं मायेचा मूळपुरुष । सकळकर्ता ॥ ४ ॥
तूं विष्णूचें मूळस्थान । तूं योगियांचें ध्यान ।
तूं वेदशास्त्रांचें मथन । सार वेदांताचें ॥ ५ ॥

तूं सकळ सत्याचा साक्षी । अनंत माया तुझे कुक्षी ।
तुमचें निजरूप लक्षी । ऐसा कवणु ॥ ६ ॥
भुंजवायूसी आकळावें । गगन वोलांडूनि जावें ।
महातेजासी आच्छादावें । कवणेपरी ॥ ७ ॥
सप्तपाताळा तळवटीं । एकवीस स्वर्गांचे शेवटीं ।
पवाडा करीन ऐसी पोटीं । हांव कैची ॥ ८ ॥
वसुंधरा ही एकसरी । घालोनियां मस्तकावरी ।
अंतरीक्ष गमन करी । ऐसा कवणु असे ॥ ९ ॥
आवर्णोदकाचा अंत । कैसा घ्यावा तो अद्भुत ।
तुमचे स्वरूपाचा निश्चितार्थ । कवण करी ॥ १० ॥

## दुसरें पत्र.

सकळ तीर्थांचें सार । सत्य स्वरुप निर्विकार ।
तुमचें चित्त तदाकार । निरंतर ॥ १ ॥
विमळ ब्रह्मपरायण । सगुण भक्तिसंरक्षण ।
विशेष वैराग्यलक्षण । तुमचे ठायीं ॥ २ ॥
मुक्त क्रियेचा अनादरु । स्वधर्मकर्मी अत्यादर ।
आग्रहनिग्रहाचा विचारु । तो हि नसे ॥ ३ ॥
नसे कामनेचा लेश । जयत्या पर्वाचा हव्यास ।
अंतरीं आवडे विशेष । हरिकथा निरूपण ॥ ४ ॥
तुमचे देह सार्थकाचे । सर्वदा परोपकाराचे ।
भगवंतें निर्मिलें वहुतांचें । समाधान ॥ ५ ॥
तुमचे चि वाग्विलासें । वहु पाखंड नासे ।
संशयातीत प्रकाशे । विमळ वस्तु ॥ ६ ॥
सन्मार्गाचा केपक्षी । अनमार्ग करणें अलक्षी ।
लोक पावती प्रत्यक्ष । समाधान ॥ ७ ॥
दक्षता आणि चातुर्यता । वित्पन्नता आणि लीनता ।
उत्तम गुण सर्वज्ञता । तुमचे ठायीं ॥ ८ ॥
तुमचें स्वरूप वर्णवेना । ह्मणोनि देहाची वर्णना ।
युक्त अयुक्त मिन जना । क्षमा केली पाहिजे ॥ ९ ॥

सारांश, दोन्ही पत्रांत श्रीश्रेष्ठांचे गुणानुवादकीर्तन करवलें तितकें करून अखेरीस तुमच्या स्वरूपाचा निश्चितार्थ कोणास होणार आहे, असें जेथें समर्थ ह्मणत आहेत, तेथें इतरांनीं श्रेष्ठांचें वर्णन संपूर्ण करण्याची हांव धरणें व्यर्थ होय.

प्रपंचीं असोनि परमार्थ कराचा।
वरा विवराचा निरंजन॥ स्फुट ओ. ११४

या समर्थोक्तीप्रमाणें श्रेष्ठांचें वर्तन होतें. श्रेष्ठांनीं हि कांहीं मुमुक्षु जनांवर अनुग्रह करून त्यांचा उद्धार केला होता असें दिसतें. मुजे उपनांवाच्या एका शिष्याचा उल्लेख हनुमंतस्वामींच्या बखरींत आला आहे. दक्षिणगीर गोसांवी ह्मणून त्यांचे दुसरे एक शिष्य होते.* त्यांचा मठ जांबेस आहे. त्यांच्या विषयीं जांबेस एक दंतकथा सांगतात; ती अशी आहे कीं, या दक्षिणगीर बुवांचें प्राणीमात्रावर सारखें प्रेम असे. त्यांच्या ठिकाणीं भूतदया कांहीं विलक्षण होती. सर्वांनीं सुखी असावें अशी त्यांची नित्य वासना असे. कोणत्या हि जीवाला दुःखांत पाहिलें ह्मणजे यांच्या अंतःकरणांत भडभडून येत असे. देहभान विसरून त्या जीवाचें दुःख हरण करण्यास हे धांवून जावयाचे, मग तो जीव मुंगीचा असो, कुत्र्याचा असो, गाढवाचा असो किंवा माणसाचा असो! त्यांच्या नित्यक्रमापैकीं एक गोष्ट अशी होती कीं, रोज कित्येक शेर धान्य ते पक्ष्यांना टाकीत. यांना पाहिलें पुरें कीं, सर्व पक्षी, जनावरें यांच्या भोंवतीं प्रेमानें गोळा होत, मग माणसें होत होतीं यांत नवल नाहीं! तरी पण सज्जनांचें दुर्जनांनीं निष्कारण वैर करावें, ह्या जगांतील सामान्य नियमाप्रमाणें त्यांचे तेज सहन न करणारीं कांहीं माणसें होतीं च! त्यांनीं यांच्यावर कांहीं कुभांड रचल्यामुळें आंबडच्या अधिकाऱ्याकडून एकवार यांना बोलावणें आलें. जांबेहून आंबड चवदा कोस आहे. दक्षिणगीरबुवा जावयास घराचे बाहेर पडले. त्यांच्या भोंवतीं प्राणीमात्रांचा गराडा पडला. त्यातून आपला मार्ग काढीत ते जसजसे जाऊं लागले तसतसा त्यांच्या मस्तकावर चिमण्यांचा व इतर पक्ष्यांचा इतका दाट थवा झाला, कीं जणूं काय, त्यांच्यावर त्यांनीं छत्र च धरलें होतें. भूतदयेचा असला मूर्तिमंत पुतळा आवडास पोंचल्यावर अधिकारी त्याला शरण आले व

* कोणी ह्मणतात, हे गोसांवी प्रत्यक्ष श्रेष्ठाचे शिष्य नसून त्यांचे प्रशिष्य होते.

त्याची निंदा करणाऱ्या दुर्जनांचें उलटें पारिपत्य झालें हें सांगितल्यावांचून वाचकांचे लक्षात येणार नाहीं असें नाहीं.

केवळ दंतकथा आहे खरी, पण तींत उत्कट भूतदयेचें रहस्य असल्यामुळें येथें नमूद करून ठेवली आहे. ज्यांच्या शिष्यांचा किंवा प्रशिष्यांचा हा अधिकार, त्याचें वर्णन काय करावें! श्रेष्ठाच्या चरित्राविषयीं भक्तिरहस्यावरून कांहीं कांहीं कल्पना होतात, पण त्या पुढल्या प्रकरणांत नमूद करण्याविषयीं इतक्यांत मीं म्हटलें आहे, तेव्हां येथें श्रेष्ठाचें चरित्र संपलें म्हणावयाचें.

शके १५९९ च्या फाल्गुन वद्य १३ सह १४ स श्रेष्ठानीं दहिफळास आपला अवतार संपविला. श्रेष्ठांचे कुटुंबानें पतीबरोबर परलोकास जावें असा निश्चय करून, अमावास्येचे दिवशीं दीर्घ स्वरानें "राम" असा उच्चार करून देहाचें विसर्जन केलें. जांबेपासून दहिफळ उत्तरेस वीस कोस येईल. शेवली प्रांतांतील कोणी अधिकारी श्रेष्ठांचे शिष्य होते, त्यांचेकडे श्रेष्ठ लग्नास गेले असतां परत येतांना वाटेंत दहिफळास त्यांनीं देह ठेवला असें हनुमंतस्वामी म्हणतात. पण दहिफळास व शेवलीस परंपरेनें लोक असें सांगतात कीं, श्रेष्ठ काशीयात्रेला निघाले असतांना वाटेंत त्यांनीं दहिफळास कायमचा मुक्काम केला. दहिफळास गावाच्या बाहेर अर्ध्या कोसावर खंदारे पाटलांच्या एका शेतांत श्रेष्ठाच्या समाधीचें वृंदावन आहे. समाधीला मोगलाईंतून ८० रुपये वर्षासन आहे. पुजारी पूजा करीत असतात.

रामचंद्रबावा व श्यामजीबावा असे श्रेष्ठांना दोन पुत्र होते. ते या वेळीं लहान होते. श्रेष्ठांच्या अवतारसमाप्तीचें वृत्त कळतां च समर्थांनीं उद्धव गोसांवी यांस जांबेस पाठविलें. त्याबरोबर उभयतां चिरंजीवांकरितां उपदेशपर दहा श्लोक त्यांनी दिले होते, ते, सर्व काळीं व स्थळीं, बालांना उपयुक्त असल्यामुळें येथें देणें आवश्यक आहे.

### श्रीसमर्थांचा

## मुलांस उपदेश

खरें सत्य बोला यथातथ्य चाला।
बहू मानिती लोक तेणें तुम्हांला।
धरा बुद्धि पोटीं विवेकी मुलें हो।
बरा मूण बो अंतरामाजि राहो ॥ १ ॥

वरें दांत घांसोनियां तोंड धांवें । कळाहीन कां शूद्रमुखी नसावें ।
सदां सर्वदा प्रेत्न सांडूं नको रे । बहूसाल हा खेळ कामा नये रे ॥२
दिसांमाजि कांहीं तरी तें ल्याहावें । प्रसंगें अखंडीत वाचीत जावें ।
वयें श्रेष्ठ रे दास्य त्याचें करावें । बरें बोलणें सत्य जीवीं धरावें ॥ ३
बहू खेळ खोटा सदालस्य खोटा । समस्तांसि भांडेल जो तो चि खोटा।
बहूतां जणांलागि जीवें झिजावें । भले सांगती न्याय तेथें भिजावें॥४॥
हिशेवीं सदा न्याय सांडूं नका रे । कदांचीत अन्याय होतां धका रे।
जनीं सांडितां न्याय रे दुःख होतें । महां सूख तें ही अकस्मात जातें॥५
प्रचीतीविणें बोलणें वेर्थ वांयां । विवेकेंविणें सर्व ही दंभ जायां ।
बहू सज्जला नेटका साज केला । विचारेंविणें सर्व ही व्रेर्थ गेला ॥६॥
वरी चांगलें अंतरीं गोड नाहीं । तया मानवाचें जिणें वेर्थ पाहीं ।
वरी चांगलें अंतरीं गोड आहे । तयालागि कोण्ही तरी शोधिताहे ॥७॥
सदा अंतरीं गोड तें सांडवेना । कदा अंतरीं वोखटें तें खपेना ।
ह्मणोनी वरा गूण आधीं धरावा । महां घोर संसार हा नीरसावा ॥८॥
भला रे भला बोलती तें करावें । बहूतां जनांच्या मुखें येश घ्यावें ।
पुढें शेवटीं सर्व सांडूनि जावें । मरावें परी कीर्तिरूपें उरावें ॥ ९ ॥
बरा वोखटा सर्व संसार जाला । अकस्मात येईल रे येमघाला ।
ह्मणोनी भले सांगती सत्य चाला । जनीं दास तो शीकवीतो मुलांला१०

श्रीसमर्थांनीं शके १६०३ च्या माघ वद्य ९ स श्रीसज्जनगडीं देह ठेविला व तेव्हांपासून प्रतिवर्षी गडावर दासनवमीचा उत्सव सुरू झाला. चाफळास रामनवमीचा उत्सव होत च असे, तो पुढें चालू राहिला. या दोन्ही ठिकाणची व्यवस्था श्रीसमर्थांचे शिष्य पहात. काळांतरानें या व्यवस्थेसंबंधानें कांहीं शिष्यमंडळींत ईर्षा सुरू झाली. दिवाकर गोसांवी व उद्धव गोसांवी यांचें पटेनासें झालें. कल्याणस्वामींनीं मध्यस्ती केली. श्रीचे अभिमानी सर्व च होते; त्यांनीं विचार करून जांबेहून श्रेष्ठांच्या चिरंजीवांस परंपरा पुढें चालविण्यासाठीं आणावें असें ठरविलें. परंतु नंतर कांहीं काळ महाराष्ट्रांत धामधुमीचा गेल्यामुळें तो विचार लांबणीवर पडला. मध्यंतरीं आधीं धामजी यांनीं व नंतर रामजी यांनीं अवतार संपविले. महाराष्ट्रांत शांतता झाली. जांबेस आणि गडावर श्रीचे साक्षात्कार झाले, तेव्हां जांबेस जाऊन समर्थभक्तांनीं श्रेष्ठांचे नातु ह्मणजे रामजीबुवांचे चिरंजीव गंगाधरस्वामी

यांस विशति केली. त्यावरून ते शके १६३२ च्या श्रावण शुद्ध ५ स सज्जनगडीं येऊन दाखल झाले. या सर्व हकीकतीस कागदपत्रांचा आधार असून शिवाय गिरिधरस्वामी हि समर्थप्रतापांत ह्मणतात:—

मोहरे मोहरे इरेसी पडती। मोहरे मोहरे वळावती।
मोहरे मोहरे भक्ति करुनि दाविती। प्रीतिकलहो दिसती परमार्थें॥

नाना देशकाळें प्रसंगें वर्तती।
नाना राजयोगें राजकारणें करिती।
नाना अध्यात्म ग्रन्थीं विवरणें विवरिती।
विवेकविचारें परमार्थें॥
बहु नायक महंत जाले।
महंत महंतीं विचार केले।
मुख्य सज्जनपर्वतीं साक्षात्कार जाहाले।
समर्थदेवें आज्ञा केली॥
समर्थे जांबुवतीपुरीसी साक्षात्कार केले।
समर्थमहंत गंगातीरासी गेले।
गंगाधरस्वामी गंगातीरस्थ प्रार्थिले।
समर्थभजनें वाढावया॥
समर्थे आसनीं मंत्रोद्धार केले।
समर्थे मस्तकीं दासबोध धरिले।
समर्थे कंथा मेखळा देऊनि स्थळासी आणिले।
गंगाधरस्वामी श्रेष्ठपौत्र स्वानंदें॥

॥ श्रीराम ॥

२

# श्रीश्रेष्ठाची कविता

भक्तिरसामृत भूमंडळीं । सुसेव्य सर्वदां असता जवळी ।
पाप संताप दुःख दारिद्र्य कळीं । काय करिती बापुडीं ॥ भ. ६४-१०

## ( १ ) सामान्य विचार

श्रीसमर्थांचे जसे दासबोध व आत्माराम हे दोन ग्रंथ तसे श्रीश्रेष्ठांचे भक्तिरहस्य आणि सुगमोपाय हे दोन ग्रंथ होत. करावयाचा तेवढा सर्व बोध दासबोधांत करून हि कांहीं शिष्य जेव्हां कोरडेच्या कोरडे राहिले, तेव्हां त्यांच्यासाठीं श्रीसमर्थांनीं आत्माराम नांवाचा लहानसा ग्रन्थ निर्माण केला; तद्वत् भक्तिरहस्याचें सारें रहस्य श्रेष्ठांनीं सुगमोपायांत थोडक्यांत आणलें आहे. दासबोधानंतर आत्माराम ग्रंथ लिहिला गेला हें अंतःप्रमाणावरून जसें सिद्ध आहे, तसें मात्र श्रेष्ठांच्या ग्रंथासंबधानें ह्मणतां येत नाहीं. तथापि भक्तिरहस्यानंतर सुगमोपाय लिहिला गेला असावा, असें मला वाटतें. भक्तिरहस्याचा रचनाकाळ ग्रन्थांत दोन ठिकाणीं आला आहे.

चारि सहस्र सात शतें सत्तरीं चपें होते वेळीं ।
अन्योन्य आरंभलें भूमंडळीं ॥

असा उल्लेख ७३ व्या प्रकरणांत आला आहे. भक्तिरहस्य ग्रन्थांतील शेवटची ओंवी तर स्पष्ट च आहे.

शकें दशकें उणीं सोळा शतें । कीलकनाम संवत्सरातें ।
विजयादशमीसी भक्तविजयातें । ग्रन्थ संपूर्ण पूर्णफळद ॥

शके १५९० च्या विजयादशमीस भक्तिरहस्य ग्रंथ संपूर्ण झाला ! ह्मणजे आज बरोबर २४१ वर्षांनीं सदरहु ग्रन्थ प्रथम प्रसिद्ध होत आहे. सुगमोपायाचा रचनाकाळ ग्रन्थांत दिला नाहीं व तो ठरविण्यास अन्य साधनें हि आज उपलब्ध नाहींत.

प्रस्तुत भागाचे शेवटीं श्रेष्ठांची स्फुट कविता दिली आहे. ती इतकी थोडी असावी यावर माझा क्षणभर सुद्धां विश्वास बसत नाहीं; परंतु काळाच्या तावडींतून आज आपणांस इतकी च लाभत आहे, असें ह्मटलें पाहिजे. जांबेच्या आसपास पांच पन्नास कोसांत याहून जास्त कविता मिळाली नाहीं व जी मिळाली ती हि निवडून काढावी लागली आहे. श्रेष्ठांचें नांव 'रामीरामदास' खरें, परंतु समर्थांची हि 'रामीरामदास' या नांवानें कांहीं कविता आहे व न जाणो 'रामदास' एवढ्या च नांवावर श्रेष्ठांची हि कांहीं कविता असेल. अशा स्थितींत श्रेष्ठांची ह्मणून जी थोडी स्फुट कविता दिली आहे, तींत एकादें दुसरें प्रकरण कदाचित् समर्थांचें हि असण्याचा संभव आहे. तथापि यांत बिघडत कांहीं च नाहीं. रामदासांची कविता रामीरामदासांची किंवा रामीरामदासांची कविता रामदासांची समजण्यांत आली तर उभयतां बंधूंमध्यें, फार तर, वाटणी करण्यांत चूक झाली असें ह्मणतां येईल; परंतु हें 'जुनें ठेवणें' एका च घरांत राहणार आहे. ही निवड करितांना मी एक सामान्य धोरण ठेविलें आहे. जांबेस किंवा जांबेच्या आसपास 'रामीरामदास' नांवानें कविता मिळाल्यास ती सकृद्दर्शनीं श्रेष्ठांची व कृष्णातटाकीं मिळाल्यास ती समर्थांची मानावयाची.

समर्थ किंवा श्रेष्ठ आपणांस 'दास' ह्मणवीत, यासंबंधानें एके ठिकाणीं श्रेष्ठांनीं उलगडा केला आहे.

कदापि ऐसें ह्मणती अभक्त जन।
दास हें अनुचित विप्राभिधान।
तरी हा आक्षेप चि अज्ञान।
करी जयाचा तयासी॥ सु. १०-५३
अहो शूद्र सेवक जैसा तिहीं वर्णांस।
तैसें मनुष्यदास्य अनुचित ब्राह्मणांस।
तें दूषण योजील हरिभक्तांस।
तो चतुर कीं मूर्ख॥ ५४॥
विप्र दास व्हावया ईश्वराचे।
संचित पाहिजे कीं जन्मोजन्मींचें।
नारदादि ह्मणविती जयांचे।
दासाचे दास॥ ५५॥

ब्राह्मणानें मनुष्याचें दास्य करू नये, हें ह्मणणें ठीक आहे; परंतु ईश्वराचें दास्य घडण्यास जन्मजन्मांतरींचें पुण्य च सग्रही असावें लागतें! जितेंद्रियता, निष्कपटपणा, विहिताचरण हीं ज्याच्या ठिकाणीं आहेत ते च रामाचे खरे दास, बाकी सर्व मिथ्या वेषधारी शुकसारण होत.

*श्रेष्ठांच्या मुख्य दोन ग्रन्थांतील विषयाचा विचार करण्यापूर्वी श्रेष्ठांनीं* आधाराला घेतलेल्या ग्रन्थांचा उल्लेख करणें आवश्यक आहे. भारत, भागवत व रामायण हे तीन ग्रन्थ श्रेष्ठांच्या अभ्यासांतले होते, हें सांगण्यांत कांहीं नवीन शोध लागलासा होणार नाहीं. या सर्वमान्य ग्रन्थांचा अलिकडे आपणास जरी विशेषसा परिचय नसला तरी शंभरवर्षांमागें असें एक हि ब्राह्मणक्षत्रियांचें घर *नसे कीं, ज्यांत या ग्रन्थांचीं नित्यश. पारायणें होत नसत! हल्लीं आपण जी विद्या पढतों तींतून या ग्रन्थांना वगळण्यांत* आलें आहे, हें दुर्दैव होय! तथापि पुनरपि या ग्रन्थांचा व त्यांतील ज्ञानाचा आश्रय करावा अशी समाजाला प्रेरणा होत असल्याचीं तुरळक चिन्हें आतांशीं दिसू लागलीं आहेत! एका महापुरुषाचे उद्गार आहेत कीं, "रामायण आणि महाभारत हे दोन ग्रन्थ जोंवर आहेत ह्मणजे जोंवर त्यांचें आमच्याकडून अध्ययन होत आहे तोंवर भरतभूमीनें स्वत.च्या जीविताविषयीं निराश होण्याचें कारण नाहीं."

या तीन ग्रन्थांशिवाय गौतमस्मृति, अत्रिस्मृति, मन्वादिक अष्टादश स्मृतिकारांच्या स्मृति, शारीरक भाष्य, ब्रह्मपुराण, ब्रह्मांड पुराण, स्कंद पुराण, गरुड पुराण, बृहन्नारदीय पुराण, गुरुगीता, भगवद्गीता, इत्यादि ग्रन्थांचा *श्रेष्ठांच्या ग्रन्थांत स्पष्ट नामनिर्देश च आहे. श्रुति, स्मृति आणि पुराणें यांचा मथितार्थ काढून आपण तो श्रोत्यांस सादर केला आहे असें श्रेष्ठांनीं एके ठिकाणीं ह्मटलें आहे. भर्तृहरीचीं शतकें हि त्यांच्या वाचनांतून चुकलीं न*व्हतीं असें भक्तिरहस्याच्या ५४ व्या प्रकरणाच्या ४३ व्या ओंवीवरून उघड होत आहे संस्कृतांतील या ज्ञानभांडाराशिवाय श्रीज्ञानेश्वर, श्रीएकनाथ इत्यादि साधुसंतांच्या ग्रन्थांचा श्रेष्ठांना पूर्ण व्यासंग होता, असें श्रेष्ठांच्या ग्रंथावरून विशेषत. सुगमोपायावरून वाचकाचे लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. फार काय सांगावें, परंतु कांहीं कांहीं उल्लेखावरून आपल्या धाकन्या बंधूचा 'दासबोध' ग्रन्थ हि श्रेष्ठांच्या अवलोकनांतून गेला असावा, असें मला वाटतें, आणि यांत नवल हि नाहीं.

( १ ) मज नाहीं तुज न साजे ॥ भ. ६१-७९
( २ ) ब्राह्मण तो च जो ब्रह्मविद ॥ भ. ७१-६४
( ३ ) निधाना आड असे विवसी ॥ भ. ७६-३
( ४ ) खरीं खोटीं नाणीं एकवाटलीं ।
परी परीक्षक निवडी वेगळालीं ॥ भ. ७७-१
( ५ ) असो कांहीं च न करवे जऱ्ही ।
तरी बैसले निजले ठाई तऱ्ही ।
भगवन्नाम स्मरतां वैखरीं ।
कांहीं च आयास न लगती ॥ भ. ७७-४३
( ६ ) येथें शिष्यप्रज्ञा कारण ॥ सु. ३-१५
( ७ ) सुगमोपाय-प्रकरण ७
( ८ ) सुगमोपाय-प्रकरण ८

इत्यादि श्रेष्ठांच्या ग्रन्थांतील वचनें व स्थळें दासबोधाच्या नित्य वाचकांस पट्कन् दासबोधांतून काढून दाखवितां येतील; असो.

श्रेष्ठांचे ग्रन्थाचा भर विशेषतः अध्यात्मविद्येवर जरी आहे, तरी त्यांच्या ग्रन्थांत व्यावहारिक उपदेशाचा भाग पुष्कळ आला आहे; आणि त्यामुळें सर्व तऱ्हेच्या वाचकांस श्रेष्ठांची कविता प्रिय झाल्यावांचून राहणार नाहीं, असा मला पूर्ण भरसा आहे.

## ( २ ) श्रेष्ठ आणि समर्थ

श्रेष्ठ आणि समर्थ यांचे ग्रन्थ भक्तिरहस्य व दासबोध मननपूर्वक वाचून मनाला प्रश्न करावा कीं, या उभयता बधूच्या ग्रन्थांचें विशिष्ट स्वरूप काय आहे व स्वरूपांत फरक असल्यास तसा फरक पडण्याचीं कारणें कोणतीं. श्रीमत् दासबोध ग्रन्थांत काय आहे, त्याचें स्वरूप कसें आहे, त्याचें प्रयोजन कोणतें, त्यानें कोणतें कार्य केलें व तें च कार्य केव्हां हि करण्याची पात्रता त्याच्या निदिध्यासानें समाजाचे ठिकाणीं कशी येऊ शकेल इत्यादि प्रश्नाचा विचार आपण मागें केला च आहे. आतां भक्तिरहस्याच्या स्वरूपाचा आपणांस विचार कर्तव्य आहे. तदनंतर दोन्ही ग्रन्थांच्या स्वरूपांत फरक दिसून आल्यास त्याचीं कारणें शोधूं.

श्रेष्ठांहून समर्थ सरासरी सवादोन वर्षांनीं लहान होते. दोघे हि एका च काळांत होऊन गेले. तत्कालीन देशस्थितिसंबंधानें भक्तिरहस्यांत ठिकठिकाणीं

अशा ह्या उद्वेगकारक कलियुगात पापाचरण करावयाचें नाहीं अशा पुष्कळ नियम केला आणि तदनुसार मुमुक्षु सावध राहिला तरी, फार तर मुख्य जीं चार पातकें तीं स्वतः करण्याचें तो टाळील,

परी परकीय ससर्गासी काय करी ॥

परंतु परधर्मीय परकीयाच्या ससर्गापासून जे अपरिहार्य पातक लागतें तें कोणाला आणि कसें टाळवेल ? श्रेष्ठ वैतागून ह्मणतातः—

जयाचें रामीं मीनलें मन । तया काय करिती बाह्य दुर्जन ।
तनुतेसी तरी आहे च निदान । दास लीन श्रीरामीं ॥७३-८८

यापेक्षां, श्रेष्ठ विचारतात, अशा सकटकाळीं, मोठा भगवद्भक्त झाला, तरी तो निराळें काय करणार ?

यथार्थ कृपाळ सर्वेश्वर । जें शरीर आहे नश्वर ।
नाहींतरी महा भागवत नर । काय करिते ये काळीं ॥७३-९०

असा हा विकट प्रश्न श्रेष्ठाना जसा पडला होता तसा च तो समर्थांना हि पडला होता. कलियुगात वर्णाश्रमधर्म चालत नाहींत ह्मणून भगवद्भक्ति योजिली, ती हि कालपरत्वे घडत नाहीं, तेव्हा आता काय करावें ? श्रेष्ठ उत्तर देतातः-

ऐसिये संकटीं हें च गमे । रामनाम जिव्हां जपावें अंतरयामें ।
तेणें सर्व हि पापजाळ निर्गमे । हरिचिंतनें नान्यथा ॥७३-७२

आणि समर्थ ह्मणतात, हे तर खरें च, नामस्मरण हा तर सर्व कर्मांचा पाया आहे, आमच्या सर्व चळवळींना भगवताचें अधिष्ठान पाहिजे यात तिळमात्र सदेह नाहीं, पण त्याबरोबर प्रयत्न हि पाहिजे.

अकलवंद नाहीं जेथें । अवघें चि विस्कळित तेथें ।
येकें अकलेविण तें । काये आहे ॥ दासबोध १२-९-२८
घालून अकलेचा पवाड । व्हावें ब्रह्मांडाहून जाड ।
तेथें कैचें आणिलें द्वाड । करटपण ॥ २९ ॥
येथें आशंका फिटली । बुद्धि येत्नीं प्रवेशली ।
कांहींयेक आशा वाढली । अंत:कर्णीं ॥ ३० ॥

अशीं या प्रश्नाला दोघाकडून दोन उत्तरें मिळतात. समाजाला निकृष्टा-वस्था आली ह्मणजे सज्जनाच्या मनाची स्थिति द्विधा होते. कित्येक सत्पुरुष

अनन्य भावानें परमेश्वराकडे धांव घेतात, त्याला आळवितात, किंबहुना सर्वस्वीं आत्मनिवेदन करितात. दुसरे कित्येक असतात ते, हें सर्व करून, प्रयत्नवाद सांगतात व सर्वांना कार्याला प्रवृत्त करितात. पहिल्या प्रकारच्या सत्पुरुषांचा आशिर्वाद यांच्या मस्तकीं असतो व त्यांना प्रयत्नांत यश येतें. श्रेष्ठांची च स्थिति पहा. समाजाच्या अवनत स्थितीचा विचार करतां करतां त्यांचें मन उद्विग्न झालें व विषयानुसंधान क्षणभर बाजूस ठेवून ते परमेश्वरास अनन्य भावानें आळविते झाले:—

**आतां हे च प्रार्थना अच्युता । स्वभक्ताकृति यथोचिता ।**
**स्वरूपीं सामावीं अनंता । मग हो पुढें भलतें च ॥७३—९१**
**पुढें हि स्वभक्त बीजाकारें । रक्षिसील च काळानुसारें ।**
**परि ते हि धैर्यवंत होतीं अंतरें । विषकंडिकाकीटवत ॥९२॥**
**अथवा तुझिया संरक्षणा । कोण जाणे नारायणा ।**
**कैसें रक्षिलें प्रेमपरायणा । मार्कंडेया कल्पांतीं ॥ ९३ ॥**

सारांश सत्पुरुषांनीं, परमेश्वराची केलेली प्रार्थना व पुढिलांना दिलेले आशिर्वाद कधीं हि फुकट जात नाहींत, आजपर्यंत कधीं गेले नाहींत व पुढें जाणार नाहींत. किंबहुना पुढिलांच्या प्रयत्नांचें भांडवल ह्मणजे च पूर्वगामी महापुरुषांच्या प्रार्थना व आशिर्वाद होत! अशा प्रकारें श्रेष्ठ पुरुषांची योग्यता जाणून त्यांचा आशिर्वाद मिळविण्याची महत्त्वाकांक्षा समाजाला नेहमीं असाव-यास पाहिजे. श्रेष्ठ आणि श्रेष्ठतुल्य अवतारी पुरुष पूर्वकाळीं झाले ह्मणून श्रीसमर्थांचा अवतार संभवला. श्रेष्ठांपासून शिकून त्यांत आपली भर घालून समर्थांनीं आपला ग्रन्थ व पन्थ हीं निर्माण केलीं.

भक्तिरहस्य ग्रंथ दासबोधानंतरचा असेल पण श्रेष्ठ व इतर पूर्वगामी भगवद्भक्त यांची शिकवण हा पाया आहे व समर्थांची शिकवण हें शिखर आहे. आराध्यदेवतेच्या मंदिराकडे जातांना शिखराकडे अंतरावरून साहजिक प्रथम नजर गेली आणि ह्मणून श्रीमत् दासबोधानें प्रथम मन वेधलें व आतां चार वर्षांनीं पायाचा विचार करण्याचा योगायोग येत आहे! असो.

आतां प्रश्न असा आहे कीं, श्रेष्ठ आणि समर्थ या उभयतां बंधूंच्या उत्तरांत असा फरक कां पडावा? याच्या कारणाचा उमज पडण्यासाठीं उभयतांचे चरित्र पाहिलें पाहिजे. कोणत्या हि ग्रन्थाचें खरें रहस्य कळण्यास ग्रन्थकाराचें चरित्र अवगत असावें लागतें. समर्थांचें चरित्र सर्वविश्रुत च आहे. मागील

३ तामसोत्तमा—दुसऱ्यानें केलेली भक्ति पाहून मत्सरानें करावयाची ती.

४ राजसाधमा—धनधान्यादि मनोरथ पुरावे ह्मणून करावयाची ती.

५ रजोमध्यमा—कीर्ति व्हावी ह्मणून करावयाची ती.

६ राजसोत्तमा—सालोक्यादि प्राप्तीकारणें करावयाची ती.

७ सात्विकाधमा—स्वकीय पापक्षयाकारणें करावयाची ती.

८ सात्विकमध्यमा—देव भक्तिप्रिय आहे ह्मणून करावयाची ती.

९ सात्विकोत्तमा—देवाचे आपण दास आहोंत अशा बुद्धीनें करावयाची ती.

१० उत्तमोत्तमा—

ईश्वर ध्यान मी च ईश्वर।
मजमाजीं मद्रूप हें चराचर।
दास हि समरस निरंतर।
ते भक्ति उत्तमोत्तम ॥ ६-२१

हें कलियुग जरी अनेक दोषांनीं युक्त असलें तरी त्यांत एक मोठें गुण आहे तें हें कीं, मोक्षप्राप्तीचें साधन त्या मानानें या युगीं सोपें आहे. जी गोष्ट कृतयुगांत ध्यानानें, त्रेतायुगीं यज्ञदानानें, द्वापारांत पूजनानें, प्राप्त होत असे ती या कलियुगात केवळ कीर्तनानें प्राप्त होत आहे.

ह्मणौनी धन्य धन्य हें कलियुग। पावलें धन्य धन्य जग।
भगवद्भक्त महाभाग। अनायासें तरताती ॥ ६-३९

श्रेष्ठ ह्मणतात, अशा या भक्तीला वर्णाश्रमाचा प्रतिबंध नाहीं. सर्व वर्णांत श्रेष्ठ अशा ब्राह्मणकुळांत मनुष्य जन्माप्त आला असला आणि तो जरी षट्कर्मयुक्त असला तरी जर तो भक्तिविहीन असेल तर तो विप्र श्वपचाहून हि हीन समजावा. सदाचाराला भक्तीची जोड पाहिजे. भक्तीवांचून नुसता सदाचार दुर्बळ होय.

काय वर्णघरिष्ठीं जन्मोनि।
काय श्रुति पुराणं विचार विद्या अभ्यासूनि।
परमेशभक्तिभावें धन्य त्रिभुवनीं।
ह्मणोनि भाव धरा तरा ॥ ४०-५५

, त्या च प्रमाणें भक्ति करावयाची ती कर्मपूर्वक असावयास पाहिजे. भक्ताला कर्माची अपेक्षा नाहीं अशी जर कोठें समजूत असेल तर ती चुकीची होय. आराध्य देवाची भक्ति करण्यास गायन, नृत्य इत्यादि साधनांची आवश्यकता नाहीं, एक फक्त प्रेमाचा जिव्हाळा पाहिजे असतो.

हृदयीं धरूनिया प्रेम । मद्भक्त जो निःकाम ।
सदा स्मरली माझें नाम । तयाचा मी विकिला ॥ ६-४२

परमेश्वराची भक्ति जी करावयाची ती अनन्य भावानें केली पाहिजे. भक्ति ह्मणजे कांहीं परमेश्वराची फसवणूक नव्हे. काळ आनंदाचा असो किंवा संकटाचा असो, ज्याच्या उपासनेंत अंतर पडत नाहीं तो च खरा अनन्य भक्त व त्यानें केलेली भक्ति ती च सदृढ भक्ति होय. भक्ति दृढ आणि उपास्य-दैवत समर्थ अशी जोड मिळाल्यावर आणखी काय पाहिजे !

आराध्य देव अति समर्थ । परी भक्ताचा दृढ भावार्थ ।
तरी तें भक्तिप्रेम व्यर्थ । होईल कां हो ॥ ५६।३

कधीं होणार नाहीं. स्वतःच्या दोषाचा कंटाळा येऊन पश्चात्तापयुक्त होऊन सद्गुरूस शरण गेलें पाहिजे. अनुताप उत्पन्न होणें ह्मणजे मोक्षप्राप्तीचा अर्धा अधिक मार्ग आक्रमून जाणें होय.

तुजएवढा नाहीं कृपानिधि । मजएवढा नाहीं अपराधी ।
तूं पावन मी पतित जडधी । उद्धरीं शरण आलों जी ॥ ५५-४३

अशा अनन्य भक्ताची उपेक्षा सद्गुरूंनीं कधीं हि केली नाहीं. भक्ति करावयाची ती निष्काम केलेली बरी. निष्काम भजनाचें महत्त्व श्रीसमर्थां-नीं हि दासबोधाच्या दहाव्या दशकाच्या सातव्या समासांत उत्कृष्ट दर्शविलें आहे. निष्काम भक्ति पाहून देव ह्मणतोः—

माझे भक्त अति निःकाम । मी चालवीं त्यांचें योगक्षेम ।
भक्तकुटुंबी हें माझें नाम । विबुध सदा वर्णिती । ५०-५६
सकाम जे भजती सहज । त्यांचें स्वल्पें च पुरलें भोज ।
निःकामाचें तरी मज । सर्वस्वेंसीं चालवणें ॥ ५०-५७

हें सर्व खरें असलें तरी आज च कांहीं सर्वजन अनन्यभावेंकरून परमे-श्वरास शरण जात नाहींत. सिद्धांत मात्र इतका खरा कीं, हरिभक्तीवांचून व भगवत्प्रसादावांचून या कलियुगीं बंधमुक्ति नाहीं. आणि ह्मणून पहिल्या च प्रकरणांत श्रेष्ठ ह्मणतातः— · ·

तथापि ज्याची जितुकी शक्ति । तैसी करावी हरिभक्ति ।
हरिवांचूनि बंधमुक्ति । कदा नव्हे कलियुगीं ॥ ४९ ॥
ऐसें नाना ग्रंथांचें तात्पर्य । ऐसें चि बोलत आले आर्य ।
भगवद्भक्त्या कृतकार्य । होईजे भगवत्प्रसादें ॥ ५० ॥

अशा रीतीनें भक्तिरहस्यांत भक्तीचें महात्म्य श्रेष्ठांनीं वर्णिलें आहे. हरिभक्तिपरायण भागवत कोणास ह्मणावें ह्मणून श्रेष्ठांनीं ५१ व्या प्रकरणांत ५४ पासून ७५ व्या ओंवीपर्यंत भागवतलक्षणें दिलीं आहेत तीं वाचकांनीं अवश्य वाचावीं. तीं लक्षणें आपल्या श्रोत्यांच्या मनावर ठसावीं ह्मणून तप, दान, व्रतें यांचें महत्व सांगून हरिहरभक्तांच्या प्रेमळ कथा श्रेष्ठांनीं वर्णिल्या आहेत. त्या महान् भगवद्भक्तांच्या कथा वर्णन करण्यांत आपला एक खाजगी हेतु श्रेष्ठांनीं एके ठिकाणीं व्यक्त केला आहे, तो साधुसंतांच्या नैसर्गिक थोरपणाला शोभण्यासारखा च आहे.

तया भावार्थाचा वारा । कांहीं तऱ्ही लागो या शरीरा ।
ह्मणौनि वर्णितसे आर्यागिरा । देवा भक्ताचा सोहळा ॥ ४७-३२

त्या ईश्वरावतारी भक्तांच्या प्रेमळ कथा वर्णन करीत असतां त्यांच्या भक्तिभावाचा वारा किंचित् तरी आपणांस लागावा, त्यांच्या मार्गानें जाण्याची आपणांस स्फूर्ति व्हावी व तेणेंकरून आपलें व आपल्या बरोबर आपल्या श्रोत्यांचें कल्याण व्हावें असें श्रेष्ठ ह्मणतात.

पऱ्हवीं काय हे महाराष्ट्रवाणी । ईचिण पडली होती वाणि ।
व्याकर्ण वितपत्ति श्लाघ्यवाणी । ते तरी पदोपदीं कळतसे ॥ ४७-३३

भगवद्भक्तांच्या कथा गाण्यांत साधुसंतांचा आणखी एक उद्देश असा असतो कीं, त्या कथा वाचून तरी वाचकांस आपल्या दोषांचा कटाळा यावा, त्यांच्या ठिकाणीं भक्तिप्रेमाचा पाझर फुटावा व त्यांचें पाऊल सन्मार्गावर पडावें. अशा प्रेमळ कथा वाचून किंवा ऐकून ज्याचें अंतःकरण द्रवणार नाहीं त्याला काय ह्मणावें ?

सद्य प्रत्यय हि देखोनि । भक्ति नुपजे ज्याचे मनीं ।
तो चि पाषाण ये जनीं । नव्हे पाषाण पाषाण ॥ २३-४४

श्रीराम दासाचा अभिमानी आहे, तो भक्ताची उपेक्षा कधीं करीत नाहीं, भक्ताला संकट पडलें असतां तो भक्तकैवारी श्रीराम भक्तसहाय्यार्थ धांवून येतो अशा प्रत्ययाच्या गोष्टी ऐकून तरी आपण आळस सोडून श्रीरामभजनीं प्रवर्तावें अशी श्रेष्ठांची आज्ञा आहे.

पाहा हो दासाचा अभिमानी । ऐसा दुसरा कैंचा जनीं ।
आह्मी तयाचा भजनीं । आळस न करूं सर्वथा ॥ ४६-५६

भक्तीला साधन श्रवण आहे व श्रवणांत च वाचनाचा समावेश होतो. श्रीसमर्थांनीं हि या च साधनाचें महत्त्व स्वतंत्रपणें सांगितलें आहे. श्रवणाला कष्ट करावे लागत नाहींत, श्रवण प्रपंचाच्या आड येत नाहीं व वर्णाश्रमधर्म श्रवणाच्या आड येत नाहींत.

जयां वेदीं नाहीं अधिकार । सर्व साधारण नारी नर ।
तयांसी तरावया थोर । उपाय हा एक कळियुगीं॥ ४४-३

पुराणें संस्कृतांत आहेत व तीं सांगण्याला पुराणिक च न मिळाला तर काय करावें, ही अडचण हि आतां उरली नाहीं. साधुसंतांचे आपल्यावर हे मोठे उपकार आहेत.

पुराणिक न मिळे करणें काय । हा हि नाहीं अंतराय ।
देशभाषा सज्जनीं उपाय । केले याचि कारणें॥ ४४-६

पुराणिक मिळाला च तर तो निस्पृह असावा. या गुणाकडे आपलें जावें तितकें लक्ष जात नाहीं हे दुर्दैव होय. पुराणिक आणि हरिदास यांनीं श्रेष्ठांच्या खालील उपदेशाकडे लक्ष दिलें तर च त्यांच्या गुणाचे चीज होणार आहे.

तवं चि विद्या गुणगौरव । जवं यांचा न धरी मानव ।
अर्थी होता याचकभाव । विद्यागुणें गेलें महत्व ॥ ४४-३७
याचकाचे निरोपणीं । भाव नुपजे अंतःकरणीं ।
दीन दुर्बळ तें पुराणीं । कैसें वैसों शकेली ॥ ४४-३८
ह्मणौनि निस्पृहतेपासीं । जन बोळगती अनायासीं ।
सहज गुरुता हे तयासी । वचन दुर्लभ त्याचें ॥ ४४-३९

भक्तीचे प्रकार व भक्तांच्या कथा देऊन श्रेष्ठांनीं जें भक्तीचें रहस्य ठरावेलें आहे तें

## ( ४ ) नामस्मरण

होय. भक्तिरहस्य ग्रंथाचीं ७७ प्रकरणें असून त्यांत श्रेष्ठांनीं विष्णुशंकरांचा महिमा वर्णन करून व त्यांची एकात्मता सिद्ध करून पांच पन्नास पौराणिक कथा दिल्या आहेत. या सर्वांचा मथितार्थ काढल्यास " नामस्मरण " या एका शब्दांत भक्तिरहस्याचें रहस्य सागतां येतें. ७७ प्रकरणापैकीं क्वचित् असें एकादें प्रकरण असेल, कीं ज्यांत नामस्मरणाचा उल्लेख करून तें श्रो-

तथापि ज्याची जितुकी शक्ति। तैसी करावी हरिभक्ति।
हरियांचूनि बंधमुक्ति। कदा नव्हे कलियुगीं ॥ ४९ ॥
ऐसें नाना ग्रंथांचें तात्पर्य। ऐसें चि बोलत आले आर्य।
भगवद्भक्त्या कृतकार्य। होईजे भगवत्प्रसादें ॥ ५० ॥

अशा रीतीनें भक्तिरहस्यांत भक्तीचें महात्म्य श्रेष्ठांनीं वर्णिलें आहे. हरिभक्तिपरायण भागवत कोणास ह्मणावें ह्मणून श्रेष्ठांनीं ५१ व्या प्रकरणांत ५४ पासून ७५ व्या ओंवीपर्यंत भागवतलक्षणें दिलीं आहेत तीं वाचकांनीं अवश्य वाचावीं. तीं लक्षणें आपल्या श्रोत्यांच्या मनावर ठसावीं ह्मणून तप, दान, व्रतें यांचें महत्व सांगून हरिहरभक्तांच्या प्रेमळ कथा श्रेष्ठांनीं वर्णिल्या आहेत. त्या महान् भगवद्भक्तांच्या कथा वर्णन करण्यांत आपला एक खाजगी हेतु श्रेष्ठांनीं एके ठिकाणीं व्यक्त केला आहे, तो साधुसंतांच्या नैसर्गिक थोरपणाला शोभण्यासारखा च आहे.

तया भावार्थाचा वारा। कांहीं तऱ्ही लागो या शरीरा।
ह्मणौनि वर्णितसे आर्पागिरा। देवा भक्ताचा सोहळा ॥ ४७-३२

त्या ईश्वरावतारी भक्तांच्या प्रेमळ कथा वर्णन करीत असतां त्यांच्या भक्तिभावाचा वारा किंचित् तरी आपणांस लागावा, त्यांच्या मार्गानें जाण्याची आपणांस स्फूर्ति व्हावी व तेणेंकरून आपलें व आपल्या बरोबर आपल्या श्रोत्यांचें कल्याण व्हावें असें श्रेष्ठ ह्मणतात.

पऱ्हवीं काय हे महाराष्ट्रवाणी। ईविण पडली होती वाणि।
व्याकर्ण विरपत्ति श्लाघ्यवाणी। ते तरी पदोपदीं कळतसे ॥ ४७-३३

भगवद्भक्तांच्या कथा गाण्यांत साधुसंतांचा आणखी एक उद्देश असा असतो कीं, त्या कथा वाचून तरी वाचकांस आपल्या दोषांचा कंटाळा यावा, त्यांच्या ठिकाणीं भक्तिप्रेमाचा पाझर फुटावा व त्यांचें पाऊल सन्मार्गावर पडावें. अशा प्रेमळ कथा वाचून किंवा ऐकून ज्यांचें अंतःकरण द्रवणार नाहीं त्याला काय ह्मणावें ?

सद्य प्रत्यय हि देखोनि। भक्ति नुपजे ज्याचे मनीं।
तो चि पाषाण ये जनीं। नव्हे पाषाण पाषाण ॥ २३-४४

श्रीराम दासाचा अभिमानी आहे, तो भक्ताची उपेक्षा कधीं करीत नाहीं, भक्ताला संकट पडलें असतां तो भक्तकैवारी श्रीराम भक्तसहाय्यार्थ धांवून येतो अशा प्रत्ययाच्या गोष्टी ऐकून तरी आपण आळस सोडून श्रीरामभजनीं प्रवर्तावें अशी श्रेष्ठांची आज्ञा आहे.

तेणे चि केलें वेदाध्ययन।
तेणे च केलें सत्शास्त्रव्याख्यान।
तेणें केलें स्वकर्मानुष्ठान।
हरिहरनामें जो स्मरे॥ ७—५०

यापेक्षां नामस्मरणाचा जास्त गौरव कोणास करता येईल असें वाटत नाहीं. कलियुगात वर्णाश्रमधर्माची झालेली दैना व अधर्माचा सर्वत्र झालेला जयजयकार पाहून अविनाश निगमबीज असे समर्थ रामनाम सर्वांचे हृदयीं अखंड सप्रेम असावें अशी श्रेष्ठानीं प्रार्थना केली आहे. या साधनास श्रुतिस्मृतिपुराणें याचा आधार आहे, असें असून हि तत्संबंधीं कोणाच्या मनात विकल्प राहिल्यास त्यास इलाज नाहीं.

स्वयें श्रीराम उपदेशी रामनाम।
तें च दास हि उपदेशिती सप्रेम।
स्वस्वरूप प्रबोध परम।
कृपाकटाक्षें अविच्युत॥ ७७—१०२

मोक्षप्राप्तीचा असा हा पुण्यकारक व सुलभ उपाय आहे. त्याला कांहीं दुसरी सामुग्री लागत नाहीं. हातून स्वकर्म होत नाहीं, स्वधर्म घडत नाहीं; अशा स्थितीत नामस्मरणाला कसचा हि प्रत्यवाय नाहीं. दुसरें कांहीं न करिता सर्वकाळ व सर्व स्थितीत भगवन्नामस्मरण जर घडेल तर पुण्यास सीमा नाहीं. तप, दान, व्रत इत्यादि जीं साधनें सांगितलीं आहेत त्यास शरीरबल, द्रव्यबल, याची अपेक्षा असते व इतकें असून हि त्या साधनांना विघ्नें फार असतात. तसें नामस्मरणाचें नाहीं.

यासी न चले कांहीं विघ्न।
कोण्हीं हि करूं न शके भग्न।
ह्मणौनि नारदादि सर्वज्ञ।
परी नामीं च रमोनि राहिले॥ १०।५८

असा हा सुलभ भक्तिमार्ग आहे.

त्यांच्या मनावर बिंबविण्याचा श्रेष्ठांनी प्रयत्न केला नाहीं. बहुधा असें एक हि प्रकरण नाहीं, कीं ज्यात नाममहात्म्याबद्दल एकादी तरी ओंवी नाहीं.

रामनामें तरले जड । रामनामें तरले दगड ।
तया रामस्मरणासी अगड । कांहीं च नाहीं ॥१५—५०

हरिनामस्मरणाहूनि जगीं । साधन समर्थ नाहीं कलियुगीं ।।
पावों इच्छिती परमानंदालागी । तिहीं नाम स्मरावें ॥ ५३–६९

महिमा नामस्मरणाचा । पांग फिटला मरणाचा ।
आपण आळस न करूं वाचा । नाम स्मरतां रामाचें ॥४९–८५

अशा नामस्मरणाचा महिमा आहे तो जाणून सत्वर हा मार्ग स्वीकारावा. श्रेष्ठ ह्मणतात, कृतांतनगरी समीप आली, तेथील पादप दिसों लागले, तरी अजून विलंब करणें शहाणपणाचे होईल काय ? ५६।८३

श्री राम जय राम जय जय राम । अखंड जो स्मरे सप्रेम।
तो स्वयें चि असे पुरुषोत्तम । ह्मणौनि राम न विसरावा ॥ ११–८८

श्री राम जय राम जय जय रामा । आपुलां नामीं देईं प्रेमा ।
रामस्मरणमहिमार्णवसीमा । न पवे द्वितीय अद्वैतीं ॥ १३—६२

ही गोष्ट इतकी प्रत्यक्ष आहे कीं, ती शपथेवर सांगितली पाहिजे असें नाहीं. ज्याने श्रीरामाला आपलासा करून घेण्यासाठीं नामस्मरणाचें टोणें केलें आहे, त्यापासून देव वेगळा झाल्याचें आजपर्यंत उदाहरण नाहीं. केवळ रामनामस्मरणेंकरून असंख्यात भक्त तरले आहेत, ही गोष्ट सर्वप्रसिद्ध आहे. काशीविश्वेश्वराचें तरी या बाबतींत सर्वांनीं ऐकावे.

रामनाम तारक एवढी प्रौढी । विश्वेश्वरें उभारिली गुढी ।
त्या समर्थाचें आइकावें येवढी । प्रार्थना मना आमची ॥६७-४२

तप, दान, व्रत यांचा महिमा आपण सांगितला खरा, पण त्या सर्वांचें पुण्य एका नामस्मरणाने लागते असें श्रेष्ठ ह्मणतातः—

सकळ हि तपें तेणें केलीं । सांग विधिपूर्वक त्यासी च फळलीं।
ज्याचें वाचें विश्वासें आलीं । नामें हरिहराचीं ॥ ७-४७

तेणें केले सर्व हि याग । तेणें केले महा योग ।
तेणें केला सर्वस्वाचा त्याग । हरिहरनामें स्मरे जो ॥ ७-४८

तेणें केलीं सर्व हि दानें । तेणें चि केलीं तीर्थाटणें ।
तेणें केलीं सर्व हि साधनें । हरिहरनामें स्मरे जो ॥ ७-४९

तेणें चि केलें वेदाध्ययन।
तेणें च केलें सत्शास्त्रव्याख्यान।
तेणें केलें स्वकर्मानुष्ठान।
हरिहरनामें जो स्मरे॥ ७—५०

यापेक्षां नामस्मरणाचा जास्त गौरव कोणास करतां येईल असें वाटत नाहीं. कलियुगांत वर्णाश्रमधर्मांची झालेली दैना व अधर्माचा सर्वत्र झालेला जयजयकार पाहून अविनाश निगमबीज असे समर्थ रामनाम सर्वांचे हृदयीं अखड सप्रेम असावें अशी श्रेष्ठांनीं प्रार्थना केली आहे. या साधनास श्रुतिस्मृतिपुराणे यांचा आधार आहे; असें असून हि तत्संबधीं कोणाच्या मनांत विकल्प राहिल्यास त्यास इलाज नाहीं.

स्वयें श्रीराम उपदेशी रामनाम।
तें च दास हि उपदेशिती सप्रेम।
स्वस्वरूप प्रबोध परम।
कृपाकटाक्षें अविच्युत॥ ७७—१०३

मोक्षप्राप्तीचा असा हा पुण्यकारक व सुलभ उपाय आहे. त्याला कांहीं दुसरी सामुग्री लागत नाहीं. ह्यानें स्वकर्म होत नाहीं, स्वधर्म घडत नाहीं; अशा स्थितींत नामस्मरणाला कसचा हि प्रत्यवाय नाहीं. दुसरें कांहीं न करितां सर्वकाळ व सर्व स्थितीत भगवन्नामस्मरण जर घडेल तर पुण्यास सीमा नाहीं. तप, दान, व्रत इत्यादि जीं साधनें सांगितलीं आहेत त्यास शरीरबल, द्रव्यबल, यांची अपेक्षा असते व इतकें असून हि त्या साधनांना विघ्न फार असतात. तसें नामस्मरणाचें नाहीं.

यासी न चले कांहीं विघ्न।
कोण्हीं हि करूं न शके भग्न।
ह्मणोनि नारदादि सर्वज्ञ।
परी नामीं च रमोनि राहिले॥ १०।५८

असा हा सुलभ भक्तिमार्ग आहे.

यालागीं हे च प्रार्थना पदोपदीं ।
जिव्हा वेष्टिजे नामपदीं ।
तेणें पाविजे स्वानंदपदीं ।
परमापदी चुकतील ॥ ७४-७४

## ( ५ ) सुगम उपाय

भक्तिरहस्य ग्रन्थांत भक्तिप्रेम असून सुगमोपायांत प्राधान्येंकरून अध्यात्मविचार आहे. या बहुमोल ग्रंथाच्या पहिल्या तीन प्रकरणांत सद्गुरु-स्वरूपाचा जो निर्णय केला आहे तो अप्रतिम आहे. त्याचा संक्षेप करणें अशक्य आहे. गुरुभक्तांनीं हीं प्रकरणें मुळावरून च साद्यंत सप्रेम वाचावीं.

जैसे अर्थप्राप्तीसी करावे उपाय ।
तैसे परमार्थासी धरावे सद्गुरूचे पाय ॥ १।१२

असा सिद्धांत सांगून श्रेष्ठांनीं सद्गुरु व सच्छिष्य यांचीं लक्षणें दिलीं आहेत. नंतर सच्छिष्य सद्गुरूला विनवितात :—

तें माझें सत्य स्वरूप मज चि नाकळे ।
असत्य प्रपंचें मन आकळे ।
तें चि निरंतर निवळे ।
आणि तें चि होऊनि असावें ॥ ३—६६

सद्गुरु उत्तर देतात, असें होण्याला चित्ताचा जय झाला पाहिजे. या चित्ताचा स्वभाव कसा आहे हें आपण सर्वजण जाणत च आहोंत, तथापि श्रेष्ठांचे शब्द फार गोड आहेत.

चित्ताचा स्वभाव ऐसा चि आहे ।
क्षणभर ही निश्चळ न राहे ।
अवस्तुत्वेंसी वस्तुत्वें पाहे ।
राहे वस्तु विसरोनि ॥३-७५
चित्त चि प्रपंचरचनेचें कारण ।
ह्मणोनि यासी हें नव्हे दपण ।

तें चित्त कसें जिंकावें? संकल्पविकल्पात्मक मनाला कोणत्या उपायांनीं वश करून घ्यावें? हे उपाय चार आहेत:-(१) सत्संग (२) वासनात्याग (३) हठयोग (४) अध्यात्मविचार; पैकीं पहिले तीन उपाय दुर्घट आहेत. मतामतांचा गलबला माजून राहिलेल्या या कलियुगांत सत्संग दुर्मिळ होय! विषयांकडे सारखी धांव घेणारी अनावर वासना आवरली जाणें सोपें नव्हे. हठयोगाविषयीं तर ह्याच्या काळीं बोलावयास च नको. हठयोगाच्या गोष्टी करणें पुष्कळांना आवडतें, पण श्रेष्ठ ह्मणतात--

हे हठयोगवार्ता वाटे रम्य।
आणि फळप्राप्ति हि अनुपम्य।
परंतु क्रियासिद्ध सत्ययुगीं हि दुर्गम्य।
तेथें कळींत केवि घडे। ३-१२८

सारांश, श्रेष्ठांच्या मतें मनोजय होण्यास इतर उपायांच्या मानानें अध्यात्मविचार हा च एक सुगम उपाय आहे. अध्यात्मविचार ह्मणजे तत्त्वमसि या महावाक्याचा विचार होय.

ऐक शिष्या येथींचें वर्म।
स्वयें तूं चि आहेसि ब्रह्म।
येविषयीं संदेह भ्रम।
धरूं चि नको॥

असें वर्म श्रेष्ठांच्या धाकट्या बधूनीं या महावाक्याचें सांगितलें आहे. हा अध्यात्मविचार बळावला किंवा हें वर्म पटलें ह्मणजे जिंकावयास मन निराळें उरत च नाहीं. चवथ्या प्रकरणापासून नववें प्रकरण संपे तों, तत्=तें, त्वम्=तूं आणि असि=आहेस, या तीन पदांचा विचार श्रेष्ठांनीं केला आहे. हीं सहा प्रकरणें कठीण आहेत. तीं मुमुक्षूनें सद्गुरुचरणाजवळ वाचावीं हे च खरें. अध्यात्मविचाराचें हि पर्यवसान अखंडैकभक्तींत करून श्रेष्ठ ह्मणतात--

भगवद्भक्तीच्या आश्रयेंवीण।
कलौ साधन तितुका शीण।
युगानुसार करून स्वधर्मरक्षण।
ईश्वरभक्ति करावी॥ १०-२

सारांश, सर्व परमार्थसाधनांचा पाया भगवद्भक्ति आहे आणि ह्मणून ग्रंथाचे

शेवटीं शेषांनीं उपटपणें श्रीराममंत्राचा गौरव केला आहे, तो येथें देऊन हें प्रकरण संपवूं,

पाय कराचे कष्टसाध्य मंत्र अन्य ।
नश्वरफळद विधानलोपें देती दैन्य ।
एक होतसाता शाश्वतफळद धन्य ।
उघडा मंत्र श्रीराम ॥ १०-९९
जेणें दिग्बंधन जालें मुक्त ।
जेणें विधिनिषेध केले भक्त ।
जो आचांडाळाविप्रपर्यंत युक्त ।
तो उघडा मंत्र श्रीराम ॥१००॥
जो नवविधभक्तीचें मूळ ।
जो चतुर्विधमुक्तीचें फळ ।
जो सर्वसाधनांची सिद्धि केवळ ।
तो उघडा मंत्र श्रीराम ॥१०१
जयाचें वर्णितां महिमान ।
न शक्नोमि म्हणे चतुरानन ।
शेषा सहस्रमुखीं पडे मौन ।
तो उघडा मंत्र श्रीराम ॥ १०२ ॥
तारकब्रह्म हें नाम ज्याचें ।
काशी मुक्तिक्षेत्र हें गौरव त्याचें ।
जें कंठरत्न उदार सदाशिवाचें ।
तो उघडा मंत्र श्रीराम॥१०३॥

अशा ह्या उघड मंत्राचा प्रभाव श्रीरामदासांकित महाराष्ट्राच्या पुनरपि प्रत्ययास येवो !



# उपसंहार

भक्तिरहस्य ग्रंथ ज्या पोथीवरून छापला आहे ती पोथी चाफळमठांतील असून श्रीबापुसाहेबमहाराज यांजकडे मिळाली. श्रेष्ठांनीं मूळ ग्रन्थ शके १५९० त लिहिला व प्रस्तुतची प्रत शके १६९१ त तारळेकर कुळकर्णी गिर्मोजी उद्धव यांनीं केली, हें पोथीच्या शेवटीं नमूद आहे. ताडून पाहण्यास आणखी दोन प्रती मिळाल्या पण त्या अपूर्ण आहेत. एक प्रत मर्डे येथील मठपतींचे चिरंजीव श्रीरा. भ. प. विश्वनाथ रामदास बुवा यांनीं दिलेल्या संग्रहांत होती. तिचीं अवघीं पहिलीं पचवीस च प्रकरणें आहेत. दुसरी प्रत जांबेपासून सहा कोसावर असलेल्या मंगरूळ गांवीं श्रीरा. म. प. अंबादासबुवा रामदासी यांचे जंवळून मिळाली. तिचीं १ ते ६८ प्रकरणें आहेत, ह्मणजे फक्त शेवटचीं नऊ प्रकरणें कमी आहेत; त्यामुळें प्रतीचा शक जरी नक्की सांगतां येत नाहीं, तरी एकंदर स्वरूपावरून ही प्रत श्रेष्ठकालीन असावी असें अनुमान कांढण्यास मुळीं च हरकत वाटत नाहीं. सुगमोपायाची एक च प्रत शके १६९६ तील चाफळचे मठांत मिळाली. स्फुट कविता जांबेचे श्रीरा. भ. प. लक्ष्मण देव यांनीं दिलेल्या बाडावरून घेतली आहे. श्रीबापुसाहेब महाराज आदिकरून सर्वांचा मी या सहाय्याबद्दल अत्यन्त ऋणी आहे.

या भागापैकीं सुगमोपाय सेरीज करून बाकी सारी कविता आजपर्यंत अप्रकाशित होती. ह्मणजे या भागाच्या ५०८ पृष्ठांपैकीं ४१३ पृष्ठें निवळ नवीन आहेत. सुगमोपाय पूर्वीं शके १८१६ त रा. रा. बाबाजी अनंत तेंडुलकर यांनीं एकदां छापला होता. त्याच्या प्रती हल्लीं दुर्मिळ आहेत. मोठ्या प्रयासानें सभेला एक प्रत मिळाली. तिच्यापेक्षां चाफळची प्रत शुद्ध आहे हें सांगावयास नको. रा. तेंडुलकर यांनीं रामदासी ग्रन्थ व चरित्रें छापण्याचे परिश्रम बरे च केले होते असें दिसतें. त्यांचें या ठिकाणीं कौतुकयुक्त स्मरण होणें साहजिक आहे.

भक्तिरहस्याच्या टीपा देण्याचें काम रा. दाजीबा देव यांनीं केलें व सुगमोपायाच्या कांहीं टीपा दाजीबांनीं व कांहीं येथील संध्यामठाचे अधिपति रा. वासुदेवराव शिदोरे यांनीं दिल्या आहेत. उभयतांचा सप्रेम निर्देश करणें आवश्यक आहे.

श्रीकल्याणमहाराजांच्या हातच्या बाडावरून मनाचे श्लोक स्वतंत्रपणें विपुल टिपांसह प्रसिद्ध करण्याविषयीं फार वेळां आश्वासनें दिलीं, पण आतां यापुढचा ह्मणजे पांचवा भाग मनाचे श्लोकांचा शक्य तितक्या लवकर वाचकांच्या हातीं देण्याचें शेवटचें आश्वासन देतों. मनाचे श्लोकांचा भाग दरम्यान निघून पुढील विजयादशमीचे आंत च " श्रीदिनकररामदास " कृत कवितेचा सहावा भाग प्रसिद्ध करूं. दिनकर हे खुद्द श्रीसमर्थांचे शिष्य, तिसगांवमठपति होत. त्यांचा स्वानुभवदिनकर ग्रन्थ श्रीसमर्थसांप्रदायिकांना अत्यंत आवडता असा झाल्यावांचून राहणार नाहीं, अशी मला पूर्ण खात्री आहे. या ग्रन्थाची मौज अशी आहे कीं, तो प्रत्यक्ष श्रीसमर्थशिष्यानें लिहिला असल्यामुळें त्यांत श्रीसमर्थांविषयीं व श्रीसांप्रदायाविषयीं पदोपदीं जे उल्लेख आले आहेत ते प्रेमळ वाचकांस प्रपंचाचा विसर पाडून श्रीसमर्थचरणीं आनन्दांत लोटांगण घालावयास लावतील ! दिनकरांची इतर हि कविता सद्गुरुभक्तीनें ओथंबलेली आहे. रामचंद्र ह्मणून दिनकरांचे प्रपंचपरमार्थे निजात्मज होते. त्यांचा " सीतारामसंवाद " ग्रन्थ मिळाला असून तो हि अपूर्व आहे. नुसत्या दिनकरांची कविता ६०० पृष्ठांवर होण्याचा संभव आहे; त्या च भागाला रामचंद्रांची कविता जोडली तर न जाणो सहावा भाग १००० वर पृष्ठांचा होईल. पण ह्या पुढील कथा आहेत; आज श्रीसमर्थरामदासस्वामी यांचे वडिल वंधु श्रीश्रेष्ठरामीरामदास यांची कविता महाराष्ट्रास अर्पण करीत आहे, हें खरें. पुढचें पुढें !

धुळें,<br>
विजया दशमी शके १८२१.

शंकर श्रीकृष्ण देव



## श्रीसद्गुरुस्तवन

ज्यासी दीनबंधु नाम हें साजे ।
ज्यासी देही च देवपण गाजे ।
ज्ञानवैराग्यसंपन्न राजे ।
ज्याच्या दर्शनें चिन्मये पुण्य मांजे ॥ १ ॥

गे वाइये आवडी तयाची मज मोठी ।
चित्तीं अखंड पडली मिठी ।
साधुजनाचीं बहु उंच कोटी ।
कृपादृष्टीं तारिल्या भक्तकोटी ॥ १० ॥

ज्याचा परमार्थवृक्ष अंकुरला ।
शाखापल्लवीं विस्तारला ।
नवविधा प्रकारें मुहुरला ।
शुध निष्काम भजनें फळा आला ॥ २ ॥

ज्याची अपार धारणा धृती ।
ज्याची वेदांत काव्य संमती ।
ज्याची अगम्य न गमे गती ।
ज्याचीं चरित्रें सर्वत्र गाती गीतीं ॥ ३ ॥

सर्व तीर्थांचें तीर्थ ते साधु ।
सर्व देवांचे देव ते साधु ।
अग्रपूजेसी वंद्य ते साधु ।
सस्वरूपाचे मायेबाप साधु ॥ ४ ॥

ज्यासी मुळीं च मीपण नाहीं ।
ज्यासी समान देखणें देही ।
जेहीं आपणास सेविले ठाईं ।
सर्व कल्याण त्याचिये पाईं ॥ ५ ॥

# ॥ भक्तिरहस्य ॥



॥ श्रीराम ॥

ॐ नमो सिद्ध विनायका । सिद्धस्वरूपा वरदायका । सिद्धानंदा सिद्धात्मका । मंगळमूर्ति ॥ १ ॥ मुळीं असेचिना आमंगळ । तेंचि तत्वता मंगळ । अमूर्तिचि मूर्तिमंत केवळ । मंगळमूर्ति ऐसा ॥ २ ॥ नाना चित्र विचित्र व्यक्ति । तुझें स्वरूप हें वेदोक्ति । येक च अनेक अनेक च येक हे शक्ति । अभिनव तुझी ॥ ३ ॥ नरकुंजर आणि हिमकर । उंदिर मयूर फणिवर । वस्त्रें भूषणें आयुधाकार । सर्व आत्मा तुं गणेश ॥४॥ तुझें स्वरूप स्मरतां पाहिं । अविघ्नता ह्मणिजे विघ्नचि नाहिं । असोनि दवडिलेंसें नव्हे काहि । ह्मणोनि अशेप विघ्नहरु ॥ ५ ॥ सद्भावें स्मरतां गणपति । सुप्रसंन जाला सहजस्थिति । परम रसाळ सिद्धस्मृति । बोळाले अंतरिं ॥ ६ ॥ आता अभिवंदुं वागेश्वरि । जे सरस्वति ब्रह्मकुमरि । दिव्यस्वरूपा खेचरि । हंसवाहना ॥ ७ ॥ जे प्रणवांकुर कल्पवल्लि । दशकोर्द्धदशक[१] पुष्पें विकाशलीं । जीव ईश्वर कल्पना गुंफिलि । तितुक्या माळा जाल्या ॥ ८ ॥ तेथें फळनिष्पत्ति अपूर्व । हरिहरार्पित तेथिंचें सपूर्व । खेच अविनाश येर सर्व । गळोनियां पडति ॥ ९ ॥ आतां वैखरि मध्यमा पश्यंति परा । याचिया वसावि अभ्यंतरा । निराकार होत्साता साकारा । शब्दसृष्टि निपजवि ॥ १० ॥ जन्मांतरिं हिं तुझें स्तवन । घडलेंचि नाहिं ऐसे जे मळिन । त्यास जिव्हा हि मुखिं असोन । मुकें विश्व देखतसे ॥ ११ ॥ ऐसि वंदिता वाग्देवि । सुप्रसंन जालि सद्भावि । परमात्म स्फूर्तिचि गुप्त ठेवि । होति ते अंतरि प्रकाशीलि ॥१२॥ आतां सद्गुरु रघुनंदना । सर्वांगें केलें अभिवंदना । जो जगत्रयाच्या प्राणस्पंदना । चाळितसे करणेंसि ॥ १३ ॥ तेथें गणेश आणि सर-

---

१ दश इंद्रियें व अर्धदश विषय.

स्वति । वेगळि कैंचि विश्वाकृति । तथापि याचि किजे प्रथम स्तुति । हे हि आज्ञा ईश्वराचि ॥ १४ ॥ जयाचें करावया वर्णन । वेगळें कैंचें मंगळार्चन । तोचि स्वयें मगळायतन । ह्मणउनिया ॥ १५ ॥ तो सद्गुरु जगद्गुरु समर्थ । भावेंचि भेटला श्रीरघुनाथ । मस्तकिं ठेउनि पद्महस्त । स्वस्वरूप प्रकाशिलें ॥ १६ ॥ हें गुह्य पाहिजे गुप्त । परि संत तितुके नित्य त्रुप्त । परमार्थ जाला जैसा प्राप्त । तैसा निरोपिला पाहिजे ॥ १७ ॥ स्वभावें हि सद्गुरुता । ईश्वरिच आसे स्वता । मनुष्यवेषें तन्हि तत्वता । ईश्वरावतारच किं ॥१८॥ जयास तू शिष्या होय हा वोधु । तोचि सर्वथा जाला शुद्धु पूर्वापर तरत आले साधु । येणेंच निर्धारें ॥ १९ ॥ सद्गुरु तत्शीष्यासि होय देव । परंतु जनदृष्टि भासे मानव । तैसा नव्हे हो रघुराव । देवादिदेव स्वतसिद्ध ॥ २० ॥ तो गुरु तोच देव ईश्वर । जगपाळक जगचाळक जगदीश्वर । सर्वदा वंद्य सर्वेश्वर । गुरुत्वें अधि वंदिला ॥ २१ ॥ आतां सज्जनाभिवंदन योग्यें । जयाचि महिमानें अमोघें । ससारिं वर्तता भवंदार्घें । वेगळेंचि ते ॥ २२ ॥ जे देवभक्त लिळेंरोळें । अवतार धरिति खेळें मेळे । ज्याच्या चारित्रें भुमंडळें । पावन होति ॥ २३ ॥ जयाचिं अस्यानें परिसता । भक्तिभावार्थ उपजे चित्ता । जिहिं पुढिलहि भक्त भोळे अच्युता । निरविले अहेति ॥२४॥ जिहि करुनि दुष्कर सेवा । प्रसन्न जालिया प्रार्थिलें देवा । तुझि आवडि उठताच तारिं जिवा । करावलंबें अविलंबें ॥ २५ ॥ नारद तुंबर सनकादिक । वाल्मिक व्यास आणिक शुक । भगवत्प्रिय रुपि अनेक । जगदुधारिं तत्पर ॥ २६ ॥ इहि करूनि तपसाधनें । कलियुगिं तरावया दिनें । आवगणुनि नाना साधनें । नाममहिमा प्रेरिला ॥२७॥ यागादिकिं कर्मिं पाहिं । आणि वर्णअश्रमधर्मि हिं । करित असताच अधिकार नाहि । रामनामें तरति ते ॥२८॥ जैसे परम धार्मिक अतुळ दाते । मुखि कवळें घालिति अक्षर्माते । तैसें पावावया निज क्षेमाते । नाममहिमा प्रकाशिला ॥ २९ ॥ जिहिं येव्हढे उपकार केले । ते कैसे जातिल निस्तरले । ह्मणउनि प्रेमरंगें

१ भवताप. २ रोळ = मार्ग. ३ भाग. ४ शक्तिहीनास.

पाउलें । आठविले अंतरी ॥ ३० ॥ संतास अभिवदन करितां । संतोष वाटे श्रीभगवता । प्रसन्न होउनि संतता । याळागि हि देतसे ॥ ३१ ॥ भूत भविष्य वर्तमान भक्त योगि । अभिवंदन हें सकळांलागि । वर द्यावा जि प्रेमरागि । वर्णावया रामातें ॥ ३२ ॥ भावें करितां संतस्तवन । तवं ते पुर्विच करुणाघन । सहजस्वभावें वरदान । प्रेमकळा दिधलि ॥ ३३ ॥ आतां श्रोते मोक्षश्रीमत । जे श्रवणाधिकारि प्रस्तुत । कथाश्रवणि येकचित्त । तयातें हि प्रणम्य ॥ ३४ ॥ जयाची स्वस्थ अंतरकळा । सदा इछिती श्रवणसोहळा । ज्याचे सगर्भ चित्तवृत्तिसि डोहळा । हरिकथेचा आखड ॥ ३५ ॥ ते हरिसिंच उपमेय । हरिसि अन्न दुर्लभ काय । दिना अनाथाचें खाय । समर्पिलें जें ॥ ३६ ॥ तैसे श्रोते विचक्षण । सर्व कथा असति श्रवण । परि भावार्थे महाराष्ट्र-निरोपण । तेहिं सुखे परिसति ॥ ३७ ॥ बहुत श्रुत आणि शुचिस्मत । सात्विक सावेंडा श्रद्धावंत । भावार्थि भोळा संत । लक्षाणि संपूर्ण ॥३८॥ चित्तशुद्धि वेर्णे बुद्धि तिक्षण । परमार्थ परिक्षा विचक्षण । जयाचें मननयुक्त श्रवण । साक्षात्कार आखड ॥ ३९ ॥ ज्याचे कर्ण कथामृत-पात्रें । रूपानिधान धाम नेत्रें । चित्तभित्ति चित्रिली विचित्रें । भगवत्कीर्ति सुरगें ॥ ४० ॥ ज्याच्या अवधानाचा सोहळा । जैसी कासवी अवलोकी बाळा । सर्व सतोष आपुल्या डोळ्यां । लेउनि काय ॥ ४१ ॥ श्रोते करुनि सन्मुख । वारिले वाजट वहिर्मुख । जयासि परमार्थाचें दुःख । त्याचें काय प्रयोजन ॥४२॥ शाक्त कामिक लावत्री । बाह्यरंग दिसे राघवी । अंतरी असेति ज्याचा जीवीं । कुकर्माचे कुप ॥४३॥ वळकट वेंडि पाखडि । उत्शृंखळ शब्द तोंडि । भोळियाचा भावार्थ खंडी । कोमळ देखोनिया॥४४॥ कर्मधर्मभ्रष्ट पठ । अशास्त्र करणें खटपट । देहाभिमानी धीट दुष्ट । दुरुनिच दवडावे ॥ ४५ ॥ जरि तो बैसविला सभे । तरि संतांमाजि न शोभे । सिद्धविरुद्धें तन्हि क्षोभे । इतुके कासया करावे ॥ ४६ ॥ सहज संसारि जे जन । त्याचें श्रवणें चोखोळे मन । यज्ञचित जे दु-

१ त्यांना परमेश्वराचीच उपमा योग्य आहे. २ भोळा, भोळसर. ३ शिवाय, आणि. ४ वाचाळ, ५ स्वभाव, ६ निर्मळ होतें.

मेन । त्याचें चित उखळेना ॥ ४७ ॥ आतां परिसावें सावधान । हरि-भक्तिचें महिमान । न कळे ह्मणे चतुरानन । तेथें किति मानवि ॥४८॥ तथापि ज्याची जितुकी शक्ति । तैसी करावी हरिभक्ति । हरिवाचुनि बंधमुक्ति । कदा नव्हे कलियुगीं ॥ ४९ ॥ ऐसें नाना ग्रंथाचें तात्पर्य । ऐसेंचि बोलत आले आर्य । भगवद्भक्त्या कृतकार्य । होइजे भगवत्प्रसादें ॥ ५० ॥ भक्तिरहस्य याचें नाम । येथें विषयो च भक्तिप्रेम । संबंध नाना ग्रंथानुक्रम । प्रयोजन सज्जनप्रार्थना ॥ ५१ ॥ आजि ज्ञानगाथा घरोघरीं । क्रिया मांडली आसुरी । हेचि या काळिची थोरी । कौतुक पाहिलें पाहिजे ॥ ५२ ॥ तथापि आज्ञा अनुलंघ्यमान । आणि वर्णितां भगवद्भक्तिचें महिमान । होय परम समाधान । तरि कां आळस करावा ॥५३॥ भाग्यवंताची आवडी । सर्वांग निववी नामगोडी । श्रीरामाची होय जोडी । ह्मणउनिया आदरु ॥५४॥ विनवी रामिरामदास । अति सुरस भक्तिरस । सेव्य संतां श्रीमंतास । भोक्तेचि ते येथिचे ॥ ५५ ॥ इति श्री भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । मगळार्चनं नाम । प्रथमं प्रकरणम् ॥ १ ॥

---

॥ श्रीराम ॥

ॐ नमोजी आदि अनंता । स्वस्वरूपा सदोदिता । अपरांपरा शाश्वता । कर्ण संवेद्या ॥१॥ जगज्जाळ मूळकंदा । परात्परा परमानंदा । वाणि प्रवर्त्तली अनुवादा । तुझेन अनुमोदनें ॥ २ ॥ तुंवा चेतविल्या चित्त चळे । तुंवा प्रबोधिल्या इंद्रियग्रामें कळे । तुंवा वळिल्या वृत्ति वळे । तुझिया मोहरा ॥ ३ ॥ जितुकी नेमित्ति प्रमाणें । तें तुजपासुनिच निर्माण । तयाचेनि प्रमाणिकपणें । तुज तो नेम करवेना ॥ ४ ॥ प्रत्यक्ष प्रमाण शब्द आणि अनुमान । जहद्द[२] अजहद्[३] जहदाजहद[४] उपमान । इतुकियासहि अघटमान । तुझीया रंगताहे ॥ ५ ॥ तुज ततता नाहिं

---

१ मार्गाकडे. २ जहल्लक्षणा = त्यागलक्षणा, दूषित लक्षणा. ३ अजहल्लक्षणा = अत्यागलक्षणा. ४ त्यागात्यागलक्षणा, ह्मणजे सारासार ओळखून असाराचा त्याग व साराचें ग्रहण.

पार । तुं सर्वत्र सारिखाचि चौफेर । इकडे थोडें इकडे फार । हें सर्वथा घडेना ॥ ६ ॥ आकाश पृथ्वीहुनि वेगळें । तुं अनंताकाशाहुनि विस्तिर्ण सगळें । तुं आकाशच ह्मणावें तरि तें पोकळें । तुं सघन सुक्ष्म स्वप्रकाश ॥७॥ तुं स्पर्शासि तरि अकळ । परि सबाह्य व्यापक सकळ । जयातें हि तुं च केवळ । तथापि मिं हें जाणावया ॥ ८ ॥ मी ह्या हेतु ह्मणों माया । तरि ते माया च नये आया । मीं तुजमाजि अभेद बोध इया । माया कैंचि वेगळी ॥ ९ ॥ माया ह्मणिजे मृगजळ । जवं निर्धारिलें नसे केवळ । होचि निर्धारिता निर्मळ । सूर्यप्रकाश लीळा ॥१०॥ सूर्यप्रकाश सूर्यास्तव । नेत्रिं हिं सूर्यांश वैभव । जळदाभास प्रादुर्भाव । सूर्यसत्ता प्रसिद्ध ॥ ११ ॥ प्रातःकाळिं कदा नसे । सायंकाळिं हि समरसें । मद्ध्यास्थानिच आभासे । ह्मणउनि सूर्यमय तें ॥१२॥ असो सत्य ना आसत्य ऐसा । नसोनि भासे भासताच नसे तैसा । अनादि जळदाभास ठसा । प्रबोधें हिं न मोडे ॥ १३ ॥ कोण्हि ह्मणति मिथ्या तथां सत्य रवि । सत्य ह्मणति तन्हि सूर्यपदवी । उभयतेविण उभय भावि । सत्य सूर्य प्रकाश ॥१४॥ तैसा प्रपंच मिथ्या अथवा सत्य । अधिष्ठान आत्मा तो नित्य । अनित्य कल्पना तेचि अनित्य । सहज सत्य आत्मा तुं ॥१५॥ तुं शरीरेंविण सचेतन । सर्वज्ञ इंद्रियां वाचुन । तुज विकारचि नसोन । येवढी रचना देखिजे ॥१६॥ तुझा ठाइ देवत्वादीदेवा । आखंटा अद्वैता स्वयमेवा । विवर्तरूपिणी मुळमाया अनुभवा । प्रकाशी तुझेन सामर्थ्यें ॥ १७ ॥ तुझा अनुभव काय तुज नव्हता । जें इणें प्रकाशिलें तत्वता । तुज वेगळी ईश्वरजीवता । कोणें प्रकारें घटों शके ॥ १८ ॥ मूळमायेसी हि तुं मूळ । तुज वाचुनि न घडे केवळ । सत्य ना असत्यसें मिथ्या जाळ । चेतना चेतवे तुझेनि ॥ १९ ॥ एतावता इतुकेचि गमे । तुझिया सामर्थ्याची सर्व हि नामें । तुज वाचुनि दुजें नाहि नेमें । ह्मणउनि तु निर्द्वंद ॥ २० ॥ संसारिं बोलिले पाहिजेति जीव । तरि ह्या स्वप्नसृष्टिचा प्रादुर्भाव । प्रबोधीं आहे आववें वाव । द्रष्टा च सर्व स्मरतांहि ॥ २१ ॥ ऐसा तुं बहुत्वें वीण बहुरूपी । केविं भुळसी

---

१ मध्यान्दीं.

स्वस्वरूपीं । विवर्तरूपिणी साक्षेपी । तुवां च अधिष्ठिली ॥ २२ ॥ अशेषशक्ति चक्राचा अंगिकार । ह्मणौनि तु आत्माच प्रत्यगात्मा ईश्वर। करितां ऐश्वर्याचा व्यापार । मूळमाया तेचि माया ॥ २३ ॥ ईश्वर जो वर्णिजे वेदीं । जो सर्वदा स्तविजे सर्वपदीं । जो निरंतर योगिवृंदीं । हृत्सरोजीं स्मरिजे तो ॥ २४ ॥ जया देव दैत्य समान आपे । जो सकळा सारिखाचि स्वरूपें । अशरीरि आणि होय साक्षेपें । हे जयाचि प्रसिद्ध ॥ २५ ॥ तो अकळ न कळे सकळा । न फावे भक्तिसुखाचा सोहळा । ह्मणौनि स्वसामर्थ्यें स्वलिळा । मुर्तित्रय अवतरला ॥ २६ ॥ ब्रह्मा विष्णु सदाशिव । अशेंकरुनि सर्वहि देव । चराचर जीतुके जीव । क्षत्रज्ञ जो तयाचा ॥ २७ ॥ मानवि भजती देव । कामनारूपें कल्पुनि भव । वैराग्यसपन्न शुद्ध जीव । ससारिं सुटो इछिते ॥२८॥ त्याचा तरणोपाय कैसा । स्वधर्में तरावें हा भर्वसा । तरि तो सांग न घडे ऐसा। काळ आला विपरीत ॥ २९ ॥ कळिचेनि प्रतापानळें । सार्वनें तितुकीं जाली विव्हळें । स्वकर्मादिकें सकळें । करिजेत असताच न टकेती ॥३०॥ सहवासी जनसंपर्क । कुविद्या कुबुद्धि कुतर्क । दुर्जनसगें तरि नरक । अकल्पित वोलिलें ॥३१॥ महा पातकें अवघीं च्यारी । संसर्गी पांचवा वरोबरी । आर्द्रपाप जो न निवारी ।शक्त होउनि तयातें ॥ ३२ ॥ आतां बहुतेक वरोघरीं । हे चि अरभिली कुमरी । बहुतास येकला निवारि । तो वांचला हि पाहिजे ॥ ३३ ॥ बहुत सद्ध जालें इंधन । तरि शमे सुक्ष्म हुताशन । जे समुदाइ आणि दुर्जन । कैंचि गति सज्जना ॥ ३४ ॥ जना आवडे शुष्क वैर । लाभेविण कळहो घोर । निर्दयता आणि निष्ठुर । लज्जारहित सर्वदा ॥ ३५ ॥ पिते पुत्र शत्रु होती । येकमेकाचे प्राण घेती । मातेसि दवडुनिया घालिती । गाळिप्रदानें करुनिया ॥ ३६ ॥ स्त्रीदेव कामकिंकर । द्रव्यावेद दुराचार । कैंचा बरा घराचार । तन्हि तिजआधिन ॥ ३७ ॥ पूर्वी पतिव्रता होत्या नारी । आतां स्त्रीव्रत बहुत संसारी । ऐसियासीहि सांडुनि घरीं । परपुरुषीं भजत्याति ॥ ३८ ॥ कन्याविक्रय करिती ब्राह्मण । वेद शास्त्र विकिती पुराण । विकिती हरिकथा नामस्मरण । नाना द्रव्यें

आणि रस ॥ ३९ ॥ दुष्ट सेवा दुष्ट प्रतिग्रह । दुराचारी दुराग्रह । गोब्राह्मणा अति निग्रह । तेथें कैंचा प्रतिपाळ ॥ ४० ॥ पापें संतापें पावे दुःख । न पावे संसारिचें हि सुख । लक्ष्मी अधर्मी विन्मुख । अलक्ष्मीचा आदणा ॥ ४१ ॥ ऱ्हस्व काया कैचि माया । बहु आपलें प्रसवे जाया । सर्वथाहि न मिळे खाया । बुभुक्षित विटबे ॥ ४२ ॥ चोरी करी पारे न भरे पोट । तन्हि परदारीं महाधिट । परिग्रहेंविण लपट । अर्थकामि अतितृष्णा ॥ ४३ ॥ वटु अव्रत अनाश्रमि भोगि । अर्थ तृष्णा सन्यासिया लागि । ग्रामवास करिती योगि । तपोवेषोपजीविका ॥ ४४ ॥ क्षत्रि वैश्य स्वधर्मभ्रष्ट । शूद्र जाले सेवानष्ट । किति हेंचि बोलावें स्पष्ट । सीण वाटे वाचेसी ॥ ४५ ॥ अशेष माडला अनाचार । ग्लानी पावला सदाचार । सहामात्राजि मुमुक्ष नर । तेणे काय करावें ॥ ४६ ॥ आपला आपणा आधर्म नावरे । संसर्गिचा केवि आवरे । चहुकडुनि पडति चिरे । कैसें तरे बापुडें ॥ ४७ ॥ ऐसी आर्तभुत देखोनि दीनें । दयार्णव द्रवला महामनें । तोडवया भवबंधनें । नाम खड्ग प्रेरिलें ॥ ४८ ॥ तरावया अघसागरीं । नामनौका प्रेरी श्रीहरि । आपुलेन हस्तें वैसउनि वरि । वैकुंठासि नेतुसे ॥ ४९ ॥ पसरूनिया कर्ण कोशा । कारुण्यें लक्षि दाहाहि दिशा । जेथें आइके नाम घोषा । तेथें उडी च घाली ॥ ५० ॥ भावें अथवा स्वभावें । प्रमादें तन्हि मुखा यावें । कोण्हि तन्हि नाम घ्यावें । ह्मणोनि वाहे उभारि ॥ ५१ ॥ भक्तभार स्कंदि वाहे । करावलंबें तारिताहे । नाभि ह्मणत कृपा पाहे । बाहे ह्मणे मजलागि ॥ ५२ ॥ बुडत असतां दुखार्णवीं । हरि तारक जोडला देवीं । परमानंद प्रेमळां जीवीं । जयजयकार करिताती ॥ ५३ ॥ मूर्तित्रय ईश्वरावतार । परि ब्रह्मब्रह्म कर्म तत्पर । दिनोद्धरण हरिशंकर । तोचि वर्णिजेति आता ॥ ५४ ॥ याचें वर्णावया ध्यान । कैचें वाचेसी महिमान । तथापि प्रेम उथळलें गहन । तें न बोलता नावरे ॥ ५५ ॥ आतां सावधान श्रोतेमंडळ । तयासी प्रार्थितसे केवळ । हरिकथामृतकल्लोळ । सावकाश सेवा सुकर्णी ॥ ५६ ॥ रामदास ह्मणे आतां । आळस दवडु नाम गाता । पावो रामसायोज्यता ।

कर्थेनिण कलियुगीं ॥५७॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामीरामदासकृते ॥ नामा तरणोपायवर्णननाम । द्वितीयोध्याय ॥ २ ॥

---

॥ श्रीराम चरद ॥

पूर्व प्रकरणीं ईश्वर अवतार । साकार स्वरूपे हरीहर । त्याचीया आकृती मनोहर । चित्त चिंतीला निवतसे ॥ १ ॥ ऐका भगवताचें ध्यान । जे का कैवल्य निधान । तनु मनाचे समाधान । जें देवासीं दुर्लभ ॥ २ ॥ स्मित सुंदर अति सुनीळ । रम्य सकुमार वेल्हाळ । शक्ती कळाधर कुशळ । पूर्ण षड्गुणीं गुणनिधि ॥ ३ ॥ जगद्वय चरणकमळे । सरळीं शोभती पदांगुळें । कनिष्ठिकेपासुनि आगळें । श्रेष्ठपणें अंगुष्ठा ॥ ४ ॥ सव्य चक्रांक अंगुळी । अरुणा भारगळी तळीं । टाका वाळाकीया कीळिं । वर्तुळाकार शोभती ॥ ५ ॥ उर्ध्व रेखा अति सुरंगा । जैस्या जान्हवी आणि गंगा । काय जन्मस्थान सगा । चिन्हरूपें जडलिया ॥ ६ ॥ सद्य मुक्ति आहे पदस्मरणीं । ह्मणोनि ध्वज उभारला चरणिं । वज्र भक्त पजरपणीं । चिन्ह कार्यें उमटला ॥ ७ ॥ विकशित अष्टदळ पद्म । तेंचि पद्मेचें सुख सद्म । जेथें कोटि अर्बुदें पद्म । सख्या ठेविती सिरपद्में ॥ ८ ॥ भक्तप्रीति वाकि मुरडियीं । पाउलें आकळुनि ठेल्या सद्भावीं । उद्गार उठता स्वानुभवीं । अति गजेंरें गर्जती ॥९॥ तोडरें शोभे ब्रीदावळी । असुरांतक सेवक पाळी । तुळसी

जडलीं पल्लवीं ॥ १५ ॥ कासि कटि मणि मेखळा । किळ किंकीणि ज्वाळ माळा । रुणुझुणु वाजती मंजुळा । जैस्या श्रुती परतल्या ॥१६॥ उदर सुंदर दोंदाकृती । पद्मनाभिसव्यावर्ति । अब्जोद्भवाची उत्पति । सकळा भुवनासी जेथें ॥ १७ ॥ श्यामरोमांकुर रेखा । उभय संमिळित सुरेखा । जाणोनि अंतरिच्या सुखा । स्थिरावलें हृदयीं ॥१८॥ पृथुत्तुंग सुविशाळ । भूतीभुवन वक्षस्थळ । हरित मणि मयुख मंडळ । तैसे स्तनांक दोन्ही ॥१९॥ कारुण्याचें हिं कारण । ब्रह्मपदाचें भूषण । महिमा वर्णु शके कोण । अकळ नकळे हृद्गत ॥२०॥ महा स्कंद चतुर्भुज । आजानु शुंडाकृति सहज । कोपर शोण सतेज । नखें सरळा अंगुळिका ॥ २१ ॥ सर्व संपूर्ण लक्षणें । करतळी धरिली नारायणें । भक्ता अभय वर देणें । जेणें मस्तक कुवाळी ॥ २२ ॥ आंगिं चंदनाची उटी । मणि मुद्रिका दाहिं बोटि । रत्नकंकणें मणगटि । कीर्तिमुखे बाहिवटे ॥ २३ ॥ कीर्ति अतिशयें निर्मळा । घरटी घाली दिग्मंडळा । मंदरमथनि बाहु-बळा । संख्या न कळे सुरवरा ॥ २४ ॥ हंस निळोत्पळावरि । तैसा शंख शोभे करीं । नाद नसमाये अंबरीं । विजय काळीं वाजवितां ॥ २५ ॥ चक्र अरीचक्रा अंतक । रविचक्राकार तेजिक । दैत्य संव्हा-रुनि सकळिक । येऊनि हाति वसतसे ॥ २६ ॥ मस्तक दुष्टाचें छेदित । वेळवेळां दिग्ध धौत । कौमोदकी धगधगित । करिं कवळिलि शोभे ॥ २७ ॥ दिव्य अमर हेम कमळ । करकमळि सर्वकाळ । पद्महरिंत दीनदयाळ । उदार धीर गंभिर ॥ २८ ॥ कंबुकंठि कौस्तुभ मणि । तेजोनिधि झळके किरणि । वैजयंति सुदृढ गुणी । तुळसी सुमनमाळिका ॥२९॥ नभ अति सुनिळ निर्मळ । वरि नक्षत्रें देति ढाळ । तैसी साजिरी मुक्त माळ । श्रीहरिचें सुकंठिं ॥ ३० ॥ शोभे सुहास्य वदन । परमानंदाचें सदन । रसना निगमा जन्मस्थान । दंतपंक्ति सुरंग ॥ ३१ ॥ चुबुक चारु सुमनोहर । युवा कुमार निमासुर । उमटों पाहे तरुणाकार । अधर शोभा आरक्त ॥ ३२ ॥ तेजोमय रसाळ रम्य । वदन शोभा अनुपम्य । घ्राण सरळ सुगंधगम्य । जगत्प्राणा पर्णाळि ॥ ३३ ॥ भृकुटि सुरेख

धनुपाकार । नेत्र आकर्ण सुदर । पत्राग्रींचे रोमांकुर । लावण्यातें शोभविती ॥ ३४ ॥ हर्षे निर्भर महागन । तेणें विकाशलें लावण्य । चचळता देखोनि मीन । जाळि तळपों सिकलें ॥ ३५ ॥ अति सामर्थ्ये अवलोकना । सायोज्यता लाभे दीना । रक पावती महिमाना । पूर्ण कामें तत्वता ॥ ३६ ॥ कुंडलें कार्णी रत्नखचित । मकराकारें लखलखित । तेज गंडस्थळि फाकत । महिमा अकळ श्रवणाचा ॥ ३७ ॥ श्रवणि सुर जाले तल्लिन । श्रवणि सुखावलें मन । श्रवणि जाले समाधान । श्रवणि शोभा सप्रभ ॥ ३८ ॥ भाळि त्रिवेळिका साजिरी । मळिरट रेखिला कस्तुरि । अकळ न कळे ज्याची थोरी । उपमा नाहि तयासी ॥ ३९ ॥ शिरीं शोभति चाचर कुरळ । कृष्ण सुरगे मृद निर्मळ । धुपें धुपिले परिमळ बहुळ । दाहि दिशा फाकतसे ॥ ४० ॥ नाना सुगध नाना रगी । अमर सुमनें शुध जगीं । चढलिं हारिचे उत्तमागी । वृगुठिसि गुफिलि ॥ ४१ ॥ सुमनयोगें मधुकरासि । सेविता चि स्वविपयासी । मीळणी जाली भगवतासी । हर्षे रुजि कारितातो ॥ ४२ ॥ तेजपुज मुगुट सिरिं । रश्मि फाकती नाना परि । रग बैसे गगनावारि । त्याची शुन्यता गेली ॥ ४३ ॥ तुळसी मञ्जरिका पुष्पिता । परमा मोदें मघमाघीता । मुगुटि त्रुची प्रेमगता । भगवतासि आवडती ॥ ४४ ॥ माधवाची प्रीति थोरी । गायनाचे ब्रह्मच्यारी । त्याची रुचि देवास भारी । मुगुटावरि पिछांर्में ॥ ४५ ॥ जैसी रवीप्रकाशें करीं । रत्नें दिसतातीं साजिरीं । तैसा स्वप्रकाश हारि । अळकारा शोभवी ॥ ४६ ॥ लक्ष्मी लावण्याचा गाभा । साळकृता हरि वलभा । अकीं शोभे पद्मनाभा । भद्रासनी भगवत ॥ ४७ ॥ विकुठावती विष्णुपुरी । कनकगीरिचा सीखरीं । रत्नखचित रचना थोरि । जेथें हरि वैभवें नादे ॥ ४८ ॥ विस्वक्सेनादि हरिगण । दिग्पति सेविती नारायण । दिव्य अप्सरा पेखण । किंनर गधर्व गाति ॥ ४९ ॥ नारदादिक भक्तराज । कारिती हरिकथासमाज । भावें तुष्ट गरुडध्वज । सुप्रसन्न सेवका ॥ ५० ॥ कनकदडिं आतपत्र । कळस झळकतसें

विचित्र । मुक्तजाळिका पवित्र । अति सुढाळ साजिरी ॥ ५१ ॥ मणिमंडित दिनमणि पर्ण । राज विभुति नाना वर्ण । दुंदुभि मंगळ तुरे कर्ण । पुजा काळि नित्रविती ॥ ५२ ॥ करणें विश्वाचा प्रतिपाळ । विशेष भक्ता कृपाळ । त्यांचा करावया सांभाळ । नाना अवतार धरितु ॥ ५३ ॥ भक्तालागि वेषधारी । क्षीरसागरी बळिचे द्वारीं । तीर्थी क्षेत्रीं सचराचरीं । अभ्यंतरीं सकळाचें ॥ ५४ ॥ ज्याचे हृदईं ध्यान बिंबे । त्यासी क्षण तोहि न विसंभे । नामस्मरणमात्रें लाभे । दीना वैकुंठ पदवी ॥ ५५ ॥ रामदासा समाधान । करिता श्रीहारिचें ध्यान । आतां परिसा पंचानन । नामे मुक्तिदायक ॥ ५६ ॥ स्वस्ति श्रीभक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुध्यानवर्णननाम । तृतीयोध्यायः ॥ ३ ॥ श्रीरामो जयति ॥ शुभं भवतु । राम ॥

---

॥ श्रीराम ॥

पूर्वे प्रकरणीं गोविंद । स्तविला विश्वा मूळकंद । आतां शंकर परमानंद । वर्णिजेतो सद्भावें ॥ १ ॥ ध्यान परिसावें शिवाचें । जाड्य निरसावें जिवाचें । भय भंगलिया भवाचें । शंकर पदवी पाविजे ॥२॥ परि हें अकळ सकळांपरि । कंपित होतसे वैखरी । चित्त जातसे चोंवरि । परि सुप्रेमें सावरिली ॥ ३ ॥ न कळे बाळ वृध तरुण । न कळे सगुण किं निर्गुण । न कळे न कळे विरूपेक्षिण । किं भुवनत्रय सुंदर ॥ ४ ॥ शंकर संतोषातें करीं । सदाशिव कल्याणकारी । रुद्र प्रळयांतीं संहारी । निरशी जन्ममरणातें ॥ ५ ॥ योगी ह्मणावा किं भोगी । त्यागी किंवा तो अनुरागी । लोक तत्र नव्हे जगीं । सीळ अभिनव कैसें ॥ ६ ॥ आर्द्र चर्म आणि अंगें । जें वर्जिलीं सकळ जगें । तें या शंकरप्रसंगें । त्रिजगासि अभिवंद्य ॥ ७ ॥ नग्न नग्न दिगंबर । सर्वाभरण भूषितवर ।

---

१ भयभीत रीतीनें २ त्रिनेत्ररूप ३ नरकपालें

स्मशानवासी निर्विकार । चाळक किं विश्वाचा ॥ ८ ॥ किं ते कैळास-भुवनीं । शोभे रत्न सिंहासनीं । वामांकारूढ भवानी । लोकपाळ सेविती ॥ ९ ॥ कैसा परि तो वर्णावा । लक्षवेना लिळार्णवा । परि त्या भावार्थाची सेवा । भोळेश्वरा आवडे ॥१०॥ ज्याचें स्तवन करिता श्रुति । चकित थकित प्रवर्तती । तो हा भोळा चक्रवर्ति । भोळ्या भावें वर्णिजे ॥११॥ यथाशक्ति जैसी मति । तैसाचि तू गिरिजापति । आतां परिसावें सुचित्ती । संतीं चतुरीं प्रेमळीं ॥१२॥ निर्गुण धाम धवळ । स्वप्रकाश अति तेजाळ । जैसा दिव्य रजताचळ[1] । कर्दर[2] शृंगीं[3] मंडित ॥ १३ ॥ कर्पुर गौर अतिसुंदर । किं गोक्षीर फेन साकार । स्फटिक वर्ण प्रभुताकार । तैसी आंगप्रभा हें ॥ १४ ॥ मुनी मानसीची सीत कमळें । तैसीं चरण रातोत्पळें[4] । अति साजिरीं पदांगुळे । चढता महिमा अंगुष्टीं ॥ १५ ॥ उत्तुग नख चक्रवाळें । मुकुरा[5] सन्निभ सोज्वळें । सन्य चक्रांकित अंगुळें । शोभताति त्रिकांडि ॥ १६ ॥ कोमळ तळवे आणि टांचा[6] । धवधवीत उर्ध्वरेखा । पदीं पूर्णता सुरेखा । मुक्तिध्वज उभारला ॥ १७ ॥ भक्तमनमदगज आवरी । अकुश कुमार्गी सावरी । वज्र भवगिरीते विदारी । सेवक जन अभयकर ॥ १८ ॥ पदीं पद्में सुनिकसिते । परमानंदा मोदवतें । महिमा न वर्णवे शेषातें । भक्त मधुकरा रुंजी ॥ १९ ॥ भक्ति मुक्ति चरणीं लिळा । वांकिं गर्जती वेळोवेळां । ह्मणती येथींचा सोहळा । देवादिका दुर्लभ ॥ २० ॥ घामे बिरुदाचा तोडर । शरणांगत वज्रपजर । दुष्टा दानवा सहार । पुतळे रुळती शत्रूचें ॥ २१ ॥ जगद्वंद्यें पदें दोनी । सेविती चराचर सुरमुनि । अर्चित सुमन चदनीं । त्रिभुवनि विख्यात ॥ २२ ॥ घोटि त्रिकोन सुंदरें । उभय भार्गी तेजाकारे । जघा सरळा मनोहरें । जानुचक्रे वर्तुळ ॥ २३ ॥ स्फटिक स्तभ सचेतन । तैसे उरूद्वय गहन । सुंदर सघन तो जवन । पंचानन तो स्वयें ॥ २४ ॥ गुह्य स्थानाचें महिमान । प्रगट जाणे त्रिभुवन । करिती लिंगाचें पूजन । ज्याचें जाले

---

१ रौप्यपर्वत. २ गुहा. ३ शिखर ४ चरणकमलें ५ दर्पण ६ टांचा.

पुराण ॥ २५ ॥ ज्याच्या स्वरूपासी आच्छादी । ऐसें वस्त्र नाहि वेदी । म्हणोनि दिगंबर सकळादि । सेखी दिशा त्यामाजी ॥ २६ ॥ कनक रुचिरें दिव्यांबरें । लिळा धरितसे सुंदर । सार्द्र गज चर्म सादरें । व्याघ्राजीन उत्तरी ॥ २७ ॥ रत्नकांचि मणि मेखळा । क्षुद्र घंटा ज्वाळमाळा । रम्य वाजती सुढाळा । नृत्यकाळीं कां गमनीं ॥ २८ ॥ उदर दोंदांसी त्रिवळी । सव्यावर्त नाभिकमळीं । तेथें ब्रह्माडाच्या वोळी । रोमरेखा साजिरिया ॥ २९ ॥ अति विशाळ वक्षस्थळ । तेथें शोभति लघु कुरळ । सकळा सामर्थ्याचे स्थळ । अति साजिरें स्तनांक ॥३०॥ महास्कंदभुजादंड । जानुपर्यंत प्रचंड । जैसे सरळ दिग्गज शुंड । दशहि तीक्षण कोपर ॥ ३१ ॥ साकारता कास्मिर किळें । तैसीं सुंदर करतळें । सरळ त्रिकांडीं अंगुळें । सर्व लक्षण संपूर्ण ॥ ३२ ॥ सर्वांगीं विभुतीची उटी तेणें शोभतसे धूर्जटी । ज्याची विभूति सर्व सृष्टि । स्वप्रकाशें शोभत्री ॥३३ त्रिपट्कोण विविधाकृति । मध्यें विजे रत्नजोति । मुद्रिका अगुळी झळकति । यंत्राकार साजिरिया ॥ ३४ ॥ कीर्ति वर्णे विश्वमुखें । ते पावति परम सुखें । दंडीं शोभती कीर्तिमुखें । बाहिनटे केयुरें ॥ ३५ ॥ हस्तीं कवळिला त्रिशुळ । जैसा तेजाचा कल्लोळ । छेदी अखिळाचें मूळ । दंड दंडी दुष्टातें ॥ ३६ ॥ डमरु डिमिडिमि गर्जे नादें । भेणें तडकत शत्रु दोंदें । सुरवर नाचती आनंदें । जयजयकार करिताती ॥ ३७ ॥ दिव्य धनुष जें पिनाक । वज्रवद अमोलिक । दढानादि सितात्मक । मध्य मुष्टीं कवळिलें ॥ ३८ ॥ तीक्षण बाण सिळाधौत । धारा तेजें झळाळित । गृध्रपक्षें पिछाकित । अनिवार हस्तकीं ॥ ३९ ॥ आत्म स्मरणीं स्वळिळा । हस्तीं रुद्राक्षाची माळा । जगज्जीवन जिन्हाळा । कमंडलु निजकरीं ॥ ४० ॥ अभिनव आयुधाची परि । खट्वांगाचि धरिलें करीं । जें निःकाम सचराचरीं । तें सामर्थ्य मिरविलें ॥ ४१ ॥ नरकपाळ पाणीतळीं । पात्र मिरवी चंद्रमौळी । सर्प धरिला करकमळीं । ऐसीं दश हि आयोधें ॥ ४२ ॥ विषें विकळ

---

१ प्रभा.

सकळ सृष्टि । मृत्युंजय शिरं जगजेठि । अवलीळेसि धरिलें कंठीं । नीळकंठ प्रसिध ॥ ४३ ॥ कंठ मणि मुक्तमाळा । तेज फांके वक्षस्थळा । अस्थिमाळिका विशाळा । नाग येज्ञोपवीत ॥ ४४ ॥ स्नानंदाचीं दिव्य सदनें । तें चि शोभती पंचवदनें । जिन्हा सरस्वतीचीं स्थानें । सकळ विद्या तेथुनिया ॥ ४५ ॥ अधर सधर अति सुरंग । दशनी झळके रत्न रंग । चारु चुबुका लक्षणांग । श्मश्रु चिन्हें वें अकळ ॥ ४६ ॥ जगत्प्राण प्राणें सरळीं । नासा पुटिका तेजाळिं । आकर्णता नेत्रकमळीं । आनळ नयन झांकिला ॥ ४७ ॥ प्रतिवदनीं त्रिनयन । निजाल्हादें निर्भर मन । पूर्ण कृपावलोकन । परमानंददायक ॥ ४८ ॥ नेत्र पत्रीं रोमांकुर । भृकुटि सहज धनुषाकार । मकराकृति तेजाकर । कार्णी मणि कुंडल शोभा ॥ ४९ ॥ स्वप्रकाश शिव श्रवण । श्रवण सुपणा सुशण । श्रवणीं उपतिष्टे स्मरण । श्रवण भक्तजना तारक ॥५०॥ भाळीं अर्ध अमृतकर । सुदर शोभे तिलकाकार । धरिला नित्य निरतर । शंकर तेजें उजळला ॥ ५१ ॥ शकर तनुता अति सुगध । जेथूनि जालें सर्व गध । अमर सुमन पुजा सुध । ज्याच्या अंशें मघमघित ॥ ५२ ॥ पिंगट जटाजुट निर्मळ । धरा दुर्धरें धरिलें जळ । मुगुटीं झळकती रत्न कीळ । कळसीं हिरें सप्रभ ॥ ५३ ॥ रम्य कैलासशिखरीं । राजभुवनीं भद्रांबरीं । कर्पूरगौरसहित गौरि । लोकपाळ सेविती ॥ ५४ ॥ सकळ सिवगण करिती सेवा । आत्तपत्रादिक वैभवा । पुष्पांजाळि माहादेवा । मगळ तुरें गर्जती ॥५५॥ रामिरामदासी ध्याता । जिवासिव सायोज्येता । शकर करुणाकर तत्वता । भावार्थीचे सतोषे ॥५६॥ स्वस्तिश्री भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिवध्यान वर्णन नाम । चतुर्थ प्रकरणं ॥ ४ ॥ श्रीरामोजयति । शुभमवतु । श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

पूर्व प्रकरणद्वयीं हरि शकर । वर्णिले नीळ धवळ साकार । जिहीं दोहीं रूपीं सर्वेश्वर । अमूर्त मूर्तिमंत ॥ १ ॥ जैसीं दोहीं नयनीं

दृष्टि येकी। किं येक श्रोत्र दो श्रवणां किं। येक पुरुष दो हस्त किं। तैसी यासी येकात्मता ॥ २ ॥ निर्गुण होत्साते गुणनिधानें। कीर्ति व्यापिली सर्व भुवनें। जिहीं आपुलेनि सामर्थ्ये महिमानें। विश्व धरिजे उद्धरिजे ॥ ३ ॥ पृथ्वीमाजि प्रवेशोनि वोजें। जगत्रय धरिलें गरुडध्वजें। नामस्मरणाचें भोजें। तारी दुराचारी हा ॥ ४ ॥ होउनि रसात्मक चद्रमा। औषधि पोषी अमृतोपमा। तेणें चालवी काळक्षेमा। सकळा हि जिवाचिया ॥ ५ ॥ तैसाचि स्वयें महेश्वर। महीरूपें विश्वाधार। धरिलेंसें हें चराचर। आपुलेनि सामर्थ्ये ॥ ६ ॥ औषधिपोषक चंद्रकिरण। तो चंद्र ज्याचें भाळभूषण। तेणें रसें उदरपोषण। करी सर्व जिवाचें ॥ ७ ॥ करुणाकर सदाशिव। नामस्मरणमात्रें भव। विध्वंसुनी जड जीव। कैवल्याप्रति नेतसे ॥ ८ ॥ मुळींचीं जे जे विशेषणें। ते दोघे हि मिरवती भूषणें। तरि भेदाचेन दूषणें। कैसेनि ते लिंपती ॥ ९ ॥ रमापति आणि उमापति। दोघे हि आत्मत्वें स्तविती श्रुति। तरि आत्मे काय वेगळे आहेति। किं येक चि अद्वितीय ॥ १० ॥ आत्मा अव्यक्त बीजस्थानीं। तो चि प्रत्यगात्मा व्यक्तावलंबनी। तयासी सर्वेश्वर ह्मणती मुनी। तो आकारा कारण ॥ ११ ॥ तया निराकाराचें साकार। शाखाद्वय हे हरिहर। हे भिन्न भासे हि इतर। कदा नव्हती स्वरूपीं ॥ १२ ॥ आतां निराकार आत्मा। आणि साकार हि परमात्मा। साकारा निराकाराची सिमा। नसे चि स्वरूपार्णवीं ॥ १३ ॥ आता जैसें आहे तैसें। ब्रह्म चि केवळ असे। विजातीय काहिं च नसे। भासत च असता ॥ १४ ॥ व्याप्यव्यापक नलगे अक्षेप। तेजांश चि सर्व दीप। आणि मुख्य तेजाचें स्वरूप। काय भिन्न होतील ॥ १५ ॥ तैसे ईश्वर आणि जीव। ब्रह्मरूप स्वयमेव। जया नसे हा अनुभव। ते स्वप्नवत मिथ्या भेदिती ॥ १६ ॥ तो जरि साच असता भेदु। तरि कोण्हासी हि नसता अद्वयानंदु। समस्त खल्विदं ब्रह्म वेदु। कासया प्रतिपादिता ॥ १७ ॥ पूर्वी भेद प्रतिष्ठिला होता जेणें। अभेदता हि वर्णिजे

१ आचरीन.

तेणें । तरि त्याचेनि वाक्यप्रमाणें । पूर्वपक्ष मिथ्या जाला किं॥ १८ ॥ सत्य भेदु संहारिता । भेदहत्या पडती संतां । ब्रह्मयासहित ब्रह्मांडता । हें असे रूप जयाचें ॥ १९ ॥ एतावता भेद नाहीं । भासे तो अभेदमय पाहीं । भेदीं अभेद अभेदीं भेद हें हि । प्रमाणसिद्ध ॥२०॥ ह्रस्व दीर्घ मृद्भांड करणी । कारणरूप येकी धरणी । घटाकाश महदाकाशपणीं । काय पडली वेगळे ॥२१॥ तेथें ब्रह्मांडरचनेचें कारण । स्वयें नीळकंठ नारायण । तया वेगळेंपणीहि वेगळेंपण । काय घडों शेकेली ॥ २२ ॥ तयासी प्रत्येकें स्तविती श्रुति । हरिहर विश्वेश्वर विश्वमूर्ति । आणि वि-श्वोत्पत्ति विनाश स्थिति । प्रत्यकें प्रतिपादिती ॥ २३ ॥ जैस्या येका रामाचिया दोनी प्रतिमा । द्विभुज चतुर्भुज निरोपमा । चित्रधनुर्बाण-पाणीं घनशामा । शंखचक्र गदाधरा ॥ २४ ॥ तयातें स्तविता वेग-ळालें । मुळींचें महिमान पाहिजे वर्णिलें । ह्मणोनि प्रत्येकें अद्वैत स्तवन केलें । श्रुतिस्मृतिपुराणीं ॥ २५ ॥ विष्णुमाया वैष्णवी जाली । ते वि-ष्णुतेजें प्रवर्तली । तेचि अष्टधा प्रकृतिल्या आली । इच्छासामर्थ्यें विष्णूच्या ॥ २६ ॥ तयेपासुनि सृष्टिरचना । क्षेत्र क्षेत्रज्ञ हे विवंचना । प्रतिपाळी जन सज्जना दुर्जना । करूनिया दंड ॥ २७॥ संहारकाळीं काळरूपधरा । करी सकळाचा संहारा । हे लीळा जळतरंगाकार । स्वयें निर्विकार स-दोदित ॥ २८ ॥ तैसाचि शिव तरी सहज ईश्वर । सदां स्वस्वरूपीं सादर । आकारीं च निराकार । अपार योग जयाचा ॥ २९ ॥ तया ईश्वराची ईश्वरी माया । सर्वेश्वरें प्रतिष्ठिलिया । प्रवर्तविली प्रपंच रचाया । आपुलेन सामर्थ्यें ॥ ३० ॥ मायेस्तत्र त्रिगुणादि तत्वें । निर्माण जाळीं पृथक्त्वें । पचीकृत अपचीकृततत्वें । जाली रचना सर्व हि ॥ ३१ ॥ यत्र जीव तत्र शिव । क्षेत्र क्षेत्रज्ञ प्रादुर्भाव । यैसा विस्तारला सावेव । प्रपंच उभारा ॥३२॥ आवघें जग चि विष्णुमय । यैसा नाना ग्रंथान्वय । महद्भूतें भौतिकें अप्रमेय । भूतात्मा स्वये श्रीहरि ॥ ३३ ॥ भूतें विष्णु भुवनें विष्णु । वनें विष्णु गिरिदिशा विष्णु । पृथ्वी समुद्र सरिता विष्णु । साभास निराभास हरिरूपें ॥ ३४ ॥ हरिरूप स्वये वोंकार । हरिरूप

मातृका प्रकार। हरिरूप अर्थ नानाकार। स्फुरण परापर श्रीहरि ॥ ३५ ॥ हरीवांचुनि कांहिं च न घडे। तरी महादेव चि का वेगळा पडे। विष्णुसहस्रनामीं वाडेंकोडें। मिरवी नामें शिवाची ॥ ३६ ॥ तेहि नामें विष्णुपर वाखाणिलीं। शिवता निवडूनि दवडिली। तरी हरीची व्यापकता भंगली। ह्मणोनि हरिहर अभेद ॥ ३७ ॥ तैसाच रुद्रपद्धतीस महेश। सर्वमय मी सर्वेश। विश्वरूप वर्णिला जगदीश। सर्वात्मा सर्वरूप ॥ ३८ ॥ पृथ्वी मी सदाशिव स्वता। आप तेज वायो व्योमता। गिरि समुद्र सर्व जीवता। सदाशिव मी स्वये ॥ ३९ ॥ मी मृत्तिका मी पाषाण। मी धान्य मी अमरगण। मी ब्रह्मा मी नारायेण। स्वयें शंकर सर्वात्मा ॥ ४० ॥ असो सर्वहि मी महेशान। कांहींच नाहीं मजवांचुन। जें जें बोलिला पंचानन। तें वर्णावें कवणासी ॥ ४१ ॥ अष्टमूर्ति महेश्वर। भूतपंचक स्वयें शंकर। रवि शशि वन्हि इंद्र ईश्वर। स्वयें अशेष विश्वरचना हे ॥ ४२ ॥ त्रिपुरादि दुष्ट संहारून। करी सृष्टीचें प्रतिपाळन। प्रळयकाळीं करितां दहन। तृतीय नेत्रानळें ॥ ४३ ॥ येवं सर्व हि शैर्वाकार। तरि वेगळा नव्हे शार्ङ्गधर। भिन्न भावितां अद्वैत ईश्वर। हें हि केंवि घडों शके ॥ ४४ ॥ शेखीं हें अवघेंचि वाव। जैसा नानाकार भासे माद्दव। स्वात्माराम सदाशिव। स्वसवेद्य अविनाश ॥ ४५ ॥ केशवाचें ह्रदईं शिव। शिवाचें ह्रदईं केशव। सर्वथा नाहीं भिन्नभाव। हें वेदवाक्य विश्वारूढ ॥ ४६ ॥ शिवकेशवासी भेद भावी। तो आकल्प पचे रौरवीं। येवढ्या अनृतापरिस पदवी। थोर कैंची पापाची ॥ ४७ ॥ या दोहींमध्यें ज्याचा पाईं। आवडी उठे चित्ताचा ठायीं। त्यातें भजावें ह्रदयीं। अनन्य भाव धरूनिया ॥ ४८ ॥ करावी अव्यभिचारिणी भक्ति। याची यैसी असे युक्ति। पुजूनि सर्वस्वें पतिव्यक्ति। भावें देवर मानावे ॥ ४९ ॥ पतीसी जयाची आवडी। प्राणापरिस ज्याची गोडी। तयातें द्वेषूनि दवडी। ते पतिव्रता किं पापिणी ॥५०॥

---

१ मोठ्या आवडीनें. २ शंकरमय.

पतीचा ठाईं ज्याची प्रीति । तैसी च असावी आपुली वृत्ति । येकि वेगळी करूनि रति । सर्वांसी तत्सुखार्थ सेवावे ॥ ५१ ॥ येकाचें करूनि भजन । येकाचा द्वेष करावा ह्मणोन । यैसें तन्हि आहे वचन । कोण्हे ग्रंथीं कोण्हाचें ॥ ५२ ॥ जयासीं भजावें तो ईश्वर । तद्रूप सर्व चराचर । येकदेशी तो अविचार । देव चि नेणें ॥ ५३ ॥ येकदेशित्वेंवाचून । कदा न घडे भजन । तरी शिळाप्रतिमापूजन । भगवद्भावें च कीं ॥ ५४ ॥ त्या भगवंताचें रूप । कांहीं बरें कांहीं कुरूप । यैसिया स्तवनासी कोप । कीं कृपा करावी ॥ ५५ ॥ आतां आसो कैंचा भेद । भावें भजावे शिवगोविंद । भगवद्भक्तया परमानंद । अनयासें पाविजे ॥ ५६ ॥ ते भक्तीचीं दश लक्षणें । पुराणीं वर्णिलीं विचक्षणें । ते सादर परिसावी ह्मणें । श्रोतयाप्रति प्रार्थुनी ॥ ५७ ॥ इति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामीरामदासकृते । विष्णुशंकरयोरैक्यतावर्णनं नाम । पंचम प्रकरणं ॥ ५ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

पूर्व प्रकरणांतीं अन्वय । भक्ति कलिमार्जी तरणोपाय । तिचा हि लक्षण समुदाय । दश प्रकारें परिसावा ॥ १ ॥ पराच्या विनाशाकारणें । भक्ति भगवंताची करणें । ते तामसाधमा सदा धरणें । जें असुरादिकासी ॥ २ ॥ जें अर्चन कैतवंबुद्धि । जैसी स्वैरिणी स्वपतीसी आधीं । ते तामसमध्यमा बुधि । बोलिली आहे ॥३॥ देवपुजा देखोनि दुजयाची । मछरें सेवा करी हरिहाराची । मजपुढें स्थिती किती याची । ते भक्ति तामसोत्तमा ॥ ४ ॥ धनधान्यादि मनोरथ प्राप्त व्हावे । ह्मणोनि माधवा महादेवा भजावें । तें भक्तीचें लक्षण जाणावें । राजसाधम ॥ ५ ॥ सर्वलोकविख्यात कीर्ति । व्हावी ह्मणोनि पूजी हरिहरमूर्ति । यैसी

---

१ दुसऱ्या... ..सविण्याच्या बुद्धीनें.

ज्या भजनाची स्फूर्ति । ते भक्ति रजोमध्यमा ॥ ६ ॥ सालोक्यादि पद प्राप्तीकारणें । जया शिव अथवा केशवार्चन । दृढ भावें अंतःकरणें । भक्ति ते राजसोत्तमा ॥ ७ ॥ स्वकीय पापक्षयालागुनी । जो तत्पर ह- रिहरपूजनीं । ते सात्विकाधमा महामुनी । बोलती भक्ति ॥ ८ ॥ चक्र- धरा अथवा शंकरासी । भक्ति प्रिय अहर्निशीं । ह्मणोनि भजति ते भक्तीसी । लक्षण सात्विकमध्यमा ॥ ९ ॥ विधिबुध्या[1] होउनी[2] दास । जे पूजिती विष्णु अथवा शिवास । ते भक्ति श्रेष्ठ तयेस । लक्षण सात्विको- त्तमा ॥१०॥ ईश्वरध्यान मी च ईश्वर । मजमाजीं मद्रूप हें चराचर । दास हि समरस निरंतर । ते भक्ति उत्तमोत्तम ॥ ११ ॥ जेथें देवभक्ता येका- त्मता । तेथें सिद्ध जाली अनन्यता । आपुली भक्ति आपणीं तत्वतां । कोणासी हो नावडे ॥ १२ ॥ आवडीयेचि परम प्रीति । हरिहर येकमेकाचे दास होती । परम शांभव सीतापति । शंकर स्वयें हनुमंत ॥ १३ ॥ एवं प्रकारें मनोरमा । जयाची भक्ति उत्तमोत्तमा । तया कर्पूरगौरा घनश्यामा । अभिवंदन सद्भावें ॥ १४ ॥ नमो अरूपा बहुरूपा माधवा । नमो सा- कारा निराकारा महादेवा । नमो दश एकादशावतारा अभवा । शिवके- शवा नमोनमः ॥ १५ ॥ नमो माते भगवद्भक्ति । सर्वथा न कळे तुझी शक्ति । आश्रितासी सायोज्यता मुक्ति । स्वस्वरूपता देवाची ॥ १६ ॥ जो भगवंत सर्वांसी अनधीन । योगीयां नाकळे ज्याचें ध्यान । तो स- र्वस्वेंसि तुज अधीन । तुझिया सूत्रें वागतु ॥ १७ ॥ जया सगुण नि- र्गुण नेमितां श्रुति । सचकित नेति नेति ह्मणती । तू तया करिसी ना- नाकृती । मछकछपादिकीं ॥ १८ ॥ जो अनंताकाश विस्तीर्ण अनंत । ज्याचा सर्वथाहि न कळे अंत । तो तूं करिसी मूर्तिमंत । सुंदर आणि गुणनिधी ॥ १९ ॥ तु उमेरमेची अंतरवृत्ति । ह्मणौन हरिहर वेगळे नव्हती । तुजपासीं सदा वसती । तुझिये आवडीस्तव ॥ २० ॥ तू भक्तजनाची जननी । कृपामृत संजीवनी । वाढविसी उत्संगीं घेउनी । नाना कौतुकें पुर-

---

१ विधि = अमुकच करणें किंवा घेणें अशा अर्थाचा जो उपदेश तो. तेव्हां विधिबुध्या = केवळ भक्ति करावी या ईच्छेनें. २ मांडीवर, सन्निधानीं.

विसी ॥२१॥ सीणती ह्मणोनियां बाळें। साहसीं न घालिसी कवण्हे काळें। सहज स्वभावें खेळेंमेळें। आवडविसी देवातें ॥२२॥ न पाहासी विधिनिषेधा। कृपा च करिसी सापराधा। निवारीसी सर्व बाधा। आपुलेनि सामर्थ्यें ॥ २३ ॥ देखोनि या कळीची कळी। माझिया ळळेवाडां क्षणीं छळी। ह्मणोनि राहों नेदी तयाजवळी। दवडी अभक्ताकडे ॥ २४ ॥ ऐसी भक्तिजननी स्तवितां। प्रसन्न स्वभावें च कृपावता। जये वेगळें भगवता। कदा न पविजे कलियुगीं ॥ २५ ॥ कृतयुगीं तरले ध्यानें। त्रेतायुगीं यज्ञदानें। द्वापारीं तरले पूजनें। केवळ कीर्तनें कलियुगीं ॥२६॥ कलौ कल्मषरूप मनें। निश्चयें न तरे अन्य साधनें। मुक्ति रामनामाभिदानें। आणि स्मरणें शिवाचा ॥ २७ ॥ साडुनी हरिहर भक्तीचा आश्रय। केवळ बोधलुब्ध निराश्रय। ते पावती क्लेशसमुदाय। तुषकडणीं[१] श्रम जैसा ॥२८॥ ह्मणोनि भक्ति साधनसजीवनी। भक्ति वैराग्याची योनी। भक्ति ज्ञानाची जननी। विज्ञानें सहित ॥ २९ ॥ भगवद्भक्तीचिये द्वारीं। वोळंगती पुरुषार्थ च्यारी। कर जोडुनी निरतरीं। तिष्टत असती ॥३०॥ भक्ति धर्माचें निजधाम। भक्ति अर्थाचा आराम। भक्तिचा ठाइं संपूर्ण काम। मोक्षदायिनी सुभक्ति ॥ ३१ ॥ भक्तीचे ठायीं भगवताचें। षड्गुण ऐश्वर्य वर्ते साचें। संपूर्ण महिमान भक्तीचें। कवणा वर्णवेलि ॥ ३२ ॥ भगवद्भक्तीची सत्ता थोर। विधिनिषेध केले किंकर। भक्तिप्रतापें मोडली थोर। दडा आणि दोषाची ॥ ३३ ॥ प्रायश्चित्तास कोण पुसे। हठयोगास ठावचि नसे। तीर्थादिकें अनायासें। भक्तिचा ठायीं वोळगती ॥ ३४ ॥ तपें हरिहरेंवीण तापलीं। प्राप्तिकारणें अनुतापलीं। ईश्वरभक्तया निवालीं। सार्थक जालें कीर्तनीं ॥ ३५ ॥ कृतादि युगीचे तापस प्राणी। करिती कलियुगाची सिराणी। येथें कीर्तनमात्रें चक्रपाणी। मोक्षदाता सुभक्ता ॥ ३६ ॥ कळी हा दोषाचा समुद्र। परि येक असे महाभद्र। कीर्तनमात्रें चद्रमौळी रामचंद्र। महापापें हरूनि मोक्ष दे ॥ ३७ ॥ पूर्व युगीं काळांतरें। ईश्वरप्राप्ती होय निर्धारें।

---

१ तुष=कोंडा. कडण=कडन, काढणें. २ प्राप्त होती. ३ आश्रय. ४ श्रेष्ठता.

कलौ येकेचि अहोरात्रें । सुप्रसन्न सुभक्तां ॥ ३८ ॥ ह्मणौनी धन्य धन्य हें कलियुग । पावलें धन्य धन्य जग । भगवद्भक्त महाभाग । अनायासें तरताती ॥ ३९ ॥ कळी भरे भवसिंधू दुस्तरु । भगवंत अनाथ करुणाकरु । प्रेरिलें सुभक्ति महातारूं । विलंब न लउं वळगतां ॥ ४० ॥ पुनःपुना ह्मणे जगज्जीवनघन । माझें नाम माझें जीवन । कलियुगीं नामस्मरणावाचुन । गतिच नाहीं अन्यथा ॥४१॥ हृदयीं धरूनिया प्रेम । मद्भक्त जो निःकाम । सदा स्मरली माझें नाम । तयाचा मी विकिला ॥ ४२ ॥ माझिया नामस्मरणाचें टोणें[1] । मज केलें भक्तें जेणें । तयापासुनी वेगळें होणें । यैसें मज स्मरेना ॥ ४३ ॥ वैकुंठीं नलगे माझें मन । मज नावडे कैलास भुवन । नाम संकीर्तनीं अनुदिन । निष्ठे भावें भूललों ॥ ४४ ॥ माझिया नामाचा महिमा । मज चि ठाउका पुरुषोत्तमा । जीव नेणती सुखाब्धिसीमा । ह्मणौनि स्वमुखें मी सांगें ॥ ४५ ॥ जिवाची गणना कोण धरी । माझें स्मरण मी चि करी । माझ्या स्मरणाचें सुख वैखरी । मज हि न बोलवे ॥४६॥ त्रैलोक्य दुर्लभ आणि सोपें । सांडुनी करिती संसारपापें । सदा सिणतीं त्रय तापें । दुःखी होती दंडिता ॥ ४७ ॥ तथापि संसार तन्हि[2] कोण सांडवी । सुखें सेउ विषय ठेवी । मी ईश्वर भोक्ता इतुकें चि भावी । तेणें चि होय कृतार्थ ॥ ४८ ॥ ज्या विषये निरयीं पचावें । तो सेविता हि मजप्रति यावें । त्या माझें कां न व्हावें । अनन्य प्रेमें आवडी ॥४९॥ या सर्व सौकर्याचें[3] मूळ । माझें नामस्मरण मात्र केवळ । येके स्मरणें येक च वेळ । भक्तिज्ञान वैराग्य मी देतों ॥ ५० ॥ येकें नामस्मरणें नवविधा भक्ति । हे अभिनव ईश्वरशक्ति । अनुपम्य येथिची युक्ति । बीजतरुचे परी ॥ ५१ ॥ नामस्मरणासरिसें रूप । नाठवितां आसे अ-

---

१ वेढुक. २ नरकां. ३ सोप्या साधनाचें. ४ वृक्षाचा सर्व विस्तार ज्याप्रमाणें एका बीजाचे ठिकाणीं एकवटला असतो त्याप्रमाणें एक नामस्मरणरूप भक्ति केली ह्मणजे नवविधा भक्तीचे सर्व श्रेय प्राप्त होतें; तें कसें हें पुढील ओव्यांत दाखविलें आहे.

पॆंअप । तेथें कीर्तीचा प्रताप । वेगळा न वचे ॥ ५२ ॥ गुणनामकर्म, वर्णन । याचें नाम संकीर्तन । कीर्तन करी तया समाधान । काय नाहीं श्रवणाचें ॥ ५३ ॥ ह्मणौनि श्रवण कीर्तन स्मरणाचें वीज । भगवन्नाम होय सहज । स्मरण जालें तरी भोजें । पुढें सर्व भजनाचें ॥५४॥ पादवसेन आर्चन वंदन दास्य सख्य । आत्मनिवेदन स्मरणं सकळाचें आस्य । विस्मरणें भक्ति हें भाष्य । भुवनत्रयीं अश्रुत ॥ ५५ ॥ नवविद्यामार्जी येकी करितां । अवश्याच पाविजे भगवंता । नामस्मण एतावता । संपूर्ण फळदायक ॥ ५६ ॥ भावें करितां नामस्मरण । होय कीर्तनाचें स्फुरण । कीर्तनें होय श्रवण विवरण । चित्तशुद्धि तद्वारा ॥ ५७ ॥ जैसजैसा भक्त कीर्तनसीळ । तैसतैसें मन होय निर्मळ । तेणें प्रकाशें सूक्ष्म स्वरूप केवळ । जैसें अंजनें निधान ॥ ५८ ॥ ऐसी करितां भगवद्भक्ति । सेवितां च विरसे विपयासक्ति । अनायासें विवेक विरक्ति । वोळगणी जाली ॥ ५९ ॥ शुष्क पंडित भक्तिहीन । ह्मणतील भगवद्गुणकर्मनामवर्णन । याचें नामकीर्तन तें पुस्तकवाचन । गांव नाचो नये ब्राह्मणा ॥ ६० ॥ प्रसिद्ध वचन कारिकेसी । जें गांव नये ब्राह्मणासी । तें जेणें करणें उदरभरणासी । ते चि निषिद्ध नटतुल्य ॥६१॥ परंतु भगवद्भक्तीरूप । नृत्य गीत करितां पाप । ह्मणेलि तो चि पापस्वरूप । महा निरयीं पचिजेतो ॥ ६२ ॥ भगवद्भक्त शुद्धांतःकरण । अभ्यासिले नाहीं व्याकरण । तयासी न पवे नारायेण । ह्मणतां कदा नुद्धरे ॥ ६३ ॥ येन्हवीं हि देशभाषेविरहित । श्रोतया नुपतिष्टे संस्कृत । श्रोतया वेगळा वक्ता पंडित । काय करावा ॥ ६४ ॥ आतां पुराण विक्रय करी । येणें व्यवसायें दुर्भर भरी तो हि अति निषिद्ध संसारीं । कोणे उपायें तरेली ॥ ६५ ॥ स्वधर्मसंरक्षण करावें । स्वकर्मेंचि करूनि तरावें । परंतु ब्राह्मण्य बुडों लागलें तें धरावें । भक्तिवाचूनिया कवणें ॥ ६६ ॥ यालागीं हरिभक्ति

१ आवड. २ मुख. ३ नामस्मरणावांचून भक्ति करणे हें बोलणेंहीं कधीं कोणी ऐकलें नाहीं. ४ गाऊ. ५ मनांत बिंबत नाहीं.

करावी आदरें । न्यून कर्म संपूर्ण कीजे ईश्वरें । केवळ कर्माग्रह निराधारें । सिद्धि न पवे कलियुगीं ॥ ६७ ॥ षट्कर्मयुक्त भक्तिविहीन । तो विप्र श्वपचाहूनि हीन । चतुर्वेदी वासुदेव नेणोन । बहिर्मुख मूर्ख पतित ॥ ६८ ॥ वाचोनि पढोनि करी पाप प्रमाद । तया अंतीं उपेक्षिती वेद । दंभाचारवंतासी गोविंद । अंतरे महदंतरें ॥ ६९ ॥ ह्मणोनि अग्निहोत्र अगत्य ब्राह्मणा । अगत्य वेदाध्ययेन जाणा । तैसी हरिकथा अगत्य नारायणा । प्रीतींतें पावावयातें ॥ ७० ॥ येथें नलगे गायनकळा । नलगे सर्वथा नृत्यशाळा । पाहिजे प्रेमाचा जिव्हाळा । जेणें पाविजे भगवंता ॥ ७१ ॥ तत्वतां नसावा साभिमान । मग जैसा असेलि तैसेंच समाधान । हरिहरकीर्तनीं संजीवन । प्रेम परमेश्वराचें ॥ ७२ ॥ संस्कृत देशस्थ नव्हे वेगळें । जेथें भगवत्प्रेम तें चि आगळें । जें देशीं जे भाषा सकळासी कळे । तिणें करावें कीर्तन ॥७३॥ स्वधर्मश्रद्धा युगानुसार । अन्य प्रकारें भरावें जठर । करावा भगवत्कथेचा गजर । अति निःकाम निजनिष्ठा ॥ ७४ ॥ वैभव असिलें तरी सर्वस्वें । भजन भगवंताचें करावें । परमानंदें महोत्छावें । वित्तपाठ्य करूं नये ॥ ७५ ॥ जरी असिला अकिंचन । तरी सांडूं नये समाधान । भगवंत दिनाचा करुणाघन । समर्थाआधीं पावे तया ॥ ७६ ॥ हरिहरलिंग प्रतिमासिळा । पूजनीं पाहिजे प्रेमकळा । वरकड पदार्थाचा अडताळा । भक्ता नलगे सर्वथा ॥७७॥ येथिची अकथ्य आहे रीति । सर्व पदार्थाचा ठाईं प्रीति । ते देवभक्त चि स्वयें जाणती । प्रसन्नता प्रगटित ॥७८॥ भावें समर्पी पत्र पुष्प फळ तोय । तेणें चि ईश्वर संतृप्त होय । अथवा सांसारिक जो व्यय । तोहि अर्पितां संतोषे ॥७९॥ केवळ नामस्मरणमात्रें । कांहीं च न कष्टविता गात्रें । बैसले ठायींच वक्रें । नामस्मरणें भेटतसे ॥ ८० ॥ यैसें समर्थ आणि सुगम । परमेश्वराचें रम्य नाम । उच्चारितां लाभे पूर्णकाम । हें निधान कलियुगीं ॥ ८१ ॥ तया भगवंताकारणें तप दान व्रतें । बोलिलीं आहेति बहुतें । ते यथामती बोलिजेतिल तें । परि-

१ चाडाळाहून.

सावी सज्जनीं ॥ ८२ ॥ स्वति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । भक्तिवर्णनं नाम । षष्टमं प्रकरणं ॥ ६ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

पूर्व प्रकरणांतीं व्रत दान तप । जे बोलिजेली भगवद्भक्तिरूप । येसा उपक्रम केला तो सक्षेप । युक्त आतां परियेसा ॥ १ ॥ तपें भगवंताकारणें । पूर्वी केलीं असाधारणें । आतां कलियुगीचें जिणें । येसें कैचें ॥ २ ॥ अन्नमय प्राण जाला । जैसा मृत्तिकेचा घट चोला । धारिष्ट कैचें हो तयाला । जीवनधारणें कारणें ॥ ३ ॥ आतांच्या शरीरासारिखीं विवेकें । तपें बोलिलीं उत्तमश्लोकें । तें हि प्रकारें त्रिगुणात्मकें । सत्वरजतमोमयें ॥ ४ ॥ मूढ आत्मपीडे करी । साहे अग्नि धूम हिम नानापरी । अथवा पराच्या उछेदार्थ करी । श्रम असुर जैसा ॥ ५ ॥ तें तमोरूप तप । परम प्रमादरूप । तेथें भगवत्प्रातीचा साक्षेप । कैंचा महातामसा ॥ ६ ॥ तया तपाची फळप्राप्ति । अथवा फळाची अप्राप्ति । तया दोहींमाजीं व्याप्ति । असे परम दुःखाची ॥ ७ ॥ तयाचें फळ तें असार । दुष्ट काम कां मछ्छर । याची परिपाकता घोर । महा निरय भोगवी ॥ ८ ॥ तया हृदिस्थ च भगवंत परी । अंतरला दुरीच्या दुरी । ह्मणौनि भगवंतावांचूनि तप करी । तो संताप केवळ ॥ ९ ॥ आतां रजोताप प्रकार । मज व्हावा अति सत्कार । मज मानू हें चराचर । मज सर्वत्रीं पुजावें ॥ १० ॥ मजपासीं भरावी यात्रा । म्यां बंद्य व्हावें प्राणिमात्रा । माझी अवज्ञा करील त्या क्षेत्रा । प्रतीत व्हावी तत्काळ ॥ ११ ॥ येसिया संकल्पाचें तप । तें केवळ देहबुद्धिरूप । ईश्वरावांचूनिया ताप । अनुताप कैंचा तेथें ॥ १२ ॥ केवळ पावावया परेशा । निशेष हि नाहीं फळाशा । तया सत्वगुण प्रकाशा । तपोनिष्ठा अति शुध्द ॥ १३ ॥ जें देवाचें देवतार्चन । तें पुजावें विष्णुपंचानन । यथाशक्त्या अनन्य मन । स्वयें सप्रेम भावार्थे ॥ १४ ॥ देवतार्चन

करवितां दुजया हातीं । जो पुजील त्यासीच फळप्राप्ति । पदार्थीविण काय भगवंतीं । खोळंबलें आहे ॥ १५ ॥ येथें भावार्थ पाहिजे केवळ । भावार्थें निर्धन तें पूर्ण सकळ । नामस्मरणें अभिवंदनें प्रेमळ । देवासी पावे ॥ १६ ॥ तो भावार्थ न ये सिकवितां । बाह्य अभ्यासें न ये तत्वतां । ईश्वरकृपा प्रगटे स्वता । आणि सद्गुरुसत्संगें ॥ १७ ॥ ईश्वराचीं रूपें दोनी । चळ अचळ ऐसीं जनीं । अचळ प्रतिमास्थानीं । चळ तो ज्ञानी सद्गुरु ॥ १८ ॥ तया सद्गुरु सर्वोत्तमाचें । अनन्य भावें पूजन साचें । हें मुख्य प्रकारें तपाचें । स्वरूप प्रसिद्ध ॥ १९ ॥ परमेश्वरप्रीत्यर्थ द्विजवर । प्राज्ञ पुजावे सादर । तेणें पावन होय शरीर । आतां शौच द्विविद्ध ॥ २० ॥ अंतरशौच शुद्ध भाव । हाणिजे विश्वरूपें येक देव । भक्त हि अविभक्त हा अनुभव । अनन्य भक्तीचा ॥२१॥ बाह्यशौच मृतिकाजळें । गात्रें करावीं निर्मळें । येथे तरी समर्थ दुर्बळें । विचारावीं न लगती ॥ २२ ॥ धर्मप्रवृत्ति संक्षेपस्थिति । मूत्रोत्सर्गी मळोत्सर्गी मैथुनांतीं । येक वेळ मृत्तिका लिंगाप्रती । प्रक्षाळनी बोलिली ॥ २३ ॥ प्राक् अथवा उदङ्मुख शुचिस्थानीं । वाम पाणीसी त्रीणि उभयांसी दोनी । पांदतळाधोर्ध्व येक वेळ वामे वेद गंडुषें टाकुनी । अच्मनद्वयें मूत्रशौच ॥ २४ ॥ अपानप्रक्षाळनीं पंचमृत्तिका । दश वामे समोभय हस्तका । पादप्रक्षाळनीं त्रिवार शुचिदायका । गंडुषाष्टक आच्मनत्रयें मळशौच ॥ २५ ॥ विहित मैथुनांतीं मूत्रशौचवत । षष्ट गंडूष ब्रह्मसूत्र मार्गे उपवीत । वाम अवाम कर्णी यज्ञोपवीत । मळोत्सर्गी मुत्रोत्सर्गी धरावें ॥ २६ ॥ हा विधि गृहस्थासी । द्विगुण ब्रह्मचर्यासी । त्रिगुण वानप्रस्थासी । संन्यासीयासी चतुर्गुण ॥ २७ ॥ हा ब्राह्मणाचा विधिनेम । तैसाच क्षेत्री वैशानुक्रम । स्त्री शद्रासी अनेम । गंधलेपक्षयावधि ॥२८॥

हें स्वभावें येथें लिहिलें । स्वकर्म ग्रंथीं चि आहे विहिलें । देशकाळशक्तियुक्त्या केलें । पाहिजे सर्व ॥ २९ ॥ सर्व भूतीं भगवद्भाव । हें चि तत्वतां आर्जव । स्वयत च आहे सर्व[1] । हें शुद्ध तप बोलिजे ॥ ३० ॥ ब्रह्मचर्य ह्मणिजे जितेंद्रियता । येथें आहे द्विविधता । येका ब्रह्मचर्य गृहस्थ हि होत साता । येक ते वर्णी च केवळ ॥ ३१ ॥ गृहस्थ परस्त्री सोहोदेर । तो कळींत सन्यासी हा निर्धार । तेथें ब्रह्मचर्य काय थोर । सदाचारसीळता ॥ ३२ ॥ आतां वर्णी ह्मणिजे मैथुनत्याग । मैथुन बोलिला अष्टांग । स्मरण वर्णन क्रीडा विलोकनांग । भाषण संकल्पाध्यास क्रिया ॥ ३३ ॥ याची निवृत्ति तरीच घडे । जरी भगवंताची कृपा जोडे । जयेस्तव कदा न पडे । संसर्ग परस्त्रियांसीं ॥ ३४ ॥ स्त्रियांमाजीं घोळों लागला । त्याचें जितेंद्रियतेचा कळस जाला । केवळ वैश्वानर आणि नारद भ्रंशला । कळींचे मानव ते किती ॥ ३५ ॥ चित्रींची कामिनी सादर अवलोकी । ती प्रत्यक्ष पीडे उभयलोकीं[2] । ह्मणौनि प्रत्यक्षेचा सहवास साधकीं । करूं नये करूं नये करूं नये ॥ ३६ ॥ जया स्त्रीसमाज आवडे । तया ज्ञानावरी वीज कां न पडे । ते ब्रह्मभ्रमें जाले वेडे । उभय लोकीं अति निंद्य ॥ ३७ ॥ यालागीं तत्वतां वर्णी तो ब्रह्मचर्यनिष्ट । त्याचें साधन अति उत्कृष्ट । तया न कारितां नाना कष्ट । भावें भेटे भगवंत ॥ ३८ ॥ मुख्य तप तें अहिसा । तो हि द्विविध प्रकार कैसा । जीवघात मर्मभेद यैसा । सर्वथा हि वर्जावा ॥ ३९ ॥ वेदोक्त जीवघाती याजिक । जे इच्छिती विषयार्थ स्वर्गलोक । ते निर्दय देव इंद्रादिक । जैसें व्याघ्रें मेध्य भिल्ल ॥ ४० ॥ ये प्रपंचरूप काम्य कर्में । ह्मणौनि सन्यासीं वर्जिलीं दृढ नेमें । अहिंसादि शुद्ध आश्रमधर्में । पावले परब्रह्मीं ॥ ४१ ॥ आतां नुच्चारावे कोण्हाचे वर्म । वर्म ह्मणिजे अधर्म । आणि अधर्म वारीना तरी अनुक्रम । तदर्थ यात-

---

१ ब्रह्मचर्य दोन प्रकारचें आहे, गृहस्थाश्रमी असून जो जितेंद्रिय आहे तो व दुसरा वर्णानेंच जो ब्रह्मचारी आहे तो. २ परस्त्रीला बहिणीप्रमाणें मानणारा गृहस्थ ब्रह्मचाऱ्यापेक्षां श्रेष्ठ असा संन्यासी च या कलियुगांत समजावा.

नेचा ॥ ४२ ॥ याची ऐसी असे निर्णयता । वर्जी माती खातां माता । परी बाळकीं नाहीं निस्नेहता । तैसा जीवीं मत्सर न करावा ॥ ४३ ॥ सात्विक तप सत्य वचन । जेणें उद्वेग न पवे जन । प्रिय हित्तद आणि अनुसंधान । आत्मविद्या अभ्यास ॥ ४४ ॥ प्रिय आणि हितकारक । येथें आहे महा कौतुक । फळींत तरी प्रीतिदायक । अविधी विषयसेवन ॥ ४५ ॥ येणें तरी सर्वथा नव्हे हित । अप्रिय बोलतां भंगे चित । येथें हें चि दिसें उचित । अशास्त्र कठोर वर्जावें ॥ ४६ ॥ सकळ हि तपें तेणें केलीं । सांग विधिपूर्वक त्यासी च फळली । ज्याचें वाचें विश्वासें आलीं । नामें हरिहराचीं ॥ ४७ ॥ तेणें केले सर्व हि याग । तेणें केले महा योग । तेणें केला सर्वस्वाचा त्याग । हरिहर नामें स्मरे जो ॥ ४८ ॥ तेणें केलीं सर्व हि दानें । तेणें चि केलीं तीर्थाटणें । तेणें केलीं सर्व हि साधनें । हरिहर नामें स्मरे जो ॥ ४९ ॥ तेणेंचि केलें वेदाध्ययन । तेणें च केलें सत्शास्त्रव्याख्यान । तेणें केलें स्वकर्मानुष्ठान । हरिहर नामें जो स्मरे ॥ ५० ॥ कळौ कर्मधर्मादिक सकळ । परमेश्वरस्मरणेंविण विकळ । जीविका चि अधर्माचें मूळ । तद्रूप सर्व हि आचार ॥ ५१ ॥ यालागीं हरिहरनामोच्चारेंविण । साधनमात्र तितुकें सीण । हरिहरभक्त्या तदर्पण । करितां सर्व संपूर्णता ॥ ५२ ॥ भगवद्भक्त्यातप बोलिलें । तेथें हरिहरपूजन अधिष्ठिलें । तें विस्तरें बोलिजेलि तें परिसिलें । पाहिजे महा भागवतें ॥५३॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामीरामदास कृते । तपदान वर्णनं नाम । सप्तमं प्रकरणं ॥ ७ ॥

---

॥ श्रीराम ॥

पूर्व प्रकरणांतीं •हरिहरपूजनें । आदिकरूनि धर्मसाधनें । ते चि बोलिजेती समाधानें । चित्ताचया परिसावें ॥ १ ॥ शिवकेशवदेवालयें । दुजया उपदेशूनि करवी सद्वयें । आपण हि यथाशक्त्या करी स्वयें । त्याचें पुण्य परिसावें ॥ २ ॥ मातृपितृवंशोद्भूतें । लक्ष कोटी कुळें

दीतिमतें । त्यासहित कल्पत्रय विष्णुपदातें । सेऊनि तेथें च विमुक्ति॥३॥ मृत्तिकेचें चि शक्तिसारिखें । हरिहरालय करी हारिखें । तो हि तें चि फळ पाविजे सुरों । शत कोटी कुळासीं ॥ ४ ॥ विष्णु अथवा शिवायतन । काष्टाचे करितां फळ द्विगुण । इष्टिका त्रिगुण सिळा चतुर्गुण । स्फटिकनिबद्ध दशगुणता ॥ ५ ॥ ताम्राचें शतगुण बोलिलें । कनकमय कोटिगुणें वर्णिलें । जें देवतायतनाचें नेमिलें । तयाहूनि अधिक फळ ॥ ६ ॥ देवालयें तटाकें ग्राम । जो प्रतिपाळील पुण्यत्तम । तो शतगुणित फळ पावे उत्तम । करी तयापरिस हि ॥ ७ ॥ हा मुख्य धर्म होय निर्मळ । यासीं वारील तो पतित केवळ । तथापि आतां देशकाळ- । वर्तमान विचारिलें पाहिजे ॥ ८ ॥ ज्योतिर्लिंगें दिव्य स्थळें । मोडती बुडती जेणें काळें । तत्र प्रतिष्ठितां शास्त्रबळें । ब्रह्मसूत्र राहिलें पाहिजे ॥ ९ ॥ हा विचार करूनि सुखें चि । करावें हें प्रसिद्ध चि । ज्याचिया ख्याति पुण्याची । अगाध बोलिलीसे ॥ १० ॥ द्वादशी पौर्णिमासीसीं । क्षीरस्नान हरिहरासी । तो उभयपक्ष कुळायुतेंसीं । विष्णुसायोज्यता पावे ॥ ११ ॥ प्रस्थमात्र पयस्नान । पूजी विष्णुमहेशान । तो कुळायुतेंसीं सज्जन । विष्णुसालोक्य पावे तो ॥ १२ ॥ द्वादशीसीं घृतप्रस्थें करी । जो भगवतास अभिषेक करी । तो कोटिकुळासीं निरंतरी । सायोज्यता पावतसे ॥ १३ ॥ पंचामृतें अभिषेक करितां । येकादशीसी भगवंता । शिवा अथवा अनंता । तत्तत्सायोज्यता कोटिकुळेंसीं ॥१४॥ येकादशी द्वादशी पौर्णिमासीं । नारिकेळोदकस्नान भगवंतासी । वास्तव्य असिले त्तदेशीं । तयाचें फळ परिसावें ॥१५॥ शत जन्मार्जित हरे पाप । द्वयकुळासी निःपाप । वैकुंठीं वसे पुण्यरूप । विष्णुपदीं आनंदें ॥ १६ ॥ पुष्पमिश्रित गंधयुक्त उदक । तेणें करितां अभिषेक । युगपर्यंत स्वर्गलोक । अधिपत्यें पाविजे ॥ १७ ॥ जळें निर्मळें वस्त्रपूतें । अभिषेक करिता हरि वा हरातें । सर्व पापविनिर्मुक्त तयातें । स्वर्गी वास्तव्य शत

१ आनंदानें. २. इतर देवतांचीं देवालयें बांधण्यापासून जें फळ मिळतें त्यापेक्षां विष्णु अथवा शिवाचीं देवालये बांधल्यानें जास्त फळ मिळतें.

संवत्छर सर्व सुखें ॥ १८ ॥ क्षीरें क्षीरसागरनिवासी । जो संतर्पील पूर्यसंक्रांतीसी । विष्णुभुवनीं वसति त्यासी । त्रि सप्त पूर्वजांसहित ॥१९॥ शुक्लपक्षीं चतुर्दशी । अष्टमी पौर्णिमा येकादशी । भानुवारीं सोमवारीं द्वादशीं । सोम सूर्य परागीं[१] ॥ २० ॥ मन्वादि युगादि व्यतिपात । वैधृति गजछाया असतां प्राप्त । अर्वोदय पुष्यार्क हस्तार्क रोहिणी बुधयुक्त । संप्राप्त असतां ॥२१॥ शनि रोहिणी भौमाश्विनी । शन्याश्विनी बुधाश्विनी । भृगुपात अर्क वैधृति दिनीं । बुधानुराधा श्रवणार्क ॥२२॥ सोमश्रवण हस्तबृहस्पति । बुधाष्टमी बुधाषाढ भृगुरेवती । पयस्नानें पुजावा लक्ष्मीपति उमापति । घृत दधि मधु शर्करा ॥ २३ ॥ पंचामृतस्नानाचें फळ । सर्व यज्ञपुण्य अविचळ । त्रिसप्त पुरुषान्वित निर्मळ । विष्णुपुरीं वास्तव्य अकल्प ॥ २४ ॥ तेथें उत्पन्न होय ज्ञान । जें योगियासीं दुर्लभ करिता साधनें । तेणें मोक्षस्वरूप समाधान । पुनरावृत्ति असेना ॥ २५ ॥ कृष्णपक्षीं चतुर्दशी सोमवार । दुग्धें अभिशेपितां शंकर । शिवसायुज्य निरंतर । पावे तत्फळेंकरूनि ॥ २६ ॥ नारिकेळोंदकें सदाशिव । अभिषेकें पूजी धरूनि भाव । अष्टमीं चंद्रवासरीं जीव । शिवसायोज्यता तो पावे ॥२७॥ कृष्णपक्षीं अष्टमी कां चतुर्दशी । घृतमधुपचामृतेंसीं । संतर्पिता भाळवाळशशी । शिवसायोज्यता पावे ॥ २८ ॥ पुष्पफळोदकें त्रिपुरारि । भावें सस्नापितां सोमवारीं । तो स्वर्गीं वसे शत कल्पवरी । शिवपूजाप्रसादें ॥ २९ ॥ तिलतैलें अभिषेक करितां । सदाशिवाथवाअच्युता । कुळत्रितयेसीं सायोज्यता । भक्त पावे देवाची ॥ ३० ॥ गुक्षरसें पार्वतीपति । जो अभिषेक करील प्रीतीं । तो शिवलोकीं वसे महामती । शत कल्प कोटी कुळासीं ॥३१॥ घृत अथवा दधि । स्नापितां शंकर गुणनिधि । अथवा क्षीरें महाबुद्धी । अभिषेक करी. द्वादशी ॥३२॥ जन्मायुतार्जित पाप । विध्वंसनि पुण्यरूप । कोटिकुळेंसीं निःपाप । शिवसावर्ण्य तो पावे ॥ ३३ ॥ जो स्नान द्वादशीसीं । दुग्धें योजी माधवासी । तो विमुक्त जन्मायुतार्चित पापासी । परम पद पावे

१ उपरागीं, ग्रहणाचे दिवशीं.

कोटिकुळान्वित ॥ ३४ ॥ कार्तिकी पौर्णिमासीसि गोविंद । जो मधुप्रस्थें स्नापील परमानंद । तो पावे श्रीहरीचें पद । कोटिकुळेंसीं नान्यथा॥३५॥ मनोहरें पुष्पें सुरंगें सुगंधें । मनोरमें यथोक्त अष्टगंधें । उमापति रमापति पूजितां शुद्धें । तत्तत्सारूप्य भक्तासी ॥ ३६ ॥ पद्मपुष्पीं पूजी पद्मनेत्र । अथवा पार्वतीचा कळत्र । तो कुळत्रितयेसीं पवित्र । पावे तत्तद्भुवनासी ॥ ३७ ॥ सुवर्ण केतुकीपुष्पीं वनमाळी । जातिपुष्पीं पूजी त्रिशूळी । तत्तत्सालोक्यता पूजाफळीं । तत्तद्भक्त पावती ॥३८॥ जातिपुष्पीं कर्पूरगौर । बंधुककुसुमीं शामसुंदर । पूजितां सर्वपापविमुक्त नर । मेरूमस्तकीं वसे युग ॥ ३९ ॥ सप्तळाकुसुमीं विष्णु । रुद्रपुष्पीं जिष्णु । पूजितां पावे सहिष्णु । स्वरूपता हरीची ॥ ४० ॥ शिव विष्णु जातिसुमनें । पूजी उत्तम चंदनें । प्रस्थपुष्पीं पूजी शुद्ध मनें । तो सर्व हि काम पावतसे ॥ ४१ ॥ जो दिव्य वृषभध्वजा । प्रस्थपुष्पीं वांधे पुजा । शमीपुष्पीं पूजी बीजा । तो सर्व हि काम पावतसे ॥ ४२ ॥ अपामार्गदळीं शूळी । पूजितां सर्वकाळीं । विशेष शिवरात्रीं पुण्यसीळीं । शिवसायोज्यता पाविजे ॥ ४३ ॥ बिल्वपत्रें त्रिशुळाकार । अर्चितां संतोषे शंकर । शिवसायोज्यता पावे नर । तुळसीदळें गोविंद ॥ ४४ ॥ घृतयुक्तगुग्गुळें धूप । हरिहरा समर्पी भक्तिरूप । त्याचें तत्काळ चि सर्व पाप । भस्म होऊनि जाय ॥ ४५ ॥ तिळतैलें दीप । हरिहरासमीप । लाविल जो प्रदीप । तो सर्व काम पावतसे ॥ ४६ ॥ घृतदीपें हरती पापें । गंगास्नानफळ व्यापें । ग्राम्यतैलवनतैलप्रदीपें । तत्तत्सालोक्य त्रिसप्तासीं ॥ ४७ ॥ सर्व ऐश्वर्येसीं । शिवकेशवपुरीसीं । वसति फार्वे अनयासी । ह्मणौनि दीपदान करावें ॥ ४८ ॥ जो तटाक करील करवील त्याचें । पुण्य शताब्दें गणितां न गणवे साचें । पंचकोटि कुळासीं विष्णुपदीं

भार येक । तो पंचापद्वर्षें दिवी वसे ॥ ५१ ॥ जो या धर्मकृत्याची शुश्रुषा करी । तो नित्य विष्णुपदीं वास करी । तटाकार्धफळ कासारीं । कूपीं पाद कुल्या शतस्योत्तर ॥ ५२ ॥ धनाढ्य करी तटाकसाधनें । दुर्बळ कूप करी तेसमान । आरामकर्ता कुळत्रितयेंसीं भुवन । पावे ब्रह्मयाचें महा ॥ ५३ ॥ गो ब्राह्मण अथवा कोण्ही । छायेसी विश्रांत पावे प्राणी । तया पुण्याची फळश्रेणी । स्वर्गी वसवी करीतया ॥ ५४ ॥ आराम ग्राम देवालय तटाक । कर्ता पावे महाविष्णुलोक । हरिसहित पूजिजे हे कौतुक । महापुण्य फळाचें ॥ ५५ ॥ सर्व लोकोपकार करणें । अथवा देवपूजार्थ धर्मपरायणें । पुण्याराम केला जेणें । तयाचे फळ परिसावें ॥५६॥ तया वृक्षाचीं पुष्पें पत्रें । जितुकीं निर्माण होती विचित्रें । तावत्काळ स्वर्गी वसिजे पवित्र । कोटि कुळासहित ॥ ५७ ॥ आराम रक्षी कंटकावरणें । युगद्वय ब्रह्मपदीं वसिजे तेणें । तुळसीरोपण केलें जेणें । पुण्य तयाचें परिसावें ॥ ५८ ॥ सप्तकोटिकुळासहित । वैकुंठीं वसे सहलक्ष्मीकांत । मूळ मृत्तिका उर्ध्व पुंड्र धरित । तया श्रीहरि संतुष्टे ॥ ५९ ॥ तुळस्यालयांतील तृण । जो उत्पाटील प्रवीण । तितुक्या ब्रह्महत्या होती क्षीण । यदर्थी संशयो नाहीं ॥ ६० ॥ तुळसीसीं घाली उदक । यथेष्ट होय च कीं येक चुळक । तो वसे जों आचंद्रतारक । क्षीरोदशायीसह ॥ ६१ ॥ तुळसीकाष्ठाचिया माळा । जो घाली मिरवी गळां । कर्णी धरी तुळसीदळां । त्यासी नाहीं उपपातक ॥ ६२ ॥ तुळसीवनासी कटकावरण प्रकार । जो करील धर्मपरायण नर । ते असेलि तितुकें दिवस तितुकीं युगें वसे साचार । कुळत्रयेंसी ब्रह्मपदीं ॥ ६३ ॥ तुळसीदळ कोमळामोद मंजुरी । समर्पी श्रीहरिचरण कमळावरी । तो सत्यलोकीं सत्य वास्तव्य करी । पुनरावृत्ति निवर्तली ॥ ६४ ॥ अनाथ ब्राह्मणाचें शव । जो दहन करील मानव । तो अश्वमेध सहस्राचें सहस्रफळ गौरव । निश्चयेंसीं पावतसे ॥ ६५ ॥ पूजारहित विश्वपूज्य श्रीहरि । भक्षें भोज्यें अथवा फळें करीं । जो धार्मिक

१ पाण्याचा पाट.

पूजा करी । तया सारूप्य द्विशत कुळासी ॥ ६६ ॥ सर्वोपचारें लक्ष्मीकांत । जो पूजील पूजारहित । तो उभयपक्ष कुळायुतायुत । मोक्ष पावे दुर्लभ ॥६७॥ पत्रीं पुष्पीं अथवा फळीं । अथवा केवळ च जळीं । चुळकमात्रें पूजितां शुद्ध शुळीं । लक्षाश्वमेधफळ फावे ॥६८॥ जो पत्रें अथवा कुसुमें । शुद्धलिंग पुजील प्रेमें । तो अश्वमेधायुतफळ सहस्र गुण पावे नेमें । शिवसायोज्यता फावे ॥ ६९ ॥ जो अनार्चिता अनंतासी केवळ । समर्पील भावें जळ । तो सप्तकुळासीं फळ । पावे विष्णुसालोक्य ॥७०॥ हरिहरसदनीं संमार्जन । जो येकदा करी सज्जन । जितुकें समार्जती रजकण । तितुकीं युगसहस्रें हरिपुरीं वसे ॥ ७१ ॥ जो गोचर्ममात्र जळें सिंपें । शिक्ताणु जन्मार्जितें हरती पापें । सुगंधोदक सिंचिता हरिसारूप्य । रज सहस्रगुणे राहिजे ॥ ७२ ॥ पूजायुक्त सुप्रसन्न । विष्णु अथवा शिवलिंग देखोन । परमानंदें करी नमन । तो वसे विष्णुभुवनीं ॥ ७३ ॥ हरीसी अथवा शंकरासी । त्रीणि प्रदक्षणा नेमेसीं । करी तो पावे फळासी । अश्वमेध पदोपदीं ॥ ७४ ॥ गायक अथवा नृत्यकरी । गाती नाचती देवद्वारीं । गंधर्वराजता रुद्रगणेशता तरी । आकल्पंत तो मोक्षभाक्॥७५॥ देवालयीं मुखवाद्य जो करी । तो विमान शत युक्त कल्प स्वर्गवास करी । करतालिका वाजवी तरी । विमानें शतायुगद्वय ॥ ७६ ॥ देवासन्मुख घंटावादनाचें फळ । कोण वर्णू शके हो बहुळ । भेरी मृदंग पटह डिंडिभी काहाळ । याचें पुण्य अद्भुत ॥ ७७ ॥ देवस्त्रीगणसहित सर्व कामें । पंचकल्प स्वर्गीं वसे नेमें । शंखवाद्यस्वन सुप्रेमें । निःपाप ब्रह्मपद पावे ॥ ७८ ॥ कांस्यटाळें जेंगट झल्लरी । वाद्यें वसवी विष्णुनगरीं । गंधर्वी गाइजे नानापरी । विमान शत सकुळ ॥ ७९ ॥ या सकळ पुण्याचें फळ । हरिहरनामस्मरण केवळ । चित्त करूनिया निश्चळ । जीवींचे आवडीं स्मरावें ॥ ८० ॥ हे करिता नलगे वोढी । हें निर्भय सर्व भयतां काढी । याचिया फळाची महा प्रौढी । जितां जाणता तद्रूप ॥ ८१ ॥ जेणें नामस्मरणें स्वतां । दासचि पावे स्वस्वरूपता । अतःपर कैंची भेदाभेदता । नामस्मरण प्रभावें

॥ ८२ ॥ निउन तें पूर्ण नामस्मरणें । तें निश्चयेंसीं चित्तीं धरणें । सर्व स्वस्वरूपें भरणें । रामनामस्मरणमात्रें ॥ ८३ ॥ ऐसें तप बोलिलें आतां दान । हें भगवद्भक्तिमहिमान । तरी तें दानपत्रवर्णन । कीजेल आतां ॥ ८४ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । परमेश्वर पूजनादि धर्मसाधनवर्णनं नाम । अष्टमं प्रकरणं । संपूर्णं ॥ श्रीराम ॥

---

॥ श्रीराम ॥

पूर्व प्रकरणांतीं वक्ष्यमाण । दान यजावें शिवनारायण । तरी दानयोग्य पात्र कोण । तें चि आतां पारिसावें ॥१॥ वर्णांचा ब्राह्मण गुरु । तो सत्पात्र हा निर्धारु । प्रतिग्रहें करी उद्धारू । यथायोग्य तयाचा ॥२॥ कदाचित क्षेत्री सुसीळ । कां वैश्य परम धर्मसीळ । तो हि पात्र होय निर्मळ । हें पुराणीं प्रसिद्ध ॥ ३ ॥ यामध्यें हि अपात्रपात्रता । प्रसंगें चि बोलिजेलि आतां । दान सफळ निर्फळ स्वतां । ज्याचेनि योगें ॥४॥ षठ पुत्रहीन दंभाचारवंत । वेदां देवां द्विजांतें द्वेषित । स्वकर्मत्याग करी तया देत । तें सर्व हि निर्फळ ॥ ५ ॥ असूयाविष्ट ज्याचें मन । कृतघ्न जो दुर्जन । भजों नये त्यासी भजे त्या दान । दिधलें तितुकें निर्फळ ॥ ६ ॥ परद्वारनिरत पापी । परद्रव्यापहारी पापरूपी । नक्षत्रपाठकासीं दिधलें शुद्ध कूपीं । पडलें चि की ॥ ७ ॥ नित्य यांच्या परचित । सदा संग्रहीं पाप वित्त । खळ हिंसक वञ्चित । तया दिधलें नुपतिष्टे ॥ ८ ॥ नामविक्रयी हेमविक्रयी । वेदविक्रयी पुराणविक्रयी । शास्त्र-विक्रयी धर्मविक्रयी । यासी दान तें निर्फळ ॥ ९ ॥ रसविक्रय जो करी । सर्वविक्रयी दुराचारी । परासी संतापवी पापकारी । त्यासी दान तें निर्फळ ॥ १० ॥ स्वयें पापी सज्जना निंदी । त्याचें घेव नये परमा-पदीं । त्यासी देव नये कपर्दी । तो दानप्रतिग्रहीं वर्जिला ॥ ११ ॥ आतां जयासी दिधलिया किंचित । अक्षय उपतिष्टे अनंत । तें पारिसावें

---

१ याचना.

शुचिष्मत । निमळ फळदायक ॥ १२ ॥ सत्कर्मनिरत श्रोत्री । धार्यवत दुर्वळ तत्पात्रीं । जें समर्पिलें ते धात्री । वरी पुण्य न समाय ॥ १३ ॥ अर्थेंवीण व्रत खोळवलें । तें ज्याचेन दानें चालतें जालें । त्यानें पुण्याचें दान केलें । अति उपतिष्ठले उभयासीं ॥ १४ ॥ जेणें दानें होय अग्निसेवा । जेणे पूजन घडे शिवकेशवा । जेणें जीवन धार्मिकाचिया जीवा । तेणें पुण्यें पुण्य वाढलें ॥ १५ ॥ जेणें दानें चाले अतिथीपूजन । जेणें दानें चाले सत्सेवन । जेणें दानें घडे दान । तें कल्पवृक्षारोपण ॥ १६ ॥ गोदानीं दिधली कामधेनू । दक्षणा परीस भिजऊनु । चिंतातुरा चिंतामणी सकल्पूनु । दिधला जैसा ॥१७॥ तया पुण्यफळासी कैंची सीमा । तेणें पुण्यें भेदिलें व्योमा । यैसें पात्र पावणें हें परमा । सुकृताचें सत्फळ हो ॥ १८ ॥ पुण्यदेसीं पुण्यकाळीं । पुण्यतीर्थीं पुण्येस्थळीं । पुण्यपात्रा पुण्यसीळीं । दिधले अनत पुण्यफळद॥१९॥ गृहासीं येता पुण्यसीळा । तात्काळ सर्व हि पुण्यपीठें जालीं गोळा । तयाऱ्या अवचक पूजनाऱ्या फळा । कोणा वर्णूं शके हो ॥ २० ॥ गोदानें करिता नृग नृपोत्तम । दत्तगौ मिळाली कळपीं उत्तम । ते पुनर्दाता तया पूर्वप्रतिगृहीं द्विजसत्तम । क्षोभोनिया पडला ॥ २१ ॥ ते दोघे हि चढले तमा । राज्य घेउनी हि न करिती निर्गमा । तया राजेश्वरा यातना परमा । कल्क लाश देहो प्राप्त जाला ॥२२॥ मग तो उद्धरिला श्रीकृष्णें । परिदाता च बुडविला याचकतृष्णें । ह्मणौनि पात्र न विचारिता मूर्ष्णें[1] । पीडे पुण्यकारक ॥ २३ ॥ दाता हि परीक्षावा पुण्यसीळीं । नाहींतरी दुष्ट प्रतिग्रह बुडवी तत्काळीं । विशकूचा प्रतिग्रह करिता दुकाळीं । विश्वामित्रपुत्र बाधले ॥ २४ ॥ आता कळीयुगामाझारीं । आरंभली नवलपरी । सद्वासना च बुडाली बहुतापरीं । किंचित हेतु जो धरी । त्यासी न मिळे खावया ॥ २५ ॥[2] तथापि कोण्हीयेक फळाशया । दातृत्व

---

१ मूर्षे, विनाकारण. २ आह्मास मिळालेल्या भक्तिरहस्याच्या दोनी प्रतींत या २५ व्या ओवीस पाच चरणें आहेत तीं तशींच येथें कायम ठेविलीं आहेत.

करूं इछि तया । सीळपरीक्षा कासया । करावी लागली ॥ २६ ॥ स्व: धर्मोपार्चित नव्हे अर्थ । तेथें पात्रपरीक्षा ते व्यर्थ । ते दोघे हि नव्हती समर्थ । येथोक्त दाता प्रतिग्रही ॥ २७ ॥ याचीं वर्णावीं लक्षणें । तरी युगधर्मी चि बोलिलीं विचक्षणें । नारदाप्रती अष्टश्रवणें । पूर्वींच निवेदिलीं ॥ २८ ॥ आतां हेतू मात्र धर्माचा । धार्मिकाचा ठाइं दिसे साचा । तदनुसार च अधिकाराचा । विचार हि मांडला ॥ २९ ॥ यालागीं हें असतां कलियुग । येथें स्वातंत्र्यें धर्म नव्हे सांग । भगवत्प्रीत्यर्थेंवीण व्यंग । पडतच आहे ॥ ३० ॥ जरी स्वधर्मकर्म सिगें चढेलें । पुण्यफळ प्राप्त जालें । तरी युगनिंदणें लागलें । कासया करणें हो ॥ ३१ ॥ ह्मणौनि भगवद्भक्तीचा आश्रये करावा । संग सज्जनाचा धरावा । लोभ कामनेचा सरावा । मनींहूनि सर्वदां ॥ ३२ ॥ भगवंत दाता भगवंत भोक्ता । भगवत कारिता भगवंत कार्यता । येसी वाणली अनन्यता । तो चि स्वता भगवंत ॥ ३३ ॥ जो भगवत्ध्यानें भगवद्रूप जाला । तेणें जो दानधर्म केला । तो हि भगवन्मय समर्पला । भगवंतींच स्वभावें ॥ ३४ ॥ भगवंतीं कैंचें निउन । सहज संपूर्ण चिद्घन । तया पूर्वीं च दानफळ उपतिष्ठोन । प्राप्ति हरीची जालीसे ॥ ३५ ॥ आतां स्वभावें महा भागवतें । वेगळें नुरोन शिवस्वरुपातें । अकर्तृत्वाचेनि हातें । जें जें कीजे सुकृत ॥ ३६ ॥ तयाचया भाग्ययोगें । ब्रह्मरूपता पाविजे जगें । तेथें ब्रह्ममय च प्रसगें । प्रतिग्रहीं हि जाला ॥ ३७ ॥ तो तरी सहज ब्रह्मरूप । त्याचें करणें ब्रह्मस्वरूप । तेथें असेचिना विक्षेप । परिपूर्णता निज लाभें ॥३८॥ दानफळें पाविजे उत्तम जन्मा । तरी तो चि स्वरूप अजन्मा । दानपुण्य निवारी यमा । तरी तो आत्मा तयाचा ॥ ३९ ॥ तेणें कीजे सदाचार । तो जाणावा लोकोपकार । तो सदां स्मरे हरिहर । आत्मभावें आवडी ॥४०॥ अभिनव तयाची लीळा । तो अद्वयानंदाची अंतरकळा । परी भक्तिप्रेमाचा जिव्हाळा । आखंडता हें अश्चिर्य ॥ ४१ ॥ तो गाय नाचे हरिहररंगीं । रुदन करी भेटीलागीं । सात्विकभाव उठती आंगीं । भावातीत सर्वदां ॥ ४२ ॥ त्यालागीं रूप धरी देव । जो अरूप स्वय-

मेव ।.नवल दर्शनस्पर्शनाचा प्रेमभाव । तया द्वयाअद्वयाचा ॥ ४३ ॥ या स्वानंदाचें मूळ कारण । कळी हरिहरनामोच्चारण । तें करूनियां प्रीत्या प्रविण । करुन सुखें सर्व हि ॥ ४४ ॥ ते सहज संपूर्ण सफळ । सध अविनाश सर्वकाळ । यत्किंचित करिती प्रेमळ । ते अनंत सत्वतां ॥४५॥ रामा कृष्णा कमलेक्षणा । लक्ष्मीनिवासा नारायेणा । शिवा शंकरा गिरिजारमणा । पंचवक्त्रा परेशा ॥ ४६ ॥ येसी हरिहरनामावळी । उच्चारिती नित्यकाळीं । त्ये सकळ पुण्यमेळीं । सेविजेती सर्वदां ॥ ४७ ॥ साळंकृत कोटि गोदानें । यज्ञायुति मेरू सुवर्ण दानें । अयुतकल्प निवासे स्नानें । प्रयागीं केलीं त्रिकाळ ॥ ४८ ॥ तया सर्व हि पुण्याचेनि फळें । नाम भगवताचें न तुळे । जें स्मरिलें एक वेळें । भक्तराजें आवडीं ॥ ४९ ॥ तया नामप्रेमाकारणें । जन्मोजन्मीं केलीं पुण्याचरणें । तो दानप्रसंग बोलिजेल जेणें । कर्ता पात्रे भगवंता ॥ ५० ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । दानपात्र वर्णनं नाम । नवम प्रकरणं ॥ ९ ॥

---

॥ श्रीराम ॥

पूर्व प्रकरणांतीं बोलिलें । दानप्रकरण आरंभलें । तें परिसावें जैसें आपुलें । सामर्थ्य तैसें करावया ॥ १ ॥ ब्राह्मण वृत्तिहीन कुटुंबी दुर्बळ । शास्त्रज्ञ श्रोत्री अध्यात्मनिष्ट निर्मळ । सद्गुणवताचें वृत्तिसंस्थापन केलियां फळ । अक्षयीं अनंत परिसावें ॥ २ ॥ मातृपितृवंशोद्भवें । कोटिकुळें पुण्यगौरवें । यासहित वैकुंठीं प्रवेशे वैभवें । कल्पांतीं तेथेंच विमुक्ति ॥ ३ ॥ गणवती पृथ्वीचे अंश । गणवती वृष्टिबिंदु सावकाश । धात्रा हि गणूं न शके पुण्यकोश । ब्राह्मणसंस्थापनाचें फळ ॥ ४ ॥ समस्त देवरूपीं ब्राह्मण । त्यासी जीवनदानफळ वर्णूं शके कोण । नित्य विप्रहित करी पुण्यप्रविण । त्याचें फळ परिसावें ॥ ५ ॥ त्येणें सर्व हि याग केले सांग । सर्व तीर्थाटन केलें सांगोपांग । सर्व तपें तपला महाभाग । आ-

ह्मणासी दे ह्मणेटि तो हि तत्तुल्य ॥ ६ ॥ भगवतप्रीत्यर्थ ब्राह्मणासी । उत्तम वस्तु अर्पितां भक्तीसीं । पाविजे ब्रह्मभुवनासी । पुनरावृत्ति दुर्लभ ॥ ७ ॥ अन्नदानाचें महिमान । अत्यंत बोलिलें गहन । तैसें च बोलिजे जळदान । यथाकाळीं अर्पिल्या ॥ ८ ॥ अन्नोदकमय प्राण आता । अन्नोदक देईल तो प्राणदाता । प्राणदानीं पावे स्वतां । सर्व हि दानाचें फळ ॥ ९ ॥ ह्मणोनिया अन्नोदकदान । हें कळीमाजीं मोटें साधन । बहुसाळ असिलें धन तरी अन्न । उदकछेत्र योजावें ॥ १० ॥ नाहींतरी यथाशक्त्या । अन्नदान करावें भक्त्या । दा[illegible]ा पोष्यांमाजीं युक्त्या । येक तो ब्राह्मण सामावे ॥ ११ ॥ शुक्लवृत्ति करूनि परी । ब्राह्मण जेऊ बरोबरी । अति दारिद्रें हें हि न टके तरी । घर दाखवावें दातयाचें ॥ १२ ॥ अन्नदाता वंशायुतें । सहित पावे ब्रह्मभुवनातें । पुनरावृत्ति कैंची त्यातें । अवंचकता हें शास्त्र ॥ १३ ॥ अन्नदानसम दान क्षितीं । न भूतो न भविष्यति । जळदानफळनिष्पत्ति । तयाहूनि अधिक ॥ १४ ॥ अन्नोदकदानें सैंघ । प्राण संतुष्ट होती अघ । तेणें परमात्मा स्वसवेद्य । क्षत्रेंज्ञ पावे प्रीतीतें ॥ १५ ॥ धर्मराज ह्मणे राया भगीरथा । विचित्र अन्नोदकपुण्याची कथा । महापातकोपपातकयुक्त सर्वथा । पुनात होय तत्काळ ॥१६॥ अन्नदातयाचे कुळीं । सहज उपजे पुण्यसीळीं । तो पूर्वजन्मीचे सहस्रकुळीं । नरक ना पाहे जन्मे च ॥१७॥ अन्नदानें करिता क्षितीं । त्रुत नव्हे याचक चित्तीं । अन्नोदकदानें संत्रुप्त होती । ह्मणौनि हें करावें ॥ १८ ॥ जे जो यथाशक्त्या भक्त्या अतिथीपूजन । करूनि करील अन्नदान । तयासी जालें मोक्षसाधन । ह्मणौनि थोर अन्नदाता ॥ १९ ॥ वजरा वेऊनियां करीं । जो अतिथाचें पादप्रक्षाळण करी । तो गंगादि सर्व तीर्थीभीतरीं । सुस्नात जाला सचीयें ॥ २० ॥ तैलाभ्यंग करी ब्राह्मणासी । तो शताब्द गंगातीर

---

१ पोषण होत असलेलीं कुटुंबीय माणसें. २ फक्त ब्राह्मणाचे घरीं नोकरी करून किंवा भिक्षा मागून चरितार्थ चालविणें. ३ सद्धेतु, प्रामाणिकपणा. ४ तात्काल. ५ आज. ६ ज्ञानस्वरूप वस्तु. ७ जीव.

यासी । सुस्नात जाला पुण्यरासी । येवढें फळ पुण्याचें ॥ २१ ॥ रोगिया ब्राह्मणाचा प्रतिपाळ । जो करील पुण्यसीळ । तो कोटिकुळेंसीं निर्मळ । ब्रह्मपदीं वसे युग येक ॥२२॥ जो रोगी रक्षी येक ब्राह्मण । त्यासीं सुप्रसन्न नारायण । अथवा नरा रोगातुराचें रक्षण । करितां सर्व काम देतसे ॥२३॥ जो ब्राह्मणासी दे निवास । त्यासी सुप्रसन्न देवेश । आपुला देतसे वास । जो देवासी दुर्लभ ॥२४॥ ब्राह्मणासी गाय पयस्विनी । ब्रह्मविदासी देईल दानीं । तो येईल विष्णुभुवनीं । सुखें वास्तव्य करावया ॥ २५ ॥ आपणासीं गौ नाहीं घरीं । प्रतिग्रह घेऊनि गोदान करी । त्याचें पुण्य वैखरी । समर्थ नव्हे वर्णावया ॥ २६ ॥ जो कपिला पयस्विनी वेदविदुषा । पुण्यात्मा देईल पुण्यपुरुषा । तो सहज मुक्त सर्व दोषा । रुद्रतुल्य जाणावा ॥ २७ ॥ विप्रा अध्यात्मनिष्ठासीं । उभयतोमुखी देईल येथोक्ततेसीं । गणना न करवे त्याचया पुण्यासी । शताब्दपर्यंत गणितां हि ॥२८॥ गंगातीरीं शताश्वमेध । सांगपांग करी शुध । तें फळ पाविजे शुद्ध । उभयमुखीप्रदानें ॥२९॥ उभयतोमुखीचें दान । कोटि दानासमान । शिवसायोज्य पावे गहन । जें सर्वांसी दुर्लभ ॥ ३० ॥ ब्रह्मसदनीं शतायुत । इंद्रमंदिरीं पचकल्पपर्यंत । चतुर्दशभुवनीं लोकवांछित । तेथें सुखें विचरे तो ॥ ३१ ॥ येसें उभयतोमुखी दान । शक्तें करावें यत्नेंकरून । ग्यद्व प्रतिग्रही त्याचें अनन । अवलोकूं नये ॥ ३२ ॥ भयभीताचें रक्षीं प्राण । विशेषेंकरूनियां ब्राह्मण । तो सर्वतीर्थीं सुस्नात प्रविण । सर्वयज्ञीं दिक्षित ॥ ३३ ॥ वस्त्रदानें रुद्रभुवन । कन्यादानें ब्रह्मसदन । सकुळेंसीं कनकदान । विष्णुभुवना नेतसे ॥ ३४ ॥ साळकृता सुलक्षणा कन्या । अध्यात्मनिष्ठासी देईल धन्या । तो शतवर्षेंसीं देवमान्या । पावेलि ब्रह्मपदासी ॥ ३५ ॥ आषाढी अथवा कार्तिकी पौर्णिमा । प्रीत्यर्थ शंकरा सर्वोत्तमा । वृषभदान करील द्विजोत्तमा । तो सप्तजन्मार्जितावनिर्मुक्त ॥३६॥ तो रुद्ररूप रुद्रभुवनीं । उभयकुळेंसीं वृषदानीं । परमानंदें नादे मनीं । रुद्रेंसहित सर्वदा

---

१ गाय वीत असताना दान करणें.

॥३७॥ तांबूलदानें विष्णु प्रसन्नात्मा। श्रीयुता फळा दे उत्तमा। दधिदुग्ध-मधुघृतदानें पावे स्वर्गपदा परमा। दिव्याब्दायुतपर्यंत॥३८॥ युक्षदंडदानें विष्णुभुवन। रसगुडदानें क्षीराब्धि शेषशयन। सुगंध फळपुष्पदानें सदन। पाविजे चतुराननाचें ॥ ३९ ॥ विद्यादान पृथ्वीदान गोदान। अगाध याचें महिमान। नरकापासूनि उद्धरती दुग्धदोहन। कारितां फळ यज्ञाचें ॥ ४० ॥ विद्यादान वाचादानता। पाविजे स्वयें सायोज्यता। ज्ञानदान अक्रोध आर्जवता। मोक्षदानीं मुमुक्षा ॥ ४१ ॥ तयाचें काय वर्णावें फळ। तो स्वतांच ब्रह्मरूप केवळ। सकळां फळांचें फळ निर्मळ। तो स्वयें च स्वसंवेद्य ॥ ४२ ॥ तो येक सद्गुरू च समर्थ। त्याचें पात्र सच्छिष्य विरक्त येथार्थ। तेणें मुमुक्षु करावा कृतार्थ। त्याचें फळ तो च कीं ॥ ४३ ॥ धान्यदानें पावे सत्यलोक। धनदानें हरे सर्वोपपातक। आणिख अल्पदानें महत्फळकौतुक। तें श्रवण करावें आणि करवावें ॥ ४४ ॥ शाळग्रामसिळादान। लिंगप्रदान ब्रह्मांड-कोटिदानसमान। येणें मोक्ष पाविजे नलगे बहु धन। हें अवश्य करावें भक्तीं भक्तया ॥ ४५ ॥ जो मठीं महंताचे लावी दीप। क्षणें गंगास्नानफळ पुण्यरूप। सरत्न सुवर्णदानें निःपाप। भुक्ति मुक्ति तो पावे ॥४६॥ माणिक्यदानें मोक्ष पावे। वज्रदानें धृवलोक पावे। विद्रुमदानें[१] स्वर्गी वसावें। मौक्तिकें सोमसंनिध ॥ ४७ ॥ वैडूर्य[२] पुष्परागदानें। रुद्र-लोकीं वसावें महिमानें। अळंकारदाता सुमनें। सर्व सुखासी तो पावे ॥४८॥ पुष्परागप्रदानें सर्व संतोष। अन्यरत्नें अशेष। तद्दानें पाविजे विशेष ब्रह्मलोक प्रसिद्ध ॥ ४९ ॥ गजादि यान दातार। आपुलिये शक्तिअनु-सार। विमानाधीश होय नर। महिषीदानें अपमृत्यु हरे ॥ ५० ॥ गौसी त्रुण अर्पी निःकाम। तो रुद्रलोक पावे उत्तम। आपणासी प्रिय उपभोग परम। तद्दानें ईश्वर संतोषे ॥ ५१ ॥ जें जें बोलिलें दानपुण्य। यासी विघ्न करील तो जघन्य[३]। तो महा यातना पावे दैन्य। ईश्वर तया विन्मुख

---

१ विद्रुम=प्रवाळ, पोंवळें. २ वैडूर्य=नीलोपल, अशितोपल किंवा पेरुजा ह्मणून एक मौल्यवान धातु आहे. ३ नीच.

॥ ५२ ॥ सर्व दानपुण्य येके च काळीं । धनें साधनेंविण सुखसंमेळीं । रमणीय हरिहरनामावळी । उच्चारिता सद्भावें ॥ ५३ ॥ यासी नचले काहीं विघ्न । कोण्ही हि करूं न शके भग्न । ह्मणौनि नारदादि सर्वज्ञ । परी नामीं च रमोनि राहिले ॥ ५४ ॥ आता हि देशकाळवर्तमानासारिखें । टाकोनि तें स्वधर्मकर्म दानपुण्य करावें सुखें । परतु केवळ हरिशंकरनामस्मरणेंविण दुखें । कोण निरसू शकेलि ॥ ५५ ॥ दानविधि आहे बहुत । भगवद्भक्तिरूप स्तविला किंचित । आता व्रतें बोलिजती शिवाच्युतप्रीतिअर्थ ते परिसावीं ॥ ५६ ॥ स्वस्ति श्रीमद्भाक्तिरहस्ये । रामिरामदासकृते दानप्रकरण वर्णन नाम । दशम प्रकरण समाप्तः ॥ १० ॥

---

॥ श्रीराम ॥

पूर्व प्रकरणांती वक्ष्यमाण । बोलिलें बोलिजेलि व्रताचरण । सतोषावया शिवनारायण । तरी ते च आता परिसावें ॥ १ ॥ तोषावया द्व्यंबक त्र्यंबकें । व्रतें आहेति अनेक । तयामध्यें कांहींयेक । अंगभूतें बोलिजेति ॥ २ ॥ अनायासें सर्व जन । पावती भावें जनार्दन । तेथें अनत सुख पावोन । तपोवृद्धि होतसे ॥ ३ ॥ येणें तेणें प्रकारें श्रीहरि । पावावया सतीं चतुरीं । विष्णुपूजन प्रेरिजे तरी । विष्णुव्रतें आधीं आइका ॥ ४ ॥ मार्गशीर्ष शुद्ध द्वादशी । पूजावया हृषिकेशी । प्रात.स्नान करावें नेमेंसीं । दतधावनपूर्वक ॥ ५ ॥ परिधान उत्तरीं शुक्लांबरें । आरक्त ततु वर्जावे आदरें । सदस्याष्टहस्त धोतरें । दक्षणाग्र वाळो न घालावी ॥ ६ ॥ स्नान नदी तटाक कुल्या का सरोवरीं । करावें विष्णुस्मरण संकल्पें करीं । कूपभाडस्नान वृथा परी । देशकाळ विचारावा ॥७॥ गगामृत्तिका शुभ्र मनोहर । ऊर्ध्वपुंड्र रेखावा दद्धाकार । येकांगुळ द्व्यंगुळ त्रिचतुरंगुळ विस्तार । नासामुळात् केशपर्यंत ॥८॥ हृदइ पद्मपत्राकृति वंशपत्राकार बाहुस्थिति । शेष दीपकळा रीतीं । भाळी सातराळता असावी॥९॥

१ मागील प्रकरणात जें मी सागणार ह्मणून ह्मटलें तें. २ हरिहर.

आतां असो हा सदाचार । स्वतंत्र च आहे सविस्तर । तर्पण करूनि शंखचक्रगदाब्जधर । विधिपूर्वक पुजावा ॥ १० ॥ सर्वोपचारीं मधुसूदन । भावें करावें अर्चन । केशवाय नमस्तुभ्यं अभिवंदन । अष्टोत्तरशत तिलपायसाहुति ॥ ११ ॥ लक्ष्मीसहित लक्ष्मीकांत । त्रिकाळ पुजावा यथोचित । मनोहर सुमनें सुगंधादि बहुत । फळीं नैवेद्यीं यत्नता ॥१२॥ वेदिका तोरण पताकादि सर्व शोभा । रुचिर करावी पद्मनाभा । रात्रौ क्षीरोदजा वल्लभा । गीतनृत्यवाद्यीं तोषविजे ॥ १३ ॥ प्रातःकाळीं उठोनि पुढती । भावें पुजावा पद्मापति । नित्यकर्म करूनि पूर्वस्थिति । शुचिर्मौन्यैंकरूनि ॥ १४ ॥ पायस घृत समिश्रित । नारिकेळ फळान्वित । परमान्नदानें इष्टफळद अच्युत । प्रार्थूनि द्यावें ब्राह्मणा ॥१५॥ मग आपुलिये शक्तिसारिखें । ब्राह्मणा भोजन द्यावें सुखें । बंधुइष्टवर्गासीं मौन मुखें । स्वयें भोजन करावें ॥ १६॥ नारायणपर होत्साता । हरिपूजन करील भक्तिता । तो पौंडरिकयज्ञफळ स्वतां । पावे अष्टगुणित ॥१७॥ शुक्ल द्वादशी पौषमासीं । उपोषण करावें दृढ नेमेंसीं । नारायण नमावा प्रेमेसीं । पयसा द्रोणमानेंसीं पुजावा ॥ १८ ॥ त्रिकाळ करावें पूजन । यथाशक्त्या सांग भजन ।,सर्वोपचारीं जनार्दन । भक्तिभावें अर्चावा ॥ १९ ॥ रात्रौ जागरण करावें । गीत नृत्य वाद्य भक्तिभावें । प्रातः—काळीं पुनः पुजावें । पूर्ववत श्रीहरीसी ॥ २० ॥ कृशरान्न सवृत दक्षणा । परमेश्वरप्रीत्यर्थ द्यावें ब्राह्मणा । सुप्रसन्न सर्वेश्वरा नारायणा । कृशरान्नदानें मज होई ॥ २१ ॥ यथाशक्त्या ब्राह्मणासी । भोजन द्यावें सद्भावेंसीं । सबांधव मौनें हरिस्मर-

तोपविजे पूर्ववत ॥ २५ ॥ प्रातःकाळीं नित्यनेम । करूनि पुजावा पुरुषोत्तम । माधवा सर्वोत्तमा सर्वकाम । तिळप्रस्थदान दे मज ॥ २६ ॥ सदक्षणा सवस्त्र तिळ प्रस्थभारे । विष्णुप्रीत्यर्थ ब्राह्मणासी दान करी । ब्राह्मणभोजन जाळियावरी । पंक्तिकरासीं स्वयें भुंजे ॥ २७ ॥ येसे जो करी तिळदानव्रत । तो संपूर्ण वाजपेयफळ शत– । गुणें पावे निश्चित । हरिपूजनप्रसादें ॥ २८ ॥ फाल्गुण शुद्ध द्वादशी प्रसिद्ध । उपोशनें हरिपूजन करी बुध । पूर्वमानें पयस्नानें विविध । उपचारयुक्त सद्भावें ॥ २९ ॥ त्रिकाळ पूजापरायण । निरंतर स्मरे नारायण । अष्टोत्तरशत घृततिलाहुति अर्पण । करी अग्निचा मुखीं ॥ ३० ॥ गोविंदा तुज प्रणम्य भावें । रात्रौ गीत नृत्य स्तोत्रें तोषवावें । प्रातःकाळीं पुंनः पूजन करावें । नित्यनेमानतरें ॥ ३१ ॥ [1]आढक वस्त्र दक्षणायुत । विप्रासी द्यावें यथोचित । श्रीहरिस्मरणें सुचित । विष्णुव्रतपरायणें ॥ ३२ ॥ नमो गोविंदा पद्मनाभा । सर्वेशा रुक्मिणीवल्लभा । येणें धान्यदानें स्वप्रभा । प्रीतीतें पावे जगद्गुरू ॥ ३३ ॥ येसें जो करील सुव्रता । ब्राह्मणभोजन शक्तिता । पश्चात्पंक्तिकरासीं स्वतां । सवांधव भोजन ॥ ३४ ॥ तया गोमेधमखाचें फळ । संपूर्ण संप्राप्त अविचळ । अच्युतार्चनप्रसादें प्रेमळ । कृतार्थ होती तत्वतां ॥ ३५ ॥ शुद्ध द्वादशी चैत्रीं । उपोषणें हरिपूजन श्रोत्रीं । करील तो धन्य ये धात्रीं । पूर्ववत उपचारीं ॥ ३६ ॥ नमो महाविष्णु भक्तवत्छळा । क्षीरप्रस्थें घृतप्रस्थें घननीळा । स्नानादि पूजा त्रिकाळा । भक्तिभावें पुजावें ॥ ३७ ॥ रात्रौ जागरण नृत्य गीत । वाद्यें तोषविजे अनंत । पुनः प्रातः पुजावा अच्युत । नित्यनेमपूर्वक ॥ ३८ ॥ अष्टोतरशत मधुप्लुत तिळाहुति । सदक्षणा सवस्त्र विप्राप्रति । आढक तंदुळ द्यावे लक्ष्मीपति । प्रार्थूनियां दृढ भावें ॥ ३९ ॥ प्राणरूपी महाविष्णु स्वतां । अन्नदानीं प्राणदाता । तंदुळदानें लक्ष्मीकांता । प्रीतीतें पावे मजलागीं ॥ ४० ॥ येसे तंदुळदान व्रत व्रतीं । जो हरिपूजनपूर्वक सुकृति । करील त्या अत्यग्निष्टोम अष्टगुणीति । यज्ञफळ प्रसिद्ध

[1] साडेतीन शेर तांदुळ.

तोषविजे पूर्ववत ॥ २५ ॥ प्रातःकाळीं नित्यनेम । करूनि पुजावा पुरुषोत्तम । माधवा सर्वोत्तमा सर्वकाम । तिळप्रस्थदान दे मज ॥ २६ ॥ सदक्षणा सवस्त्र तिळ प्रस्थभारि । विष्णुप्रीत्यर्थ ब्राह्मणासी दान करी । ब्राह्मणभोजन जालियावरी । पक्तिकरासीं स्वयें भुंजे ॥ २७ ॥ यैसे जो करी तिळदानव्रत । तो संपूर्ण वाजपेयफळ शत– । गुणे पावे निश्चित । हरिपूजनप्रसादें ॥ २८ ॥ फाल्गुण शुद्ध द्वादशी प्रसिद्ध । उपोशनें हरिपूजन करी बुध । पूर्वमानें पयस्नानें विविध । उपचारयुक्त सद्भावें ॥ २९ ॥ त्रिकाळ पूजापरायण । निरंतर स्मरे नारायण । अष्टोत्तरशत घृततिलाहुति अर्पण । करी अग्निचा मुखीं ॥ ३० ॥ गोविंदा तुज प्रणम्य भावें । रात्रौ गीत नृत्य स्तोत्रें तोषवावें । प्रातःकाळीं पुनः पूजन करावें । नित्यनेमानंतरें ॥ ३१ ॥ क्षीरोदक वस्त्र दक्षणायुत । विप्रासी द्यावें यथोचित । श्रीहरिस्मरणे सुचित । विष्णुव्रतपरायणें ॥ ३२ ॥ नमो गोविंदा पद्मनाभा । सर्वेशा रुक्मिणीवल्लभा । येणें धान्यदानें स्वप्रभा । प्रीतीतें पावे जगद्गुरू ॥ ३३ ॥ यैसें जो करील सुव्रता । ब्राह्मणभोजन शक्तिता । पश्चात्पंक्तिकरासीं स्वतां । सबांधव भोजन ॥ ३४ ॥ तया गोमेधमखाचें फळ । संपूर्ण संप्राप्त अविचळ । अच्युतार्चनप्रसादें प्रेमळ । कृतार्थ होती तत्वतां ॥ ३५ ॥ शुद्ध द्वादशी चैत्रीं । उपोषनें हरिपूजन श्रोत्री । करील तो धन्य ये धात्रीं । पूर्ववत उपचारीं ॥ ३६ ॥ नमो महाविष्णु भक्तवत्छळा । क्षीरप्रस्थें घृतप्रस्थें घननीळा । स्नानादि पूजा त्रिकाळा । भक्तिभावें पुजावें ॥ ३७ ॥ रात्रौ जागरण नृत्य गीत । वाद्यें तोषविजे अनंत । पुनः प्रातः पुजावा अच्युत । नित्यनेमपूर्वक ॥ ३८ ॥ अष्टोत्तरशत मधुप्लुत तिळाहुति । सदक्षणा सवस्त्र विप्राप्रति । आढक तंदुळ द्यावे लक्ष्मीपति । प्रार्थूनियां दृढ भावें ॥ ३९ ॥ प्राणरूपी महाविष्णु स्वतां । अन्नदानीं प्राणदाता । तंदुळदानें लक्ष्मीकांता । प्रीतीतें पावे मजलागीं ॥ ४० ॥ यैसे तंदुळदान व्रत व्रतीं । जो हरिपूजनपूर्वक सुकृति । करील त्या अत्यग्निष्टोम अष्टगुणीति । यज्ञफळ प्रसिद्ध

१ सा[illegible]

॥ ४१ ॥ वैशाख शुद्ध द्वादशी श्रीहरि । उपोषणें अर्ची पूर्वापरीं । द्रोणक्षीरें मधुसूदन मुरारि । आपुले शक्तिसारिखा ॥ ४२ ॥ त्रिकाळ भक्तिभावें पूजा । करावी लक्ष्मीकांता गरुडध्वजा । रात्रौ गीत वाद्य नृत्य वोजा । मधुमर्दन तोषविजे ॥ ४३ ॥ नमस्ते मधुहंत्रेति मंत्रें । घृताहुति होमाविया विचित्रें । यथाशक्त्या व्रतीं पवित्रें । पुनः प्रातर्हरिपूजा ॥ ४४ ॥ नमस्ते देवदेवेशा । लोकभावना सर्व लोकेशा । घृतदानें हृषीकेशा । सर्व काम मज देई ॥ ४५ ॥ येणें मंत्रें अध्यात्मवंता । घृतप्रस्थ सवस्त्र सदक्षणा स्वतां । समर्पावें श्रीभगवंता । विशुद्ध फळप्राप्त्यर्थ ॥ ४६ ॥ यैसें घृतदानव्रत जो करी । तो धन्य धन्य ये संसारीं । तो सर्व पापविनिर्मुक्त हारि— । प्रसादें अश्वमेधाष्टक फळ पावे ॥ ४७ ॥ जेष्ट शुद्ध द्वादशीं सप्रेम । उपोषणें पूजी त्रिविक्रम । क्षीराढकें स्नापी पुरुषोत्तम । नाना उपचारसंयुक्त ॥४८॥ त्रिकाळ पूजन पूर्व प्रकारें । करावें भक्तिभावें सुनिर्धारें । अष्टोत्तरशत पायसाहुति आदरें । घृतयुक्त हवाविया ॥ ४९ ॥ रात्रौ गीत नृत्य वाद्य जागरणीं संतोषविजे पद्मपाणी । प्रातःकाळीं नित्य नेमाचरणीं । देवदेवेश पुजावा ॥ ५० ॥ अपूप तीस द्यावे ब्राह्मणासी । सवस्त्र सदक्षिणेसीं । प्रार्थावें श्रीपतीसी । अपूपदानें होई प्रसन्न ॥ ५१ ॥ यानंतरें ब्राह्मणसंतर्पण । यथाशक्त्या विष्ण्वार्पण । बंधुवर्गासहित आपण । भोजन करावें हरिस्मरणें ॥ ५२ ॥ यैसें करील जो प्रेमळ । सर्व पापविनिर्मुक्त निर्मळ । तो नर मेधाष्टक फळ । पावे विष्णुपूजाप्रभावें ॥ ५३ ॥ आषाढ शुद्ध द्वादशीसी व्रती । उपोषणें पुर्जाव रमापति । वामनरूपी पूर्वस्थिति । पयस्नानादि उपचारें ॥५४॥ त्रिकाळार्चन जागरणं । पूर्व मानें व्रताचरण । पुनः प्रातःकाळीं नारायण । वामनरूपी अर्चावा ॥ ५५ ॥ नमस्ते वामनाय । दुर्वा होम यथाउपाय । अष्टोत्तरशत अथवा होय । शक्तिसार तितुकाच ॥ ५६ ॥ दध्यन्न सदक्षणा नारिकेळ । वस्त्रें आच्छादुनियां विमळ । द्यावें आत्मविदा द्विजा महाफळ । पावावया कारणें ॥ ५७ ॥

तदुपरी ब्राह्मणपूर्वक भोजन । बंधुवर्गेंसीं करील सजन । हृदई ध्यान मुखीं मौन । परम भक्तिभावार्थें ॥ ५८ ॥ वामन द्रव्यस्थ वामन दाता । वामन उभयासी हि त्राता । येणें दध्यन्नदानें स्वता । सुप्रसन्न हो मजलागीं ॥ ५९ ॥ येसें दध्यन्नदानव्रत । जो करी शुचिस्मत । तो अग्निष्टोमफळ शत- । गुणित पावे श्रीहरिप्रसादें ॥ ६० ॥ शुद्ध द्वादशी श्रावणीं । उपोषनें पुजील चक्रपाणी । पूर्ववत व्रताचरणीं । भक्तिभावें वृषदाज्याहुति ॥ ६१ ॥ आढक उत्तम गोक्षीर । भक्तिभावें सदक्षणा अंबर । हेमकुंडलें शक्तिसार । ब्राह्मणा कर्णीं घालावीं ॥ ६२ ॥ नमो क्षीराब्धिनिवासा शेषशयना । श्रीहरि पशुपाशविमोचना । क्षीरदानें जगजीवनघना । सुप्रसन्न होई मजलागीं ॥ ६३ ॥ पश्चाद्ब्राह्मणादि भोजनविधि । येसे करील जो सुबुधि । तो अश्वमेधसहस्र फळसिद्धि । पावे विष्णुपूजनें ॥ ६४ ॥ शुद्ध द्वादशी भाद्रपदीं । उपोषनें पूजनें परमानंदीं । तत्पर हृषीकेशपदीं । पूर्वप्रकारें पूजनें ॥ ६५ ॥ चरूणामधुमिश्रेन । शक्तिसदृश हुताशन । मुखें त्रुप्त जनार्दन । अनन्य भावें करील ॥६६॥ आढकार्द्र गोधूम । सदक्षणा वस्त्र सप्रेम । प्रार्थावा पुरुषोत्तम । हृषीकेश नमोस्तुते ॥ ६७ ॥ गोधूमप्रदानें हृषीकेश्वरा । सर्व सुख देई करुणाकरा । ब्राह्मणपूर्वक भोजन प्रकारा । बधुवर्गेसीं करावें ॥ ६८ ॥ नमो नमो हृषीकचाळका । नमो हृषीकपाळका । नमो हृषीकरामळक्षाळका । पाही गोधूमव्रतें ॥ ६९ ॥ येसें करील विशुद्ध मन । पूर्ण प्रेमें हृषीकेशार्चन । तो हृषीकेशप्रसादें समाधान । ब्रह्ममेध फळ पावे ॥ ७० ॥ शुद्ध द्वादशी आश्विनी । तत्पर उपोषनें पद्मनाभीं पूजनीं । पयस्नानादि उपचार जनीं । पूर्ववत सद्भावें॥७१॥ तीळतांदुळयवघृतप्लुता । आहुति समर्पाविया शक्तिता । त्रिकाळार्चन जागरण उत्साहता । ब्राह्मणपूर्वक भोजन ॥७२॥ आधीं मधुकुडप सदक्षणांबर । विप्रासी द्यावें प्रीत्यर्थ श्रीधर । पद्मनाभ नमस्तुभ्य उच्चार । करूनियां प्रार्थना ॥७३॥ येणें मधुदानें अब्जनाभीं । मज क्षणावें नाभि नाभि । प्रांतीतें पावोनि सुलभीं । सर्व सुख मज द्यावें ॥७४॥ येसें मधुदानव्रत कारक ।

विष्णुभक्तपापहारक । तो ब्रह्मेधफळ सहस्त्र गुणिक । पावे कमळा-
पतिप्रसादें ॥७५॥ कार्तिक शुद्ध द्वादशी । व्रतीं विष्णुपरायण उपवासी ।
स्नान दंतधावन पूर्वक नेमेंसीं । ब्रह्मयज्ञ करूनिया ॥ ७६ ॥ शुक्लांबरधर
द्विजवर । आढक क्षीर दधि घृतें दामोदर । सस्नापुनिया षोडशोपचार ।
यथाशक्त्या अर्पावे ॥ ७७ ॥ पुष्पें धूप दीप नैवेद्य फळीं । तांबुलादि
दक्षणा निरांजन पुष्पांजळी । त्रिकाळ पुजावा वनमाळी । रात्रौ जागरण
गीत नृत्य वाद्यें ॥ ७८ ॥ अष्टोत्तरशत मधुमिश्रिती । होमानिया तिला-
हुति । प्रातःकाळीं दामोदर श्रीपति । भक्तिभावें पुजावा ॥ ७९ ॥ पुनः
होम तिलाज्याहुति । होमाविया अष्टोत्तरशति । पच भक्ष्यान्न परम
प्रीतीं । दक्षणान्नेंं द्यावें श्रोतिया ॥ ८० ॥ दामोदरा जगन्नाथा कारण-
कारणा । शरणांगत वत्छळा भक्ततारणा । त्राहि त्राहि मज नारायणा ।
प्रसन्न होई अन्नदानें ॥८१॥ येसें करुनिया मग । ब्राह्मणभोजन साग ।
पश्चात् सहित बंधुवर्ग । आपण भोजन करावें ॥ ८२ ॥ येसें करील
जो सम्यग्व्रत । तो सहस्राश्वमेधफळ द्विगुणित । पावेलि तत्वता शुचि-
स्मंत । दामोदरार्चनप्रभावें ॥ ८३ ॥ एव द्वादशीव्रत वर्षवरी । जो
तपोनिधि भावें करी । तो धन्य कृतार्थ बहुतापरी । परमपद पावतसे
॥ ८४ ॥ असो येक मास अथवा द्विमास । जो करील द्वितियोपवास ।
हरिपूजनें पावे तत्फळास । आणि परमपद अनायासें ॥ ८५ ॥ या
सकळा हि व्रतफळाचें फळ । नामस्मरण रामाचें येक वेळ । अहर्निशीं
स्मरेलि जो प्रेमळ । तो स्वयेंचि श्रीराम ॥ ८६ ॥ अशक्ता न टकती
व्रतें तपें । तरी नाम भगवताचें सोपें । सुखें स्मरावें स्वरूपें । परमानंद-
दायक ॥ ८७ ॥ श्रीराम जयराम जयजयराम । आखड जो स्मरे सप्रेम ।
तो स्वयं चि असे पुरुषोत्तम । ह्मणौनि राम न विसरावा ॥ ८८ ॥
स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदास कृते । व्रतवर्णने द्वादशद्वादशीव्रत ।
एकादश प्रकरण । संपूर्ण ॥ ११ ॥ १ ॥

॥ श्रीराग ॥

नमो नमस्तेस्तु लक्ष्मीपति । तुझें ध्यान असो चित्तीं । नामस्मरणें हे भारती । रंगोनि राहो सुप्रेमें ॥ १ ॥ द्वादश द्वादशी व्रतोद्यापन । परिसावें जी सावधान । ज़ेणें संतोषे जनार्दन । फळ संपूर्णदायक ॥२॥ मार्गशीर्षी पौर्णिमासी । संपूर्ण करावया द्वादशी । व्रतोद्यापन विधीसी । विष्णु चित्तीं स्मरावा ॥ ३ ॥ सन्यासवन्मृत्तिकाशौच । दंतधावनपूर्वक स्नान साच । शुक्लांबरधर शुक्ल च । गंधलेपन करावें ॥ ४ ॥ मंडप करावा मनोहर । चतुरस्र सुशोभित सुंदर । पताका तोरणें रुचिर । रचना करावी सादरें ॥ ५ ॥ तन्मध्यें करावें विमान । मुकुरी चामिकरी दैदिप्यमान । घंटा किंकिणि सुस्वन । नाना पुष्पीं आळंकृत ॥ ६ ॥ धौत सूक्ष्म तंतुचें शुक्लांबर । तेणें आच्छादावें परिकर । दीपमाळा अविकंप चौफेर । ठेवाविया बहुता ॥ ७ ॥ मध्यें सर्वतोभद्र कुसरीं । सुरंग रेखावे नानापरी । शुक्लांबरें वेष्टूनि तयावरी । पूर्णकुंभ स्थापावा ॥ ८ ॥ द्वादशाब्ज प्रपूरित । पंचरत्नसमन्वित । तया कलशावरी लक्ष्मीकांत । आसनार्थ संपुष्टावा स्वशक्त्या ॥ ९ ॥ लक्ष्मीनारायणप्रतिमा । हेम रजत ताम्रमयी मनोरमा । स्थापावी संपूर्ण कामा- । प्राप्त्यर्थ पूजनार्थ ॥१०॥ पंचामृतें अभिषेक विधियुक्त । सभाग्य करू भगवद्भक्त । केशवादि नामयुक्त । सर्वोपचार अर्पावे ॥ ११ ॥ रात्रौ जागरण पुराणश्रवण । गीत नृत्य वाद्य सुलक्षण । वर्जावे निद्रादि अवगुण । भक्त्या कीर्तन करावें ॥ १२ ॥ भक्तकीर्तनाचें महिमान् । भगवत आहे भक्ताधीन । न करितां अन्य साधन । कीर्तनमात्रें हरि भेटे ॥ १३ ॥ येथें न लगे विद्या कळा । भक्त गाय नाचे मोकळा । त्याचिया प्रेमाचा सोहळा । अकळ सकळा लोकांसी ॥ १४ ॥ करितां व्रतोद्यापनाचरण । भक्तभेटी लाभे कोण । लाहे तरि तद्रूपें नारायण । प्रत्यक्ष भेटला तयासी ॥ १५ ॥ भक्तभेटि नव्हे जरी । व्रति हि नेणें कीर्तनथोरी । तरी उदरोदेशीं गायक नृत्य करी । गीत नृत्यीं बोलिलें तें ॥ १६ ॥ त्रिकाळा-

१ भरतखंड. २ मुकुर=आरसा. ३ चामिकर=सोनें ४ स्वस्तिक

र्चन करूनि दिवा । रात्रौ जागरण केशवा । प्रातःकाळीं पुजासेवा । नित्य नेमपूर्वक करावी ॥ १७ ॥ तिळाज्यहोम सहस्राहुति । हवन करावें मूळमंत्र व्याहृति । भावें पुजावा रमापति । सर्वोपचारीं सुसांग ॥ १८ ॥ पुराणपठण भावें । परमेश्वरापुढें करावें । तदनंतर विस्तारावें । वायनदान द्वादश ॥१९॥ दध्यन्न पायस यथोचित । दशापूप घृतयुक्त । यथासामर्थ्य दक्षणेसहित । द्यावें द्वादश विप्रासीं ॥ २० ॥ देवादिदेवा जगन्नाथा श्रीहरि । भक्तानुग्रहकारका मुरारि । कृष्णा वायनदान अंगिकारीं । सर्वाभिष्टप्रद होईं ॥ २१ ॥ प्रार्थना कृतांजळी । जानु ठेऊनि भूमंडळीं । अति विनित प्रेमसमेळीं । वाग्प्रणम्य करावें ॥ २२ ॥ नमो नमो सुरराजराजा । नमो जगन्निवासा खगध्वजा । नमो अजजनका अजा । संपूर्ण फळकरीं हरि ॥ २३ ॥ ऐसा प्रार्थूनियां अच्युत । जानु करूनि अवनीगत । अर्घ्य द्यावा लक्ष्मीसहित । परमेश्वराप्रीत्यर्थ ॥ २४ ॥ नमस्तुते लक्ष्मीकांता । पयोनिधिनिवासी अनंता । अर्घ्य अंगिकारीं भगवंता । श्रीसहित श्रीहरि ॥२५॥ रामा तुझेन स्मरणें नामोच्चारणें । तपयज्ञक्रियाचरणें । निउन तें संपूर्ण करणें । नमनें सद्य तुझेन॥२६॥ ऐसें प्रार्थूनियां परमेश्वरासी । प्रतिमा दक्षणा आचार्यासी । अर्पूनिया ब्राह्मणासी । भोजन द्यावें सद्भावें ॥ २७ ॥ दक्षणा देऊनि द्विजवरा । येथाशक्तया मनोहरा । विष्णुकथा परिसावी परिकरा । प्रेमरंगें सत्संगें ॥ २८ ॥ पश्चात्स्वयें बंधुवर्गासीं । भोजन करावें मौनेंसीं । मनीं स्मरत माधवासी । ग्रासोग्रासी श्रीराम ॥ २९ ॥ ऐसें जो करील द्वादशीव्रत । तो सर्वकाम पावे अविच्युत[1] । निःपाप त्रिसप्त कुळासहित । विष्णुभुवनीं निवास ॥ ३० ॥ जो दुर्लभ देवांदिकां । न टके साधनीं अनेकां । तो पावीजे विधिजनक- । पूजनप्रसादें मानवें ॥ ३१॥ जेथें पावल्यां नाहीं शोच्यता । निरंतर निकट अच्युता । धन्य ते जननी धन्य ताता । तया दृढव्रतीचीं ॥ ३२ ॥ हें द्वादशीव्रत उत्तमोत्तम । नित्य जो वाचील परिसेल द्विजोत्तम । तया संतुष्ट पुरुषोत्तम । वाजपेयफळ देतसे ॥ ३३ ॥

---

[1] अविनाश

अरत्निमात्र तेथें अग्नीसी प्रतिष्टावें। आज्य भागांतपर्यंत करावें। पुरुषसूक्तें-करूनि ॥ १३ ॥ चरु करून तिलाज्याहुति । हवन करावें यथास्थिति । येकवार अथवा पापनिवृत्ति- । कारणें प्रायश्चित्त स्वगृह्योक्त ॥ १४ ॥ होम समाप्त करूनि विधिप्रकारें । शांतिसूक्त पठावें आदरें । मग देवा-पासीं येऊनि भक्तिभरें । पुनः पूजन प्रकल्पावें ॥ १५ ॥ पौर्णिमासीसि निराहार भक्तिता । तुजपुढें आहे लक्ष्मीकांता । भोक्ष्यामि परेहनि भग-वंता । शरणं भव श्रीरामा ॥ १६ ॥ येसी विज्ञापना करूनि करुणा-करा । अर्घ्य द्यावा निशाकरा । जानुद्वये स्पर्शोनि धरा । शुक्रपुष्पाक्षता-न्वित ॥ १७ ॥ क्षीरसागरसंभवा । अत्रिगोत्रसमुद्भवा । अर्घ्य अंगि-कारी देवा । रोहिणीसह शशांका ॥ १८ ॥ अर्घ्य देऊनि प्राङ्मुखें । पूर्णेंदुमंडळ लक्षावें सन्मुखें । प्रार्थना कृतांजळि सुखें । नमो रोहिणी-वल्लभा ॥ १९ ॥ नमो अमृतकरा शुभ्रांशा । नमो नमो नक्षत्रेशा । तुझेन सौभाग्य पावे निशा । नमो लक्ष्मीसहोदरा ॥२०॥ यानतरें जागरण करावें । पुराणपठणादि श्रवण भावें । जितेंद्रियता वर्जावें । पाखांडालापादिकासी ॥२१॥ ततः प्रातःकाळीं उठोनि । नित्यनेम संपादूनि । सादर व्हावें हरि-पूजनीं । यथाविभवविस्तरें ॥ २२ ॥ यानंतरें ब्राह्मणभोजन । स्वयें बंधु-वर्गासीं धृतमौन । पश्चात करावें भोजन । हरिस्मरणें करावें ॥ २३ ॥ येसें पुष्यादि कार्तिकपर्यंत । संवछर करावें पौर्णमास्याव्रत । भक्तिभावें पूर्ववत । नारायणपूजनादि सर्व हि ॥ २४ ॥ यानंतर उद्यापनविधि । सादर परिसोत कां सुधी । श्रवणमात्रें ज्याची बुद्धि । उदितव्रत करावया ॥ २५ ॥ मंडप करावा चतुरस्र । ध्वजा पताका तोरणादि शोभा सहस्र । घंटा किंकिणीरव पुष्पमाळा अजस्र । प्रतिष्टे प्रतिष्ठेकारणें योग्य ॥२६॥ कलश मुकुर चामिकरावृत । बहु दीपकळिका सुशोभित । रंगमाळा चहुंकडे सुरंगित । ज्या आवडती देवासी ॥ २७ ॥ मध्यस्थानीं सर्वतो-भद्र विचित्र । पंचाशद्वर्णविराजित यंत्र । तयावरी पूर्णकुंभ वेष्टित पवित्र ।

शुक्रांवरें करूनि ॥ २८ ॥ विधियुक्ता तया कलशावरी । हेमरौप्यताम्रप्रतिमा साजिरी । लक्ष्मीनारायणाकारी । देदिप्यमान मांडावी ॥ २९ ॥ पंचामृतस्नान भक्तिपूर्वक । तदुपरि उपचारपूजा सकळिक । सानंद करावी ससम्यक । परम प्रेमें रमेशा ॥ ३० ॥ रात्रौ करावें हरिजागरण । गीत नृत्य वाद्यें नारायण । सतोषउनि व्रतपरायण । प्रातःकाळकर्म करूनिया ॥३१ ॥ विधिवद्विष्णुपूजा पूर्वापरि । करूनिया अग्निमुखाभीतरीं । तिलाज्याहुति पूर्ववत प्रकारीं । हरिप्रीत्यर्थ हऊनियां[1] ॥ ३२ ॥ तिलदान यथाशक्त्या । ब्राह्मणासी करावें भक्त्या । सदक्षणावर युक्त्या । पूर्वमानें प्रार्थना ॥ ३३ ॥ नारायणा लक्ष्मीकळत्रा । उत्फुल्लपद्मपत्रनेत्रा । तिलदानें मुहास्यवक्त्रा । सुप्रसन्न होयी मजलागीं ॥ ३४ ॥ ऐसें प्रार्थूनि परमेश्वरा । भोजन द्यावे धरामरा । सतृप्ति होय शार्ङ्गधरा । यथारुचि मुखें ज्याचेन ॥ ३५ ॥ तैसा तृप्त नव्हे अग्निमुखें[2] हरि । तो तृप्त जालों न ह्मणे कोण्हेपरि । जन्ही अजीर्ण जालें होतें अध्वरीं[3] । श्वेतकी नृपोत्तमाचे ॥ ३६ ॥ नकळे पड्रसाची रुचि । सद्य सतुष्टता तया कैची । ह्मणौनि शक्ति असोनि जो वंची । तो वंचला कृतकर्मा[4] ॥३७॥ आयुष्यसंपदेचा विनाश । होय जैसा शक्तीचा विकाश । तैसा न करिता अविनाश । व्यय हरिपूजनीं ॥ ३८ ॥ शक्ति च नाहीं याक्तिचितें । संपूर्ति[5] आहे ईश्वरातें । तो श्रीहरि आवीं पात्रे दीनातें । येणें च गुणेंकरूनि॥३९॥ अकिंचनें किंचित केलें । तें शक्तीहूनि अधिक जालें । महज अनंत उपतिष्ठलें[6] । अनंता अंतरसाक्षी तें ॥ ४० ॥ तैसेंच करीन ह्मणोनि पठ । धरूनि धनदुराशेचा हठ[7] । तेणें कैसा तोषेलि वैकुंठ । चातुर्पंकळाप्रकाशक ॥ ४१ ॥ करिता लक्ष कोटभरणें । शत सहस्र वेची उदारपणें । कार्पण्य भगवद्भक्तिकारणें । अतएव अनादर ॥ ४२ ॥ ह्मणौनि सर्व सामर्थ्ये वैभवें । भजन भगवताचें करावें । राम आपुला येर परावें । सर्व हि मायाजाळ हें ॥ ४३ ॥ अहो या प्रभाचें गौरव । काय नि-

---

१ हवन करून २ यज्ञात ३ अतरल., शावचला. ४ व्यवहारनतुर मनुष्य ५ सपूर्णता. ६ मनात उभलें. ७ हट

रस् शर्कोलि रौरव । कीं या कळेवरामध्यें जीव । हो करवेलि याचेन॥४४॥ असों हें न मानिती बहिर्मुख । जया प्रपचीं चि वाटलें सुख । सत सर्वे-श्वरीं सन्मुख । पाठ्य सर्वथा न करिती ॥ ४५ ॥ ह्मणौनि यथावैभव ब्राह्मणद्वारा । सव्रुत करूनि सर्वेश्वरा । सहित चतुरवर्गा पत्किरा । स्वयें भोजन योग्यत. ॥ ४६ ॥ ऐसें जो करी लक्ष्मीनारायणव्रत । तो इह-लोकीं पुत्रपौत्रासमन्वित । महाभोग भोगूनि अन्युत– । पद पावे योगियां दुर्लभ जें ॥ ४७ ॥ यें व्रतें बोलिलीं ज्याकारणें । तो श्रीराम सुलभ नामस्मरणें । जेणें नामस्मरणमात्रें धावणें । केलें गजेंद्रासाठीं ॥ ४८ ॥ ज्याचेन नामस्मरणें सद्य । पतित पावन होती अद्य । नेणता काहीं गद्यपद्य । केवळ ह्मणतां श्रीराम ॥ ४९ ॥ करितां रामस्मरण मात्र । अविमुक्त वाराणसी क्षेत्र । करूनि राहिला सत्ताष्टनेत्र । तें रामनाम भावें स्मरावें ॥ ५० ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । व्रत वर्णने लक्ष्मीनारायण । व्रतसोद्यायन नाम । द्वादश प्रकरण समाप्तः ।

॥ श्रीराम ॥

---

॥ श्रीराम ॥

नमो मच्छ कूर्मा वराहोत्तमा । नमो नारसिंहा वामना त्रिविक्रमा । नमो परशुरामा दाशरथीरामा । नमो कृष्णा बौद्धा सुकल्की ॥ १ ॥ नमो व्रतप्रिया सुव्रतवल्लभा । नमो पद्मनेत्रा पद्मनाभा । नमो पद्मापति पद्महस्ता स्वप्रभा । पद्मोद्भवजनका ॥ २ ॥ आचरतां दुष्कर तपें । तुझी प्राप्ति दुर्लभ स्वरूपें । तें दर्शन व्हावया सोपें । साधन ध्वजारोपण ॥ ३ ॥ तुज दीनाची कृपा । ह्मणौनि तरणोपाय सोपा । रचिला सच्चिदानंदरूपा । तरावया कलियुगीं ॥ ४ ॥ परिसा ध्वजारोपणव्रत । भुवनत्रितयवि-ख्यात । भगवत्प्रीतिपात्र सत । भगवत्प्रीतिकारणें ॥ ५ ॥ सर्व पाप सर्वांचें पावे क्षया । विष्णु प्रसन्न सहजाया । विहित जें वर्णचतुष्टया ।

१ प्रत्येक मुखास तीन डोळे, याप्रमाणें ज्याला पाच मुखें मिळून पधरा (५+८) डोळे आहेत असा, शंकर

स्त्रियांसी हि तारक ॥ ६ ॥ सर्व दु:खप्रहरण । सर्व सुखाचें कारण । संसारसागरोत्तारण । ध्वजारोपण व्रत हें ॥ ७ ॥ विष्णुभुवनीं ध्वजारोपण करी । तो पूजिजे विरच्यादि सुरवरीं । अतः काय वैखरी । महिमा वर्णी आगळा ॥ ८ ॥ सहस्र हेमभार स्वधर्मार्जित । अर्द्धोदयीं सत्पात्रीं पुण्यक्षेत्रीं देत । तें पुण्यफळ अगणित । तूरतामात्र जयाची ॥ ९ ॥ ध्वजारोपण गरुडध्वजा । गंगास्नान तुळसीसेवनसम वोजा । अथवा शून्यें विष्णुमूर्तिपूजा । विष्णुपुरीं पावनी ॥ १० ॥ अहो चित्र अहो चित्रें । ध्वजारोपणपुण्य विचित्र । श्रम हे नहीं बहु यत्रें । न लगतां फळ विशाळ ॥ ११ ॥ कार्तिक शुद्ध दशमीं । हारे स्मरावा अंतरयामीं । दंतधावनपूर्वक नेमीं । स्नानविधि करावा ॥१२ ॥ येकभुक्त भूमिशयन । ब्रह्मचारी नेमौयन । धौतांबरधरसन्मुख शयन । नारायणस्मरणें निजे ॥ १३ ॥ उषःकाळीं उठोनि व्रतीं । नित्यनेम करूनि श्रीपति । पुजावा बरविया रीतीं । नानापरीं उपचारें ॥ १४ ॥ मग चहूं ब्राह्मणींसहवर्तमान । करावें भावें स्वस्तिवाचन । नांदिश्राद्धविधि करून । स्तंभद्वय यथोक्त ॥ १५ ॥ प्रोक्षावे गायत्रीमंत्रें । मग वेष्टावें शुभ्र वस्त्रें । धातों विधाता वेदमत्रें । स्तंभद्वयीं पुजावे ॥ १६ ॥ चद्र सूर्य सुपर्ण । तत्पदी पुजावे यथावर्ण । हरिद्राक्षता गंधादिपूर्ण । शुक्लपुष्पीं विशेष ॥ १७ ॥ यानंतरें गोचर्ममात्र । गोमयलेपनें पवित्र । स्थंडिल करावें विचित्र । गृह्योक्त अग्नि स्थापावा ॥ १८ ॥ आज्यभागादि अनुक्रमें । घृतपायसाहुति नेमें । अष्टोत्तरशत प्रेमें । हरिप्रीत्यर्थ होमाविया ॥ १९ ॥ विष्णुर्नुकं वीर्याणि । प्रथम पुरुषसूक्तपठणीं । वैनतेयायस्वाहा वाणीं । अष्टाहुति वाविया ॥ २० ॥ सोमो धेनु मुदुत्यर्च । जितेंद्रियता हननवाच । सौरमंत्र जपोन सर्वे च । शांतिसूक्त जपावें ॥ २१ ॥ रात्रौ जागरण जगदीश्वरापुढें । प्रातःकाळीं उठोनि नेमें दृढें । आपुलें स्वकर्म असेलि जेवढें । तें सर्व संपा-

दूनि ॥ २२ ॥ मंगळ वाद्यांचेन घोषें । सूक्तपाठें अति संतोषें । नृत्य गीत स्तोत्रीं निर्दोषें । ध्वज न्यावा देवाळया ॥ २३ ॥ महाद्वारीं अथवा शिखरीं । ध्वज बांधावा हर्षें करीं । यथोक्त स्तंभें वरवियापरी । चंद्रार्कांडजांकित ॥ २४ ॥ यानंतरें नारायण- । पूजन व्रतपरायण । षोडशोपचारीं प्रविण । करूं भक्तिभावें ॥ २५ ॥ ऐसा ध्वज देवसदनीं । सुशोभायमान स्थापूनि । प्रदक्षणा करावया स्तोत्रपठनीं । श्रुतिस्तव्य तयासी ॥२६॥ यानंतरें गिराप्रणम्य । करावें प्रेमें अनुपम्य । तेणें श्रीहरि भक्तिगम्य । अंतरङ्ग संतोषे ॥ २७ ॥ नमो पुंडरीकनयना । नमो सर्वभूतभावना । नमो हृषिकेशा जनार्दना । महा पुरुष पूर्वजा ॥ २८ ॥ जेणें हें सकळ हि जालें । जेणें स्थितिदशेतें आलें । जेणें विश्वविलया गाइलें । तया तुज नमो श्रीरामा ॥ २९ ॥ तुझा परमभाव ब्रह्मादिक । देव नेणती सकळिक । योगी नेणती उत्तमश्लोक । तया तुज नमो हरि ॥ ३० ॥ अंतरिक्ष ज्याचा नाभि । आकाश मूर्ध्नि[1] पद्मनाभीं । कटि पृथ्वी पाताळ पादप्रभीं । अवेव देवयोनी ॥ ३१ ॥ जो कारणकार्यरूपें । स्वयेंचि शोभे रूपारूपें । अद्वितीय स्वस्वरूपें । स्वसंवेद्य सच ॥३२॥ तया रमारमणा प्रणाम । शेषशयना नमो सप्रेम । नमो स्वानंदाभिराम । सीताराम नमोस्तुते ॥ ३३ ॥ ब्रह्मस्वरूप चैतन्यघन । सच्चिदानंद जगज्जीवन । आत्मा नित्य निरंजन । परमतत्व स्वसंवेद्य ॥ ३४ ॥ जो तत्वता निराकार । होत्साता भासे साकार । जो साकार निराकृति निर्विकार । अकळ करणादिकांसी ॥ ३५ ॥ तया नमन श्रीअनंता श्रेष्ठा । कर्मनिष्ठा योगसिष्ठा । भक्ता ज्ञानियां विशिष्टां । जो गति पति श्रीयेचा ॥ ३६ ॥ जो अशेष जगज्जाळपाळ कृपाळय । भक्तभावें अतसिकुसुमाभ होय । चतुर्भुज भुवन सुंदर त्याचे पाय । जगत्प्रणम्य प्रणमामि ॥ ३७ ॥ ऐसा श्रीविष्णुस्तव । प्रणम्यपूर्वक पढे मानव । तो सर्वदोषधौत जीव । विष्णुसायोज्यता पावे ॥ ३८ ॥ यानंतरें ब्राह्मणसंतर्पण । यथाशक्त्या सदक्षण । यानंतरें आचार्यचरण ।

---

१ कमलनयना, विष्णु. २ मस्तक.

दक्षणाछादनें पुजावे ॥ ३९ ॥ पश्चात् साङ्गनि जनविरोधु । भोजन करावें सहितमित्रबंधु । पारणानतरें रामगुणसिंधु । स्मरावा हृदयाब्जकोशीं ॥ ४० ॥ यैसें हें ध्वजारोपणव्रत । जो करील शुचिस्मत । त्याचें पुण्य अपरमित । भक्तिभावें परिसावें ॥ ४१ ॥ ध्वजस्तभीं जव जव चळे । तव तव करित्याचें पाप जळे । महा पातकोपपातक जाळें । भस्म होतीं हरिप्रसादें ॥ ४२ ॥ महा पातकें आणि त्याची यातना । येथें भगीरथा कथिली विवचना । जे आइकता महा मना । धीर न धरे प्रकपी ॥ ४३ ॥ तयाचें प्रायश्चित्त अति दुर्घट । श्रवणें हो पाहे हृदयस्फोट । तें अचाट कर्मकचाट । अगवेगुण्य घडेना ॥ ४४ ॥ कदापि अवटित हि घडे । तन्हि नि शेप पापक्षयो न घडे । ज्ञानाज्ञान तार्जें जोडे । तें सर्व केसेंनि नाशे ॥ ४५ ॥ अमुक्या पातकासी अमुके प्रायश्चित्त आचरे । येसा सकल्प करावा उच्चारे । तरी न कळोनि गुप्त वडले घारें । तें तव सहज च राहिलें ॥ ४६ ॥ पुढें हि तो च देहो इंद्रियें तें चि । पुढतीं घडोनि आलें हें चि । तरी व्यर्थता पूर्वप्रायश्चित्ताची । शूकरस्नानश्रम जैसा ॥ ४७ ॥ येसें सर्व प्रकारें न सोडी । पापसमूह वेसला नरडीं । तो ध्वजारोपणमात्रें सोडी । तत्काळ जाय जळोनी ॥ ४८ ॥ येसें आईकानि शक्त प्राणिया । कळवळा नुपजे करावया । पुढती परीक्षावे नलगे तया । तेरेलि कीं बुडेलि यैसें ॥ ४९ ॥ घरीं कोण आहे उवडें बोडकें । जे ध्वजापुरतें न मिळे फडकें । पाहुणचारांचें करी कडकें । अन्न काय नाहीं ब्राह्मणार्थें ॥ ५० ॥ तो देवी सपत्तीचा नव्हे असुर । असेना का परता निसुगनिष्ठुर । जाचिती यमकिंकर भयकर । तेव्हां च तो कळवळु ॥ ५१ ॥ आता मुमुक्षु जिज्ञासु धर्मसीळ । सहज सात्विक निर्मळ सुसीळ । श्रीरामप्राप्तासी उतावेळ । तिहीं तत्कामार्थ करावें ॥५२॥ येस्या व्रतातपाचें लक्ष । रामस्मरणापुढें अलक्ष । तया रामस्मरणाचा पक्ष । दृढ धरावा निर्धारें ॥ ५३ ॥ रामनाम परम सावन । यसें ज्याचें समाधान । तो मनुष्यवेपें निधान । भाग्यवतासी च जोडे ॥ ५४ ॥ जोड-

त्यावरी हि यत्नता । जाली पाहिजे अनन्यता । दुर्जनसमागमावाता । सावधान असावें ॥ ५५ ॥ रामा राघवा रघूत्तमा । कृष्णा केशवा मेघश्यामा । गोविंदा गोपति पुरुषोत्तमा । परमानंदा मुकुंदा ॥ ५६ ॥ येसें करितां नामस्मरण । स्वयें तोच नारायण । तयाचें स्वाभाविकाचरण । भगवत्प्रीतिकारक ॥ ५७ ॥ तो व्रतातपाची जीवनकळा । तो अधिष्ठान सकळां पुण्यफळा । स्वयें आचरे स्वलीळा । जगत्करुणेकारणें ॥ ५८ ॥ येवढे महिमान रामस्मरणी । तो राम सर्वदा स्मरा वाणीं । त्यांची निशिदिनीं करा शिरोणी । श्रुति स्मृति स्तवील ॥ ५९ ॥ श्रीरामसंबंधी ध्वज राहे दिवस । तितुकीं युगसहस्त्रें सारूप्य करीत्यास । विकुंठावतीसी होय वास । ध्वजारोपणप्रसादें ॥ ६० ॥ अत्राख्यायिका विचित्र । बोलिजेलि जे चित्र । ते परिसोत कां पवित्र । पुढलिय प्रकरणीं ॥ ६१ ॥ श्रीराम जयराम जयजयरामा । आपुलां नामीं देइ प्रेमा । रामस्मरणमहिमार्णवसीमा । न पवे द्वितीय अद्वतीं ॥ ६२ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । ध्वजारोपणव्रतवर्णनं । नाम त्रयोदशप्रकरणं संपूर्ण ॥ श्रीराम ॥

---

॥ श्रीराम ॥

जयजय रामा जगत्कारणा । जयजय रामा जगत्तारणा । जयजय रामा भयनिवारणा । अनायासें भजनाभा ॥ १ ॥ पैशाच्यउन्मादें । भजनभाव कैंचा प्रमादें । भक्तीसारिखें घडतां आनंदें । हरिपद पावे पातकी ॥ २ ॥ परिसा ध्वजारोपणमहिमा । परमाश्चिर्य वर्तलें श्रीरामा । परम पातकी पावला धामा । वैकुंठीच्या वसविलें ॥ ३ ॥ पुण्यकथा पतितपावनी । सर्व पापविध्वंसिनी । कृतयुगीं सोमवंशोद्भव भूप मेदिनीं । सुमति नामें सप्तद्वीपीं ॥ ४ ॥ धर्मात्मा शुचिस्मंत सत्यसंपन्न । अतिपूजनें अतिथीसी अन्न । देतसे सर्वभूतीं प्रपन्न । हरिभक्तिपरायण ॥ ५ ॥ सर्वगुणालंकृताकृति । पूज्य पूजारत निरहंकृति । दया संपूर्ण

---

१ मत्त्व, उपयोग. २ श्रीराममंदिरांत. ३ यद्धांजलि.

सर्वभूतीं । यशवंत कीर्तिवंत तो ॥ ६ ॥ तयाची भार्या पतिव्रता । सत्यवती नामें विख्याता । गुणलक्षण रूपवंता । पतिप्राणा सुसीळा ॥ ७॥ तें दोघें पतिव्रता पति । नित्य पूजिती लक्ष्मीपति । जातिस्मरण त्यांचा चित्तीं । अन्नोदकदानें परायणें ॥ ८ ॥ तटाक आराम वापी कांसार । जिहीं केलीं अपार । नित्य निरंतर पुण्यप्रकार । करणे तया उभयासी ॥ ९ ॥ ते सत्यवती नृपसुंदरी । नृत्य करी विष्णुमंदिरीं । परम संतुष्ट भावें करी । जातिस्मरणमहिमान ॥ १० ॥ आणि तो राजा चूडामणी सुमति । यथार्थ ज्याच्या नामाची स्थिति । जैसें अजापुत्रासी अज ह्मणती । तैसें नव्हे तें नाम ॥ ११ ॥ तो यथार्थ महाराज । सत्यसंतोषें सुविस्तर ध्वज । विष्णवालयीं आरोपी फळभोज । जाणोनि जातिस्मरणेंसी ॥ १२ ॥ येसीं दोघें हि हरिपरायणें । ज्याची स्तुति सुरांसी करणें । त्रैलोक्यविश्रुतें जयांकारणें । धार्मिक वर्णिती सदा ॥ १३ ॥ तयाचिया सीळसुमनामोदा । जाणवलें विभांडका दिव्य षट्पदा । बहु शिष्यसमूहें आला येकदां । प्रश्नगुंजारव करावया ॥ १४ ॥ आइकोन ऋषि विभांडक आला । राजा संतोषें पुढें जाला । नमस्कार साष्टांग केला । येरें धरिला हृदयेंसी ॥ १५ ॥ राजा ह्मणे ऋषिसत्तमा । कृपा केली तपोधामा । पवित्र करावया आश्रमा । आजि कृतार्थ मी जालों ॥ १६ ॥ आजि माझा जन्म सफळ । आजि स्वधर्मकर्म फळलें सीळ । आजि अलभ्य लाभ चरणकमळ । स्पर्शिलें भाळीं ॥ १७ ॥ मग तो पत्नीसहित महीपति । मधुपर्कविधि यथासंपत्ति । पूजा केली परम प्रीतीं । अनन्यभावें ॥ १८ ॥ वरासनस्थ विभांडक मुनि । आपण बैसला नीचासनी । परम प्रेमें कर जोडुनी । प्रार्थिता जाला जनेश ॥ १९ ॥ भगवन् विभांडक ऋषिराया । तुझेनि पावन जाली काया । श्री ह्रीं[३] कीर्ति पुण्य द्यावया । आगमन सज्जनाचें ॥ २० ॥ तूं भगवंत गृहासी आलिया । म्यां समर्पिली सर्व संपत्ति पुत्र जाया । अतःपर आज्ञा करावी धरावया । मज आपुला मस्तकीं ॥२१॥

१ पूर्व जन्मांतील स्थितीची आठवण २ कर्पा ३ विनय.

देखोनि अनन्य विनयान्वित । महर्षि जाला अति हर्षित । कृपाकरें मस्तक स्पर्शित । बोलता जाला मुदितास्य ॥ २२ ॥ राया तूं बोलिलासी केवळ । तैसेंचि आहे तुझें सीळ । तुझ्या वंशाची कीर्ति निर्मळ । इहपरत्रीं प्रसिद्ध ॥ २३ ॥ धर्म अर्थ काम मोक्ष । च्यान्ही पुरुपार्थ जे प्रत्यक्ष । यांचे प्राप्तीचा मुख्य पक्ष । विनयो होय भूपति ॥ २४ ॥ तुझ्या विनयें माझा चित्तीं । जाली असे अति प्रीति । येक पुसणें असे तुजप्रति । तें सांगावें महींद्रा ॥ २५ ॥ विष्णुसंतोषाकारणें प्रकार । वहुत आहेति सुविस्तर । तथापि तूं ध्वजारोपण तत्पर । किमर्थ तें सांगावे ॥ २६ ॥ आणि हे पतिव्रता सिरोमणी । सत्यवति तुझी राणी । परम प्रेम अंतःकरणीं । नृत्य करितां हरिपुढें ॥ २७ ॥ तरि हें किमर्थ वृत्तांत सांगावा । अपूर्व वाटत असे जीवा । सुमति ह्मणे भगवंता भावा । परिसे याचया सांगेन ॥ २८ ॥ मी पूर्वी होतों शूद्र । सुमाळी नामें अभद्र । माझिया दोषापुढें समुद्र । सामान्य जाले भूतळीं ॥ २९ ॥ कुमार्गरत लोकपीडक । पिशुन धर्मविद्वेषक । देवद्रव्य ब्रह्मद्रव्यापहारक । महापातकी दुरात्मा ॥ ३० ॥ गोहत्यारा ब्रह्महत्यारा चोर । प्राणिवधासी अति निष्ठुर । वज्रशाद्वी वज्रचित क्रूर । सर्व पापस्वरूप ॥ ३१ ॥ येसें असतां क्रमले वहुकाळ । मग बांधवादिकीं तजिला अमंगळ । लोकीं बहिष्कार केला केवळ । दुःखें वनाप्रति गेलों ॥ ३२ ॥ तेथें हि करी मृगमांसाशन । आणि पंथीहा मार्गावरोधन । अवैराग्यें विजन वन । वसविलें असतां ॥ ३३ ॥ येकदां सीतोष्णवृष्टिक्षुधात्रुपाक्रांत । अतिशयें निदाघार्तभूत । जीर्ण वनस्थ हरिप्रासाद येकांत । तेथें प्रवेशलों स्वयें ॥ ३४ ॥ हंसकारंडवसेव्य सरोवर । पद्मपुष्पीं विराजित मनोहर । वनसुमनें मधुकर अपार । गुंजारव करिती तथे ॥ ३५ ॥ ते हरिसरोवरीं केलें जळप्राशन । तेणें सीतळ जालें माझें मन । वीस समूळ उन्मुळून । क्षुधानळ निववीला ॥ ३६ ॥

---

१ आनंदयुक्त मुद्रेनें. २ उन्हाच्यातापानें विव्हल होऊन. ३ बदकाचे जातीचा पक्षी.

तये देवालयीं मांडिला वास । पडलें झडलें निर्वातास । तृणकाष्ठीं सावकाश । गृहभावें झाकिलें ॥ ३७ ॥ भूमि आपणा निजावयास महा मुनी । समान केली त्यां लिंपोनी । वीस वर्षे मृगमांसभोजनीं । क्रमलें मज येकाकीं ॥ ३८ ॥ यानंतरें हे साध्वीदुःखार्तभूता । निषादिका विंध्यदेश होता । तेथें आली बंधुत्यक्तता । नाम कोकिळिनी प्रसिद्ध ॥ ३९ ॥ ते हि क्षुधात्रुपाक्रांता । ग्रीष्मतापें संतप्ता । दैवयोगें भ्रमतभ्रमतां । तेथें चि आली अकस्मात ॥ ४० ॥ तिसी देखोनियां भगवंता । कृपा थोर उपजली चित्ता । मग त्यां जळग्रासें सबाह्य दुःखिता । निववली येकाकिनी ॥ ४१ ॥ मग आपुलें कर्म मजप्रति । कथिती जाली यथास्थिती । मी दामुक निषादाची प्रीतिवती । कन्या विंध्यनिवासिनी ॥ ४२ ॥ सदा परस्वापहारिणी । नित्य पैशुन्यकलहकारिणी । स्वपतिहंती व्यभिचारिणी । स्वधर्म बहिष्कृता ॥ ४३ ॥ यैसी देखोनि दुराचारी । बंधुवर्गी घातलिये बाहेरी । ते मी प्रवेशोन कांतारीं । भ्रमे अनाथ दुःखिता ॥ ४४ ॥ येसें आपुलें आचरण चिरित्रें । मज सांगितलें स्वामी विचित्र । यानंतरें सहजचि मित्र । समानसीळे अनुकूळे ॥ ४५ ॥ मग ते देवाळई स्वभावें । दोघे राहिलों दंपतीभावें । तेथें कोणें कोणा निवारावें । आह्मां दोघां समसीळां ॥४६॥ परपुरुष परस्त्री येकांतस्थानीं । असतां वैराग्य तों नुमजे मनीं । दुःसह दुःखें हि विसरोनी । रतीगती च आरंभें ॥ ४७ ॥ तेथें सुखरूप ताऱुण्यभरीं । येकांत करिती परनर परनारी । अर्थ परमार्थ मिषें करी । ते तत्वतां भ्रंशती ॥ ४८ ॥ अदंत वृद्ध आणि बाळक । तेथें चि असावें निःशंक । इतरें परस्परें साशंक । ह्मणोनि येकांत न व्हावा ॥ ४९ ॥ सुसीळ सुसीळ परनरनारी । येकांतीं चळलीं पूर्वापरी । भगवंता विभांडका आह्मी तरी । सारिखीं च कीं दोघे ॥ ५० ॥ मद्य मांसाशनीं विष्णुसदनीं । यथेष्टाचार करितां येक दिनीं । अति उन्माद मद्यपानीं । चढला आह्मां दोघांसी ॥ ५१ ॥ वस्त्रें फेडूनियां

१ निवान्यारतिां. २ भिह्नांग. ३ चाहार्त. ४ चारित्र.

उन्मादें । दंडाग्रीं वांधलीं मातेळ छंदें । नाचों लागलों विभ्रमानंदें । निर्लज्ज दोघें हि जणें ॥ ५२ ॥ नकळे कोण कर्ममेळें । मृत्यु पातला तेणें च काळें । न्यावयालागीं छळें बळें । आले भयंकर यमदूत ॥५३॥ तयं आश्चिर्य जालें रुषिराजा । कोण वर्णू शके गरुडध्वजा । ध्वजारोपण पुण्य पैजा । विष्णुदूत प्रेरिले ॥ ५४ ॥ शंखचक्रगदाब्जधर । चतुर्भुज घनःशाम सुदर । कोटिसूर्यसम सुखद प्रभाकर । मंजुळ भाषी समर्थ ॥ ५५ ॥ भयंकर पाशधर भीम काळे । क्रूर भीषण दाढारे कराळे । तया यमदुतांप्रति ते वेळें । विष्णुदास बोलते जाले ॥ ५६ ॥ तें म्यां परिसिलें स्वकर्णीं । परिसें धर्मज्ञ चुडामणी । रे रे क्रूर दुराचारी हो अविवेकपणीं । यासी न्यावया आलेति ॥ ५७ ॥ सोडा सोटा याच क्षणा । या निःपापा हरिवल्लभा दोघाजणां । निःपापी पापवुद्धि तो जाणा । पुरुषाधमा तत्वतां ॥ ५८ ॥ पापियाचा ठाईं निःपापवुद्धि धरी । एतावता तयाचा संग हि करी । तो अधमाधम वोलिजे संसारीं । ह्मणौनि तुह्मी अविवेकी ॥ ५९ ॥ विवेकें पाविजे सुख संपदा । अविवेकें परमापदा । यानंतरें प्रतिवादा । करिती यमकिंकर ॥ ६० ॥ हें पातकोत्तमें आहेति दोघे । यांचीं दुष्ट कर्मे अमोघें । हें जाणोनि आलों वोघें । घेऊनि जाऊं यांसी ॥ ६१ ॥ श्रुतिप्रणीत तो च धर्म । विपरीत तो च अधर्म । इहीं केलें अमर्याद कर्म । ह्मणोनि यासी नेतसों ॥ ६२ ॥ येसें आइकोनि विष्णुदूत । कोपोनि यमदूतासी बोलत । ज्याच्या तनुतेजाची फांकत । प्रभा दिगांतीं ॥ ६३ ॥ कैसे धर्म जाणता अधर्मी हो । अविवेकें पावलेति मोहो । नरकाध्यक्ष जालेति तन्हीं हो । पापवुद्धि न संडा ॥ ६४ ॥ महापातकीं स्वधर्मक्षयावधि । नरकीं तिष्ठोनि मुक्त होती सुधी । तुह्मी आचंद्रतारा दुष्टवुधि । नरकापासूनि न सुटा ॥ ६५ ॥ पूर्वसंचित पापाचीं । निष्कृति न विचाराची । अद्यापि पापकर्माची । करित असा पुनः पुनः ॥ ६६ ॥ श्रुतिप्रणीहित ते चि धर्म यथार्थ । परंतु तुह्मी बोलतां तितुकें व्यर्थ । भगवद्भक्तिपरायण कृतार्थ । आपासें

---

१ 'मातलों' असा दुसऱ्या प्रतींत पाठ आहे.

अनायासें हि ॥६७॥ ये दोघे हि हरिपरायणें । इहीं केलीं ध्वजारोपणें । नृत्य सहर्षांतःकरणें । उपलेपन हरिसद्मीं ॥ ६८ ॥ ये उभयता अतकाळीं । होतीं श्रीहरिचा देउळीं । महा पातकोपपातकी नामसमेळीं । पावे परम पदाते ॥ ६९ ॥ विष्णुभक्त अथवा यति । यांची शुश्रुषा जे करिती । ते पावती परम गति । त्यांतें लक्षिती ते हि कृतार्थ ॥ ७० ॥ मुहूर्त अथवा मुहूर्तार्ध हरिमंदिरीं । सीणला हि विश्रांतीसी बैसे जरी । तो पावे परमस्थान मा भावें करी । भजकाचें काय अपूर्व ॥ ७१ ॥ तुह्मी दुष्ट बाह्य दृष्टीं । क्षुद्र चि लक्षीत असा सृष्टि । परी रामस्मरणीं जयाची तुष्टि । तो चि वेदविदा वर ॥ ७२ ॥ आतां सीघ्र सोडा या दोघांसी । आइकोनि सोडिती पाशबधासी । मग विमानीं वाहोनियां आह्मांसी । विष्णुसदनाप्रति नेलें ॥७३॥ युग कोटि सहस्रें शतें । हरिसामिप्य दीप्तिमतें । तैसीं च रुद्रपद ब्रह्मपदातें । पावलों तितुकी च सख्या हो ॥ ७४ ॥ तेथें भोगूनियां दिव्य भोग । क्रमें महीप जालों महाभाग । येथेंहि सर्व संपदा अव्यग । पावलों विष्णुप्रसादें ॥ ७५ ॥ न कळत घटलें उन्मादें । दुराचारें पापप्रमोदें । त्याचें हें फळ दिधलें मुकुंदें । प्रेमळ फळ कळेना ॥ ७६ ॥ ह्मणौनि नृत्य ध्वजारोपणा । जातिस्मरें प्रीति दोघा जणा । आइकोनि संतोषला रुपिराणा । स्तऊनि आला स्वाश्रमा ॥ ७७ ॥ यालागीं श्रोतयांप्रति प्रार्थी । येनर्दे[1] पुण्य यदर्थी । आळस न करावा कृतार्थीं । ध्वजारोपण करावें ॥७८॥ ऐसिया ध्वजारोपणादि व्रतारोपण । भावें स्वभावें करिता रामस्मरण । पावे परमेश्वरपरायण नारायण । स्वस्वरूप सायोज्यता ॥ ७९ ॥ ह्मणौनि श्रीरामाच्युतानंता विष्णु । मुरारि मधुकैटभारि जिष्णु । सदां सर्वदां स्मरे सहिष्णु । तो च स्वयें श्रीहरि ॥ ८० ॥ ऐसें सामर्थ्य रामनामीं । तरी कां हो न स्मरों आह्मी । भावें उच्चारु सर्व यामीं[2] । श्रीरामनाम सप्रेम ॥ ८१ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । ध्वजारोपणाख्यान । सुमति सपत्निक महिमान । फळ पावति तन्मता ॥ प्रकरण चौदावें ॥

---

१ तर मग. २ प्रहरीं.

॥ श्रीराम ॥

जयति जयति श्रीरामा । जयति सपूर्णकामा । जयति निर्मळ गुणधामा । मेघनीळा सुस्मिता ॥ १ ॥ जयति भुवनैकनिधाना । जयति अरिकुळनिदाना । जयति सर्वभूतीं समाना । भक्तपक्षाभिकारका ॥ २ ॥ जयति जगदेकदुर्गमा । जयति भवदुर्गनिर्गमा । जयति सद्भावें सुगमा । दीनानाथा दयार्णवा ॥ ३ ॥ पतंजळयोगशास्त्राभ्यासें । तुझी ओभा[1] ते हि न भासे । तो तू कळीमाजीं अनायासें । नामस्मरणें भेटसी ॥ ४ ॥ जरी तूं न करितासि हा तरणोपाय । तरी हे मुमुक्षु करिते काय । तुझें नामस्मरण निरपाय[2] । स्मरतां तूं होसी कैवारी ॥ ५ ॥ आतां हरिप्रिय हरिपंचक । व्रत धर्मार्थकाममोक्षदायक । आचरतां हरे पातकशोक । नरनारीं करावें ॥ ६ ॥ जें भुवनत्रयीं प्रसिद्ध दुर्लभ । सर्व सौख्यद सर्व व्रतफळलाभ । सर्व मगळमय सर्व शुभ । पाविजे ज्याच्या प्रभावें ॥ ७ ॥ मार्गशीर्ष शुद्ध दशमीं । जितेंद्रिय असावें व्रतनेमीं । व्रतोक्त स्नानादि सर्व कर्मीं । तत्पर व्हावें सर्वस्वें ॥ ८ ॥ नित्य दैवतार्चन पंचमहायज्ञ । तद्दिनीं अशन करू व्रतज्ञ । विष्णुसन्मुख शुचिः सूज्ञ । निजावा हरिस्मरणेंसीं ॥९॥ ततः प्रातःस्नात हरिसमर्चा[3] । करावी न करावी अन्य चर्चा । पोडशोपचार स्ववर्चा- । सारिखें पयस्नानादि ॥ १० ॥ नमो ज्ञानरूपा ज्ञानदायका । नमो विश्वरूपा विश्वात्मका । देवदेवा वैकुंठनायका । उपवास तवप्रीत्यर्थ ॥ ११ ॥ करूनि उपवास समर्पण । रात्रौ हरिकथा जागरण । द्वादशीं त्रयोदशीं चतुर्दशीं नारायण । उपोषणें पुजावा ॥१२॥ संप्राप्त असतां पौर्णिमा । विशेष पंचामृतादि मेघशामा । सर्वोपचारीं सर्वोत्तमा । अर्चावें भावें स्वशक्तिता ॥१३॥ करावा तिळहोम तिळदान । षष्ट दिवसीं उषःकाळीं उठोन । स्वाश्रमकर्म संपादून पचगव्यप्राशन । पूर्वापरि हरि पुजावा ॥१४॥ ब्राह्मणभोजनानंतरें स्वता । पारणें बधुवर्गासीं करावें मौनता । नामस्मरणें अच्युता । चिंतूनियां मानसीं ॥ १५ ॥ ऐसें पो-

---

१ प्रकाश, प्रभा. २ ज्यापासून तोटा न होतां नफा च होईल. ३ हरिपूजन.

ष्यादि कार्तिकपर्यंत। संवछर करावें महा व्रत। पुनर्मार्गशीर्ष होतां प्राप्त। उद्यापन करावें ॥ १६ ॥ येकादशीसी निराहार। द्वादशी सपादूनि सदाचार। पचगव्य प्राशूनि परमेश्वर। पुजावा महा मंडपीं ॥ १७ ॥ करूनि अनुपम्य विध्युक्त शोभा। संतोषवावें पद्मनाभा। घृतमिश्र पायसवायन विप्रां सुप्रभा। द्यावें दक्षणावस्त्रफळेंसीं ॥ १८ ॥ सुगधोदक सपूर्ण कुंभदान। अध्यात्मविदा द्यावें वस्त्रें वेष्टून। सर्वेश्वरा परमान्नदानें सुप्रसन्न। होई मजलागीं भगवता ॥ १९ ॥ नारायणा कारणकारणा। सर्वात्मया जगदुद्धारणा। जळकुंभदानें विश्वप्राणा। प्रीतीतें पावे मजलागीं ॥ २० ॥ यैसें प्रार्थूनि परमेश्वरा। भोजन द्यावें धरामरां। बधुवर्गादिसह पंक्तिकरा। स्वयें भोजन करावें ॥२१॥ यैसें हे विष्णुपंचकव्रत करी प्रीतीं। तया नाहीं ब्रह्मपदींहूनि पुनरावृत्ति। साळंकृत कोटिसहस्रें गोदानें ब्रह्मविदांप्रति। त्याचें पुण्यफळ येकें उपोषनें ॥ २२ ॥ जो हें आइकेलि भक्तिपूर्वक। त्याचें हरे कोटि उपपातक। आता आणिख व्रत सम्यक। प्रकारें परिसावें ॥२३॥ श्रीराम जयराम जय जयराम॥ छ जें आचरता महा पुण्य। कारिती ते नर धन्य। होती देवादिका मान्य। स्वयें तरोनि सुकीर्ति ॥ २४ ॥ आषाढ श्रावण भाद्रपद। आश्विन अन्य मासीं धर्मविद। शुक्लपक्षीं दशमीसी गोविंद। स्मरावा नित्य नेमपूर्वक ॥२५॥ करूनि नित्य पंचगव्य देवतार्चन। रात्रौ ब्रह्मचर्य भूमिशयन। एकादशीसी प्रातःस्नान। सदाचार करावा ॥ २६ ॥ विधिवद्विष्णुपूजा। करावी सहित वेदविदां द्विजां[१]। सकल्प करावा वोजा। स्वस्तिवाचनपूर्वक ॥२७॥ मास येक निराहार अतीं पारणें। करितों भगवता तुजकारणें। तुझिये समर्थ आज्ञेप्रमाणें। तपोरूपा तपोमया ॥ २८ ॥ नमो तुज तपोरूपा परमानदा। नमो तपफळदायका गोविंदा। माझें कल्याण करी हरि विघ्नापदा। निरशी भक्तवछळा ॥ २९ ॥ यैसें नित्यनेम देवतार्चनें। मास येक उपोषन हरिचिंतनें। पंचामृतस्नानादि शुद्ध मनें। हरिपरिचर्या[२] करावी ॥ ३० ॥ दीप लावावा हरिमंदिरीं। सपूर्ण हि मासवरी।

१ ब्राह्मणांना २ हरीची सेवा किंवा पूजा.

केशवादि नामोच्चारीं हरि- । तर्पण हि करावें ॥ ३१ ॥ नित्य विष्णुसन्मुख शयन । मासांतीं यावें ब्राह्मणां भोजन । शक्तिसारिखें अकिंचन । तेणें द्वादश यत्नता ॥ ३२ ॥ शक्तिसारिखी दक्षणा वस्त्रालंकार । दानें तोपवावे धरामर । येसें महा व्रत करील नर । तो वाजिपेयफळ लाभे । ॥३३॥ दोनी मासोपवास व्रतें करी । तो पौंडरीकफळ लाभे निर्धारी । तिसरें मासोपवास व्रत धरी । आप्तोर्याम यज्ञस्य फळ द्विगुण ॥ ३४ ॥ चतुःपराक पुण्यफळ । पंच अत्याग्निष्टोम द्विगुण विशाळ । षष्ट ज्योतिष्टोमाष्टगुण निर्मळ । पावे मासोपवासव्रती ॥ ३५ ॥ अष्ट करिता नरमेधाष्ट । पुण्यफळ फावे स्पष्ट । सप्त सप्तमखयातिमेध इष्ट । फळ पावे पंचगुणें ॥ ३६ ॥ नैवतत्रृतियोंसगुणित । गोमेध फळ पावे निश्चित । दश दशभुजनेत्रगुणें पावत । ब्रह्ममेधफळ आणि पराक ॥ ३६ ॥ येकादश पराकें करितां । सर्व यज्ञफळ पावे स्वतां । हरिसारूप्य लाभे तत्वता । जे दुर्लभ योगिया ॥ ३८ ॥ द्वादश करिता हरिसारूप्य । सर्व भोगसमन्वित दुःप्राप्य । पाविजे त्रयोदशें अवाप्य । परमानंदशोच्यता पुनर्नरा ॥ ३९ ॥ मासोपवासव्रती गंगास्नाइ । धर्मशास्त्रवक्ता यथान्याई । मुक्त ह्मणौनि तपोजई । तिहीं सर्वीहि व्रत करावें ॥४०॥ यति वानप्रस्थ ब्रह्मचारी गृही । पुरुष स्त्रिया तपोनिष्ट तिहीं । आचरता पुनरावृत्ति नाहीं । अद्वैतबोधेविण मोक्ष ॥ ४१ ॥ हे महा व्रत महा पुरुष । नारायणपरायण विशेष । आचरणें अथवा श्रवणें अशेष । पातकें नाशोनि निमुक्त ॥ ४२ ॥ परि हें महद्व्रत अति कठिण । भयभीत सर्वसाधारण । कलौ अन्नमय प्राण । काय करिती वापुडीं ॥४३॥ या येवढिया कष्टाचें फळ । मोक्ष पावणे केवळ । तो रामनामस्मरणें अविचळ । सुखरूप सुसीळा ॥ ४४ ॥ नित्य श्री नित्य मंगळ । नित्योत्सव निजयमूळ । ज्याचे हृदयीं अचंचळ । रामनाम मनोरम ॥ ४५ ॥ सर्व संतोपकारक सोपें । जयाकारणे करणें उग्र तपें । तें सच असतां

---

१ वाजपेय यज्ञाचें फळ. २ ३×३=नऊ. ३ गंगास्नान करणारा. ४ गृहस्थ.

वाग्वर्ती साक्षेपें । ह्मणावें श्रीराम हरि कृष्ण ॥ ४६ ॥ विष्णु वासुदेव महादेव । मधुसूदन मुकुंद माधव । श्रीपति भूपति भूतिपति देव । दयांभोधि वैकुंठ ॥ ४७ ॥ सर्व हि व्रतातपाची फळनिष्पत्ति । सहस्र जन्मावधि सुटिती । श्रीरामनामीं प्रेम प्रीति । येणें जन्में सभाग्या ॥ ४८ ॥ रामनामेंवीण साधनश्रम । काय निरसूं शके भवभ्रम । अपूर्ण तें संपूर्ण करील कर्म । हें सामर्थ्य कैंचें आणिखा ॥ ४९ ॥ रामनामें तरले जड । रामनामें तारले दगड । तया रामस्मरणासीं अंगड । कांहींच नाहीं ॥ ५० ॥ आता प्रसन्न करावया श्रीरामासी । व्रत बोलिजेलि पुण्यराशी । प्रसिद्ध नामें येकादशी । परिसा हरिप्रिय हो ॥ ५१ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामीरामदासकृते । मासोपवास व्रतवर्णन । पंचदशम प्रकरण समाप्त ॥ १९ ॥

नामापुढें साधन काय आहे । हा भाव ज्याचे हृदयीं च राहे ।
तो मुक्त जाला स्तविजे तयाला । त्याचेनि संगें गति मानवाला ॥१॥
येकादशीचें फळ वर्णवेना । तुळावयाला दुसरें दिसेना ।
ज्याच्या प्रभावें हरिरूप व्हावें । पुनर्नरें शौच्य कदा न व्हावें ॥१॥

---

॥ श्रीराम ॥

नमो एकादश हृषीकेशा । नमो एकादश रुद्र हनुमंतेशा । नमो एकादशीव्रतप्रिया परेशा । परमानंदस्वरूपा ॥ १ ॥ नमो नमस्ते एकादशीजनका । नमो एकादशी वरदायका । नमो एकादशीकृतसहायका । अनाथ करुणाकरा ॥ २ ॥ नमो नारायणा नरकांतकरा । नमो कुशासुरप्राणसंहरा । नमो मुरारि मधुवधकरा । कैटभमर्दना अनंता ॥ ३ ॥ नमो प्रकृतिप्राणनाथा । नमो अनंतब्रह्मांडेशा समर्था । नमो लीलाजगदाभा प्रतिभासा यथा । शुक्तिरजताकारता ॥ ४ ॥ नमो भासा-

---

१ वाणीनें २ दयेचा समुद्र ३ लवणीची वाट, अवघड.

भासस्वरूपा । नमो भासाभासातीता अरूपा । नमो मनोवाचा परा आपेंआपा । नमो मनोवाचावाचका ॥ ५ ॥ तव स्तव्र कारितें स्फुरण । तें तुज आत्मयाचें हें प्रमाण । तुझा अनुभव जया तो आपण । तूं च अखंड दंडवत ॥ ६ ॥ इंद्रियें बहिर्मुखें बापुडीं । तुझिया अनुभवासी हे वेडीं । ते तुज केवीं जाणती बाह्य जोडी । तूं स्वसंवेद्य सर्वथा ॥७॥ येसा विनऊनि लक्ष्मीपति । प्रार्थित असे श्रोतयाप्रति । परिसा भुवनत्रयीं ज्याची ख्याति । व्रतराज येकादशी ॥ ८ ॥ आइका व्रत येकादशी । श्रवणें हरती पापराशी । पुण्य आकाशअवकाशीं । सामावेना करित्याचें ॥ ९ ॥ आणिखें व्रतें जें बोलिलीं । तें कोण्हीयेकें केलीं न केलीं । करील तरी पुण्य न करी तरी लिहिलीं । नाहींत कोठें पातकें ॥ १० ॥ तैसी हे हरिदिनी नव्हे हो । सकळीं करावी सांडूनि आग्रहो । न करितां ब्रह्महत्यादि दोष संदेहो । सर्वथा धरूं नये ॥ ११ ॥ ज्यान्ही वर्ण ज्यान्ही आश्रम । एकादशी कर्तव्य हा नेम । न करी त्याच्या दोषाचा निर्गम । नव्हे सर्वथा ॥ १२ ॥ ब्रह्महत्येसी आहे निष्कृति । शास्त्रबुद्ध्या प्रायश्चित्तीं । एकादशीअन्नासी निवृत्ति । न घडे न घडे न घडे हो ॥ १३ ॥ समर्थ सर्वदोषदहनी । एकादशी हुताशनी । तिची च अमर्यादा अन्नानीं । तो दिग्विजयी नारकी ॥ १४ ॥ दोषाशनी एकादशी । प्राप्त असतां सर्व देशीं । अन्न वर्जितां तये दिवशीं । वऴसा वर्ते पातका ॥ १५ ॥ एकादशीनें वर्जिलीं । सज्जनीं मनींहूनि ताजिलीं । हाणोनि तेथें[२] थार जाली । उपावया तयांसी ॥ १६ ॥ मार्जरें केलें आखुप्राशन । तस्यांगस्त्यापि शुकासी तोचि स्थान । तैसें सेवी एकादशीसी अन्न । दोष त्याआंगीं संक्रमती ॥ १७ ॥ एकादशीचे अहोरात्र । अन्नस्पृहा करी कुपात्र । तो सर्व नरकभोक्ता अत्र । नास्ति नास्ति संशयो ॥ १८ ॥ एकादशीसी दोही पक्षीं । स्त्रियां पुरुषीं मुमुक्षीं । अन्न वर्जावें सुलक्षी । विष्णुप्रीतीकारणें ॥ १९ ॥ उपोषनफळ निःसीम ।

---

१ एकादशीस अन्न सेवन करणाराच्या दोषास. २ नरकांत राहणारा. ३ एकादशीस अन्न सेवन करणाराच्या ठिकाणी. ४ पातकांस. ५ उंदीर खाणें. ६ सचरतात.

इहपरलोकी पूर्णकाम । हरिसंतोषें मेघशाम । कवण वर्णूं शके हो ॥ २० ॥ च्यारी लक्ष सूर्यसंक्रांती । बहु धन दिधलें विप्राप्रति । तें पुण्य न तुळे हो निश्चितीं । ज्याची सोळावी कळा ॥ २१ ॥ यतिहस्तीं हस्तोदक । मेरूतुल्य सिक्थ येक । तें सर्व यतिभोजनफळ तुकें । न पवे सोळावी कळा ॥ २२ ॥ एकादशीच्या लंघनें । सर्व पुण्याचें फळ माने । ह्मणौनि कीजे सर्व जनें । जनार्दनाप्रीत्यर्थ ॥ २३ ॥ महा पातकोपपातकयुक्त नर । करी एकादशीनिराहार । तो सर्व पापविमुक्तापर । पावे परमपदातें ॥ २४ ॥ दशमीसी उठोनि प्रातःकाळीं । नित्यनेम करूनि सकळीं । विष्णुपूजा करावी प्रेमळीं । विधिपूर्वक स्वशक्त्या ॥ २५ ॥ ब्रह्मचर्य शुचिर्भूमिशयन । येकदा येकान्नाशन । श्रीविष्णुपुढें विष्णुजनें । विष्णुस्मरणें निजावे ॥ २६ ॥ प्रातरुत्थाय सुस्नात । एकादशीसी अच्युत । भावें पुजावा यथोचित । गंधपुष्पादि उपचारीं ॥ २७ ॥ एकादशी निराहार निर्धारेसी । पारणें करीन अपर दिवसीं । उपोषन समर्पूनि देवासी । प्रसन्न होइ प्रार्थवे ॥ २८ ॥ देवापुढें करावें जागरण । आइकावें तयाचें लक्षण । जेणें निकट नारायण । प्रेमभावें संतुष्ट ॥२९॥ गंध पुष्प धूप दीप । नवेद्य फळ तांबूल पुण्यरूप । दक्षणा प्रदक्षणा निरांजन निःपाप । पुष्पांजळी नमस्कारें॥ ३० ॥ प्रतियामीं आरार्तिका । चित्रविचित्र वैकुंठनायका । वोवाळाविया मंगळदायका । श्रीमुखावलोकनें सप्रेम ॥ ३१ ॥ यथोक्त वाद्यांचें सुस्वन । पुराणपुस्तकवाचन । श्रीहरिगुणनामकीर्तन । नर्त्तन हस्ततालिका ॥३२॥ पुनःपुनः जयजयकार । हरिरंगीं लोळे थोर । दंडवत नमस्कार । सात्विकभाव उमटती ॥ ३३ ॥ पुस्तकवाचनाहूनि भारी । भक्तगीतनृत्यप्रिय हरि । वैकुंठ सांडूनियां देव्हारे । तिष्टे हरिदाससंमेळीं ॥ ३४ ॥ भक्तउपकारें दाटला । ह्मणवी तयाचा विकिला । त्याचा भारवाही जाला । योगक्षेम वाहातसे ॥ ३५॥ नृत्यें श्रमे धर्मलिंगा । भक्ता भेटे अमरगंगा । अवभृतस्नान पुण्ययागा । पुळकें येतां हरिरंगीं ॥ ३६ ॥ रामा

---

१ भाताची रास. २ महत्व. ३ प्रत्येक प्रहरास. ४ आरला. ५ रोमांच.

कृष्णा हरि मुरारि । नाचे प्रेमें रुदन करी । त्याचे पदरज त्रिपुरारी । भाळीं धेनरी आपुलिये ॥ ३७ ॥ नारदसहित शिवगणासी । हर्षे नाचतसे कैलासीं । येवढी प्रीति शंकरासी । गीतनृत्यीं भक्ताचे ॥ ३८ ॥ एव प्रकारें गीतनृत्य । त्यक्तनिद्रालस्य असत्य । जागर करी जो कृतकृत्य । तो वैकुठपद पावे ॥ ३९ ॥ अधोगति त्या नाहीं नरा । जो अवचक चक्रधरा । पाठ्य करी तरी पामरा । आत्मनाश निश्चयें ॥ ४० ॥ कळिभुजगदष्ट जरी । हरिवासरीं निद्रा करी । तो नष्टला ये ससारीं । त्याचे जीवित अघुन ॥ ४१ ॥ जो नृत्यगीतीं हरिदिनीसी । जागरकरी देवापासीं । तो होय वैकुठवासी । पूर्वजासी नान्यथा ॥ ४२ ॥ मति प्रेरी हरिजागरणीं । जागरा जावें येसी प्राणी । तो साठीसहस्र वर्षे धरणी । सेवी श्वेतद्वीपीची ॥ ४३ ॥ हरिजागरणाप्रति जाता । पदरज पडती जे तत्वता । तितुकीं वर्षे सहस्रें रमता । स्वर्गी वसे जागरणें ॥ ४४ ॥ यांकारणें गृह साडूनि । जावें आइकों हरिकीर्तनीं । मडप करी जो सुमनीं । येकादशी द्वादशी ॥४५॥ प्रतिपुष्पीं अश्वमेध । येवढें पुण्य हो अगाध । निमिषीं कोटितीर्थ शुद्ध । फळ भावे जागरणें ॥ ४६ ॥ प्रात काळीं द्वादशींत । नित्यनेमपूर्वक हरीतें । पयस्नान पचामृतें । हरिदिनीसी पूर्वदिनीं ॥ ४७ ॥ मी अज्ञान तिमिराधता । एणें व्रतें तू भगवता । होयीं प्रसन्न ज्ञानदाता । हे प्रार्थना करावी ॥ ४८ ॥ यानतरें ब्रह्मभोजन । यथाशक्त्या सपादून । स्वयें पारणें स्वजन–। सहित मानें करावें ॥ ४९ ॥ पतित पाखडी नास्तिक । अवगुणवत जितुके लोक । त्यासी बोलो नये येक । मौन बरवें सुव्रता ॥ ५० ॥ दोषेंवीण कोण कुळ । भूमि धुता नव्हे निर्मळ । मानभग हा केवळ । ह्मणौनि मौन चि बरवें ॥ ५१ ॥ एणें प्रकारें उपवास । विधिवत् करील व्रतास । परम सिद्धी होय त्यास । परमेश्वरप्रसादें ॥५२॥ नाहीं गगेसम तीर्थ । मातेसमान गुरू यथार्थ । विष्णुसम देव समर्थ । न अनशनाहूनि तप ॥ ५३ ॥ नाहीं सत्यासमान धर्म । नाहीं शास्त्र

१ मिरवी २ निःसीम, प्रामाणिक ३ ल्याडी.

वेदासम । ज्ञानासमान लाभ परम । शांतिपरतें सुख नाहीं ॥ ५४ ॥ नाहीं येकादशीऐसें । व्रत एके चि उपवासें । ह्मणोनिया सुविश्वासें । सकळिकीं हि करावें ॥ ५५ ॥ या सकळाची जीवनकळा । नाम रामाचें अवलीळा । स्मरणें तरणें भवाब्धिजळा । कष्टेवीण कलियुगीं ॥ ५६ ॥ नाम स्मरता निरंतर । होती विधिनिषेध किंकर । जे का परम भयकर । भुवनत्रयीं प्रसिद्ध ॥ ५७ ॥ कोण्हाची हि न वदे वाणी । साधनीं विधिनिषेध अग्रगणी । ते ये हरिनामस्मरणीं । किंकर झाले स्मर्तुचे ॥ ५८ ॥ धन्य धन्य ते वैखरी । रामनामातें उच्चारी । ते तारका येसारीं । श्रवणमात्रें जड जीवा ॥ ५९ ॥ अत्र चित्र[1] आख्यायिका । ए हरिदिनीची आइका । श्रवणमात्रें फळदायका । जें अनुपम्य पुण्याचें ॥ ६० ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामीरामदासकृते । एकादशीमहिमान वर्णन नाम प्रकरण षोडश समाप्त ॥

---

॥ श्रीराम ॥

नमो रामा दासवरदा । कदाचित्प्रमादें एकदा । भजनाभास[2] घडता दुर्मदा । देसी वैकुंठपदवी तू ॥ १ ॥ आह्मी कळीनें मळीनें । तूसी शरणागतें दीनें । तुझिया कृपेच्या महिमानें । तुझी प्राप्ति इच्छितों ॥ २ ॥ आह्मा इतुकी चि आधार । आह्मी पतित हा निर्धार । परी तू पतितपावन थोर । येणें धैर्य वाटलें ॥ ३[3] ॥ आह्मी स्वधर्मी भ्रष्टलों । अब्रह्मण्य जीविकें ज्यालों । पुढें जें जें आचरलों । तो तो धर्म अधर्मे ॥ ४ ॥ याचें नाम दभाचार । ज्याचा जाच परम घोर । आता आह्मा कैंचि थार । तुजवाचूनि भगवता ॥ ५ ॥ तुझी हि भक्ति विधिपूर्वक । आह्मा न टके जी सकळिक । तुझें नाम स्मरों एक । कामातुर कुटुंबी ॥ ६ ॥ तुझा ऐसा आज्ञाक्रम । स्वधर्में भक्ति सप्रेम । स्वाचाराचा उरला भ्रम । कैंचें प्रेम अनन्य ॥ ७ ॥ तथापि तुझा कृपाभर । सहज घडता नामोच्चार । नसता सद्भाव आदर । अजामेळादि तरले ॥८॥ तो स्मरला

---

१ विचित्र. २ भजनाचा देखावा, सादृश्य किंवा नक्कल ३ जाचें

अंतकाळीं । पुढतीं न पडे पापमेळीं । तरी हरिनामस्मरण जाळी । पापबुद्धि पापेंसीं ॥९॥ एकदां हरिनामघोष । जाळी ब्रह्मांडींचे दोष । करितां पात्रे स्वसंतोष । तऱ्हीं महिमा अविनाश ॥ १० ॥ बाहे उभारूनि श्रीहरि । ह्मणे मज स्मरे जो वैखरी । मुकुंद जनार्दन नरहरी । जीत असतां अविकळ ॥११॥ तो अंतीं होतां विकळ । मी तरी आहे कीं अविकळ । त्याचा करूनियां सांभाळ । वैकुंठासी नेईन ॥१२॥ एवढा नामाचा प्रतिपक्ष । श्रीहरि करितसे प्रत्यक्ष । आह्मां इतुकें आहे लक्ष । नामस्मरणें तरणें हो ॥१३॥ आतां नामीं वैसो प्रेमा[१] । ह्मणौनि कीजे व्रतनेमा । तरी ये येकादशीचा महिमा । परिसा हरीचें आवडतें ॥ १४ ॥ परिसा हरिदिनीची प्रौढी । वैकुंठीं उभारे गुढी । अनायासें प्राप्ति गाढी । बृहत्कीर्ति[३] पावला ॥१५॥ गाळव नामा मुनिशार्दूळ । दिव्य तेजें अति तेजाळ । जैसें सुखद रविमंडळ । तपोनिधि सत्यव्रत ॥ १६ ॥ आश्रुनि नर्मदेचें तीर । आश्रम परम मनोहर । सदां फळ पुष्प तरुवर । वल्ली लता आकीर्ण[४] ॥ १७ ॥ रुपि सिद्ध चारण गंधर्व । यक्ष विद्याधरादि सर्व । सेविती आश्रम तो अपूर्व । कंदें मुळें फळपूर्ण ॥१८॥ ते गाळवा निवासस्थळ । तेथें वसतसे चिरकाळ । तयासी सुपुत्र सुशीळ । भद्रशीळ कुळदीप ॥ १९ ॥ गाळवाचें फळलें तप । व्यक्त जालें पुत्ररूप । वंशावळी जे अमूप । धन्य जाली त्याचेन ॥ २० ॥ जातिस्मरण अभ्यंतरीं । अभिनव बाळक्रीडा करी । कोमळ लुळीत उत्तरीं । ह्मणे हरि कृष्ण गोविंदा ॥ २१ ॥ विष्णु जिष्णु जळजनयना[६] । नीरजनाथा[७] उरगशयना[८] । कमळावल्लभ खगवाहना । पतितपावन परमेशा ॥ २२ ॥ खेळामाजीं विष्णुमूर्ति । मृन्मय करूनि पुजी स्फूर्ति । बाळकमेळें वर्णी कीर्ति । भक्तिकरां प्रबोधी ॥ २३ ॥ निमिष निमिषार्द्ध केवळ । एकादशी व्रतसीळ । नमन पूजनीं प्रेमळ । तन्मय केलीं बाळकें ॥ २४ ॥ करी श्रीहरीची प्रार्थना । करी कल्याण

---

१ बाहु. २ परिपूर्ण, ब्रह्मानंदपूर्ण. ३ मोठी कीर्ति. ४ परिपूर्ण, भरलेलें. ५ अडखळत. ६ कमलनेत्रा. ७ ज्याच्या नाभीपासून कमल उत्पन्न झालें असा विष्णु. ८ शेषशयना.

सकळ जना । यैस्या देखोनिया क्रीडना । विस्मय करी गालव ॥ २५ ॥ कडिये घेतला उचलून । प्रीत्या दिधलें आलिंगन । धन्य वदन तें चुंबुन । हर्षे पुसता जाला ॥ २६ ॥ ह्मणे बाळा भद्रसीळा । कोमळ सुकुमारा वेल्हाळा । खेळामाजीं अभिनव लीळा । भगवद्भक्ति करितोसी ॥ २७ ॥ हरिसंस्मरण हरिपूजन । हृदयीं श्रीहरीचें ध्यान । एकादशीव्रतमहिमान । भूतकृपा सुशांति ॥ २८ ॥ चरित मंगळ परम शुभ । जें योगियांदिकां दुर्लभ । जन्मांतरस्मरणें सुलभ । तुज कैसें जालें सांगपां ॥ २९ ॥ आइकोनि पितयाचें वचन । परमाल्हादें हास्यवदन । भद्रसीळ स्वआख्यान । स्वयें सांगता जाला ॥३०॥ महिमा हरीचा आइक ताता । महाभागा पुण्यवंता । जातिस्मरें स्मरे आतां । प्रेमें यमें जें कथिले ॥ ३१ ॥ गालव परम सावधान । सांगे सुपुत्रनिधान । परमेश्वरीं तन्मय मन । तया पितयापुत्राचें ॥ ३२ ॥ पूर्व जन्मीं मी विख्यात । राजा सोमवंशोद्भूत । धर्मकीर्ति नामांकित । शिक्षित दत्तात्रेयाचा ॥ ३३ ॥ नवसहस्र वर्षे क्षिती । म्यां पाळिली यथास्थिति । अधर्म धर्म बहुता रीतीं । बहुसाळ म्यां केले ॥ ३४ ॥ मग मी लक्ष्मीचिया मदें । पापी प्रवर्तलों उन्मादें । पापाडजनसंगसवादें । पूर्व पुण्य भस्मलें ॥ ३५ ॥ पाषांडबोधें बोधलों । वेदमार्गभ्रष्ट जालों । यज्ञकर्म तजूनि ठेलों । दुन्हाविलों कीर्तीनें ॥ ३६ ॥ लक्ष्मीतिमिरें अंध जाला । कैंचीं सन्मार्ग तयाला । धर्म स्थापी मना आला । तो नाइके सताचें ॥ ३७ ॥ राजा जालों मी अधर्मी । मम प्रजा हि चळल्या कर्मी । कोणीं वारावें कुकर्मी । समुदायाच्या दुष्कृता ॥ ३८ ॥ जनपदपाप ते पडशें । माझा शरीरीं प्रवेशे । ऐसा पूर्ण पापकोशें । जालों पापभूपाळ ॥ ३९ ॥ कोण्हे एके काळवेळीं । गेलों सेनेसीं व्याहळीं । वनीं प्रवेशलों विशाळीं । बहु श्वापदें मारिलीं ॥ ४० ॥ क्षुधाक्रांत तृषाक्रांत । प्रवृद्धतापविक्रांत । रेवातीरा आलों श्रांत । सर्व सेने चुकोनी ॥ ४१ ॥ स्नान केलें तापशमना । लंघन घडलें चुकोनि सेना । तंव तत्तीरस्था सजना । एकादशी

१ क्रीडेकरितां. २ भर दोन प्रहरच्या उन्हाच्या तापानें तळमळत असतां.

ते दिवसीं ॥ ४२ ॥ रात्रीं[1] जाला सुसमाज । तेथें राहणें घडलें मज । पीडलों क्षुदेनें सहज । निराहारें जागरण ॥ ४३ ॥ डोळा न लगे श्रमास्तव । मज नव्हता भगवद्भाव । सत्संग प्रमादास्तव । कैंचा विधि विधान ॥ ४४ ॥ कैंची दशमी आणि द्वादशी । कैंची पूजा भगवंतासी । केवळ लंघन एकादशी । पडलें घडलें अघटित ॥४५॥ होतों श्रमलों मी बहुत । क्षुधातृषापरिपीडित । निद्रा नेणें चरफडित । प्रातः मृत्यु पातला ॥४६॥ आले यमाचे किंकर । दंष्ट्रा कराळ भयंकर । पाशबंधन दृढतर । करूनि धरूनि चालिले ॥४७॥ मार्ग परम तो दुर्गम । ताता कवणा सांगों श्रम । क्रूररूप जाला यम । पुसे चित्रगुप्तासी ॥४८॥ पाशबद्ध मृगपाडस । व्याघ्र गुरगुरी तयास । तैसें देखिलें यमास । चित्रगुप्तासी पूसतां ॥ ४९ ॥ सांग याच्या आचरणा । यथातथ्य विचक्षणा । चिरें विचार करूनि क्षणां । मग तो बोलता जाला ॥ ५० ॥ हा पातकियांमाजीं थोर । एकी एकादशी सार । सहज घडली निराहार । तेणें जाला निष्पाप ॥ ५१ ॥ रम्य नर्मदेचा तीरीं । एकादशी निराहारीं । पीडे करी परि जागरीं । कैंची उरी पातकां ॥ ५२ ॥ बहु जन्मार्जित बहुवसें । पापें जळतीं एके दिवसें । एकादशीच्या उपवासें । निराहारें केवळ ॥ ५३ ॥ सर्व पापमुक्त जाला । विशेष हरिप्रियत्वा आला । श्रीहरि न विसंभे तयाला । सत्य सेवकअभिमानी ॥५४॥ आइकोनि चित्रगुप्तबोली । यमधर्मासी लगवग जाली । भेंद्राखालें[2] उडी घातली । मज भयकंप सुटला ॥५५॥ तंव तो शांत अति विनीत । नमन केलें दंडवत । मज पूजिलें यथोचित । मग बोले स्वदूतांसी ॥ ५६ ॥ आइका माझें सत्यवचन । धर्मपरायण जे जन । विष्णुभक्त जे सज्जन । एकादशीव्रतनिष्ठ ॥ ५७ ॥ तुह्मी तयासी नातळावें । जयासी पुजी मी सद्भावें । तयासी ध्यावें अभिवंदावें । तरी च सौख्य पावाल ॥ ५८ ॥ ज्याचे मुखीं हरीचें नामें । राम कृष्ण विष्णु प्रेमें । हरि केशवा श्रीपति नेमें । नृसिंह विक्रम वामन ॥ ५९ ॥ नंदनंदना कंसारि । पूतनाशोषक दनुजारि[3] । पतितपावन साह्यकारी ।

---

१ पुष्कळ वेळ, २ रेड्यावरून खालीं, ३ दानवांतक.

मधुकुशमुरनरकांतका ॥ ६० ॥ कर्पूरगौरा गिरिजावरा । भालचंद्रा गंगाधरा । पंचवदना परमेश्वरा । मृड महेशा ईशान ॥ ६१ ॥ भवहर शंकर सदाशिवा । मृत्युंजय जय महादेवा । पशुपति दिग्पति पतिदेवा । दीनानाथा श्रीकंठा ॥६२॥ येसी हरिहर नामावळी । जे जपतात सर्वकाळीं । दुरूनि तेजा ते तत्काळीं । शांत सुसीळ धर्मज्ञ ॥ ६३ ॥ सत्पात्रदाननिरत । सत्सेवक सत्यव्रत । सद्गुरूसेवक अनन्यभूत । पुण्यरूप ते सांडावे ॥६४॥ सत्संगतिलोलुप अखंड । हरिकथाप्रिय नी पाखंड । त्रिपुंड्र आणि ऊर्ध्व पुंड्र । भस्म शंख चक्रांक ॥६५॥ हरिहरासी अभेदबुद्धि । ते तुह्मी सांडा हो विशुद्धि । भेद करिती ते पापधी । बांधोनि आणा निःशंक ॥६६॥ वर्ण अथवा वर्णेतर । शंखचक्रांकित जे नर । रामकृष्णस्मरणपर । सांडूनि आणा दुष्टांते ॥ ६७ ॥ मातापितयासी निष्ठुरता । लोकद्वेषी द्विजअहिता । देवस्वलोभनिरता । सज्जनद्विषा आणावें ॥ ६८ ॥ एकादशीव्रतविमुखा । परापवादातें सन्मुखा । उग्रा उत्तमनिंदक दुःखा । दाखउनिया आणावें ॥ ६९ ॥ जे विष्णुभक्तिविहीन । न करिती नारायणा नमन । नेणती देवालया गमन । ते आणावे बांधोनी ॥ ७० ॥ विप्रधनलुब्ध बांधोनी । वेगीं आणा मम शासनीं । उक्त गुणान्य अवगणनीं । ताडित आणा निर्भयें ॥ ७१ ॥ येसें यमधर्मा बोलता । दूत परिसती निश्चळता । मज बहु जाली अनुतापता । तेणें निष्कर्म[1] जालों ॥ ७२ ॥ इतुके जालियानंतर । ताता नवल जालें थोर । हरिसारुप्य तेजाकार । सहस्त्रसूर्यसम जालों ॥ ७३ ॥ मज प्रणम्य यमें केलें । दूता प्रत्ययासी आलें । काळें मजलागीं पुजिलें । तव पातलें विमान ॥ ७४ ॥ मग मी बैसोनिया विमानीं । गेलों वैकुंठभुवनीं । सुरवर वर्षती सुमनीं । जयजयकार अवरीं ॥७५॥ ताता तें सुख सांगों काय । माझे हृदयीं न समाय । वसलों वैकुंठीं सुखमय । कल्प सहस्त्र शत कोटि ॥ ७६ ॥ विमान कोटि सुसहित । सर्व भोगसमन्वित । वसोनी वैकुंठीं विख्यात । इंद्रलोकासी आलों ॥७७॥ तेथें हि भोगाढ्य जालों । सर्व

1 पापरहित.

देवीं अभिवंदिलों । तावत्काळ स्वर्गीं वसलों । मग मी आलों भूमीसी ॥७८॥ येथें तुजसारिखा पिता । माता परम पतिव्रता । जातिस्मरणें जाणे ताता । हें तत्वतां सर्व हि ॥ ७९ ॥ याकारणें हरिपूजन । हरिस्मरणीं माझें मन । मज आवडे श्रीहरिदिन । एकादशी सर्वदा ॥ ८० ॥ पूर्वीं नेणें मी हरिदिनी । भाव नव्हता मज लंघनीं । अकल्पित आलें घडोनी । त्याचा महिमा येवढा ॥ ८१ ॥ भावें यथोक्त करी त्याचा । महिमा न वर्णवे वाचा । तुवां पुसिलें जें तयाचा । अभिप्राय तो ऐसा ॥ ८२ ॥ याकारणें जी जनका । एकादशी सर्व लोकां । कर्तव्य मोक्षकांक्षका । अहरह हरीचें पूजन ॥ ८३ ॥ एकादशी करी प्रति पक्षीं । त्याचा लक्ष्मीपति प्रतिपक्षी । येथें प्रतिपाळुनिया रक्षी । अतीं नेतु वैकुंठा ॥८४॥ जो हें नित्य परिसे पढे । हरि अथवा हरिभक्तापुढें । तो वैकुंठपदवी चढे । परमानंददायक ॥ ८५ ॥ रूपात्मक आहे नाम । रूप नामाचें स्वधाम । नामें रूपें अवघा राम । दासप्रेम तन्मय ॥ ८६ ॥ विष्णुस्मरणाचा हा अर्थ । नाम ह्मणौनि समर्थ । केवळ उचारें कृतार्थ । सर्व धर्मबाह्य हि ॥ ८७॥ अच्युतनामें नाहीं च्युति । नलगे साधन वित्पैत्ति । नलगे साहित्य संपत्ति । रामकृष्ण ह्मणतां हो ॥ ८८ ॥ अवचट घडलें भद्रसीळा । तैसें चि रजकीसी अवलीळा । जेथूनि रुक्मांगद भूपाळा । प्राप्त तें चि परिसावें ॥ ८९ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामीरामदासकृते । एकादशी महिमान । भद्रसीळोपाख्यान । वर्णनंनाम सप्तदश प्रकरणं । समाप्तं ॥ १७ ॥

---

॥ श्रीराम ॥

नमो रामा अंतरात्मया । तूं चाळक सकळेंद्रियां । जाणे पंचविषया प्राणियां । तुझिया सत्ता शाश्वता ॥ १ ॥ निर्विकार जें स्फुरण । तयाचें हि तूं कारण । ज्यास्तव शब्दउच्चारण । नाना अर्थ कवळूनि ॥ २ ॥

---

१ रात्रंदिवस. २ व्युत्पत्ति.

सेखीं स्वरवर्णार्द्धशत । ते तों अक्षर नामांकित । पदार्थनामें न क्षरत । सर्व गुफोनि मोकळें ॥ ३ ॥ तैसा तू परमात्मारम । तुझिया सत्ता इंद्रियग्राम । चाले तुजवीण नाहीं नेम । परंतु या सकळातीत ॥ ४ ॥ येसिया तुजलागीं जाणता । तया तुज नाहीं भिनता । जो ये प्रपंचीं हि वर्ततां । या भवजाळावेगळा ॥ ५ ॥ आतां वेगळें आगळें । नीतूवीण स्वयें सगळें । जरी तत्वतां अवेगळें । तरि का भिन्नां का भ्यावें ॥ ६ ॥ विभक्तांभा चि अविभक्त । तरी तूं देव आह्मी भक्त । या अनुभवें महामुक्त । दशमभक्तया भजताति ॥ ७ ॥ तुझिये कीर्तीचें वर्णन । केवीं करूं शके दीन । ज्याचें मन कळीनें मळिन । एक मुख तें हि मूर्ख ॥८॥ चतुर्मुखायुपीं चतुर । कोटिवक्त्र हरितत्पर । यैसे दाहा सहस्र पार । न पवती हरिगुण वर्णितां ॥ ९ ॥ येसें आहे हो केवळ । न चले वित्पत्तीचे बळ । तरी कां आह्मी मुखदुर्बळ । भेवों देवो वर्णितां ॥ १० ॥ आवघीं रूपें आणि नामें । एका भगवंताचीं नेमे । आह्मी चुकलों तऱ्ही प्रेमें । यावेगळें तों न पडो ॥ ११ ॥ बाळकवदनींची वैखरी । नेणे शब्दाची कुसरी । परी उल्लेख जो अंतरीं । जाणे जननी सतोषें ॥ १२ ॥ वेदीं शास्त्रीं आणि पुराणीं । स्तविला आहे चक्रपाणी । तें चि वदिजे विचक्षणीं । शेखीं ह्मणती वदवेना ॥ १३ ॥ तैसी अवित्पन्ना दीना । न ये रचना जगज्जीवना । त्यासी हि पावसी मधुसूदना । ह्मणऊनि करुणाकर हरि तू ॥ १४ ॥ हें चि करुणेचें कारण । येथोक्त भजने न पवे कोण । केवळ करिता नामस्मरण । चतुरा मूर्खा सम देसी ॥ १५ ॥ येणें अभयें निर्भर वाणी । पावन करितां निर्भरवाणी । श्रोते परिसा निर्भरें वाणी । नाहीं परमानंदासी ॥ १६ ॥ आइका एकादशीची ख्याति । भुवनत्रयीं जे विख्याति । श्रवणें महादोष जाती । करिता लाभे कैवल्य ॥ १७ ॥ दिनकरवंशीं अळंकार । रुक्मांगद जो राजेश्वर । पुण्यें पराक्रमें थोर । अयोध्यापति

१ अ स्वरापासून ळ व्यंजनापर्यंत एकदर ५० होतात. २ विभक्तपणाचें सादृश्य. ३ प्रकरण ६ ओंवी ११ यांत सांगितलेली उत्तमोत्तमा भक्ति, तिनें. ४ उत्साहवान. ५ वाचा ६ अतिशय किंवा पूर्णपणानें. ७ उत्सुकपणानें. ८ घाण, तोटा. ९ सूर्यवंशी.

प्रसिद्ध ॥ १७ ॥ कोण्ही एके काळवेळीं । इंद्रसभेचे मंडळीं । स्तविली सुमनवनस्थळीं । राया रुक्मांगदाचीं ॥ १८ ॥ मग ते इंद्राचे फुलारी । बैसोनियां विमानावरी । येऊनि रजनीचिये भरीं । सुमनें नेती स्वर्गासी ॥ १९ ॥ जाति मालती सेमती । बकुळी चंपक मघमघीती । मोगर पारजातक याति । आदिकरूनि सर्व हि ॥२०॥ सुगंध सुरंग अति सुचित्र । घ्राणा नयनातें विचित्र । मृत्युलोकींची पवित्र । स्वर्गपदवी पावलीं ॥२१॥ महिमा सुमनाचा अपार । विपयीं निववि‌ले मधुकर । संगें करूनियां किंकर । देव धरिती मस्तकीं ॥ २२ ॥ प्रातःकाळीं पाहाती माळी । पुष्परहिता वृक्षावोळी । मार्ग न दिसे महीतळीं । भोंवत्या पौळी पांगोरे ॥ २३ ॥ वनंकर सांगती भूपति । रात्रौ जातिपुष्पयाति । हरिती धरितां न दिसे क्षितीं । ऐसें नवल होतसे ॥ २४ ॥ अहो ये अयोध्येमाझारीं । कोण्ही दान नांगिकारी । पुष्पचोरी स्तेयासरी । धैर्याश्रियें जागती ॥२५॥ सुमनविमानीं सुरमाळी । जात होते अंतराळीं । पापधुमाची काजळी । स्पर्शे जाला अधपात ॥ २६ ॥ ते चि स्थळींचिया वांगियां । होत्या उपटूनि टाकिलिया । त्या जाळिती तापावया । तेणें धूमें हें केलें ॥ २७ ॥ पापरूपाची संगति । स्वर्गस्थासी ऐसी स्थिति । अधस्थातें कैंची गति । दुष्टसंग वर्जावा ॥ २८ ॥ विमानेंसीं देवदूत । भूमीं पडले खळखळीत । प्रभा नगरावरी फांकत । राजा समाजें आला ॥ २९ ॥ महींद्र तयांतें पुसत । तुह्मी कवणाचे हो दूत । येरीं कथिला हा वृत्तांत । आह्मी इंद्राचे माळी ॥ ३० ॥ राजा ह्मणे करणें काय । विमान कैसें स्वर्गा जाय । कांहीं सांगावा उपाय । मग ते बोलते जाले ॥ ३१ ॥ एकादशीचा जो व्रती । त्याच्या स्पर्शे उर्ध्व गति । मग तो हो कां भलती याति । दुसरा विचार नाहीं ॥ ३२ ॥ राजा पुसे परमादरें । विनीत निरुत्तर परिवारें । दूत सांगती निर्धारें । एकादशीची कथा ॥ ३३ ॥ कुशमुर दोघे सोहोदर । ब्रह्मवंशोद्भव दुर्दर ।

---

१ माळी. २ अवार. ३ पांगारा=झाडमुळ्यांचा बारीक बारीक मुळे. ४ हरण करणारा. ५ चोर शोधून काढण्याकरितां.

कुश मारिलियां मुरासुर । करी कैवार बंधूचा ॥ ३४ ॥ क्रोधें आरक्त लोचन । गर्जे प्रळयमवस्वन । पाचारिला मधुसूदन । परमावेशें करू- नियां ॥ ३५ ॥ दोघा माडली झुझारी । मुरासुर वज्रशरीरी । रोम न तुटे चक्रधारीं । कौमोदकी कुंठित ॥ ३६॥ आगीं न फुटती बाणधारा । एकमेका हाणती सैरा । ते पेटले परम वैरा । वळ राहिलें शस्त्राचें ॥३७॥ मल्लयुद्ध करिती घोर । मुष्टिप्रहर भयकर । दुमदुमित धरणी अंबर । सिंहनादें गर्जती ॥ ३८ ॥ एकमेका आणिती तळा । मुर नाटोपे हो घननीळा । देव कापती चळचळा । विष्णु जिष्णु पळतसे ॥ ३९ ॥ दैत्य लागला पाठीसी । ह्मणे हरि उभा कोठें जासी । येरू मेरुदरकुं- टीसी । परमें श्रमें निजेला ॥ ४० ॥ दैत्य सवें चि पातला । हाणावया सिद्ध जाला । तेथें नवलाव वर्तला । प्रभुताशक्ति प्रगटली ॥ ४१ ॥ हरीच्या शरीरापासोनी । दिव्य प्रगटली कामिनी । दैत्य भुललासे देखोनी । ह्मणे तू वरी मजलागीं ॥ ४२ ॥ मग ते शखचक्रधरा । ह्मणे मजसी जुंझ सैरा । जिंतिसी तरी करीन वरा । नाहीं तरी मुक्ति परणी ॥४३॥ मग त्या माडला सग्राम । अतुळ दोहींचा विक्रम । देव पाहाती परा- क्रम । अतरिक्ष विमानीं ॥ ४४ ॥ मदनबाणीं तो आसुर । चित्तीं जालासे जर्जर । वेष वनितेचा सुदर । मन नयन वेधिले ॥ ४५ ॥ अर्थपरमार्थविजया । वनितोत्रिसी आली जया । तो तत्काळ पावे क्षया । काय होये वरपंगे ॥ ४६ ॥ असों अकरावे दिवसीं । सहा- रिलें पितृशत्रूसी । हर्ष जाला सुरवरासी । पुष्पवृष्टि करिताती ॥४७॥ सुर दुंदुभि मगळ तुरीं । अबर गर्जे जयजयकारीं । सतोषलासे श्रीहरि । कुमारिकेसी वर देत ॥ ४८ ॥ विजयो अकरावे दिवसीं । तुझें नाम येकादशी । तुझिये दिनीं जो उपवासी । तो वैकुंठ पावेल ॥ ४९ ॥ त्याच्या पुण्याची गणना । न करवे हो शतानना । धन्य धन्य त्रिभुवना ।

---

१ विष्णु. २ मेरुपर्वताच्या एका गुहेंत. ३ तू मला जिंकिलें नाहींस तर मग मुक्तीशीं लग्न लाव. ४ स्त्रीरूपी विग्रहदेवता. ५ आपला पिता जो विष्णु त्याच्या शत्रुस ह्मणजे मुरदैत्यास.

एकादशीव्रतपर ॥ ५० ॥ स्वयें सांगतसे वनमाळी । व्रत हें करावें सकळीं । स्वर्गीं भूतळीं पाताळीं । परमानंददायक ॥५१॥ आज्ञा करू-नियां सकळां । देव पातले स्वस्थळा । तो दिनकाळीचा भूपाळा । पाहे कोण्ही उपवासी ॥ ५२ ॥ नगरीं पिटिती डांगोरा । हो कां नारी अ-थवा नरा । कोण्हेंमिसें माजीं नगरा । लंघन पडलें सांगावें ॥ ५३ ॥ तंव ते रजकाची कामिनी । रोगें उपवासी तद्दिनीं । ते आणिली पा-चारूनि । जिचा स्पर्श हों नये ॥५४॥ इच्या स्पर्शें ऊर्ध्व गति । इचें लंघन शोकस्थिति । विधीतें पुसतसे भूपति । दूतीं सर्व सांगितलें ॥५५॥ कौतुक पाहातसें नगर । विमानीं ठावितां चि कर । तंव तें वोळगलें अंबर । जयजयकार हरिनामें ॥ ५६ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदास-कृते । एकादशीमहिमाने । रुक्मांगदोपाख्याने । सुमनविमानगमनं नाम अष्टादशं प्रकरणं समाप्तं ॥ १८ ॥

---

॥ श्रीराम ॥

नमो रामा राजीवनयना । रमावर उरगेश्वरशयना । नमोस्तुते वरदा जगद्यना । दनुजांतका सेवकपाळा ॥ १ ॥ प्रमादलवनीं हरि-दिनीं । नीच स्त्रीस्पर्श विमानी । होतां उपमलें गगनीं । केवढा महिमा व्रताचा ॥ २ ॥ देखोनि सद्यचमत्कार । वेधलें रायाचें अंतर । जाला व्रतासी तत्पर । नेणें पामर कळीचा ॥ ३ ॥ चतुर चमत्कारें स्वल्पें । मूढ द्रवेना अकल्पें । भगवद्वाक्यें मानी अल्पें । कीटकतुल्य वैभवें ॥ ४ ॥ धन्य धन्य त्याचें सीळ । धन्य धन्य त्याचें कुळ । धन्य धन्य त्याचें स्थळ । जो हरिभक्तिस्पृहाळु ॥ ५ ॥ दशमी उगवल्या दिन दि-नकरा । सहित सकळा हि नगरा । संपादूनिया सदाचारा । आले श्रीवि-ष्णुभुवना ॥ ६ ॥ सुगंधसिंचन रंगमाळा । षोडशउपचारीं सोहळा ।

---

१ त्या दिवसाचा म्हणजे एकादशीचा. २ विधिविधानाबद्दल. ३ प्राप्त झालें. ४ सर्पांचा राजा जो शेष त्यावर शयन करणारा. ५ उडालें. ६ हरिभक्तीची इच्छा आहे ज्याला.

पूजा करूनिया घननीळा । पुराणपठण हरिकथा ॥ ७ ॥ नगरीं पिटिती डांगोरा । आजि दशमी हो अवधारा । एकाशन भूशयन करा । ब्रह्मचर्य नेमस्थ ॥ ८ ॥ उदक आहे निराहार । अश्वा गजा न वाला चार । नागाप्रति यशीं प्रचार । राया रुक्मांगदाचा ॥ ९ ॥ धन्य धन्य त्याची दीक्षा । सकळा भजनाची अपेक्षा । मनापासूनिया उपेक्षा । जना अन्नाउदकाची ॥ १० ॥ धन्य शरयु पुण्यनदी । नित्यनेम यथाविधीं । सपादूनिया राजनिधि । करी हरिपूजा कीर्तन ॥ ११ ॥ रात्रो करिता हरिजागर । मंगळ वाद्याचे गजर । नामघोष जयजयकार । आरतियाची कुसरी ॥ १२ ॥ एकादशी अहोरात्रीं । स्वामी क्रमे मुहूर्तमात्रीं । श्रीमुख अवलोकिता नेत्रीं । कथा श्रोत्रीं परिसता ॥ १३ ॥ द्वादशीचे प्रातःकाळीं । मंगळ आरतिया भूपाळी । वोवाळुनिया वनमाळी । नित्यनेम सारूनि ॥ १४ ॥ पयस्नानादिक वेभवें । विष्णुपूजा करूनि भावें । ब्राह्मणभोजन स्वभावें । पारणविधि यथोक्त ॥ १५ ॥ वेदघोष श्रुतिव्याख्यान । भगवद्वार्ते हरिकीर्तन । धन्य तेथींचे सज्जन । अष्टौ वर्ग्यें वर्जिलीं ॥ १६ ॥ रात्रौ रुचिर हरिचरित । मंगळ रसिक सुललित । लक्ष्मीसहित लक्ष्मीकांत । सुमनसेजें आरति ॥ १७ ॥ यानंतर भक्तराज । वेंहुडे स्वगृहा समाज । ब्रह्मचर्यें घेती नीज । विष्णुध्यानें नेमस्थ ॥ १८ ॥ येसें करिता व्रतनिधान । पुण्यकीर्ती भरिलें गगन । शक्रयत्न चि जालें सघन । भुवनत्रय कोंदलें ॥ १९ ॥ आसन डळमळिलें इंद्राचें । अतुळ शौर्य सीळ याचें । हरण करील मम राज्याचें । ह्मणोनि रचिली मोहनी ॥ २० ॥ राजा आला पुष्पवना । सहज अवलोकी सुमना । तंव ते मदनसजीवना । तेथें प्रगट जाली ॥ २१ ॥ जेसी लावण्याची पुतळी । पुजिली दिव्याभरणजाळीं । शोभे तिणें वनस्थळीं । येसी जवळी देखिली ॥ २२ ॥ तरुणी प्रमदा सालंकृना । निकट पातली एकांता । ते तृणतुल्य ज्याचा चित्ता । तो चि धन्य कृतकृत्य ॥ २३ ॥ नृपति ह्मणे सुंदरी । माझी होइ तू चतुरी । येरी ह्मणे मम उत्तरीं ।

१ परत फिरला. २ दिव्य वस्त्राभरणांनी ३ स्त्री

धागों येसी भाप धा ॥ २४ ॥ रायें भाप दिधली करीं । हर्पें निर्भर अभ्यंतरीं । तीसी घेऊनियां बरोबरी । राजभुवनासी आला ॥ २५ ॥ अष्टभोगें तो भूपाळ । तिणें भुलविला केवळ । उमजों नेदी काळवेळ । व्रतनेमासी विसरला ॥ २६ ॥ तंव तो सुपुत्र धर्मांगद । जाणोनि पितयासी प्रमाद । करितां जाला परमानंद । हरिदिनी हे गजरेसीं ॥ २७ ॥ ऐसे गेले बहुत काळ । आला गृहांगणा भूपाळ । आइके हरिनामकल्लोळ । ते दशमीचा धांडोरा ॥ २८ ॥ मुखींचें तांबूल टाकिलें । शुद्ध चरणक्षाळण केलें । भूमिशयन आरंभिलें । प्रस्तावलें जिव्हार ॥ २९ ॥ तंव मोहनी हास्यवदना । करी विनोद अभिवंदना । ह्मणे हें काय आलें मना । चला मंचकावरी ॥ ३० ॥ तुह्मावीण न गमे मज । एकलिया न ये नीज । वचन पाळावें हें गुज । भाप आपुली आठवा ॥३१॥ राजा बुझावी सुंदरी । तिथित्रय धैर्य धरी । इतुकें माझें वचन करी । ह्मणूनि धरीं हलुवटी ॥ ३२ ॥ तिणें मांडिलें रुदन । गजबजिलें नृपभुवन । आली राणी धावोन । केलें वदन वल्लभा ॥३३॥ धरिली मोहिनी पोटेसीं । बुझावित असे तियेसी । छळूं नये वो स्वामीसी । धर्म परिसे स्त्रियांचे ॥३४॥ भर्तारासी कटाक्ष करी । ते राक्षसी होय निर्धारीं । क्रोधें प्रतिउत्तर दे तरी । होय सरमा श्रृगाळी ॥३५॥ भर्तारासी करी कष्टी । ते यातना पावे सृष्टीं । जे अवलोकी रोपदृष्टीं । ते होय काणी कुरूपा ॥ ३६ ॥ मुकी हुंकारे तत्वतां । होय वल्गुली वंचितां । ग्रामशूकरी ते स्वता । मधुर खाता पतिवीण ॥ ३७ ॥ पति सांडूनि हिंडे बाहेरी । ते उलूकी तरुकोटरीं । ताडितां ताडू इच्छी तरी । होय व्याघ्री वृषदंशिकी ॥ ३८ ॥ क्षीव दुःखी व्याधिवंत । दुर्वळ सुस्थित वा दुस्थित । तऱ्ही स्त्रियेसी पति दैवत । आज्ञा उल्लंघू नये ॥ ३९ ॥ येसी समजावी सुंदरा । परी नाइके दुराचारा । ह्मणे मी नारी कामातुरा । तुह्मी आचरा हे धर्म ॥ ४० ॥ नाना उपदेश बोलिले । परी विचलळिया काय चाले । पु-

---

१ अतःकरण. २ कुत्री. ३ कोल्ही. ४ फसवणारी. ५ घुबडी. ६ झाडाच्या ढोलींतील. ७ मांजरी. ८ विशेष रांतांत चढलेल्या मनुष्यास.

ण्यजन ते चितावले । ह्मणती करावें काय ॥४१॥ मात माजली नगरीं। विकळ सकळ नरनारी । निग्र आलें रायावरी । तू निवारी भगवंता ॥ ४२ ॥ राजा ह्मणे जो मोहिनी । भाप व्रत न टकी दोनी । यावेगळें घे मागोनी । प्राण आदि सर्व हि ॥ ४३ ॥ मग विनविली बहुतीं जनीं । त्रिवार क्षमा वाक्य मानी । मग ते मागतसे मानिनी । धर्मांगदाचें सिर ॥ ४४ ॥ आइकोनि रुपेचीं उत्तर । कैडतरले जनजिव्हारें । हृदयें उतटतीं गहिवरें । अश्रुधारा लोचनीं ॥ ४५ ॥ राणी विनवी प्राणेश्वरा । यानें सुपुत्राच्या सिरा । सत्व राखावें अवधारा । पुत्र देखो वैकुठीं ॥ ४६ ॥ स्वामी धर्मांगदावीण । कैसे राहती आमचे प्राण । मागें पुढें येक क्षण । मिळणी होईल हरिपदीं ॥४७॥ नगरीं जाला हाहाकार । कोण्ही न करी कार्यभार । कोंधाटलें महाद्वार । राजबीदीं दाटलिया ॥ ४८ ॥ उभिया बोल्ती नरनारी । आमचा प्राण नृपकेसरी । आह्मी जाऊनि बरोबरी । सृष्टि शून्य यावीण ॥४९॥ तव धर्मात्मा धर्मांगद । करी हरिकथा परमानंद । पुजिला सद्भावें गोविंद । नित्यनेमें हरिदिनीं ॥ ५० ॥ हरिप्रसाद शोभे गळा । तुळसीमंजुरीच्या माळा । भोंवता वैष्णवाचा मेळा । जयजयकारें गर्जती ॥ ५१ ॥ पित्रुनेमातें परिसोन । येरें घातलें लोटांगन । ह्मणे आजिचा धन्य दिन । ब्रह्मार्पण तनु होय ॥ ५२ ॥ हें शरीर अमंगळ । होय कृमी भस्म का मळ । रामार्पण होता मंगळ । पितुसहित हरिपदीं ॥ ५३ ॥ हरिप्रिय जातो हरिसदना । पुण्यप्रभा आली वदना । जन दाटले अभिनंदना । वोसाळती तनुमनें ॥ ५४ ॥ धर्मांगद पाहावया दृष्टीं । कोण्हा पवाड न मिळे सृष्टीं । दुरूनि करिती पुष्पवृष्टि । आले राजभुवनासी ॥ ५५ ॥ पंचरत्नें दिव्य ज्योति । ताटीं घालूनि प्राणप्रीतीं । पुत्रा वोवाळी आरती । विजयी जाला ह्मणोनी ॥ ५६ ॥ विजयी जाला माझा पुत्रु । निर्दाळिला वा भवशत्रु । परमानंदीं मातापितु । सहपरिवारें स्थापी ते ॥ ५७ ॥ येरू माथा ठेवी चरणीं । पितया

१ टिके २ मरपला ३ राजमार्गावर

गेला लोटांगणीं । विनवी जोडूनिया पाणी । आजि धन्य मम जन्म ॥ ५८ ॥ धन्य स्वामी तुमचा धर्म । धन्य जालें जी सत्कर्म । धन्य धन्य पुण्यनेम । सिद्धीं नेई शीर देई ॥ ५९ ॥ धन्य पुत्र जननी जनक। धन्य तेथींचे ते लोक । सकळा चढले ब्रह्मनीक । शोक मोहो विसरले ॥ ६० ॥ रायें कुमर शस्त्र सारें । केलें मोहिनी समोर । तव ते ह्मणे मज दे शीर । आह्मी न टळों शब्दासी ॥ ६१ ॥ शब्दभ्रष्टाहूनि विशेष । नाहीं सर्वथा सदोष । शब्द सत्यानृत्य पुरुष । पापपुण्य पावतसे ॥६२॥ पापरूपाचें लक्षण । आपण वृथा घे भूषण । पुण्यपुरुषा दे दूषण । नाना युक्ति चाळूनिया ॥ ६३ ॥ पुत्र व्रत माप राया । तुज या तिहीं-ची न सुटे माया । नगरेंसहित दुखी वाया । मी जाईन तैसी च ॥६४॥ धर्मांगद विनवी माते । तुझेनि पायें सायोज्यते । वांड वेळ जाला तूतें । वेगु करवी पितयासी ॥ ६५ ॥ सत्वश्रिया तो भूपाळ । उभा राहिला तत्काळ । खड्ग अति तिक्षण तेजाळ । करकळूनि धारा पुसिलिया ॥६६॥ हृदयीं चिंतिला श्रीहरि । सर्व हि गर्जले जयजयकारीं । मुष्टि उचलूनि अंबरीं । पुत्राकंठीं ह्मणता ॥६७ ॥ तेथे प्रगटला श्रीहरि । हस्त धरिला वरिच्या वरीं । अंबर गर्जे जयजयकारीं । पुष्पवृष्टि होतसे ॥ ६८ ॥ दिव्य गर्जती दुदुभी। नृप आलिंगी पद्मनाभीं । स्त्रीपुत्र करळिली उभीं । सात्विकभावें दाटलीं ॥ ६९ ॥ पूर्णचन्द्र एता तरीं । कोंदल्या चकोराच्या दृष्टि । हर्ष न समाय हृत्सपुष्टा । आपपर विसरलीं ॥ ७० ॥ करीत होतीं त्याचें ध्यान । तेंचि प्रगटलें निधान । जीवशिवा समाधान । तन्मय जालीं सकळिकें ॥ ७१ ॥ बाप भक्तलोभापर । भक्तकंठीं लागे धार । ह्मणौनि वोडाविलें शरीर । करुणाकर भक्ताचा ॥७२॥ देहममतेची आवडी । मायबापें ते बापुडीं । हरि जिवाचें दन्य फेडी । शाश्वत कृपा जयाची ॥ ७३ ॥ तव ते पातलीं विमानें । करिती गंधर्व गायनें । वाद्यें वाजती सुस्वरें । नृत्य करिती अप्सरा ॥ ७४ ॥

---

१ ब्रह्मतेज २ उत्तमप्रकारचें, तीक्ष्ण ३ पुष्कळ

दिव्य चतुर्भुज शरीरें । राजा राणी पुत्र परिवारें । अवघें नगर एकसरें । बैसे दिव्य विमानीं ॥७५॥ एकी वाचूनिया मोहिनी । विमानें उपमली गगनीं । वाजत घंटा दिव्य ध्वनी । दिव्य फडकत पताका ॥७६॥ लघूनि इंद्रचंद्रपदें । महोत्साहें परमानंदें । सहित सकळ हि जनपदें । विष्णुपद पावले ॥७७॥ उद्वस अयोध्येमाझारीं । मोहिनी होती चिरकाळवरी । यमदुतीं परोपरी । संतछळनें जाचिली ॥७८॥ सहित तेहतीस कोटि देव । न चले इंद्राचें वैभव । राया नाहीं वैरभाव । एकें उपवासें तरिलीं ॥ ७९ ॥ ह्मणौनि सज्जनाची जना । कोण्हा न घडावी छळना । कृपा नुपजे जनार्दना । संतछळकाची कदा ॥८०॥ ऐसा एकादशीमहिमा । नगर गेले विष्णुधामा । त्याचें श्रवणपठणीं प्रेमा । ते हि जाती हरिपदा ॥ ८१ ॥ पधरा दिनसा नारीनर । करून सर्व निराहार । ते पावती हरिमंदिर । आळस कोण्ही न करावा ॥ ८२ ॥ ज्याचा नामाच्या स्मरणें । श्रम काही च नलगे करणें । सुखें भवसागरीं तरणें । त्याचें व्रत का न करावें ॥ ८३ ॥ व्रतातपाचें मंडण । प्रेमभावें हरिस्मरण । राम कृष्ण नारायण । ह्मणता हरिसायोज्यता ॥ ८४ ॥ अन्य पुराणीं निर्धारीं । इचें नाम हरिशंकरी । तें चि परिसावें चतुरीं । हरिशंकर समदर्शी ॥ ८५ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामीरामदासकृते । एकादशी महिमाने । रुक्मागदोपाख्याने । वैकुंठाभिगमन नाम एकोनविंशति प्रकरण समाप्त ॥ १९

---

॥ श्रीराम ॥

नमो नमो मंदरमथना । नमो अर्थाश्रया शब्दकथना । नमो शब्दातीता अकथना । अप्रमेया प्रमेया ॥ १ ॥ नमो सर्व जीवसंजीवना । नमो सर्व मनोज्ञा महामना । नमो अमना अनादिनिधना । सर्वरूपा अरूपा ॥ २ ॥ नमोस्तुते सर्व वाचा वेदा । नमो सर्व सन्मुखा सारदा । समानपददा बहुविदा अविदा । नामस्मरणें केवळ ॥ ३ ॥

जया हरिशंकरसम स्वता। तिहीं परिसावें हरिशंकरीव्रता। एकादशी हे तत्वता। हरिहरात्मक जाणा ॥ ४ ॥ पूर्वी समस्तां कश्यपात्मजीं। क्षीरोद मथिला विश्वकार्जी। रत्नें काढूनि ब्रह्मांडामाजी। उवरिली शोभा ॥ ५ ॥ लक्ष्म्या शोभविलें विष्णुवामांग। अंशें अशेष हि अग-जग। शंख शार्ङ्ग वलय हस्तयुग। कौस्तुभ कंठीं झळकत ॥ ६ ॥ अमृत ऐरावत पारिजात रंभा। इहीं अमरावतीसी आणिली शोभा। निशा आळंकारली वल्लभा। चंद्राचेनि योगें ॥ ७ ॥ सप्ताननाश्वें सूर्य-रथा। शोभविलें व्योमपंथा। कामगौ शोभवी सर्वथा। वसिष्ठाश्रमासी ॥ ८ ॥ मद्य सद्योन्मादकारी। असुरां रंजवी विकारी। वैद्य प्रसिद्ध जो रोगारी। भविष्यानुसार ॥ ९ ॥ त्रयोदश रत्नें रसाळें। अंगिकारिलीं सुरासमेळें। उरलेन एकें हळाहळें। सृष्टि करपों लागली ॥ १० ॥ बापुडियें अमरगणें। कोमाइलीं मरणभेणें। दैत्यादिकें निःकारणें। उरले दोघे हरि हर ॥११॥ आद्य प्राशिलें नीळकंठें। आर्द्ध सेविलें,हो वैकुंठें। तेणें कराळें काळकुटें। विकळ जाले दोघे हि ॥१२॥ तेथें जाला हाहाकार। अनाथवाणें भ्रमती सुर। काय करिती प्रतिकार। मृत्युंजया जिष्णूसी ॥१३॥ शिव शिवत्व पावला निशीं। प्रातर्जिष्णुता विष्णूसी। देव गर्जती जयजय घोषीं। दुंदुभी तुरें वाहाटिलीं ॥१४॥ शुद्ध होता कर्पूरगौर। तो नीळकंठ जाला शंकर। शुभ्र होता शार्ङ्गधर। तो शाम सुस्मित तेथूनि ॥ १५ ॥ पूर्व दिवसीं घडलें लंघन। क्षणौनि स्थापिलें अनशन। अपरदिनीं सकळां अशन। तें चि पारणें द्वादशी ॥ १६ ॥ उपोषन जालें हरिहरादि सुरा। तेंचि आज्ञा प्रमाण चराचरा। लंघनोल्लंघन करी तया घोरा। यातना हरिहरशासनें ॥ १७ ॥ करूनि हरिशंकरीची स्थापना। सर्व देवादि गेले स्वस्थाना। आनंद जाला त्रिभुवना। हरिहरकीर्ति वर्णिती ॥ १८ ॥ तद्दिनि होता एकादश दिन। मूळ मासारंभापासून। ते ए-कादशी हें अभिधान। अपर ते च द्वादशी ॥ १९ ॥ असतां अद्वैतता सिधीसी। सहज सामरस्य संभवा वैष्णवासी। चालत्रावें स्वस्व सांप्रदा-यासी। हरिहर पूजनपूर्वक ॥ २० ॥ वैष्णवीं ऊर्ध्वपुंड्र शंखचक्रांक धा-

रण । शांभवीं त्रिपुंड्र भस्मोद्धळन रुद्राक्षाभरण । परम भागवतां दोहीं पक्षांचें अंगिकरण । ऊर्ध्व पुट्रावरी त्रिपुंड्रादि ॥ २१ ॥ एकासी बिल्व एकासी तुळसी । तत्तन्मत्र पढणें पुजेसी । इतराचार समान श्रुतीसी । तुळसीधारण वैष्णवां ॥ २२ ॥ तिथी अंतरीं पातला भेद । तरी आरंभला द्वैतवाद । पूर्वअपर विद्धाविधि अविवाद । भक्तीं करावा शक्तिता ॥ २३ ॥ देवा देवा अति प्रीति । भक्ता भक्ता हि तेच रीति । सर्वथा असावी सुस्थिति । विपरीत ते विपरीत ॥ २४ ॥ विष्णुसहस्रनामीं शिवनामें । शिवसहस्रनामीं विष्णुनामें । उभयता अ-उभय प्रेमें । परमानंदें वर्णिलीं ॥ २५ ॥ आपण आपुलिये बुद्धि । साधी एकस्याभिधान सिद्धि । तरी सहज च शमली कुबुद्धि । वाणी मुळींची वदतसे ॥ २६ ॥ शब्द एक अर्थ एक । जीवकल्पना अनर्थकारक । तरी होतां अनन्य सेवक । देवसायोज्यें तन्मयता ॥ २७ ॥ अनन्यता नसता स्वदेवीं । न पडता पडला भेदभावीं । तेथें काय येक न-व्हे जीवीं । विपरीत वासना ॥ २८ ॥ याकारणें सर्वकाळीं । स्मरावी हरिहरनामावळी । शांभवीं वैष्णवीं प्रेमसमेळीं । परमानंदप्राप्त्यर्थ ॥२९॥ शिवा शंकरा कर्पूरगौरा । गिरीशा गिरिजेशा गंगाधरा । माधवा मुरारी मधुहरा । मदनजनका मुकुंदा ॥ ३० ॥ सप्रेम स्मरे वदनें । तेणें केलीं सर्वे साधनें । त्यासी च वडलीं विधिविधानें । रामस्मरणें तत्वतां ॥३१॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । एकादशी हरिशंकरी- । महिमा वर्णननाम । प्रकरण समाप्त ॥ २० ॥

---

॥ श्रीराम ॥

कृष्णाय नमः येसें ह्मणता । अथवा कृष्णासी प्रणाम करितां । दशाश्वमेधफळ तत्वतां । विशेषपणें पावे ॥ १ ॥ दशाश्वमेधी पुण्य क्षये । पुनर्जन्म पावे कर्मान्वयें । कृष्णप्रणामीं जन्मासी नये । अजता अनाया सत्ता विशेष ॥ २ ॥ मायाप्रसारण आकर्षण । करूं जाणें ह्मणौनि कृष्णाभिधान । मायातीत नित्य निरंजन । मायाकारें अविकार ॥ ३ ॥

शब्दातीत होय तत्वतां । परी शब्दसंभवे ज्याचिया सत्ता । तरीं शब्द-रूप कोण हो आतां । दुजा योजावा हरिविणें ॥ ४ ॥ एवं हरिरूप शब्दमेळा । त्याहीमध्यें रामकृष्णादि नाममाळा । सच सुलभ असतां भवजाळां । भयभीत तो अभाग्य ॥ ५ ॥ प्रकृतिस्थें ब्रह्मांडें जितुकीं । तितुक्यांतील हि महापातकी । पै जोंही पापें न करूं शकती जितुकी । दहनशक्ति एके हरिनामीं ॥ ६ ॥ हा अर्थवाद जो ह्मणेल्हि प्राणी । तो नारकी हें प्रसिद्ध पुराणीं । एतावता तत्वतां तरी वाणीं । स्मरा सप्रेम हरिहरनामें ॥ ७ ॥ एक च वेळ हरिहरउच्चारें । कृतार्थता आहे नि-र्धारें । अजामेळादिक प्रत्यक्षाकारें । तत्काळचि तरले कि ॥ ८ ॥ दोष दग्ध होऊनि सकळ । हरिसायोज्यता पाविजे केवळ । हरि उच्चारितां एक वेळ । सेखीं अव्यय महिमा हो ॥ ९ ॥ ऐसें अनुपम्य तपोभरीं जोडलें मानुष्य वैखरीं । कैसें विसंभवे ह्मणौनि निरंतरी । जीवींचें आ-वडीं स्मरावें ॥ १० ॥ यातें स्मरावें अनुदिन । तथापि एकादशी हि हरिदिन । तरी तो एकादशी निर्णय गहन । परिसा दहन अघत्रोघा ॥ ११ ॥ परमापत्ति अथवा परमोत्साह । उल्लंघूं नये एकादशी अह । वैष्णवीं शांभवीं निःसंदेह । हरिशंकरी ह्मणौनि ॥ १२ ॥ एकीच एकादशी तरी एक च भाव । अद्वैत शांभव वैष्णव । द्वैताचा ठायीं स्वयमेव । सांप्र-दायें प्रशस्थ ॥ १३ ॥ ऊर्ध्व त्रिपुंड्रादि विविध । जेथें बोलिला जो निषेध । तो तयासी च आहे प्रबोध । दृढभक्तिकारणें ॥ १४ ॥ परंतु तेणें दुजयासि दोषदृष्टी । पाहाणें हें जघन्य सृष्टि । एकेच निर्गमते तरी दुजी गोष्टी । श्रुति करीत्या कासया ॥ १५ ॥ ह्मणौनि जें जयासी उचित । तें निंदणें हें चि अनुचित । उभय सांप्रदायीं सुनिश्चित । एकादशी करावी ॥ १६ ॥ अविद्वा एकादशीसक्त । तो जाणावा विष्णुभक्त । द्वंद्वभाव विनिर्मुक्त । रामस्मरणतत्पर ॥ १७ ॥ दशमी शेष अरुणोदयीं । वैष्णवें उपोषन करूं नये तयीं । संपूर्ण एकादशी द्वादशी

१ जे ही. २ अधमपणाचें.

वृद्धिगामिनी जयीं । तरी द्वादशीसी उपोषन त्रयोदशीसी पारणें ॥ १८ ॥ एकादशी जरी पूर्णापरतोद्वादशी । तरी एकादशी सांडुनि लंघन द्वादशीसी । बहुवाक्यें विरोधें संदेह मानसीं । सर्वथा न धरावा वैष्णवीं ॥ १९ ॥ अरुणोदयीं असतां दशमी । ते संपृक्तैकादशी नेमीं । जे मोहिनीसी दिधली स्वर्गकामी । ह्मणौनियां ते वर्जिली ॥२०॥ उदयापुर्वी त्रिघटिका । व्यापिनी एकादशी आइका । ते संदग्धैकादशी धार्मिका । वर्जिली असे सर्वथा ॥ २१ ॥ उदयापूर्वी मुहूर्तव्यापिनी । ते सयुक्तनाम हारेदिनी । वर्जावी सदा वैष्णवजनीं । हरिप्रीतीकारणें ॥ २२ ॥ लवबेध असतां दशमीचा । एकादशी त्यजावी सत्यवाचा । प्रमादें घडे तरी मुरारिबिंदुस्पर्श साचा । गंगाभद्रें सुभद्र ॥२३॥ कळार्द्धमात्र दशमी विद्धा । ते एकादशी नव्हे शुद्धा । ते एकादशीची श्रद्धा । द्वादशी त्रयोदशींसी पारणें ॥२४॥ ॥ **गरुडपुराण** ॥ अरुणोदय अथवा अर्द्ध बिंब । असतां दशमी शेषावलंब । तरी द्वादशीचें उपोषन अविलंब । पारणें त्रयोदशीचें ॥२५॥ तेणें क्रतुशताचें असे पुण्य । पुत्र संपदा पावे धन्य । सूर्योदयादारम्य सा घटिका ते अन्य । संकीर्णैकादशी वर्जावी ॥ २६ ॥ दशमीयुक्त एकादशी करी । फळश्रुति नेणोनि गांधारी । तिचे शतपुत्र नाशले संसारीं । ह्मणौनिया ते वर्जिली ॥ २७ ॥ आतां अष्टौद्वादशी वर्णिल्या विद्वज्जनीं । उन्मिळिनी वंजुळी त्रिस्पृशा पक्षवर्द्धनी । जया विजया जयति पापनाशिनी । अघांतका पुण्यदायका ॥ २८ ॥ एकादशी च संपूर्ण असे । पुनर्वृद्धीतें पावलीसे । तिचे नाम उन्मिळिनी ऐसें । दोषें धन हुताशनी ॥२९॥ द्वादशीचा उपवास द्वादशीसी च घडे । तिसी वंजुळी ऐसें नाम जोडे । जिच्या पुण्यप्रभावें विघडे । हत्या अयुत पातक ॥ ३० ॥ अरुणोदया आय सकळ दिन द्वादशी । अतीं प्रातःकाळीं पावे त्रयोदशी । ते श्रीहरीसी प्रिया द्वादशी । त्रिस्पृशानाम प्रसिद्ध ॥ ३१ ॥ कुंहूराकों वृद्धिवंता । जे पक्षवर्द्धिनी तत्वता । ते एकादशीचा उपवास स्वता । द्वादशीसी करावा ॥ ३२ ॥ पुष्य पुनर्वसुश्रवण रोहिणीयुता । ज्या ज्या

१ आमावास्या-पौर्णिमा.

द्वादशी उपोषिता । त्या सकळाश्रम फळतत्वता । पृथक पृथकाकारें ॥ ३३ ॥ उन्मिळिनी ब्रह्महत्या विनाशनी । वजुळी अयुतहत्याविध्वंशिनी चत्वारि महद्दोप प्रशोधिनी । त्रिस्पृशा सुप्रसिद्धा ॥ ३४ ॥ पक्षवर्द्धिनी अशेष कल्मषपातना । जया इहामुत्र जयकारका । विजया प्रेतत्व निर्मोक्षका । नरक निवारका जयति ॥ ३५ ॥ अष्टमी पापनाशिनी । महा पुण्यभरें बोळली हरिदिनी । विशेष शुक्र रुक्षयुक्त साडिता जनीं । करस्थ अमृत साडिलें ॥ ३६ ॥ याचीं रूपें विवेकतया । पुण्ययोगें ते जाणावि जया । श्रवणयोगें ते विजया । पुनर्वसूसी जयति ॥ ३७ ॥ पापनाशिनी रोहिणीयोगें । आणिख मतांतर प्रसगें । शुक्लेकादशी पुनर्वसुरगें । ते जया उत्तमा तिथी ॥ ३८ ॥ सशल्य हरिवासर । हठें च जे करिती नर । ते त्रैलोक्यसमय घोर । अघ पावती नान्यथा ॥ ३९ ॥ आता एकादशीसी मातृपितृश्राद्ध । ते द्वादशीसी करावें हें प्रसिद्ध । हरिदिनीसी अन्नदाता भोक्ता शुद्ध । नव्हे नाना प्रायश्चित्ती ॥ ४० ॥ एकादशी नित्यव्रत । श्राद्ध नैमित्तिक यत । नित्यानंतरें नैमित्य सुव्रत । आचरती स्वधर्मे ॥ ४१ ॥ एकादशी हे पुराणोक्त । श्राद्ध ह्मणावें शास्त्रोक्त । तरी जांनिका कोणती यथोक्त । जे येथें च लागला दुराग्रहो ॥ ४२ ॥ सूतकादि[1]प्रमादें श्राद्ध राहिलें । तें द्वादशीसी पाहिजे केलें । हें पुर्वी हि आहे चालिलें । आता का हा वृथाग्रहो॥४३॥ भक्तिआश्रयें करावें कर्म । हें कळीमाजी मुख्य धर्म । तरी एकादश्या भगवत्प्रेम । द्वादशी श्राद्ध हि साधलें ॥ ४४ ॥ निर्उन[2] तें पूर्ण विष्णुस्मरणें । त्या विष्णूसी व्रतभगें द्रोही होणें । श्राद्ध सहजच भ्रंशें अगनिगुणें । येणें दोन्ही हि नाशती ॥ ४५ ॥ याल्लागूनि शास्त्र देश काळ विचक्षणें । एकादशीचें श्राद्ध द्वादशीसी करणें । दोन्ही पक्ष सिद्ध होती येणें । पूर्वजा गति दोहीं हि ॥ ४६ ॥ द्वादशी असता अल्प । कैसा होईल श्राद्धसकल्प । येसा न धरावा विकल्प । थामथ्यान्ह शिवशानन्नात् ॥ ४७ ॥ विष्णूसी नवेद्य आधीं समर्पणें । त्यानतरें पितरासी देवासी

---

१ सूतकादि असावें असें वाटतें. २ न्यून.

अर्पणें । अक्षयीं अनंत उपतिष्टे तेणें । विपक्षें दोप बोलिले ॥ ४८ ॥ पितृशेप अर्पितां अनंता । तो जाणावा रेतदाता । पूर्वजां होती क्लेश तत्वतां । तस्माद्विष्ण्वार्पण आधीं ॥ ४९ ॥ एकादशीसी मृत ब्राह्मणक्रिया । प्रेताहुति पिंडदान तिलाञ्जुलि तया । तद्दिनीं नेदावी अपरदिनीं द्यावी जया । विष्णुभक्ति तद्विद्धि ॥ ५० ॥ तद्दिनीं मंत्रतः सर्व सार्थक। पुत्रें करावें ऊर्ध्वदेहिक । तात्पर्य हें चि जें अन्नोदक । हरिदीनीसी वर्जावें ॥ ५१ ॥ पुत्रपौत्र धनसंपदा । सर्व संतोप पावती सर्वदा । अंतीं उभय कुळेंसी परम पदा । पावे हरिजागरें हरिदिनीं ॥ ५२ ॥ हरिनामस्मरण सप्रेम । तयासी फळले सर्व हि नेम । तो च जाला संपूर्णकाम । आत्माराम हरिकृपा ॥५३॥ स्वमुखें बोले श्रीहरि । मद्दिनीं जो मज्जागरीं । मन्नामस्मरण गीत नृत्य करीं । तयासी मी ज्ञान प्रबोधीं ॥ ५४ ॥ तो उत्पन्न ज्ञानी माझें स्वरूप । तया भिन्न कैंचा भक्तत्वारोप । मी च स्वयें होऊनि तद्रूप । मन्नाम सप्रेम संस्मरे ॥ ५५ ॥ अत्र विष्णुशिवतत्व समरस । वर्णिला विष्णुव्रतविलास । आतां शिवमहिमा अति सुरस । बोलिजे सतीं परिसावा ॥ ५६ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदास कृते । एकादशी निर्णय । वर्णन नाम प्रकरणं समाप्तं ॥ २१ ॥

---

॥ श्रीराम ॥

ॐ नमः शिवाय स्वप्रकाशाय । सदा सप्रेम हृदयीं ध्याय । तो॰ शिवत्व पावे जो नाम गाय । हें काय हो अपूर्व ॥ १ ॥ यथाशक्त्या युगदेशकाळानुसार । सरक्षुनिया सदाचार । शिवनामस्मरणें नर । तर-तील च कीं ॥ २ ॥ स्मरण च नाहीं कदा शिवाचें । दुराचारें भरण दुर्भराचें । करितां शिवासारिखें आलें वाचे । सीतमीत भिल्लासी ॥३॥ तेणें शिवनामस्मरणप्रभावें । जीवघाती सुप्रभा पावे । ते आवडी आळ-वितां जीवें । काय शिवता न पाविजे ॥ ४ ॥ जे शिवप्राप्तीकारणें । योगयोगादि साधन करणें । ते लाहिजे केवळ नामस्मरणें । सुखरूप स्वगृहीं ॥ ५ ॥ ऐसें स्वतःसिद्ध सत्य असतां । आणि सज्जनीं हि सिक-

वितां । नामीं विश्वास नुपजे चित्ता । ऐसा कोण असे हो ॥ ६ ॥ आधीं च सर्व जीवप्रीय सदाशिव । तरी संतानुमोदन मार्दव । तरी शिवनामस्मरणीं सद्भाव । सदृढ जाला सभाग्या ॥ ७ ॥ आतां शंकरव्रतमहिमांभोधी । ज्याचा पार न पविजे बुद्धि । तेथें कळी कळींत अल्पधी । केवीं वर्णू शकेलि ॥ ८ ॥ तथापि भक्तप्रिय पंचानन । भावें च होय संतुष्टमान । यथाशक्त्या भक्त्या स्तवन । परिसोनि संपूर्ण सुखदाता ॥ ९ ॥ पूर्वी विष्णुव्रतें वर्णिलीं । आतां शिवव्रतें आरंभलीं । ते परिसावीं महाराष्ट्रबोलीं । प्रेमलक्षणीं विचक्षणीं ॥ १० ॥ येऱ्हवीं तन्ही प्रवीण । न सरे देशभाषेवीण । श्रोते जे कां सर्वसाधारण । ते सकळ सुखी 'व्हावे कीं ॥ ११ ॥ वाचूनि मूळ अर्थ सांगावा । तरी देशभाषा आली गौरवा । केवळ मूळश्रवणें च मानवा । अर्थावबोध नव्हे कीं ॥ १२ ॥ मूळश्रवणें पुण्य असे । हें हि देशभाषेस्तव भासे । जे देशभाषा प्रकाशक तेथें नसे । पुण्य हें काय घडों शके ॥ १३ ॥ पुण्यदायक भगवत्कथा । तद्विषयीक तो पुण्यगाथा । भगवत्कथेवीण सर्वथा । संस्कृत काय पुण्यद ॥ १४ ॥ सुवर्णाची असता खोटी । अनर्घ्यता चढलीकोटी । अळंकार करितां काय तुटी । होय मूळ मौल्याची ॥ १५ ॥ ह्मणौनि पुराणीं गायनीं । देशी संस्कृत अनन्य जनीं । सर्वथा शिवकथा पुण्यजननी । परिसा आतां शिवरात्री ॥ १६ ॥ परिसा शिवरात्रीसुव्रत । पुराणप्रसिद्ध जगविख्यात । सद्य सद्धरले पतित । श्रवणें हरती अघवोघ ॥ १७ ॥ दान धर्म तप होम । नव्हती शिवरात्रीसम । योगयागादि दुर्गम । सरी न पवेति साधनें ॥ १८ ॥ श्रवणमात्रें अघहारिणी । यमपंथनिवारिणी । भुक्तिमुक्तिप्रकारिणी । शिवपदप्रदायका ॥ १९ ॥ माघ फाल्गुन सधीसी । कृष्णपक्षीं चतुर्दशी । ते शिवरात्री पुण्यरासी । सर्व यज्ञोत्तमोत्तमा ॥ २० ॥ शिव सांगे पार्वतीसी । नसतां प्रकाश जनासी । भावेंवीण अनायासी । पावन जाला पतित ॥ २१ ॥ पूर्वी कोण्ही एके काळीं । निषाद जंतुघाती भोळीं । वसे विजनीं वनस्थळीं । गिरिसंकुळीं गृह त्याचें ॥२२॥ लोहिताक्ष कृष्णवर्ण कृष्णकंचुक

धनुष्यबाण । बद्ध गोधांगुंळी त्राण । प्राणघाती जिवाचा ॥२३॥ कृपा-विहीन तो पीनांग । धूर्त धूर्त तो मृगमार्ग । अष्टदिशा पाहे माग । ऐसा भ्रमला गिरीवने ॥२४॥ आमिषलुब्ध चिंतातुर । पापें हि न मिळे आहार । अर्चिला नाहीं ईश्वर । पापें सतापें पीडे ॥२५॥ रवि चालिला अस्तमाना । मग तो चिंतितसे मना । आता अवरोधू जीवना । मृग प्राशना येतील ॥२६॥ आजि बाळकें उपवासी । येथें वधीन श्वापदासी । उपवास्या स्वतनूसी । बिल्वजाळीं रिघाला ॥२७॥ रम्य तत्तडागतटीं । लिंगरूपीं तो धूर्जटी । भोंवतीं बिल्वतरूची दाटी । गुप्त असती दोवे हि ॥ २८ ॥ दृष्टीपुढिलें बिल्वदळें । तोडूनि टाकितसे कोमळें । ते पडताती भाग्यबळें । लिंग-मूर्ध्नि दक्षणे ॥ २९ ॥ वायु सीतळ तजळयोगें । तेणें थरथरा कंपित अगें । शिवसदश सुप्रसगे । शब्द वदनीं उमटती ॥ ३० ॥ नाहीं खावया मिळालें । म्हणौनि भोजन नाहीं जालें । लक्ष पशुहिंसा लागलें । निद्रा नाहीं नयनासीं ॥ ३१ ॥ ऐसा प्रथम प्रहर जाला । प्रहर पूजा घडली याला । शकर भोळा तो बोळला । पापजाळा जाळिले ॥ ३२ ॥ धरम स्फुरती अतःकरणीं । तव पातली चारु हरणी । पीन यौवन गर्भिणी तरुणी । जळपाना स्वाना तया ॥ ३३ ॥ मृगया निचक्षण तर्कला । बाण धनुपासी लाविला । विशाळ नयनें देखिला । कृतांत-दूत चि तो जैसा ॥ ३४ ॥ त्रुपा अतिभेणें पळाली । तुष्टिपुष्टिमा गळाली । जैसी चित्रीचीं लिहिली । पद नुचळिता बोलतसे ॥ ३५ ॥ स्थिर होई महा व्याधा । गर्भिता मी न करी बाधा । कुटुबाची न वचे क्षुधा । गर्भिणीचा अति दोष ॥ ३६ ॥ मृगी मानुपभाषिणी । मंजुळ सुरस धर्मवाणी । व्याध विस्मित अतःकरणीं । बाण काढी धनुपाचा ॥ ३७ ॥ मिळ्ला वाटतसे नवलाव । म्यां हि वधिले बहुत जीव । ऐसें वाणीचें लाघव । नाहीं पशूचें परिसिलें ॥३८॥ अज्ञात हि शिवपूजन । चातुर्थांशें अघदहन । प्रथम प्रहरें धर्मज्ञान । किं वेत जाले लुब्धका ॥३९॥ व्याध पुसतसे हरणीसी । कोणे स्थानीहूनि आलीसी । कोणे वर्षींची

---

१ धनुर्धराचें अगुस्तन. २ पुष्ट. ३ दुसऱ्या प्रतीत भृत असा पाठ आहे.

आहेसी । सर्व सांग मजपासी ॥ ४० ॥ मृगी ह्मणे व्याधवरा । रंभा इंद्राची अप्सरा । कळावती अति सुंदरा । विश्व जाणे मजलागीं ॥४१॥ सौभाग्यमद पुष्टांग । हिरण्याक्ष्य महाभाग । दानव मजसी रतसंभोग । बहुत काळ क्रमले ॥ ४२ ॥ कोण्ही एके काळवेळीं । चंद्रमौळी शैलबाळी । क्रीडत असतां सुखसंमेळीं । दिव्य पेखण मांडलें ॥ ४३ ॥ तंव मी भोगचिन्हान्विता । बहुत दिवस सेवातीता । गेलें बोळगों भगवंता । तेणें रुद्र क्षोभला ॥ ४४ ॥ रंभे गेली होतीसी कोठें । लावण्यतनुमदें गर्विष्ठे । सेवा सांडूनियां उद्धटे । दानव भीम भोगिसी ॥४५॥ तरी तूं पावसी अधोपात । मृगी होयीं या वनांत । हिरण्याक्ष्य हि उन्मत्त । मृग होईल तव भर्ता ॥ ४६ ॥ ऐसा रुद्रशाप जाला । मग म्यां गौरीश विनविला । तेणें उश्शाप दिधला । मिळयोगें उद्धार ॥४७॥ आतां तव रूपदर्शन । होतां जन्मांतरींचें ज्ञान । जालें परियेसी वचन । माझे प्राण रक्षावे ॥ ४८ ॥ आतां येथें येईल अन्या । पीत यौवन लावण्या । मृगी मांसला जे धन्या । तयेलागीं वधीं व्याधा ॥ ४९ ॥ जरी ते नयेलि भयभीता । तरी परिसें अपरकृतांता । मी येईन हो तत्वतां । शपथ माझें अवधारीं ॥५१॥ देव गुरु द्रव्यहरण । ब्रह्मस्वापहारकरण । आदि करूनि अघदारुण । ते मज होत टळलियां ॥५१॥ ऐसें आइकोनि ते क्षणीं । मुक्त केली कुरंगिणी । जळपानकृत हरणी । गेली स्वस्थानाप्रति ॥५२ तंव ते पातली दुसरी । तिची सपत्नि सुंदरी । देखे लुब्धक धनुर्धारी । भयभीता बोलतसे ॥ ५३ ॥ व्याधा न करिरे संधान । माझें परियेसी वचन । हरणी आली अत्र हनन । सांग केलें कीं नाहीं ॥ ५४ ॥ व्याध बोलतसे विस्मित । वाचा इची हि सुललित । शपथ करील तरी सकृत इसीं हि मुक्त करीन ॥ ५५ ॥ तंव तो ह्मणे वो पिनांगी । तुज दिधलें आहारालागीं । शपथ करूनियां सवेगीं । आपण गेली स्वस्थाना ॥५६॥ हरणी ह्मणे महामती । मी तरी आहें गा रुतिमती । आतां एईल माझा पती । पीन यौवन तनु त्याची ॥ ५७ ॥ तयाचेनि मांसें तुज । कुटुंबेंसीं तृप्तिभोज । जरी तो न ये तरी मी सहज । एईन शपथ करी-

तसे ॥ ५८ ॥ पति साङनिया धरीं । पर पुरुषीं जे रमे नारी । इत्यादिक पातक ये शिरीं । जरी मी न ये प्रभातें ॥५९॥ मग ते परिसोनिया बोली । चारु हरणी मुक्त केली । आपुल्या आश्रमासी गेली । भील्ल व्रिल्न जाळिके ॥ ६० ॥ मृग लक्षावया डोळा । बिल्वमजुरिका कोमळा । तोडूनि टाकी भूमडळा । गुप्तलिंगमस्तकिं ॥ ६१ ॥ ते चि द्वितिय प्रहरपूजा । सहज जाली वृषभध्वजा । तेणें हरलें पाप पूजा । पुण्यप्रकाश जाला ॥६२॥ तव तो कृष्णकाळविट । आला बहु मास उत्कट । हरणीगति लक्षीत निकट । देखे मेव भिल्लासीं ॥६३॥ तया वाटला प्राणात । ह्मणे हा भेटला कृतात । पद चाळिता वाणवात । प्राण माझा हरीळ हो ॥६४॥ हरणी दोन्ही ममागना । येथें आलिया जीवना । येणें नेलिया निदाना । ऐसें चिन्ह गमतसे ॥ ६५ ॥ हरिण पुसतसे लुब्धका । परीस वनपशुघातका । हरणी दोवी मम नायका । येथें वधिलिया तुवा ॥ ६६ ॥ भिल्ल करीतसे आश्चिर्य । ह्मणे हा मृगवेषें आर्य । मग मुचूनिया आत्मकार्य । त्यासीं बोलता जाला ॥ ६७ ॥ हरणी दोघी तवागना । करूनि गेलिया जळपाना । तुजला दिधलें मज भोजना । शपथ करूनिया गेल्या ॥ ६८ ॥ आता हरीन तुझे प्राण । करी देवाचें स्मरण । एरु ह्मणे हें प्रमाण । प्राण देईन सत्यासी ॥ ६९ ॥ परी परिवेमी प्रार्थना । रुतिमती ममागना । तीसी योजूनिया सताना । प्रात काळीं एईन ॥७०॥ रुतिमती जरी युवति । प्रजा न रची प्राणपति । तरी तो होय भ्रूणघाती । त्यासी होती यातना ॥ ७१ ॥ इत्यादिक सर्व धर्म । चालवें हें मोक्षवर्म । कदा न करावा अधर्म । शरीरसपत्ति जाता हि ॥ ७२ ॥ भिल्ल

अंतरसाक्षी आत्माराम । तो सकळांचे हृदयीं सम । भिल्ला विश्वासला नेम । मुक्त केला संतोषें ॥ ७७ ॥ हरिण आश्रमासी आला । एरु तोडी बिल्वपाला । सहज पूजा घडे त्याला । तृतिय प्रहरीं शिवाची ॥ ७८ ॥ तंव पातला प्रातःकाळ । वायु सुटला सीतळ । सीतें शिवशिवर्से विकळ । ह्मणत पाला तोडितसे ॥ ७९ ॥ चतुर्थ प्रहराचें पूजन । तया घडलेंसें न कळोन । कैचें आचमन कैचें स्नान । शंकर भोळा बोळला ॥ ८० ॥ बाळार्कायिये प्रकाशीं । जंव पाहे आश्रमासी । तंव पातली पाडसासीं । तिसरी हरणी डोळसा ॥ ८१ ॥ ऐसें सज्ज केला शार । देखोनि कडतरलें जिव्हार । वेगीं बोलतसे उत्तर । स्थिर स्थिर लुब्धका ॥ ८२ ॥ स्तनपानें जीववी बाळें । हरणीं वधूं नये कृपाळें । जरी तूं विकळ क्षुधानळें । तरी हें ठेऊनि येईन ॥ ८३ ॥ पतिवंचका जे नारी । महा पापिणी संसारीं । आदि करूनियां मजवरी । पापें पडोत जरी न ये ॥ ८४ ॥ तंव तो शिवपूजा निःपाप । प्रकाशला ज्ञानदीप । ह्मणे भेटलीं पुण्यरूप । मृगवेशें देवतें ॥ ८५ ॥ व्याधें हरणी मुक्त केली । आपुल्या स्थानाप्रति गेली । अवघी एक वाट जाली । स्मरती बोली भिल्लाची ॥ ८६ ॥ मृग ह्मणतसे हरणीसी । बुद्धि असावें वनवासीं पाहावें व्याघ्र,लुब्धकासीं । रक्षावियें पाडसें ॥ ८७ ॥ तंव त्या ह्मणती प्राणेश्वरा । तुझेन सौभाग्य सुंदरा । तुजवांचूनियां निराधारा । अनाथा ये संसारीं ॥८८॥ आह्मी येऊं निज सांगातें । पावों सौभाग्य मरणातें । सौख्यें पावोन स्वर्गातें । तुझेन पुण्यें पुनाता ॥ ८९ ॥ तंव ते बोलती पाडसें । मुदरें सकुमारें डोळसें । आह्मी येऊं नजीसें वासें । कोण पाळील आह्मासीं ॥ ९० ॥ सकळां मरणाचा निश्चय । मृग मानितसे कुळक्षय । क्षणक्षणा विकळ होय । परी सत्वासी न संडी ॥ ९१ ॥ प्राप्त असतां मरणदुःख । केवीं आठवे हो रतिसुख । हरिण स्वधर्मी सन्मुख । भ्रूणहत्येसी निरसिलें ॥ ९२ ॥ अविधि विषयाची विकृति । विधिमुक्तची महामति । तो गृहस्थपणें यति । अति निःपाप संसारीं ॥ ९३ ॥ मृग

---

१ राउतर.

धार्मिक सिरोमणी । परिवारें सत्य रक्षणीं । आला जेथें शूळपाणी । गुप्त बिल्वजाळिके ॥ ९४ ॥ करूनि नमन प्रदक्षणें । पुढें चालिलीं साहीजणें । मुदित तनुमनेंसीं क्षणें । आलीं भिल्लआश्रमा ॥ ९५ ॥ तंव तो पूर्वींच निरामिष । गेला आश्रमा निर्दोष । पतिव्रता ह्मणे अशेष । श्रम जाला जी आजी ॥ ९६ ॥ क्षुधातृषानिद्राक्रांत । शीत वात अति सचिंत । आमच्या उदरार्थ बहुत । कष्ट जाले स्वामीतें ॥ ९७ ॥ ऐसें हरणाचा वृत्तांत । निरोपिला यथाभूत । शाकाहार यथामिळित । करूनि करिती आश्चर्य ॥ ९८ ॥ तंव ते देखिलीं हरणें । कौतुक पाहातीं अवघी जणें । मृग व्याधालागीं ह्मणें । सहकुटुंबें सिणलासी ॥ ९९ ॥ आतां वधुनिया आमतें । भोजन कीजे यथोचितें । ऐसें आइकोनी भिल्लातें । अति वैराग्य प्रगटलें ॥ १०० ॥ स्वयें निंदी स्वशरीरा । नयनी अश्रूंचिया धारा । धिग्जन्म म्या या दुर्भरा । जीवहिंसा भरियेलें ॥ १०१ ॥ सत्यासाठीं सहकुटुंबें । मृग तू आलासी अविलंबें । मी मानव विग्विटंबें । महा पापें जीतसें ॥ १०२ ॥ पर· पुण्य देखोनि डोळा । नुपजे स्वदोषीं कांटाळा । वज्रचित्त पापागळा । तो जड दगडापरिस हि ॥ १०३ ॥ तैसा नव्हे हो तो व्याध । मानूनि आपुला अपराध । प्रणम्य प्रदक्षणा कृतबुध । धनुष्बाण भंगिलें ॥ १०४ ॥ तंव जाहाले जयजयकार । देवदुदुभीचा गजर । पुष्पवृष्टि करिती सुर । दिव्य विमान पातलें ॥ १०५ ॥ देवगण ह्मणती भिल्लासी । बैसे विमानीं पुण्यरासी । शिवपूजनें शिवरात्रिसी । तू नि:पाप पुण्यात्मा ॥ १०६ ॥ मृगराज सत्वरासी । यानीं बैसे परिवारेंसी । वाहोनि उत्सा- हें तयासी । दिव्य लोकाप्रतीं नेलें ॥ १०७ ॥ स्थान विख्यात उडगणीं । तिकाडें त्या तिवीं हरणीं । माथा तो मृग शिरोमणी । निकट दोन्हीं पाडसें ॥ १०८ ॥ पृष्टिभागीं तो लुब्धक । नयनीं देखती सर्व लोक । बाप कृपाळु त्रिंबक । पशुहिंसक तारिली ॥ १०९ ॥ पतितपावन बिरुदावळी । साच केली चंद्रमौळीं । त्याचें नाम प्रेममेळीं । घेतां काय नुद्धरिजे ॥ ११० ॥ अत्राक्षेप विचक्षणी । कीजे

धार्मिक सिरोमणी । परिवारें सत्य रक्षणीं । आला जेथें शूळपाणी । गुप्त विल्वजाळिके ॥ ९४ ॥ करूनि नमन प्रदक्षणें । पुढें चालिलीं साहीजणें । मुदित तनुमनेंसीं क्षणें । आलीं भिल्लआश्रमा ॥ ९५ ॥ तंव तो पूर्वींच निरामिष । गेला आश्रमा निर्दोष । पतिव्रता ह्मणे अशेष । श्रम जाला जी आजी ॥ ९६ ॥ क्षुधातृषानिद्राक्रांत । शीत वात अति सचित । आमच्या उदरार्थ बहुत । कष्ट जाले स्वामीतें ॥ ९७ ॥ ऐसें हरणाचा वृत्तांत । निरोपिला यथाभूत । शाकाहार यथामिळित । करूनि करिती आश्चिर्य ॥ ९८ ॥ तव तें देखिलीं हरणें । कौतुक पाहाती अवघी जणें । मृग व्याधालागीं ह्मणें । सहकुटुंबें सिणलासी ॥ ९९ ॥ आतां वधुनिया आमतें । भोजन कीजे यथोचितें । ऐसें आइकोनी भिल्लातें । अति वैराग्य प्रगटलें ॥ १०० ॥ स्वयें निंदी स्वशरीरा । नयनीं अश्रूचिया धारा । धिग्जन्म म्या या दुर्भरा । जीवहिंसा भरियेलें ॥ १०१ ॥ सत्यासाठीं सहकुटुंबें । मृग तू आलासी अविलंबें । मी मानव विग्विटंबें । महा पापें जीतसें ॥ १०२ ॥ पर- पुण्य देखोनि डोळां । नुपजे स्वदोषीं कांटाळा । वज्रचित्त पापागळा । तो जड दगडापरिस हि ॥ १०३ ॥ तैसा नव्हे हो तो व्याध । मानूनि आपुला अपराध । प्रणम्य प्रदक्षणा कृतबुध । धनुष्यबाण भंगिलें ॥ १०४ ॥ तव जाहाले जयजयकार । देवदुदुंभीचा गजर । पुष्पवृष्टि करिती सुर । दिव्य विमान पातलें ॥ १०५ ॥ देवगण ह्मणती भिल्लासी बैसे विमानीं पुण्यरासी । शिवपूजनें शिवरात्रिसी । तू निःपाप पुण्यात्मा ॥ १०६ ॥ मृगराज सत्वरासी । यानीं बैसे परिवारेंसी । वाहोनि उत्सा- हें तयासी । दिव्य लोकांप्रतीं नेलें ॥ १०७ ॥ स्थान विख्यात उडगणीं । तिकांडें त्या तिघी हरणीं । माया तो मृग शिरोमणी । निकट दोन्हीं पाडसें ॥ १०८ ॥ पृष्टिभागीं तो लुब्धक । नयनीं देखती सर्व लोक । बाप कृपाळु त्रिंबक । पशुहिंसक तारिलो ॥ १०९ ॥ पतितपावन विरुदावळी । साच केली चद्रमौळीं । त्याचें नाम प्रेममेळीं । घेतां काय नुद्धरिजे ॥ ११० ॥ अत्राक्षेप विचक्षणी । कोजे

श्रोतीं सुलक्षणीं। रंभा हिरण्याख्य वाणी। शिवशापें मृग हरणी ॥१११॥ विमानीं आरूढल्या तिघी। तरी त्या इतरा कवणी दोघी। हें सांगावें कथा योघीं। तारा लोकी कैसेन ॥ ११२ ॥ इंद्रलोकींच्या अप्सरा। स्वस्थाना जाव्या मुदरा। या वाचूनियां सुरेश्वरा। क्षण हि एक न गमे हो ॥ ११३ ॥ अत्र न करितां साक्षेप। सहज च आहे आक्षेप। परिसा परिहार संक्षेप। सग बाधी दुष्टाचा ॥ ११४ ॥ रंभे शापी पचमौळी। मेना तिळोत्तमा ते काळीं। सहज होतिया जवळी। त्या ससर्ग भोगिंनला ॥ ११५ ॥ याकारणे हो सत्संग। निश्च स्तविती महाभाग। धिःकारिती दुष्टयोग। समबुद्धि असतां हि ॥ ११६ ॥ तरी त्या तिघी मृगनायका। रंभा तिळोत्तमा मेनका। एकी निर्गमली आशका। आतां वास परिसावा ॥ ११७ ॥ अप्सरावीण न चले काज। अमरावतीसी हे सहज। अत्र तारालोकीं चोज। तरी हें ऐसें चि गमे ॥ ११८ ॥ अंशेंकरूनि तारागणीं। मुख्य सुरसभारगणीं। कथा त्रिचित्रा पुराणीं। बहु रुपिमत्त यथार्थ ॥ ११९ ॥ आतां जाला निःसंदेहो। शिवनामस्मरणें पाहों। मिळु धरूनि दिव्य देहो। आहे तारामंडळीं ॥ १२० ॥ अग्र परिसावी शिवकथा। कुंडलाहरणाख्य गाथा। जेणें निरशे हो भववेथा। पद पाविजे शांकर ॥ १२१ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये। रामिरामदासकृते। शिवमहिमा वर्णनं। शिवरात्रि मृगाख्यानं। समाप्तं ॥ १२२ ॥

तुझेनि होय विपयाभिराम । विश्राम तुं जीवाचा ॥ ४ ॥ तूं महिरूप महेश्वर । वाहासी सर्व जीवांचा भार । तुजवेगळी कैंची थार । चराचरासी ईश्वरा ॥ ५ ॥ करूनि दुष्टांचा संहार । सुष्ट कारिसी दुराचार । मुक्ति पावती निरंतर तुझेन हस्तें मस्त हि ॥ ६ ॥ तुझ्या हस्तकछत्रें मस्तक । शोभे जयाचा तो कौतुक । साम्राज्य सुख पावे सकाळिक भक्तिपदीं अविच्युत ॥ ७ ॥ तुझेन करसंस्थित त्रिशूळें । पडती छेदलिया कंठनाळे । ते मुक्त होती धौत कलिमळें । शिवसायोज्य पावती ॥ ८ ॥ भक्त अभक्त जन दुर्जन । सकळांचें कारिसी परिपाळण । ह्मणौनिया तूं करूणाघन । तुझा महिमा कळेना ॥ ९ ॥ तूं दुर्जन द्वेषितासी तत्वतां । तरी ते कैसें वांचते शरीरता । तुज शिवावांचूनि अशिवता । तत्काळचि पावतें ॥ १० ॥ आत्मा साडी कळेवर । तरी कैंचा हो ससार । तैसें तुंवा हें सचराचर । चाळिलें चळें ॥ ११ ॥ एतावता कृपावता । अनायासें शाश्वतदाता । अहेतुक भजनासारिखें होता । भक्त ह्मणऊनि तारसी ॥ १२ ॥ तुझिये शिवरात्रि सुदिनीं । मृगें भिल्ल वैसोनि विमानीं । नक्षत्रलोक पावली नयनीं । विश्व देखें जयातें ॥ १३ ॥ ते च शिवरात्री विचित्र । कथा पौराणकी पवित्र । कुडलाहारण स्वतंत्र । परिसा परम शाभत्र ॥ १४ ॥ परिसा व्रतराज शिवरात्रि । कुडलाहरणकथा श्रोत्रीं । जे परिसतां पुण्य श्रोत्रीं । महापातकें नाशती ॥ १५ ॥ नाथा विश्वनाथाप्रतीं । गिरिजा पुसे प्राणप्रीती । शंकर सांगे पूर्वस्थिति । कथा कुंडलाहारण ॥ १६ ॥ विदेह नगरीं राजेश्वरा । नामें सुधर्मा महा थोर । प्रजापाळक धर्मपर । सर्व हि गुणसंपन्न जो ॥ १७ ॥ नीतिवत राष्ट्रींचे लोक । नाहीं दड दोप दारिद्र शोक । पृथ्वीचे राजे मंडळिक । तया देती करभार ॥ १८ ॥ त्याची भार्या तिळोत्तमा । गुणलावण्यें मनोरमा । स्थिरयौवना निरोपमा । पतिप्रिया पतिव्रता ॥ १९ ॥ तयासी असता सुखसमेळें । बहुतकाळ लीळारोळें । एके दिवसीं कार्यमुळें । राजा आला पुसावया ॥ २० ॥ आला देखोनि

---

१ अति कौतुकानें आनदानें.

रिपुमर्दन । पुढें आली हास्यवदन । वंदूनि घाली दिव्यासन । पाद प्रक्षाळन केलें ॥ २१ ॥ तांबूल दिधलें पूर्णभावें । समीप बैसली गौरवें । राजा ह्मणतसे स्वभावें । विडा घेई सुंदरी ॥ २२ ॥ तंव ते हर्षोत्फुल्लनयना । विटके घेतां शुभानना । शिव शिव स्मरे नृपांगना । तें भुपाळें परिसिलें ॥ २३ ॥ मुखींचें टाकिलें तांबूळ । प्रस्तावलासे तत्काळ । स्मरलें जन्मांतरींचें मूळ । शिवरात्रि तदिनीं ॥ २४ ॥ मनामाजीं आजि पूजा । करीन मानीं वृषभध्वजा । अंतर नेणोनी बाह्य चोजा । राणी चित्तीं दुखवली ॥ २५ ॥ वोसावली तनुमनें । बोले पतिप्रतीं वचनें । तांबूल टाकूनियां अननें । दिसे विरस मानिला ॥ २६ ॥ तरी हें ऐसें कां जी जालें । स्वामी सत्य सांगा बोले । नाहिं तरी प्राण अपुले । तत्काळचि सांडीन ॥ २७ ॥ इचो ऌटिकी नाहीं वाणी । राजा दचके अंतःकरणीं । मग तें आश्वासी सुश्रोणी । आइकें प्रिये अपूर्व ॥ २८ ॥ तुवां स्मरला सदाशिव । मज आठवला पूर्वभव । ते मम जन्मकथा सर्व । सावधान परियेसी ॥ २९ ॥ मी वो होतों वैश्यजात । स्वधर्मनिरत शुचिस्मंत । दैवें मांडलें विपरीत । चौर्यबुद्धि वोडवली ॥ ३० ॥ चंद्रद्वेषी जैसा राहु । अंजनरूपा रात्रीं कुहु । भित्तिभेदन कुशलबाहु । वाजों नेदी पाउल ॥ ३१ ॥ छिद्रीं बांधें वोगमनिका । एवं नेदीं खोक सिंका । मंदिरीं विखरूनि वाळुका । पात्रें पात्र हरिनसें ॥ ३२ ॥ वस्तु ठेवावयाचीं स्थळें । मज विदित असती सकळें । पाळती वारीं रूपें कुटिळें । ऐसा पृथ्वी हिंडतसे ॥ ३३ ॥ तंव माझेनि दैवयोगें । अपूर्व मांडलें प्रसंगें । माघ फाल्गुन संधिभागें । शिवरात्रीचे निशीं ॥ ३४ ॥ भ्रमत असतां एके नगरीं । आर्द्र रात्र जाली पुरी । जन मीनलें शिवमंदिरीं । विभवें शांभव नरनारी ॥ ३५ ॥ तेथें राहिलों दडोनी । तव भाग्यवंत कामिनी । आलीसे ऌच्चीलागूनि । साळंकार सुंदरी ॥ ३६ ॥ झड घातली मणिकुंडला । तेणें कर्ण चि खंडला । तेथें हाहाकार जाला । मूर्छा यावूनि पळतसे ॥ ३७ ॥ चहूंकडूनि धांविनलें एकें मज

---

१ दुसऱ्या प्रतींत विकट असा पाठ आहे.

आटोपिलें । खड्गें शिर माझें छेदिलें । पडलें सकुंडल कूपीं ॥ ३८ ॥ शिवरात्रीसी लंघन जागरण । दुष्टबुध्या घडता जाण । चौर्यकर्मे घडतां मरण । जातिस्मरण राजपद ॥ ३९ ॥ तरी शिवरात्रि शिवयोगें । आजि आहे दैवयोगें । म्हणोनियां म्यां व्रतउद्योगें । तांबूल त्यक्त केलें ॥ ४० ॥ ऐसें आइकोनि प्राणप्रिया । परमानंदें वदे राया । मज हें आणावें प्रत्यया । मग चालिलीं दोघें हि ॥ ४१ ॥ चौर्यस्थाना जाऊनि भूप । खाणोनि प्रगट केला कूप । मांसरहित अस्थिरूप । शिर सकुंडल सांपडलें ॥ ४२ ॥ आश्चर्य करी राजपत्नि । जें व्रत घडतां हि निर्यत्नीं । येवढा महिमा ते प्रयत्नीं । करितां फळ तें अकळ कीं ॥ ४३ ॥ *सद्य प्रत्यय हि देखोनि । भक्ति नुपजे ज्याचें मनीं । तो* चि पाषाण ये जनीं । नव्हे पाषाण पाषाण ॥ ४४ ॥ मग ते विश्वासलिया चित्तें । राजाराणी एक व्रतें । अनन्यभावें यथाविधें । यथोक्त करिती शिवरात्रि ॥ ४५ ॥ रात्रौ जागरण पूजन । करिती अनुलंघ्य लंघन । पुराणश्रवण शिवकीर्तन । ब्रह्मभोजन दानोक्त ॥ ४६ ॥ तेणें व्रतपुण्यप्रभावें । पुत्रपौत्रीं सुखवैभवें । भोगूनि अंतीं महादेवें । दिव्य विमान प्रेरिलें ॥ ४७ ॥ दोघेंजणें ते विमानीं । बैसोनि आलीं शिवस्थानीं । पुनरावृत्ति नाहीं जनीं । एवढा महिमा प्रसिद्ध ॥ ४८ ॥ यालागीं हो ये संसारीं । जो शिवरात्रि भावें करी । सहस्त्रयज्ञफळ निर्धारीं । तो पावतसे अनयासें ॥ ४९ ॥ जो हें परिसे भक्तिप्रेमें । तो भुक्तिमुक्ति पावे नेमें । पढेलि तो सुख सर्वकामें । पावोनि पावे शिवपदा ॥ ५० ॥ सकळ क्रियेचें जिव्हार । शिवप्रेम होय साचार । ते शिवनामीं जो तत्पर । तो च स्वयें सदाशिव ॥ ५१ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिवव्रतवर्णने । शिवरात्रीकुंडीलाहरणोपाख्यानें प्रकरणम् ॥ २३ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

शिवनामस्मरणें प्रेमळ । ज्ञानेंध्यानेंवीण केवळ । शिवपद पावती[1] निर्मळ । जें देवासी दुर्लभ ॥ १ ॥ शिवनामस्मरणासम । साधन नाहीं सुखद सुगम । महिमा वर्णू न शकती निगम । शास्त्रें पुराणादिकें ॥ २ ॥ सहस्रजन्में करिता तप दान व्रतें । पाविजे शिवनाम सुप्रेमातें । तें शिवनाम प्रेमळ एकचित्तें । परिसा महिमा शिवाचा ॥ ३ ॥ शिवरात्रि कुडलाहरणाख्यान । पूर्व प्रकरणीं जालें वर्णन । आता परिसावें उद्यापन । शंभुशाभवाससवाद ॥ ४ ॥ जें आइकता सर्व हि पापें । नाशोनि जाती पुण्यप्रतापें । आचरता भक्ति साक्षेपें । भुक्तिमुक्ति परमानदें ॥५॥ माघ फाल्गुन सधीसीं । कृष्णपक्षीं चतुर्दशी । तद्दिनीं यथाविधि राहावें उपवासी । प्रतिवर्षप्रमाणें ॥ ६ ॥ अवतावे द्वादश द्विजवर । शिवभक्त सदाचार । आचार्य पत्निसहित सादर । निमत्रावा सद्भावें ॥ ७ ॥ मडप चतुरस्र द्वादश हस्तक । रम्य करावा चतुर्द्वार तोरणात्मक । दिव्याबरें पुष्पमाळा चामरादिक । सर्व हि शोभा करावी ॥ ८ ॥ समार्जन रगमाळा । सिंचावे नाना सुगध परिमळा । लिंगतोभद्र मध्यमडळा । पचरगीं रेखावें ॥ ९ ॥ द्वादश कुभ निर्मळजळपूर्ण । सर्व ओषधियुक्त सपूर्ण । रत्नयुक्त युक्तसुवर्ण । वस्त्रवेष्टित सपूज्य ॥ १० ॥ मडळा मध्यें पिठावेष्टित । प्रति दिशेसी त्रिणि त्रिणि यथोचित । धान्यावरी स्थापावें सुशोभित । द्वादशलिंग पूजना ॥ ११ ॥ अर्घ्य प्रथम द्यावें । गुर्वादिकासी पूर्णभावें । पाद्य आचमन करावें । मधुपर्कपूजन ॥ १२ ॥ मडपाचिये सन्निधीं । देशकादि पुजूनि यथाविधि । सौवर्ण प्रतिमा कृपानिधि । उमामहश योजावा ॥ १३ ॥ द्वादश माषक अथवा येक । स्वशक्तिसारिखा त्र्यबक । मध्यमडळीं न्यासपूर्वक । सर्वोपचारीं पुजावा ॥ १४ ॥ शिवसकल्पें हृदया । पुरुषसूक्तेन शिराचा ठायीं । शिखा नारायेणेति अन्वयीं । विष्णुर्डितः त्रिनेत्रीं ॥ १५ ॥ प्रतिरथेनतु कवच ।

1 दुसऱ्या प्रतींत 'पावक' असें आहे.

शतरुद्रिय अस्त्र साच । हें षडंग न्यासच । आतां आपाद मस्तक हे ॥ १६ ॥ सर्वेश पदयुगीं । पुरूप जानुभागीं । ऊग्र तो जंघासंगीं । उरुद्वयीं पशुपति ॥ १७ ॥ अघोर गुह्यस्थानीं । जगदीश्वर जघनीं । उरु क्रम उदर भानी । रुद्र हृदयीं चिंतावा ॥ १८ ॥ भुजांसी देव सर्वेश । कंठीं सद्योजात ईश । आस्य संस्थ करावा । ॥ १९ ॥ नासिकप्रदेशीं महादेव । नेत्रस्थानीं वामदेव । भ्रूवोर्मध्य भीमदेव । उमापति ललाटीं ॥ २० ॥ सर्वांगीं सर्वव्यापी महेश्वर । ऐसें देवरूप करावें शरीर । देव होऊनि देव यजावा हा निर्धार । तत्वता श्रुतिस्मृतीचा ॥ २१ ॥ देवरूप च पूज्य पूजक । देवरूप मंत्र उपचार सकळीक । हा अनन्य भजनाचा विवेक । जाणती शांभव तत्वज्ञ ॥ २२ ॥ आवाहनादि यथाविधि । पंचामृतस्नान प्रत्येकें प्रेमबुद्धि । वेदमंत्रीं शुद्धोदक स्नान बुधीं । रुद्राभिषेक करावा ॥ २३ ॥ तीर्थजळें निर्मळ । सुवासित सुगंधमेळें । बिल्वपत्रें पुष्पें फळें--। मिश्रित स्नपन करावें ॥ २४ ॥ कस्तुरिकादि मलयज दिव्य गंध । कुंकुमाक्षता रंग स्निग्ध । सुवासित सुरंग सुविकासित शुद्ध । उक्त पुष्पें समर्पावीं ॥ २५ ॥ विशेष त्रिशूळाकार कोमळें । भावें अर्पावीं बिल्वदळें । ज्याचें महिमान आगळें । शिवसंतोषकारकें ॥ २६ ॥ घृतमिश्रीत गुग्गुळ सुधूप । दशांगादि दिव्यरूप । कपिलाज्यें त्रिवृत्ति दीप । नैवेद्य अन्नें चतुर्विधें ॥ २७ ॥ लेह्य पेय चोष्य खाद्य । षडरस सुस्वाद्य । पंचामृतादि रस सद्य । भगवंतासी अर्पावें ॥ २८ ॥ उदक सुगंध सुसीतळ । शुद्धाचमन करोद्वर्त्तन तांबूळ । दिव्य फळें दिव्य चैलें वेष्टित बहुळ । दक्षणा पूर्णा पूजार्थ ॥ २९ ॥ निरांजन आरार्तिका । पुष्पांजळी त्रिपुरांतका । प्रदक्षिणा जगन्नायका । अष्टांगनमन प्रार्थना ॥ ३० ॥ मध्यमंडळीं संपूज्य कळशीं । यथोक्त पूजूनि शिवपार्वतीसी । यानंतरें द्वादश कळशीं । द्वादश नामें पूजन ॥ ३१ ॥ यथोदेशस्था सुमृत्तिकांगें । महिचौरीतिमंत्रें

---

१ ही ओवी तीन चरणांची मुळांतच आहे. २ दुसऱ्या प्रतींत प्रत्येक असें आहे.

करावीं लिंगें । पिंड शलाका पर्णाळिका अन्यगें । लिंग्य दर्शनें घनच-
वीत ॥ ३२ ॥ ते द्वादश द्वादश घटीं । पूजावीं द्वादशनामीं धूर्जटि ।
प्रीत्यर्थ तें चि कर्णपुटीं । परिसावी अनुक्रमें ॥३३॥ पूर्व दिशेचे त्रिणि
कळश । प्रथमीं पूजावा सर्वेश । द्वितीय कुंभीं पुरुष । तृतीय पशुपति
पूजावा ॥३४॥ मध्यमडळा दक्षिणदिशे त्रिणि । तये प्रथम कुंभस्थलिंगीं
उग्र शूळपाणि । द्वितीय कुंभलिंगीं घोर सुराग्रणी । तृतीयीं रुद्र पूजावा ॥३५॥
तेसि च पश्चिमें तीन कळशीं तीनीं लिंगें । ते प्रथमीं भव पूजावा भक्तिरंगें ।
द्वितीयीं सद्योजात सांगें । तृतीयीं सर्वेश सर्वभोगें पूजावा उमामहेश ॥३६॥
आता उत्तरेचें घटत्रय । ते प्रथमीं महादेव अप्रमेय । द्वितीय कळशस्थलिंगीं
वामदेव होय । तृतीयीं भीम पूजावा ॥ ३७ ॥ सर्व घटस्थ लिंगार्चनीं ।
व्याप्य षडंग रुद्रें करूनि । प्रत्येकें करावा अर्चनीं । पंचोपचार प्रत्येकें
॥ ३८ ॥ एव विध्युक्त यथापद्धति । सांग सहपरिवार सुरेशपति ।
पूजन करूनिया सुचित्तीं । रात्रीं जागरण करावें ॥ ३९ ॥ प्रतियामीं
आरार्तिका पूजा । भावें करावीया वृषभध्वजा । वाद्यें गीत नृत्य पुराण
स्तुति योजा । तोषवीजे गिरिजेश ॥ ४० ॥ प्रातःकाळीं नित्यनेमपूर्वक ।
भावें पूजावा त्र्यंबक । गृह्योक्तविधानें पावक । सुस्थंडिलीं स्थापावा
॥ ४१ ॥ तिलाज्यें ऋचा दशांशें । हवन करावें सावकाशें । अथवा
घृतप्लुतपायसें । पंचामृतें मिश्रितें ॥ ४२ ॥ समी समिधा घृतप्लुता ।
त्र्यंबकेणतु अष्टोत्तरशता । नवग्रहाहुति प्रायश्चित्ता । हुति होमाविया
॥ ४३ ॥ स्थालीपाक लोकपाळ बळी । ग्रहपूजनपूर्वक होममेळीं ।
प्रीतीं पाववीजे चंद्रार्द्धमौळी । भक्तिभावें यथाविभवें ॥ ४४ ॥ यानंतरें
आचार्य सपत्निक । पूजावा परम प्रीतिपूर्वक । वस्त्रालंकार सकळीक ।
गोवृषदानादिप्रदानें ॥ ४५ ॥ दश ब्राह्मणासी सुशय्या सोपस्कर । द्यावा
प्रीत्यर्थ परमेश्वर । अथवा एकीं तरी व्रतपर । तेणें दिधली पाहिजे ॥ ४६ ॥
द्वादश ब्राह्मणासी तिलपात्रादि दानें । करावीं सुव्रतें निराभिमानें ।
दानानंतरें ब्राह्मणभोजनें । यथारुचि तें द्यावीं ॥ ४७ ॥
सुगंधोद्वर्तन तांबूल दक्षणा । शिवस्वभावें द्यावें ब्राह्मणा । भवानिभवप्री-

सर्थे तदर्पणा । संकल्प करावा ॥ ४८ ॥ सर्वेश्वरेश्वर ईश्वर । जो अंत-रसाक्षी निरंतर । तो सांग पूजावा हा वडिवार । तदत्तसुभव विभवाचा ॥ ४९ ॥ वित्ताढ्य पाठ्य करी । तें काय नेणे त्रिपुरारि । अकिंचना किंचितें कृपा न करी । काय निष्ठुर करुणांबुधी ॥ ५० ॥ समर्थे पूजिला बहु कांचनीं । दुर्बळाची एकि कोंकिनी । दीनदयाळ समान मानी । प्रसन्न जळें बिल्वदळें ॥ ५१ ॥ एवं अनन्यभावें शिवरात्रव्रत करी । तो धन्य धन्य अति धन्य ससारीं । तो सर्व हि सुख भोगे शतवर्षवरी । पुत्र पौत्रीं हि नांदे ॥ ५२ ॥ दुःख दोष भय रोग दारिद्र । यासहित निरशलें अभद्र । अविच्युत अच्युतप्रियप्रसादें भद्र । इहामुत्र शिवभाव्यें ॥५३॥ अंतीं शिवसमीप होय शिवगण । दिव्यभोग भोगूनि यथातःकरण । सेखीं शिवप्रसादें शिवीं प्रवेषण । पुनरावृत्ति असेना ॥ ५४ ॥ हें सोपा-पन शिवरात्रिव्रत । श्रवण कीर्तन करिती भाग्यवत । ते सर्वपापनिर्मुक्त शाश्वत-। पदव पावती शांकर ॥ ५५ ॥ एकें सद्य शिवनामें केवळ । पतित उद्धरले उद्धरती तत्काळ । त्याचा महिमा गाता प्रेमळ । कैसें न पवती शिवपद ॥ ५६ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिवरात्रिव्रतवर्णने । कुडलाहरणोपाख्याने । शिवपुराणोक्तउद्यापननाम प्रकरणं ॥ २४ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो नमस्तेस्तु सोमनाथा । नमो सोमेश्वरा समर्था । नमो सोमवारव्रतें अनाथा । आत्मपदप्रदायका ॥ १ ॥ शिवरात्रिव्रतवर्णन जालें । आतां सोमवार महिमान आरंभलें । अल्पायासें असे वर्णिलें । महत्फळ जेथें ॥ २ ॥ करिता व्रताचरणी लंघन । प्राणी होताति क्लेशायमान । ह्मणौनि सदाशिव दयानिधान । निशिभोजनें च प्रसन्न ॥ ३ ॥ तरी स्वभावें हि जे संसारीं । बहु व्यवसायें कार्यभारी । ते काय नित्य निर-

---

१ कवडी २ साधन चतुष्टयांतील ह्या लोकींचें व परलोकींचें.

तरी । रात्रीवरी न राहती ॥ ४ ॥ एतावता भोळानाथ । सुखें तरावया अनाथ । सोपा उपाय विश्वनाथ । कळीं सोमवारव्रत ॥ ५ ॥ नंदिनारदे संवाद । सोमवारव्रत पुण्यद । इह वांछितकामफळद । अंतीं पद शांकर ॥ ६ ॥ श्रावण माघ अथवा फाल्गुन । चैत्र कां वैशाखापासून । प्रारंभ करावा सुदिन । सोमवारव्रताचा ॥ ७ ॥ नित्यनेम करूनि यथोचित । सदाशिवपार्वतिसहित । पूजावा सर्वोपस्कारसंयुत । यथाशक्त्या सुभक्त्यां ॥ ८ ॥ भावें पूजितां जगज्जीवना । स्वभावें च पुरे सर्व कामना । चंद्रोदयीं चकोरा जीवना । काय मागावें लागे ॥ ९ ॥ मागावें काय समर्थाप्रतीं । हें जीवा न कळे वित्पत्ति । ह्मणौनि न मागतां दे संपूर्णस्थिति । न दे तरी कृपा हे नव्हे ॥ १० ॥ जो न मागतां दे संपूर्णकाम । तयासी कासया करावा नेम । जनें भजावें हेंचि परम । तथापि कामिकां कामद ॥ ११ ॥ स्थावरलिंग विप्र प्रतिष्टित । अथवा जें देवतार्चनांत । ज्योतिर्लिंगपुराणविख्यात । भाग्ययोगें पाविजे ॥ १२ ॥ पंचामृतादि रुद्राभिषेक । वैदिक अथवा शिवसहस्रनामात्मक । अथवा मुख्य शिवायनमः उत्तमश्लोक । प्रेमें नेमें पूजावा ॥ १३ ॥ दिव्यांबरें दिव्यगंधे । दिव्यपुष्पे नानाविधें । दशांग धूपगुग्गुळघृतसमद्धे । कपिलाज्य दीप प्रदीप्त ॥ १४ ॥ षड्रस चतुर्विधें अन्ने । नैवेद्य समर्पावा स्पन्नें । नारिकेळादि नानाफळें गहनें । वस्त्रयुक्त अर्पावीं ॥ १५ ॥ त्रयोदशगुणाचें तांबूळ । रत्ननिष्क हिरण्य दक्षिणा बहुळ । बहु प्राप्त्यर्थ अर्पावीं ॥ १६ ॥ रत्नदीप कर्पूरनिरांजन । मंत्रपुष्पांजळी संपूर्ण । नमन प्रदक्षणा स्तवन । करावें भावें शांभवें ॥ १७ ॥ नमो भवाय भवनाशाय । नमो उग्राय उग्रविनाशाय । नमो शर्वाय शशिशेखराय । महादेवाय नमोनमः ॥ १८ ॥ नमो नीळकंठा सदाशिवा । नमो रुद्रा ईशानदेवा । भवभयापहारक वैभवा । सर्वकामप्रदायका ॥ १९ ॥ ऐसें करूनिया नमन सप्रेम । अपराध क्षमा प्रार्थूनि पुरुषोत्तम । तव नामस्मरणें परम । निऊन संपूर्ण परमेशा ॥ २० ॥ प्रथम पूजूं बैसतां सदाशिव । शिवरूप कल्पावा

१ ही हि ओवी तीन चरणाची आहे.

जीव । न्यास ह्मणिजे तजूनि अंगभाव । महादेव तेथें चिंतावा ॥२१॥ पदद्वयीं परमेश्वर । गुल्फद्वयीं शंकर । जंघाद्वयीं शिव सर्वेश्वर । शुळपाणि जानुद्वयीं ॥ २२ ॥ उरूद्वयीं जगत्प्रभु । गुह्येस्थानीं स्वयंभु । कटिस्थानीं शंभु । विभु नाभिमंडळीं ॥ २३ ॥ उदरीं सर्वकर्ता । पार्श्वे लोकभर्ता । स्थाणुह्रदयीं स्तवनद्वयीं वार्ता । हरकंठी नीळकंठ तो ॥ २४ ॥ मुखीं श्रीकंठ नेत्रीं त्रिनेत्र । श्रोत्रस्थानीं पंचवक्त्र । ललाटीं भाळचंद्र शिरीं कळत्र । हिमालयात्मजेचा ॥ २५ ॥ सर्वेश्वर सर्वांगीं । देहो शिवरूप भावूनि जगीं । आत्मा सदाशिव योगीं । प्रसिद्धच वर्णिजे ॥ २६ ॥ एवं न्यासध्यानपूर्वक । यथाशक्त्या पूजावा अवंचक । दुर्बळा दयाळ त्र्यंबक । भावें च पावे स्वभावें ॥ २७ ॥ केवळ जळ आणि बिल्वदळ । यत्किंचित्ते पदार्थ अलुमाळ । तेणें च संतुष्ट तत्काळ । विधिसंपूर्ण शिवनामें ॥ २८ ॥ ब्रह्मचर्य एकभुक्त । निःस्नेह सदाशिव भक्त । श्मश्रु अभ्यांगादिव्यक्त । जो हें व्रत करील ॥ २९ ॥ स्वशक्त्या समर्थ दुर्बळ । तया अनन्या सारिखे च फळ । सुप्रसन्न गिरिजा गोक्षीरफेनधवळ । अतूळ दाता देतसे ॥ ३० ॥ सोमवारव्रतप्रतापें । एकवासर साक्षेपें । सप्तजन्मार्जितें पापें । भस्म होऊनि जाती ॥ ३१ ॥ एक मास आचरे भावें । तरी अभाग्य हि भाग्य पावे । निपुत्रिका पुत्र पुण्यप्रभावें । स्त्रीहीना स्त्री मनोरमा ॥ ३२ ॥ जो जो इच्छिल सुखसोहळा । तो तो पावेल अवलीळा । तयाचिये गृहीं अचळा । कमळा राहेलि सर्वदा ॥ ३३ ॥ अश्वमेधसहस्राचें फळ । निश्चयें पावे अविचळ । येथें सर्व सुख भोगूनि चिरकाळ । अंतीं शिवपद विमानें ॥ ३४ ॥ अजन्मवरीं जो करी । त्याचा महिमा न वर्णवे वैखरी । निःकामता अभ्यतरीं । तो सदाशिवच स्वयें ॥ ३५ ॥ आतां उद्यापन परिसावें । जये मासीं हें व्रत घ्यावें । तये च मासीं करावें । भक्तिपूर्वक शिवार्चन ॥ ३६ ॥ दिव्य मडंप मनोहर । चतुर्द्वार शोभाकर । संमार्जनें रंगमाळिका मखर । तोरणें दीपमाळिका ॥ ३७ ॥ मध्यें लिंगतोभद्र यंत्र । पंचरंगें रंगित विचित्र । तेथें पयपूर्ण कुंभ सु-

कवच- । वेष्टित प्रतिष्ठावा ॥ ३८ ॥ शर्करापूर्ण पात्रवरी । वस्त्राच्छादित स्थापावा प्रेमें करी । तेथें उमेसहित त्रिपुरारि । नंदियुक्त प्रतिष्ठावा ॥ ३९ ॥ हेम राजत अथवा ताम्रमय । यथाशक्त्या सदाशिव अव्यय । अनन्य अवचकता तेथें काय । प्रतिक्षणीं सागावे ॥ ४० ॥ यथोक्तप्रकारें षोडशोपचार । पचामृतादि सर्वोपस्कार । भावें पूजावा भवानीशकर । न्यासपूर्वक अभिषेकें ॥ ४१ ॥ पुष्पांजळी जालियानतर । स्वगृह्योक्तविधानें वैश्वानर । स्थंडिलीं प्रतिष्ठोनि अष्टोत्तर- । शत आहुति होमाविया ॥ ४२ ॥ यव व्रीह्य तिलाहुति । हवानिया पृपदाज्यप्लुति । पूर्णभावें पूर्णाहुति । होम संपूर्ण करावा ॥ ४३ ॥ यानंतरें आचार्यार्चन । यथापूर्ति दक्षणा भरण वमन । तैसें च शुद्ध श्वेतवर्ण गोदान । यथोचित्त करावें ॥ ४४ ॥ सवझ तरुणी शांत । वस्त्रदक्षणाभरणयुत । पयस्विनी कांस्यपात्र समन्वित । मत्रसंकल्पें अर्पावी ॥ ४५ ॥ धेनु तूं जगत्रयमाता। नित्य विष्णुपदसंस्थिता । सवछा या मया दत्ता । येणें शिवप्रीति पावे ॥४६॥ यानतरें ब्राह्मणसंतर्पण।त्रयोदशसख्या सुप्रवीण । दक्षणांबराळंकार द्यावें पूर्ण । अथवा स्वविभवतां[१] ॥ ४७ ॥ त्रयोदश वट त्रयोदश वशपात्रें । त्रयोदश वायनें विचित्रें । नाना पक्वान्नें भक्ष्यें पवित्रें । फळ दक्षणांबरेसीं ॥ ४८ ॥ समर्पावीं संकल्पपूर्वक । यें वायनें सर्वोपस्कारात्मकें अगिकारावीं तुंवा त्र्यबकें । प्रीतीं पावे मजलागीं ॥ ४९ ॥ हे व्रत भक्ति यथाशक्ति । जें म्यां केले कृपामूर्ति । निउन तेथें असो पूर्ति । तुष्ठिया कृपा शंकरा ॥ ५० ॥ ऐसें करूनि समर्पण । स्वपत्न्या भोजन करावें आपण । ऐसें जो करील व्रताचरण । तो सर्व हि काम पावेलि ॥५१ अंतीं विमानारूढ सुव्रत । सोमलोक पावे मन्वतरशत । यानतर शिवपद शाश्वत । पुनरावृत्ति निवृत्ति ॥ ५२ ॥ हें व्रत आचरले ब्रह्मादि देवगंधर्व । यक्ष रक्ष दानव मानव पिशाचोरगादि सर्व ॥ रुपि हि सोमवारव्रत अपूर्व । आचरोनि पावले सुसिद्धि ॥ ५३ ॥ हें सोमवारव्रतरहस्य प्रेमें । वाचीं अथवा परिसे नेमें । तो सर्वपापविनिर्मुक्त पावे क्रमें ।

---

१ यथिमिथित तप.

विमानयानें शिवलोक ॥५४॥ हें सोमवारव्रत यथामति । वर्णिलें तें प्रीत्यर्थ हो पशुपति । आतां पार्थिवलिंगपूजनख्याति । परिसा प्रेमळ निश्चळ ॥ ५५ ॥ स्वति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । सोमवारव्रत वर्णनंनाम प्रकरणं ॥ समाप्तं ॥ २५ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो अरूपा अलिंगा । नमो ज्योतिरूपा ज्योतिर्लिंगा । नमो त्रिपुटितीता त्रिलिंगा । आत्मलिंगा सदाशिवा ॥ १ ॥ विवर्तरूपिणी मूळमायापिंड । अधिष्टात्रा शलाका प्रचंड । तो सर्वेश्वर आदिलिंग अखंड । वेदांत सिद्धांतें स्तविजे तो ॥ २ ॥ पचवदनें पचभूतें । त्रिनेत्रता त्रिगुणातें । दशहस्तता दशेंद्रियांतें । विषयो प्रपंच रचना हे ॥ ३ ॥ पृथ्वी पींड मेरु शलाका । ऐसीं अनत ब्रह्मांडलिंगें आइका । शलाका शांर शरीर जोडूनि हस्तका । लिंगाकार चराचर ॥ ४ ॥ भगलिंगमय जगत्रितय । तरी लिंगरूप विश्व होय । हें बाह्य शिवाकारता प्रमेय । आत्मा अप्रमेय शिव च किं ॥ ५ ॥ हें भिन्नाभासता हि अभिन्नात्मालिंग । ऐथें भक्त हि नुरे च भिन्नाग । हें दर्शन पात्रे जो विगतराग । सद्गुरु सदाशिवक्षत्रीं ॥ ६ ॥ तेणें जन्मजन्मांतरीं यथार्थ । पार्थिवलिंगपूजनें केलीं यदर्थ । ते सर्व साधनासी समर्थ । फळ निर्मळ स्वात्मता ॥ ७ ॥ तथापि तेण अनन्यभावें । सद्गुरुपार्थिवलिंग पूजावें । ए स्थितिसी एवं पिछवें । तेणें पूजावें मृल्लिंग ॥ ८ ॥ आतां वैराग्य असें च नाजना । निं तर करी मनकामना । तेणें हि मृल्लिंगमत्र महेशाना । पूजावें कामप्राप्त्यर्थ ॥९॥ तरी तो लिंगप्रकारविधि । नाना ग्रथीं च आहे ज्याची प्रसिद्धि । तथापि प्रीति विश्वासा व्हावया वृद्धि । बोलिजेत परिसावें ॥१०॥ लिंगवाशिष्टी चतुर्वर्णी । मृत्तिका उक्ता चतुर्णी । सीत पीत रक्त कृष्णा । यथाचिता देशस्थां ॥ ११ ॥ उक्त मृत्तिका नाहीं जरी । जें असाले जे देशांतरी । तेणें च पार्थिवलिंग तरी । केलें पाहिजे च किं ॥ १२ ॥ सर्वाधार धरारूप । मृत्तिका तुझें स्वरूप । लिंगार्थ प्रार्थितो

सरूप । प्रसन्न होईं मजलागीं ॥ १३ ॥ येणें मंत्रें मृत्तिका । आणावी नदी सरोवर तटाका । तृण कंटक खर्परादिका । शोधूनिया सुनिष्ठा ॥ १४ ॥ शुद्ध निर्मळें जळें । सार्द्र करावी सुसीळें । नित्यनेम करूनि त्रिपुंड्र भाळें । रुद्राक्षाभरण भूषणें ॥ १५ ॥ रुद्रजाप्य अथवा नाम-स्मरणें । प्रपस्थ लक्षणोक्त लिंग करणें । संपूर्ण फळप्राप्ति कारणें । संपूर्णभावें मानवें ॥ १६ ॥ पीठ पर्णाळिका सूत्रयुक्त । शलाका वर्तुळ यथोक्त । यथा योग्य सुंदर शिवभक्त । भावें करूं सुचित ॥ १७ ॥ सीळा पाटका दर्भावरी । वेदिका पुष्पप्रकारिकां करी । ध्यान करूनियां त्रिपुरारि । अवाहनादि पूजावा ॥ १८ ॥ पंचमुखा परमेश्वरा । त्रिनेत्रा दशभुजा शंकरा । गजव्याघ्राजिनधरा । सर्वाभरण-भूषिता ॥ १९ ॥ भस्माभ्यांग भुजंगयज्ञोपवीता । शशिखंड अनळ-गरळजळधृता । वामांकीं हिमगिरिजा साळंकृता । ऐसें सायुध सुप्र-सन्नध्यान करावें ॥ २० ॥ नमो महेश्वरा येईं कृपामूर्ति । प्रसाद करी मज भजन पूर्ति । आवाहान करावें स्फूर्ति । अनन्य मनोभावेंसीं॥२१॥ मूळमंत्रानुक्रमें । पूजन करावें प्रेमें । यथाविभव नेमें । गंधपुष्पादि बिल्वदळीं ॥ २२ ॥ धूप दीप नवेद्य फळीं । तांबूल दक्षणा निरांजन पुष्पांजळी । वस्त्रालंकारादिकिं शूळीं । पूजावा यथा स्वशक्तिता ॥२३॥ वैदिकमत्रें अथवा शिवनामें । लिंग पूजावें द्विजोत्तमें । इतरीं केवळ च नाम प्रेमें । अथवा पुराणमत्रें ॥ २४ ॥ प्रदक्षणा अभिवंदन । सप्रेम प्रणामात्मक स्तवन । अपराध क्षमा करी पंचानन । नमो नमस्तेस्तु सदाशिव ॥ २५ ॥ नमो भव शर्व पशुपति । महारुद्रा नमो मगळ-कीर्ति । नमो उग्रा त्रिनेत्रा स्वयंज्योति । पार्वतीकळत्रा नमोनमः ॥२६॥ हर महेश्वर त्रिपुरांतकर । शूळपिनाकाद्यायुधधर । शिव महादेव कर्पूरगौर । उमावर वरद नमोस्तुते ॥ २७ ॥ ऐसें नमन स्तवन करून । करावें भावें विसर्जन । ईशान सर्वविद्यानिधान । स्वधामा जाई गुणधामा ॥२८॥ कृपानिधी गुणभरितः । सवें चि येई स्मरण करितां । ऐसें प्रार्थूनि भग-वंत । लिंग जळीं कां स्थळीं गुप्त ठेवावें ॥२९॥ ऐसें भुक्तिमुक्तिदायक।

पार्थिवलिंग करितां भाविक । कामीक पावती कामकौतुक । निष्काम मोक्ष अनयासे ॥ ३० ॥ सद्यप्रत्ययकरी असतां । कामीक न करी तो वंचला स्वता । कोणे कोणे किती तत्वता । ते संख्या बोलिली असे ॥ ३१ ॥ विद्याकामें सहस्रलिंगें । धनार्थ तदर्थ प्रसंगें । पुत्रार्थी सहस्रार्धे भक्तिरंगें । कन्यार्थी तो शत त्रय ॥ ३२ ॥ वंध्या अयुत लिंगें करी । तत्काळ चि गर्भ धरी । राज्यार्थी शतसहस्र नारी । इच्छितया पंचशतें ॥ ३३ ॥ मोक्षार्थी कोटिगुणित । भूमिकामें सहस्र संख्यात । रूपार्थी त्रिसहस्र निश्चित । द्विसहस्र तीर्थार्थी ॥ ३४ ॥ जारण मारण मोहनादिकीं । संख्या बोलिलीसे प्रत्येकीं । परि हें करूं नये धार्मिकीं । शिवभक्तीं प्रेमळीं ॥ ३५ ॥ सहस्र राजभयनिवारणा । तदर्थ चोरभय नरभय भूतवारणा । महद्रोग परिहारणा । सहस्र संख्या बोलिली ॥ ३६ ॥ दारिद्र्योच्छेदार्थ सहस्र पांच । अयुत सर्व कामद साच । निउन कार्य हि निउन च । अधिके मूळ अधिकच प्रत्यवाय नाहीं ॥ ३७ ॥ प्रत्यह एकलिंग पापहारी । दोनी अर्थ सिद्धिकारी । त्रिणि करितां सर्व कामसंपूर्ण संसारीं । विधिपूर्वक अर्चितां ॥ ३८ ॥ पूर्वगणना संपूर्णविधि । सद्य केलिया कार्यसिद्धि । निःकाम लक्षलिंगें करील सुबुधि । तो शिव च स्वयें केवळ ॥ ३९ ॥ करिता पार्थिवलिंगपूजन । कोटि यज्ञफळ पावे सज्जन । शिवप्रसादें होय सद्गुरुज्ञान । ज्ञानें कृतकृत्यता ॥ ४० ॥ पूर्वी ब्रह्मादि सुरवरीं । श्री शौचि अरुंधत्यादि नारि । वशिष्ठादिरुपिआदि नरीं । सकळीं केलीं सिध्यर्थ ॥ ४१ ॥ अनायासें अनंतफळ । ह्मणौनि सादर होत सकळ । सद्यसिद्धि असतां त्रिकळ । कासया व्हावें संसारीं ॥ ४२ ॥ आतां याचें उद्यापन । अष्टमी नवमी युक्त चित्पन्न । चतुर्दशी आमायुक्त कां सोमदिन । आरद्रायोग विशेष ॥ ४३ ॥ लिंगप्रमाण सुवर्णप्रतिमा । रौप्य अथवा ताम्रमयी उत्तमा । वामांकारूढ उमा । ऐसी करावी सुभावीं ॥ ४४ ॥ मंडप करावा विध्युक्त । लिंगतोभद्र रंगोक्त । वस्त्रवेष्टित कुंभ युक्त- । पदार्थपूर्ण स्थापावा ॥ ४५ ॥

१ दहा हजार. २ स्त्रिया.

हारोहारीं दीपप्रभा। वेदिकादि सर्व शोभा। कुंभावरी प्रतिमारूप स्वयंभा। शंकरासी पूजावें ॥ ४६ ॥ प्रथम दिवसीं करावें उपोषण। सांग पंचामृतादि पूजन। जागरण गीत वाद्य नृत्य महेशान- । सुक्तस्तोत्रें तोषविजे ॥ ४७ ॥ प्रातःकाळीं नित्यनेमपूर्वक। पुनः पूजावा त्र्यंबक। मूळमंत्रें हवन यथाशक्त्या धार्मिक। करूनि करावें ब्रह्मभोजन ॥ ४८ ॥ पंचएकादशापासूनि चतुर्विंशति। लिंगसंख्ये सारिखी स्थिति। अधिकें अधिक च निष्पत्ति। होय पुण्यफळाची ॥ ४९ ॥ तिथि वार नक्षत्र मास। आरंभादि उद्यापनास। देशकाळवर्तमानें न्यास- । ध्यान पद्धती- प्रमाणें करावें ॥ ५० ॥ पूजेसहित मृल्लिंग जळीं। योजावें गीतवाद्य- घोषमेळीं। धातुप्रतिमा अथवा धातु तत्काळीं। आचार्यासीं द्यावें दक्षणांवरेंसीं ॥ ५१ ॥ गोदानपूर्वकपूजा। करावी आचार्याची बोजा। इतरा हि सकळा द्विजां। दक्षणावरीं पूजावें ॥ ५२ ॥ यानतरें पंक्तिरासीं। स्वयें भोजन करावें मौनेसीं। यथाशक्ति भक्तिभावेंसीं। वंचक तोच वंचला ॥ ५३ ॥ ऐसें सोद्यापन करी लिंगव्रत। तो चिंतिला काम पावे निश्चित। अंतीं शिवपद पावे शाश्वत। पुनरावृत्ति असेना ॥ ५४ ॥ सकळ फळ व्रतांतपाचें। शिवनामस्मरणें असें साचें। धन्य धन्य मानव भाग्याचे। जे स्मरती सदाशिवा ॥ ५५ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये। रामिरामदासकृते शिवव्रतवर्णने। पार्थिव लिंगपूजनं प्रकरण समाप्तं॥२६॥

जरी हे आइकोनि हि न रमे नर । अत्राख्यायिका अति रुचिर । परिसा सज्जन सादरें ॥ ५ ॥ ब्रह्मोत्तरखंड स्कंदपुराणीं । शौनकादि ऋषिप्रती सूतवाणी । वदे प्रश्नपूर्वक ते श्रवणीं । परिसावें भावें सात्विकीं ॥ ६ ॥ ऋषि ह्मणती सर्वज्ञ सूता । सुखी जाल्यों विष्णुकीर्ति आइकतां । आतां शिवमहिमा श्रवणीं चित्ता । अति श्रद्धा तो सांगे ॥ ७ ॥ सूत ह्मणे जी शिवमहिमा । वर्णूं न शके चतुरास्य ब्रह्मा । श्रुति पावलिया उपरमा । मी कीतीकल्पायुपें हि ॥ ८ ॥ तथापि तुमचा प्रश्नादर । तरी संक्षेपें सांगेन स्वशक्तिसार । श्रीगुरुव्यास करुणाकर । तयाचेन प्रसादें ॥ ९ ॥ सर्व हि श्रेय सर्व हि पुण्य । सर्व यज्ञीजपोज्ञ ध्यन्य । शिवषडक्षर अनन्य । भावें स्तवितीं महर्षि ॥ १० ॥ शिवपंचाक्षरीमहिमा । कोण पावों शके सामर्थ्यसीमा । ज्याचा ठाईं शिवपरमात्मा । सर्व सामर्थ्यें वसतसे ॥ ११ ॥ जो सर्वोपनिषत्सार बीज । ज्याच्या अनुष्ठानें मुनिसमाज । पावले ब्रह्म निरामय सहज । अंतर स्वप्रकाशें ॥ १२ ॥ भवपाश बद्धदेही । ॐ नमशिवाय ह्मणतां पाहीं । शिव च होय संशयो नाहीं । तप यज्ञ बहुमंत्र काय तया ॥१३॥ स्त्रीया शूद्रादिका सकळां । पंचाक्षरी मंत्र मोकळा । सर्व सिद्धिद अवें-ळीळा । षडक्षरी समान ॥ १४ ॥ दीक्षा होम संस्कार तर्पण । नलगे काळ उपदेशाविधि विवरण । शिवप्रार्थक शिवस्मरण । नमने सामरस्यता ॥१५॥ गुरु जे निर्मळ निर्मम शांत । साधु मितभाषी कामक्रोधरहित । सदाचार शुचिसंमत । जितेंद्रिय कृपाळु ॥ १६ ॥ तयापासूनि मंत्रोपदेश श्रोत्रीं । घेऊनि अनुष्ठान करावें पुण्यक्षेत्रीं । प्रयाग पुष्कर केदार सेतुबंध चित्रीं । गोकर्ण गौतमी नैमिष्यारण्यादिकीं ॥ १७ ॥ सद्य सिद्धि पावती भावें । शिवनामस्मरणप्रभावें । यदर्थी अख्यान परिसावें । रुचिरतर सुंदर ॥ १८ ॥ श्रोतयासी मंगळप्रद । जेणें पाविजे परमानंद । कथा कौतुक विनोद । महिमा महेशनामाचा ॥१९॥ मथुरानगरीं यदु श्रेष्ठ । दाशार्ह-नामें नृपविशिष्ट । युवा सुंदर सर्वज्ञ वीर वरिष्ठ । धीर गंभीर उदार ॥२०॥

---

१ व्यासाचा शिष्य २ शांति ३ सहज ४ कल्याणदायक ५ मायारहित.

काशिराज तनया वरानना । कळावतीनामें रूप गुणांगना । विवाह करूनि स्वभुवना । प्रवेशला वधूमी ॥ २१ ॥ रात्रौ संभोगार्थ प्रार्थितां । निकट न ये नववनिता । बळात्कारें च वोढितां । प्राथिती जाली पतीतें ॥२२॥ संभोगस्पर्श न करीं राया । मी व्रतस्थ आहे पुण्यजाया । बळात्कार न करावा जी इतुकिया । तें तूं हि स्वयें जाणसी ॥ २३ ॥ अप्रीता रोहिणी कांता । अंतर्वत्नी धृतव्रता । विशेष रजस्वला असतां । बळात्कार करूं नये ॥ २४ ॥ दंपतिप्रीति येकांती । यथोक्त प्रीतिवर्धन पुण्यरती । ऐसा प्रबोधितां हि नृपति । स्मरविन्हळ नावरे ॥ २५ ॥ तों च जपतपआचारविचार । ज्ञानध्यानवैराग्येंद्रियनिर्धार । जंव भेदला नाहीं शिवें शरीर । तोंचवरी हें सर्व हि ॥ २६ ॥ स्व मीसेवक राम हनुमंत । मार मारासी अजित । तत्पादास तैसें च वर्तत । तेच तरती तद्दास्यें ॥२७॥ भेदला असतां मदनबाणीं । साक्षेपें अहल्या भोगी वज्रपाणी । हे तरी तयाची येकांतीं राणी । धरिता जाला बळेंचि॥२८॥करीं धरितांच तयेला। राजहस्तक अति पोळाला । जैसा लोहपिंड तापला । सोडी भयविन्हळ ॥ २९ ॥ राजा ह्मणे वो सुंदरे । अग्निज्वाळो ज्वळे रुचिरे । ज्वाळा ऊर्मे मनोहरे । किमर्थ हें मज सांगावें ॥ ३० ॥ हास्यास्यें ह्मणे कळावती । मी पूर्वीच वर्जित होतें प्राणपति । परमाश्चिर्य तुह्मांप्रति । सांगेन आतां परिसावें ॥ ३१ ॥ मी पितृगृहीं असतां कुमारी । दुर्वासा जो अपर त्रिपुरारि । तेणें उपदेशिला मम प्रेमें करी । पंचाक्षरी शिवमंत्र ॥ ३२ ॥ तेणें अनुष्ठानें हें पुण्यशरीर । स्पर्शो न शके उन्मत्त नृपवर । तुज परस्त्रीसंगादि अनाचार । राज्यमदें घडलासे ॥ ३३ ॥ शिवस्मरणामृतें धौतपातक । अनन्यभावें गुरुसेवक । जालियावाचूनि सुखदायक । मम संग घडेना ॥ ३४ ॥ राजा ह्मणे कामातुर । तूं मज सांग तो मंत्रेश्वर । कळावती ह्मणे मज अधिकार । नाहीं तव गुरुत्वीं ॥ ३५ ॥ गर्गाचार्य महामुनी । तो समर्थ गुर्वाभिधानी । ऐसें तत्वतां निर्धारूनि । दोघें आलीं तयाप्रति ॥ ३६ ॥ राजा अति विनीत जाला । साष्टांग नम-

---

१ गर्भिणी. २ व्रतस्थ. ३ मदनचे शर. ४ हास्यमुखें करून.

स्कार केला । यथाविधिविभव पूजिला । कृतांजळी प्रार्थितु ॥ ३७ ॥
जी मी शिष्य शरणागत । राजमदें दुष्कृतकृत । शिवपंचाक्षरीमंत्रें पुनात ।
करीं करुणांभोनिधि ॥ ३८ ॥ ऐसा देखोनि परमादर । श्रीगुरु गर्ग क-
रुणाकर । कालिंदीतटीं पुण्य तरुवर । तेथें आणिला उपदेशा ॥ ३९ ॥
पूर्वदिवसीं उपोषण । नित्यनेम करूनि सध्यास्नान । पूर्वाभिमुख शिवचिं-
तन ।[1]हस्तक मस्तकीं ठेविला ॥ ४० ॥ उपदेशिला शिवनाममंत्र । तो
ह्रुदत होता च पवित्र । तेथें जालें परम विचित्र । श्रोत्रीं श्रोत्रीं परिसावें
॥ ४१ ॥ तयाचया देहापासाव अकस्मात । कावळे निघों लागले अस-
ख्यात । शतसहस्त्र लक्ष कोटिपर्यंत । ऐसें आश्चिर्य प्रासिद्ध ॥४२॥ निघती
करीत कावकाव । क्रोशायमान विराव । किंचित उडोनिया उर्ध्व ।दग्ध
होऊनि पडताती ॥ ४३ ॥ देहो नव्हे हो पादप । जवरीच वैसले उ-
डाले अपेंआप । ह्रदयीं होतें बीजरूप । शिवनामें जळत पळाले ॥४४॥
तरी ते निघावयासी कोण द्वार । बृहती हा च गर्गे निर्धार । आणि
जनवार्ता हि पूर्वापर । बृहतीवाटा कावळे ॥ ४५ ॥ असो हें ऐसें अ-
सेलि तैसें । देहापासाव तों नव्हे अनारिसें । परमाश्चिर्य देखोनि ऐसें ।
राजा पुसे ऋषीतें ॥४६॥ स्वामी हें अश्रुत अदृष्ट अपूर्व । हें काय सां-
गावें जी सर्व । हें आइकोनिया पूर्व । गर्ग समग्र सांगतु ॥४७॥ राया
तुवां जन्मजन्मांतरीं । पातकें केलीं होतीं कोटिवरी । तें सूक्ष्मरूपें होतीं
अंतरीं । शिवनामानळें जळालीं ॥ ४८ ॥ काकरूपें प्रगटावया कारण ।
शिवनाम जगत्रयतारण । हें प्रगट व्हावया प्रत्यक्ष प्रमाण । दाखविलें
सामर्थ्ये ॥ ४९ ॥ तैसेचि महापुण्य होतें वरोवरी । तेणें प्राप्त उत्तम
जन्मीं शिवपंचाक्षरी । आतां ये मुद्रेसीं सुख भोगी संसारीं । अंतीं प्राप्त
शिवलोक ॥ ५० ॥ रायें दंडवत नमस्कार केला । गुरुआज्ञा घेऊनि
निघाला । परमानंदें नगरासी आला । रात्रं कांतालिंगिता ॥ ५१ ॥
जैसी अमृताची पुतळी । तैसी सुखदा ह्रदयकमळीं । जैसें सर्पविष उ-
तरतां दशस्थळीं । सीतळ लागे जळपात्र ॥ ५२ ॥ ऐसा देखोनि सच

---

१ वृक्ष.

चमत्कार । ह्मणे धन्य धन्य तो स्वामी सद्गुरु । माझा मजपासीं च असतां सुखसागरु । मज प्राप्त नव्हतां कीं ॥५३ ॥ अनुपम्य गुरुकृपा-प्रसाद । विषयानंदें परमानंद । ऐसिया समर्थाचे चरणारविंद । जीवें-भावें न विसंभे ॥ ५४ ॥ मग तो परमपुण्य पावोनि भाव । ध्याय गुरु तोच सदाशिव ।[1]ऐसा धरूनि दृढ सभाव । बहुकाळ राज्य भोगिले ॥ ५५ ॥ शिवनामप्रभावें अंतीं । दंपति आलि शिवपदाप्रति । पुढें परिसावे महंतीं । महिमान सदाशिवाचें ॥ ५६ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिवमाहिमावर्णनं । शिवनाम प्रकरणम् ॥२७॥

---

॥ श्रीराम ॥

श्रीमहादेवा अभिवंदन । जो परमपतितजनपावन । भक्त्या अभक्त्या होतां पूजन । बिल्वपत्रमात्रें हि ॥ १ ॥ विचित्र शिवकथा परिसा आतां । गौतम गोकर्णीहूनि जाता । कोण्ही एके देशीं मध्यान्ह सविता । उष्ण जालें अतिभरें ॥ २ ॥ तंव देखिले सरोवर निर्मळ । जळरपर्पे जाला सुसीतळ । तेथें नवपल्लवी वट विशाळ । छायेसि बैसला नायेक ॥३॥ पाहे तंव दूरि चांडाळी । केवळ उष्णामाजीं तळमळी । वृद्धा उघडी अंधळी । हातपाय खोडी चरफडी ॥ ४ ॥ गळितकुष्ट कृमीचे उमाळे पूय रुधिर थवथवा गळे । दुर्गंध मक्षिका मूत्रमळें । सदिंया आर्दतवदना ॥ ५ ॥ पथीं चिरकुटें शतकुटें कटीं । वेष्टित पडली प्राणसंकटीं । क्षुधातृषाक्रांता अवरोध कंटीं । मरणोन्मुखी अर्धचंद्राक्षि ॥ ६ ॥ करुणार्द्रचित्तें ऋषिनिर्मळ । ह्मणे प्राणी माहापापें पीडे बहुळ । तंव उजळलें अंतराळ । आच्छादूनि रविरश्मि ॥ ७ ॥ उतरलें दिव्य विमान । चत्वारि शिवदूत देदिप्यमान । *आयुधाभरणी प्रसन्नवदन ।* देखोनि मुनि विस्मित ॥ ८ ॥ मग नमनस्तवनकृतविनित । ऋषि शिवगणासी पूसत । तत्वता सांगावा वृत्तांत । विमानायोग्य कोण प्राणी तंव ते बोलती हास्यमुख । चांडाळी हे मरणोन्मुख । इसीं न्यावया पंचमुख । प्रेरितां

---

[1] लिडविडलेली.

जाला आह्मासी ॥ १० ॥ परमाश्चिये गणांप्रती । ह्मणे हे महापापिणी घोराकृति । कैसी विमानारूढ न्याल शिवलोकाप्रती । शुनी जैसी यज्ञ-मंडपा ॥ ११ ॥ इचीये छायेचिया विटाळा । करितां कुश्चिळासी ये । कंटाळा । जीवपुण्य लक्षावें डोळां । तरी ते तनुता दिसतसे ॥ १२ ॥ पूर्वजन्मीं पापरूपा । तरी पावली पापस्वरूपा । नेणे व्रत दान जप तपा महा पातक दरकुटी ॥ १३ ॥ पशुमासाशन मद्यपान अति निद्य ही-नाहूनि हीन । अकळ शंकराचें महिमान । कृपा ने पापी शिवपदा ॥ १४ ॥ ऐसें आईकोनी ते शांकर । ह्मणती सत्य शिव करुणाकर । तिचे जन्मांतरदोप सविस्तर । स्वमुखें हि सांगितले ॥ १५ ॥ हे सर्व दोपदुखभाजनचांडाळी । मातापिता निमाली स्वकाळीं । वधुवर्गी तजिली सकळी । क्षुधातृपाक्रांता विलुंपे ॥ १६ ॥ मग हातीं धरूनियां काठी । ग्रामें नगरें फिरे पोटासाठीं । चांडाळो-च्छिष्टादिकें दरकुटीं । नित्यानित्य भारितसे ॥ १७ ॥ ऐसे क्रमले किती काळ । भोगितां भोगितां पातकफळ । पापी चिरायुपि न मरे तत्काळ । दुःख भोगिलें पाहिजे ॥ १८ ॥ ऐसें असतां पातली जरा । शक्ति कैंचे अस्थिपंजरा । वोचिरी कैंची चावील निंबरा । टुकड्या चांडाळ चर्मासी ॥ १९ ॥ तंत्र एके नगरीं असतां तिसीं । समीप आलिया शि-वनिशी । गोकर्ण महाबळेश्वरासी । जनयात्रा चालिली ॥ २० ॥ चां-डाळ करावलंबें करी । आपण हि चालिली बरोबरी । वसनाशन पोट-भरी । मिळेलि ह्मणऊनियां ॥ २१ ॥ शनीःशैनि पावळी तेथें । महा-यात्रा भरली जेथें । पुण्यवंत बहुता पथें । बहुदेशस्थ मिळाले ॥ २२ ॥ बाळ तरुण आणि वृद्ध । नरनारी पुण्यप्रसिद्ध । श्रीमंत मध्यम साधारण त्रिविध । भजती अनन्यभावें ॥ २३ ॥ महावैभवें महापूजा । भावें क-रिती वृपभध्वजा । दुर्बळाचेन बिल्वदळेंच महाराजा । महादेव संतोपे ॥ २४ ॥ रुद्राभिषेक दीपमाळा । पंचामृतें स्नपन दयाळा । दिव्योप-

---

१ कुत्री. २ शोन्, विलापकरी. ३ जुनी, चिवट. ४ शनैः शनैः

चारपूजा देखोनि प्रेमळा । प्रेमाश्रुयेती पुलकांकं॥ २५ ॥ कोण्ही गाती कोण्ही नाचती । कोण्ही ताळतालिकावीणेवाती । कोण्ही क्षणक्षणा गर्जती । हरहर महादेव ह्मणोनी ॥ २६ ॥ अन्नवस्त्रादि सर्व दानें । सर्व हि कारिती विशुद्धमनें । तेथें अंध चांडाळी दीनवदनें । मागता हि न मिळे ॥ २७ ॥ करुणाभार्पी ह्मणे मी पापरूपा । अंध अनाथ करा कृपा । अशन द्यावें वापा । परी तें नव्हे संप्राप्त ॥ २८ ॥ कोण्ही गुंतले देवतार्चना । कोण्ही ह्मणती आइको नये वेदस्वना । कोण्ही ह्मणती आजि उपोषना । नेणसी होई पुढारी ॥ २९ ॥ ऐसी सर्व हि यात्रा हिंडतां । अन्नवस्त्र न पवे चि तत्वतां । दिधलियावांचूनि भगवंता । केंवि पाविजे साहसें ॥ ३० ॥ अन्नवस्त्रेंविण जीव । विटंवती कारितां भव । तो जाणावा प्रादुर्भाव । अदत्तें दोषाचा ॥ ३१ ॥ काकुळती अंजुळी करीं । तंव एके विप्रकुमारें बिल्वमंजुरी । क्रीडतां टाकिली भीतरीं । तेणें जाली अति दुखी ॥ ३२ ॥ हें काय खावें किं नेसो ह्मणोनि रडे । ढवाळी काय मी वापुडें । ह्मणोनि जिवाचिया चरफडे । आफळूनिया टाकिली ॥ ३३ ॥ ते दैवगतीकरीं । पडली येका लिंगावरी । रात्रौ चरफडी निराहारी । निद्रा कैंची क्षुधातुरा ॥ ३४ ॥ मग जालिया अति निराशा । तेथूनिया चालिली आणिका देशा । हृदयीं न माय क्षुधापिपाशा । चालतां पडे पदोपदीं ॥ ३५ ॥ ते हे चांडाळी स्वकर्म भोगितां । भोळानाथ वोळला कारुण्यता । ह्मणे इनें बिल्वपत्र वाहिलें नेणतां । लंघन केलें शिवनिशीं ॥ ३६ ॥ इसी दिव्यदेहि करूनि । आणा वैसऊनि दिव्य विमानीं । ते शिवआज्ञेकरूनि । आलों आह्मी न्यावया ॥ ३७ ॥ ऐसें आइकोनियां ऋषिगौतम । शिवमहिमानें सप्रेम । परमाश्चिर्यें तो सत्तम । पाहात राहिला कौतुक ॥ ३८ ॥ तव तयेची जीवकळा । तयेसी मांडले सोहळा । आकर्पूनिया वेळा । केली दिव्य आकृति ॥ ३९ ॥ जैसी मंगळमूर्ति देवता । दिव्यांबराळंकारीं शुतिस्मंता । नाना दिव्यपताकाचामरविजिता ।

१ रोमांचित. २ कृपण. ३ घट.

शिवगणामाजी मध्यस्थानीं ॥ ४१ ॥ वाजती दिव्य मगळ तुरें । हर-हर महादेव ह्मणती गजरें । विमान ऊर्ध्व चालिलें एकसरें । ऋषि देखता आकाशीं ॥ ४१ ॥ आश्चिर्य कीजे लोकपाळीं । विमानीं वाहिली चाडाळी । एकें बिल्वदळें चद्रमोळी । प्रसन्न जाला पापिणी ॥ ४२ ॥ धन्य धन्य शंकरमहिमा । धन्य धन्य बिल्वगरिमा । धन्य धन्य पुरुषाधमा । ज्याचें हृदय द्रवेना ॥ ४३ ॥ बिल्वदळ अर्पिता सदाशिवा । कष्ट तो नव्हती कि याचया जीवा । नलगे नित्त विद्याभ्यास करावा । निर्मोलें बिल्वदळ सुप्राप्य ॥ ४४ ॥ ज्याचेन अनकळित अर्चने करी । पापचाडाळी दिव्य विमानावरी । ते हि जातिस्मरे भीताश्चिर्य करी । हे सत्य किं स्वप्न देखतसें ॥ ४६ ॥ मी चाडाळी माहापापिणी मज आठवे माझी करणी । म्या बिल्वदळ[1] टाकिले धरणीं । लिंग मी देखो कास्यानें ॥ ४६ ॥ बाप कृपाळाकपाळकरा । मज अनाथासी आणिलें माहेरा । हृदयीं ध्यात गौरिजाशकरा । शिवशिव मुखें ह्मणतसे ॥ ४७ ॥ मग विमान स्थिर केलें द्वारीं । शिवसुवना नेलें भीतरीं । सप्रेम साष्टाग नमस्कार करी । शिव कृपाळी मस्तक ॥ ४८ ॥ ऐसी पावली शिव-लोक । जेथें नाहीं क्रोध मद दंभ शोक । पुर्णानंद प्रकाशात्मक । जेथे न कळे अहोरात्री ॥ ४९ ॥ भावें करील बिल्वार्चन । त्याचे न वर्णवे महिमान । तयासी तुष्टे पचानन । परमानद प्रदाता ॥ ५० ॥ हे पुण्यपावन शैविकथा । जे आणती नित्य श्रोत्रवक्त्रपथा ते सत्पूर्वजासी सर्वथा । शिवलोक पावती ॥ ५१ ॥ या सर्वा साधनाचें फळ शिवनामस्मरण केवळ । अमृताचा परिसावी रसाळ । महिमा सदाशिवाचा ॥ ५२ ॥ स्वस्ति श्रीरामिरामदासकृत । शिवमहिमा । बिल्वदळमहिमान वर्णन प्रकरण ॥ २८ ॥

---

१ मन्त्र २ पुर्वीग

॥ श्रीरामो जयति ॥

नमो[1] शंकरा खट्वांगपाणि । संसारार्णवीं पडले प्राणी । त्यासी तव पुजाप्लव पुराणी । स्वयें पूजा अशक्त तेणें शिराणी । करूनि भावें पाहावें ॥ १ ॥ तव पुजावलोकनमात्रें । पवित्र होती सर्वही गात्रें । ते हि आक्षतपरी पात्रें । होती परमानंदाचीं ॥ २ ॥ ह्मणौनि सर्वदा सर्वप्रकारें । शंकरार्चन करावें नरें । यथाशक्त्या हें सोपारें । साधन आहे कळिमाजी ॥ ३ ॥ पूर्वीं हि कृतादियुगीं । हा तरणोपाय जीवालागीं विचित्र शिवलिळा महाभागीं । कथाश्रवण करावें ॥ ४ ॥ किरातदेशीं महिपाळ । विमर्शननामें महाबळ । शूर दुर्धर्प जेणें सकळ । शत्रु जिंतिले सामर्थ्यें ॥ ५ ॥ सदा मृगयासक्त निर्वृण । करता सर्व मांसभक्षण । सर्व वर्णांगनासी रमण । सर्वदा करणें तया ॥ ६ ॥ ऐसा असतां हि दुराचार । नित्य शिवपूजा तत्पर । चतुर्दशी उभयपक्षीं शंकर । पूजी सर्वभक्षी तो ॥ ७ ॥ कुळमुद्वतिनामयुवती । तयाची भार्या रूपलावण्यवति । सर्वगुणलक्षणनीती । जाणे कळा सकळा ते ॥ ८ ॥ तव ते कोण्ही एके हर्पकाळीं । पतिसी पुसे राजबाळी । दुराचारी पुजिसी चंद्रमौळी । हें परमाश्चिर्य वाटे ॥ ९ ॥ विष अमृत एके घटीं । तमप्रकाश नित्य भेटी । अंधत्व आणि दिव्य दृष्टि । एका पुरुषा घडेना ॥ १० ॥ तरी हें आश्चिर्य अद्वितीय । तत्वतां सांगावें कैसें काय । ऐसें स्त्रीवाक्य परिसोनि होय । बोलता त्रिकाल[2] तो ॥ ११ ॥ राजा सांगे हास्यानन । पूर्वजन्मीं मी होतों श्वान । पंपानगरीं पर्यटन । घरोघरीं करी सदा ॥ १२ ॥ ऐसे गेले कित्तिकाळ । ते नगरीं शिवालय विशाळ । जन मिनले प्रेमळ । शिवरात्रीं पूजना ॥ १३ ॥ तेथें मी आलों भ्रमत भ्रमत । दुरी बैसलों पुजा पाहात । देवद्वारीं श्वान हें अनुचित । दंडधारी धाविनला ॥ १४ ॥ प्रहरभयास्तव पळालों । शिवमंदिराभोंवता फिरलों । द्वारापासूनि मागें वळिलों । ऐसें भ्रमलों द्विवार ॥ १५ ॥ पुनः पुना भ्रमोनि बैसे द्वारीं । बळी पिंडतृष्णेकरी । तव एक आला धनुर्धारी । तेणें बाणें मारिलें ॥ १६ ॥

---

[1] ही ओवी पांच चरणांची आहे. [2] त्रिकालज्ञ.

शिवरात्रीसीं शिवद्वारीं मरतां । सर्व पापें दग्धजालीं तत्वतां । शिवपूजा-दर्शनप्रभावता । राजा जाली यजन्मीं ॥ १७ ॥ देखिल्या प्रदीप्त दीप-माळा । तेणें त्रिकाळज्ञानसोहळा । पूर्वजन्मप्रकृति संस्कारलीळा । सर्वभक्षनिष्कृप ॥ १८ ॥ तेणें स्मरणें करी शिवार्चा । हें तुज निरोपिली प्राक्चर्चा । तूं हि अनन्यभावें भवार्चा । करी काते सुखदा सदा ॥१९॥ आईकोनि सुख जालें जायेसी । भूत भविष्य वर्तमानासी । जरी तूं राजेंद्रा जाणसी । पूर्वजन्मीं मी कवणी ॥ २० ॥ राजा सांगे कौतुकीं तूं पूर्वी होतीसि कपोतकि । मांस कवळेसीं एकाकीं । देखिलीसी क्रूरें गीधें तूं ॥ २१ ॥ तो निरामीप भीषण । नखचंचू अति तिक्षण । करावया कवळाहारण । झडपूनि धारिलें तुजलागीं ॥ २२ ॥ तुजसह शिवसद्माभोवता फिरोनि । ध्वजाग्रावरीं बैसला जाऊनि । तुज खालतें टाकिलें मारूनि । कवळ घेऊनियां गेला ॥ २३ ॥ ते शंकरासी जालीं प्रदक्षणा । शिवसन्मुख पावलीसि मरणा । तेणें पूण्यप्रभावें सुलक्षणा । राजपत्नि अयत्निं ॥ २४ ॥ ऐसें परिसोनियां पुढती । ह्मणे त्रिकाळज्ञा प्राणपती । परमाश्चिर्यें माझा चित्तीं । शिवभक्ति बैसली स्वामी ॥२५॥ हें शरीर सोडलियावरी । काय होईल अग्र संसारीं । तें सांगावें जी कृपेकरीं । मग सांगे नृपति तो ॥२६॥ द्वितीय जन्मीं मी सैंधवनृपति । सृजयेशसुता तूं युवति । तृतियीं मी सौराष्ट्र राजपति । तू कालिंगात्मजा मम पत्नि ॥ २७ ॥ चतुर्थी मी गांधारनृप । तूं मागधतनया ममावाप । पचमीं मी अवंतीपति सुरूप । तूं दशार्णतनया ममांगना ॥ २८ ॥ षष्ठी मी मानर्त्तमहिपाळ । तू ययातिसुता महिषी सुढाळ । भोग भोगूनिया विपुळ । शिवाश्रयें अतिशयें ॥ २९ ॥ सप्तमीं मी पांड्यराजपुत्र । पद्म-वर्णनामें पवित्र । सर्वगुणसपूर्ण विचित्र । तूं वैदर्भिनामें वसुमति ॥३०॥ तूं सर्वलक्षणसंपन्ना सुंदरा । राजे मिळाले असतां तंव स्वयंवरा । तू सांडून सर्व राजकुमरा । मज चि माळ घालसी ॥ ३१ ॥ मी जिंतोनि राजे स्वयंवरीं । तुज परिणीन सुंदरी । तुजसहवर्तमान विपुळ भोग भो-

---

१ घास, तुकडा.

गूनि संसारीं । करीन पुण्यकीर्ति शिवभाक्ति ॥ ३२ ॥ अश्वमेधादि यज्ञदानें । देवद्विजपितृपूजनें । करूनियां उदास मनें । तपार्थ जावें वनासी ॥ ३३ ॥ तुजसहित प्राणांतीं । दोघें जाऊन शिवपदाप्रती । राज्यीं स्थापूनि सुपुत्रक्षितीं । सर्वधर्मधारक ॥ ३४ ॥ सप्तजन्म राज्य स्वतंत्रें । अंतीं शिवपद ऐसीं विचित्रें । केवळ पूजादर्शनमात्रें । एवढा महिमा शिवाचा ॥ ३५ ॥ कोठें सारमेय अमंगळ । कोठें महायोगातुल्य फळ ऐसें आईकोनि तत्काळ । पतीपूजन करी वधू ॥ ३६ ॥ परमाश्रियें कोंदलें मन । दोघे करिती शिवपूजन । दोघासी हि शिवाचें महिमान । स्मरतां वाटे विस्मय ॥ ३७ ॥ ऐसे भोग भोगितां विशाळ । क्रमले बहुत काळ । सप्तजन्मांतीं तो भूपाळ । शिवपद पावे पत्नीसी ॥३८॥ शिवपूजनावलोकनें । एवढें फळ महिमानें । स्वयेंच पूजितां शुद्धमनें । मानव प्राप्ति कळेना ॥ ३९ ॥ यथाशक्त्या बिल्वदळ जळ । फळ पुष्पमात्र केवळ । मिळितो परचारीं प्रेमळ । पूजा कृपाळ शंकर ॥ ४० ॥ हें शिवपूजा महिमान । जे करिती श्रवणकीर्तन । ते सर्व हि सुख भोगून । पावती परम शिवपद ॥ ४१ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्यें । रामिरामदासकृते । शिवमहिमावर्णनें । शिवपूजावलोकनंनाम शिवरात्रि प्रकरणं समाप्तम् ॥ २९ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

शिवगुरु शिव देव । शिव मातापिता शिवबांधव । शिव आत्मा शिव जीव । शिव शरीर शिव कर्म ॥ १ ॥ शिव भक्ति शिव प्रेम । शिव व्रततप शिव स्वधर्म । शिवादन्य भावना अधर्म । जाणा तोचि तत्वतां ॥ २ ॥ अहो सदाशिवासमान सखा । जीवासी दुसरा कोण देखा । शंकरावांचूनि पारिखा । स्वजन आणि परजन ॥ ३ ॥ स्त्रीकनकपुत्रादिकांवरी लोभु । तैसा जरी आवडे शंभु । तरी शिवप्राप्तीचा लाभु । कोण हा न पावे ॥ ४ ॥ म्हणौनि कोण्हीएक महानुभाव । शिवार्थ त्यक्तवैभव । ते धन्य धन्य परम शांभव । अपशिव जीवन्नाते

॥ ५ ॥ तेचि जिव्हा धन्य जगीं । जे वर्णी सदाशिवालागीं । तें चि मन जें शिवलिंगीं । सुमनप्राय निश्चळ ॥ ६ ॥ तेचि कर्ण जेथें शिव-कथाकौतुक । तेचि हस्तक जे शिवपूजक । ते चि नेत्र जे पाहाती त्र्यंबक । तेचि शिर जे शिव नमीं ॥ ७ ॥ तेच पाद जे शिवालया जाती । तेंच इंद्रियें जे शिवकर्मीं प्रवर्तती । तेचि संसार दुस्तर निस्तरती । भुक्ति-मुक्ति शिवभक्तया ॥ ८ ॥ साडूनि अथवा नेणोनि सर्व धर्म । सांडूनि अथवा नेणोनि वेदशास्त्रश्रम । सर्व वेदमय तत्वतां शिवनाम । सप्रेम स्मरणें शिव होती ॥ ९ ॥ शिवउद्देशें हुतदत्तजपादि कर्म । अल्प हि अनत फळद ऐसा निगम । भावें अर्पितां पत्र पुष्प फळ जळ परम । अमूप हि अमूप उपतिष्टे ॥ १० ॥ शिवभक्त चांडाळादिवर्णाधम । नरनारी नपुं-सक जे निर्नेम । ते अभक्ता विप्राहूनि उत्तम । शिवनामें शिव पावती ॥ ११ ॥ व्यर्थ अभक्ताचें गुणकर्म कुळसीळ । शिवभक्तिविण कळी कलुषें कुश्चळ । ब्रह्मराक्षस होती करितां छळ । भक्तया तरती शांभव ॥ १२ ॥ ते शिव भक्ताख्यान भाग्यवंत । परिसा पुण्यदायक पुण्यकृत । उज्जयिनीनाथ चंद्रसेन विख्यात । जो अपरयिंद्र नरिंद्र ॥ १३ ॥ त्याचे नगरीं महाकाळ जोतिर्लिंग । भक्तया पूजन करितो महा भाग । त्याचा सखा मणिभद्र शिवपार्श्वदाग । चद्रसेना नृपाचा ॥ १४ ॥ तेणें येकदां प्रसन्नपणीं । रायासी दिधला चिंतामणी महामणी । धातु अधातु पापा-णादि झगटणी । सद्य होती कांचन ॥ १५ ॥ ज्याच्या दर्शनें स्पर्शनें ध्यानें । वाछितार्थ पाविजे जनें । बाळार्कद्युत्ति महिमनें । कठीं बांधे भूपती ॥ १६ ॥ जैसा देवामध्यें सूर्य तेजाळ । तैसा नरामध्यें तो नृपाळ । हें आईकोनि कृतइसाळ । राजे सर्व क्षोभले ॥ १७ ॥ सौराष्ट्र केकय शाल्व कलिंग । पाचाळ मागधादिक सवेग । परचक्र चालिलें चतुरग । नगरी वेढली युद्धार्थ ॥ १८ ॥ ऐसें देखोनि चंद्रसेन । पूजा-वया पार्वतिपचानन । निराहार रात्रिंदिन । अर्चितसे अनन्य ॥ १९ ॥ शिवपूजिता नरनायका । तेच नगरीची गोपिका । पांचा वर्षाचिया बाळका । कडे घेऊनि तेथें आली ॥ २० ॥ नमन

केलें परमोत्सुकें । महापूजा देखिली बाळकें । तेणें बाळक्रीडा-कौतुकें । थांया घेतला पुजेचा ॥ २१ ॥ एक पाषाण घेऊनि आलें । त्याचें शिवलिंग कल्पिलें । दुरी खिंडारें होतें पडलें । त्याचें कल्पिलें शिवसद्म ॥ २२ ॥ त्याचा हात पुरे ऐसीं ग्राम्यरोपें । त्यांचीं पुष्पें आणिलीं साक्षेपें । खेळाचें कृत्रिम कल्पनेचेनि गंध धूप दीपें । नवेद्य फळ तांबूल दक्षणा ॥ २३ ॥ निराजन पुष्पांजळी प्रार्थना । जें जें आठवलें त्याचिया मना । दंडवत नमन पार्वतिपंचानना । गीत नृत्य करताळी ॥२४॥ तें बाळक बापुडें अज्ञान । न कळे मंत्र तंत्र विधि विधान । नेणें जप तप खेळासक्त मन । हेतु मात्र शिवपुजेचा ॥ २५ ॥ जैसा खेळतां न विसंभे सांपडला खडा । तवं तो चिंतामणी चोखडा । चिंतिला अर्थ रोकडा । प्रत्यक्ष पुरऊ लागला ॥ २६ ॥ तैसा शिवप्रेमें वेळु सरला । क्षुधा तृषा तो विसरला । शिवस्वानंदसागर भरला । अभ्यंतरीं तयाचे ॥ २७ ॥ तवं ते गतभर्तृका गोपवनिता । प्राणापरिस पाळी सुता । म्हणे बाळा भुकेलासि आतां । जेवीं किती खेळसी ॥ २८ ॥ ऐसें प्रार्थितां दोनी च्यारी वेळ । शिवपूजा न संडी तुठे बाळ । अस्ता जाव पाहे रविमंडळ । तेणें अति कोपली ॥ २९ ॥ तयासी ताडण केलें करीं । अनघडलिंग उचलूनि टाकिलें दूरी । पूजा विध्वंसूनि रोषेंकारी । गेली गृहाप्रति ते ॥३०॥ क्षुधार्त्त बाळक असुडिलें स्तनीं । किं नेऊनि सांडिलें विजनीं । तें रुदन करी कळवळुनी । तैसें रडे तें बाळक ॥ ३१ ॥ तयाचे तनु मन अति कोमळ । स्फुंदतां उेचटों पाहे वक्षस्थळ । महा मूर्च्छना आली विकळ । पडलें तें धरणीवरी ॥ ३२ ॥ मुहूर्तमानें जालें सावद । देवा देवा हा चि छंद । कोटिमाता कृपाळ परमानंद । शिव स्वयें सुझावी ॥ ३३ ॥ सुवर्णाचें सुशोभित । कळस झळकती रत्नखचित । कैलासोपम विचित्रित । देवालय केलें निर्माण ॥ ३४ ॥ माजीं मणिमय वेदिकेवरी । रत्नलिंग देखे तेजाकारी । आनंद न संटे उदरीं । तनु

१ छंद. २ जाऊं. ३ घडवून तयार केलेलें नाहीं तें; स्वयंभू. ४ उद्र पाहे. ५ अस्ताव्यस्त. ६ सांठवणें, मावणें.

मना विसरलें ॥ ३५ ॥ शिवसामर्थ्य अंतरीं । प्रवेशोनि सावद करी । ज्ञानप्रकाश अभ्यंतरीं । जाला तया बाळका ॥ ३६ ॥ ह्मणे म्यां केली खळाची पूजा । तेणें च बोळला महाराजा । बाप भक्तकृपा वृषभध्वजा। प्रत्यक्ष भेटी दिधली ॥ ३७ ॥ मग करूनिया नमस्कारा । प्रार्थितसे परमेश्वरा । स्वामी मम माता आतुरा । क्षमा करी तयेसी ॥ ३८ ॥ जो केवळ भावें च प्रसन्न होय । तया प्रार्थिता नवल काय। दिव्य देही केली माय । गृह इंद्रगृहोपम ॥ ३९ ॥ ऐसें जालिया निशिभरी । बाळक आला मातृमंदिरीं । तवं ते देवी च जैसी दुसरी । प्रसुप्ता दिव्य मचकीं॥४०॥ तव ते परमाश्चिर्यें कोंदली । उचलूनि ह्रदयीं आलिंगिती जाली । बाळा तुझेन पुत्रपणें आली । देवकळा अपराधिणी ॥ ४१ ॥ पुत्र काय घरोघरीं । प्रशवन नाहिंत नारी । तुजसारिखा सुपुत्र संसारीं । अति धन्य शिवभक्त ॥ ४२ ॥ तव तेणें बाळकें । सर्व निवेदिलें कौतुकें । तेथें मिळोनि जनलोकें । परमाश्चिर्यातें केलें ॥ ४३ ॥ बाप कृपाळुवा त्रिलोचना । क्षणें चि केली दिव्य रचना । अतुळ संपदा दिधली दीना । दिव्य केली शरीर ॥ ४४ ॥ काळीं हे बहुलेंरी घरोघरीं । पोटासाटीं कष्ट करी । हें बाळक उघडें शरीरीं । आजि नृपवरीं वंदिजे ॥ ४५ ॥ शिव तोपवावया राजा । अहर्निशीं करित होता पूजा । हें आश्चिर्य आइकोनि वोजा । निशीसी केली समाप्त ॥ ४६ ॥ मग तो राजा सहप्रधानजन । आदरें आला हो धावोन । गोपी आणि बाळकातें देखोन । परमाश्चिर्य पावले ॥ ४७ ॥ पूर्णे च देहें इहीं च डोळां । या च लोकादेखतां सकळां । दिव्य रचना केली शिवदयाळा । बाष्पाश्रु गळती लोचनीं ॥ ४८ ॥ देखोनि अत्यद्भुत रचना । अवघे आश्चिर्य करिती मना । वर्णिता पुराण शिवमहिमाना । निशि गेली क्षणमात्रें ॥ ४९ ॥ यानतरें प्रातःकाळीं । नगर वेष्टूनि होते राजे वळी । तिहीं आइकिलें दूतमेळीं । परमाद्भुत शिवचरित ॥ ५० ॥ मग त्याचिया अंतरकळा । निर्वैर जालिया सुप्रेमळा । शस्त्रें सोडूनि रा-

१ गाढनिद्रिस्त. २ काल. ३ गौळीण. ४ शुद्ध, स्वच्छ, चांगलें.

जमेळा । दर्शन घ्यावया आला ॥ ५१ ॥ चंद्रसेनानुमोदनें पुरीं । प्रवेशले परमानंदेंकरी । महाकाळदर्शन घेऊनि मंदिरीं । आले गोपवनितेच्या ॥ ५२ ॥ गोपिकात्मजाच्या क्रीडापूजनें । कृपाप्रसाद पंचाननें । हेमप्रासाद रत्नलिंग तें नयनें । देखिले जें प्रगट जाले ॥ ५३ ॥ त्याचे दिव्य देह देखिले । राजे अति सुप्रसन्न जाले । सर्व संपत्तिसंभार अर्पिले । छत्रगजवाजीरथादि ॥ ५४ ॥ जितुके पृथ्वीचे गोप । केला तयाचा अधिप । यानंतरें चंद्रसेन भूप । पूजा करी तयाची ॥ ५५ ॥ तवं सर्व सुरवरीं पूजिला । तेजोनिधि हनुमंत तेथें आला । तेणें सर्वांसी परमानंद जाला । उठोनि प्रत्येकें वंदिती ॥ ५६ ॥ वरासनीं कपिरूप दशश्रवण । भोंवते राजे जैसे शिवगण । तो राजा पूजाप्रवीण । अर्ची विधिवद्वैभवें ॥ ५७ ॥ लक्षूनि चंद्रसेनगोपर्सून । रायांप्रति बोले हनुमान । सर्वथा शंकरार्चनावांचून । गति नाहीं देहधारका ॥ ५८ ॥ हा गोपनंदन मंदवारीं । नेणोनि प्रदोषीं पूजा करी । खेळाचिये मिथ्या उपच्यारीं । कैंचा क्रम मंत्र तंत्र विधि ॥५९॥ येणें पावला परम कल्याण । याचें नाम श्रीकर पुण्यपरायण । याचे वंशान्वयीं अष्टमी नंदनारायण । कृष्ण पुत्र होईल त्याचा ॥६०॥ ह्मणोनि मंदवार मदपक्षप्रदोष । हें व्रय भुवनत्रय दुर्लभ पुरुष । शिवपूजा करील तो निर्दोष । भुक्तिमुक्ति पावेलि ॥ ६१ ॥ ऐसें बोलोनिया हनुमंत । तेथें चि जाला अंतरधियत । राजे हृष्टसेना चेष्टित । गेले स्वकीय नगरासी ॥ ६२ ॥ चंद्रसेन आणि श्रीकर । भावें पूजिती उमामहेश्वर । सर्व भोग भोगूनि चिर । शिवपद पावले दोघे हि ॥६३॥ शिवपूजा केली अजाणें । त्याचा महिमा विश्व जाणे । ह्मणौनि जाणता तो चि जाणे । भवें भावें भवीं पूजिला ॥ ६४ ॥ हें शरीर अंतवंत अविनाश जीव । यमयातना दु:सह स्वभाव । जो पुजील यथाशक्त्या शिव । तो उभय लोकीं सदा सुखी ॥ ६५ ॥ हें परम विचित्र शिवचरित्र । श्रोते वक्ते करी पवित्र । परमानंद अत्र तत्र । अनायासें सज्जना ॥६६॥

---

१ शंकर, कारण तो पंचमुखी आहे. २ गौळीण. ३ अंतर्धान ४ शिव.

स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिवमहिमावर्णने । शनि-प्रदोप वर्णननाम प्रकरणं समाप्तम् ॥ ३० ॥ १ ॥

---

॥ [1]श्रीरामो जयति ॥

नमो शंकरा संकटहरणा । नमो शंकरा सतोपकरणा । नमो शंकरा भयवारणा । परमानंदप्रदायका ॥ १ ॥ नमो उत्तम भवविभवप्रदा । नमो मनोरथपूर्णा असमवरदा । नमो सद्य प्रत्ययकारका वरदा । वर वरेण्या त्रिनेत्रा ॥ २ ॥ [2]नमो प्रदोपप्रिया दोपहरा । नमो दीनजन-करुणाकरा । नमो संसारसंतप्ताआधारा । धराधरेशा महेशा ॥ ३ ॥ प्रदोपकाळीं शिवाजवळी । देव तिष्ठती खेचर सकळी । परमानंदें चंद्र-मौळी । नृत्य करी स्वयें ॥ ४ ॥ ते काळीं जप होम शिवपूजन । शिव-स्तव शिवगुणानुकीर्तन । शिवनामस्मरण नर्तन । धर्मार्थकाममोक्षद ॥ ५ ॥ दरिद्रदुःख ऋणक्लेश । रोगवियोगादि दोपक्लेश । पूजितां पार्वतीपरमेश । निःशेप नासोनि जाती ॥ ६ ॥ जो मोक्ष द्यावयाकारणें समर्थ । त्याचेनि नेदवेती लघु पदार्थ । हें वोलणें काय यथार्थ । होव शकेलि हो ॥ ७ ॥ नश्वर पदार्थ नेदवती जया । शाश्वत पद कैंवि देववे तया । पदार्था-भिळासें भुलवी माया । तरी महिमा काय कृपेचा ॥८॥ म्हणौनि भुक्ति-मुक्तिदाता नीळकंठ । अभाग्य दुर्बुद्धि नीच पठ । त्यासी प्रदोपपूजनें दे उत्कट । भक्तांचें काय अपूर्व ॥ ९ ॥ शत्रु सर्प शैलें पडतां । काळ कळितां रोग[3]हेतां जळीं बुडतां । सदाशिव रक्षी हो तत्वतां । प्रदोपपूजका भजकातें ॥ १० ॥ अत्र पुण्यश्रव पुरातन । इतिहास मृडमहि[4]मान । जो आइकतां गातां महाजन । पावती कृतकृत्यता ॥ ११ ॥ विदर्भ नगरीं सत्यरथ नृप । धर्मधर धीर सुशीळ सुरूप । पृथ्वी पाळितां अमूप । काळ क्रमले तयासी ॥ १२ ॥ यानंतरें स्ववर्मशत्रुता । प्राप्त झाल्या तया उभयतां । विदर्भ नगरी वेढिली निर्भयता । युद्ध जालें

---

[1] मुद्रात या प्रकरणासही ३० वें प्रकरण छापल्यामुळें तें तसेंच कायम ठेवलें आहे. [2] पर्वत. [3] रोग होतां-रोग झाला असतां. [4] शंकरमहिमा.

दुर्मद ॥ १३ ॥ वीरीं वीरासी वाणीं भेदिलें । रुधिरें भांबेळ जैसें पाळेश फुललें । शाल्व सत्यरथ जर्जर जाले । एकमेकाचेनि करें ॥ १४ ॥ ऐसा करूनिया पुरुषार्थ । शाल्वशरीं तो नृपनाथ । सेनेसहित सत्यरथ । वीरशयनीं पहुडला ॥ १५ ॥ राज्य घेतलें शाल्वें वीरें । नगरीं त्राहाटिलीं मंगळ तुरें । सत्यरथपत्नी अंतर्वत्नी नामें थोरें । दुःखें पडिली बाहेरी ॥ १६ ॥ ते शोकाक्रांता सुंदरा । अति सुकुमारा गरोदरा । प्रतीचिप्रति चालिली निशांधकारा । प्रभातें मार्गें लागली ॥ १७ ॥ जातां जातां अति दूरी । एका सरोवराचा तीरीं । प्रसूत जाली तरुमंदिरीं । तेजःपुंज बाळ उपजला ॥ १८ ॥ बाळक पडला पृथ्वीवरी । क्षुधाक्रांता आक्रंदता नारी । जळार्थ प्रवेशली सरोवरीं । तंव ते नेली जळचरें ॥ १९ ॥ तेथें मातृहीन बाळ तेजाळ । क्षुदंया करी कोल्हाळ । तेथें पातली तत्काळ । सद्य विधवा ब्राह्मणी ॥ २० ॥ तिचिये कडेसी बाळक तिचें । तंव हें देखिलें एकलें वनिचें । कृपा द्रवलें हृदय साचें । पान्हा स्तनीं वोसंडे ॥ २१ ॥ अविच्छिन्न नाभिसूत्र बाळ । जैसें अच्युत बाळसूर्यमंडळ । तें देखोनियां कुतूहळ । चिंतितसे मानसें ॥ २२ ॥ कोठें गेली याची माता । काय जालीं स्वजनें पिता । कोण्हे वर्णींचें ऐसें चिंतितां । भिक्षुक एक पातला ॥ २३ ॥ तो साक्षात्त्रिपुरारी । ह्मणे कांहीं संशयो न धरी । या बाळकाचा प्रतिपाळ करी । येणें पावसी सोहळे ॥ २४ ॥ तें परिसोनि विप्रनारी । तया राजतनया अंगिकारी । एकचक्र नगरीं स्वलनपासरी । भिक्षान्नें वाढवी दोघां ॥ २५ ॥ मग तयांचीं उपनयनें केलीं । विद्याभ्यास करितीं जालीं । भिक्षा मागत मागत आलीं । तिघेजणें देवालया ॥ २६ ॥ तेथें मुनिजनांचे सभे । विप्रस्त्रीसीं बाळक उभे । देखोनि राजपुत्रप्रभे । शांडिल्य बोले आश्चर्यें ॥ २७ ॥ या राजतनया अन्य जननी । भिक्षान्नें वाढवी जनीं । या द्विजपुत्रसंगाचेनि । द्विजभाव चाळवी ॥ २८ ॥ ऐसें आइकोनि ते ब्राह्मणी । शांडिल्यासी पुसे विनीतवाणी । याचा जनक

---

१ पयाळ. २ पळस. ३ सिद्ध केली. ४ गर्भिणी. ५ भुकेनें.

जननी कुळखाणी । सांगा स्वामी ज्ञानदृष्टया ॥ २९ ॥ मुनि ह्मणे यो आइक । हा विदर्भराजाचा बाळक । युद्धीं पडला याचा जनक । जळचरें जननी भक्षिली ॥ ३० ॥ यानंतरें विस्मित चित्तीं । मुनिप्रति पुसे पुढती । यासी यावया एवढ्या विपत्ति । कारण काय जालें जी ॥ ३१ ॥ आतां याचें दारिद्र्य जाय । ऐसा कोण जी उपाय । या उपदेशा योग्य होय । श्रीगुरु शांडिल्य आज्ञा ॥ ३२ ॥ ऋषि ह्मणे आइक आतां । पूर्व जन्मीं याचा पिता । पांड्येश राजा होता । शिव पूजितां उठिला ॥ ३३ ॥ आइकोनियां कोलाहळ । शत्रुभेणें तो भूपाळ । प्रदोषपूजा सांडूनि तत्काळ । उठोनि आला भद्रासीं ॥ ३४ ॥ तंव तयाचेनि प्रधानें । शत्रु धरूनि आणिला मुहूर्तमानें । येणें परम क्रोधें अभिमानें । शीर छेदिलें तयाचें ॥ ३५ ॥ तैसेंच त्याचेनि हि नंदनें । प्रदोषपूजा सांडूनि नयनें । निद्रा केली ह्मणौनि निधनें । येणें जन्मे अनुपत्ति ॥ ३६ ॥ रायें प्रदोषार्चन गतभवीं । खंडिलें संभ्रमें राजवैभवीं । ह्मणौनि त्याची सर्व सुखपदवी । खंडोनिया गेली ॥ ३७ ॥ राणी जे नेली जळचरें । तिनें गतजन्मीं सपत्नीचीं घरें । मोडलीं तेणें दोषें थोरें । तिचा ससार मोडला ॥ ३८ ॥ तैसा च तुझा पुत्र द्विजकांते । सुब्राह्मण परी करी दुष्ट प्रतिग्रहातें । विन्मुख दानादि सुकर्मातें । तेणें दारिद्र ये भवीं ॥ ३९ ॥ ९ प्रवृत्तिनें[1] हे दुर्दशा । यासी प्राप्त जाली निराशा । पूजिल्यावाचूनि गौरीशा । कोण खंडी दारिद्र ॥ ४० ॥ जे न करित प्रदोषीं शिवपूजन । शिवप्रणम्य शिवकथामृतकर्णपान । ते जन्मोजन्मीं दरिद्री दुर्जन । दुःखी होती संसारीं ॥ ४१ ॥ जे प्रदोषसमयीं निर्दोष । भावें पूजिती उमामहेश । त्यासी पुत्रकळत्र धनधान्यकोश । जन्मोजन्मीं सुखभोग ॥ ४२ ॥ कैलासशैलभुवनीं ²जगत्रयजननी । पार्वती बैसऊनि रत्नसिंहासनीं । शंकर नृत्य करी स्वयें सर्व येऊनि । सुरनर खेचर वळगति ॥ ४३ ॥ वीणा वाजवी सरस्वति । वेणूवादनस्वर सुरपति ।

---

१ विपन्नावस्था. २ योगी.

ब्रह्मा टाळ धरूनि हातीं । घोळगे रंगीं शिवाचे ॥ ४४ ॥ महाविष्णु वाजवी मृदांग । लक्ष्मी गाय शिवकीर्ति सुरंग । मध्यमंडळीं जितानंग[1] । शिव स्वयें नृत्य करी ॥ ४५ ॥ कर जोडूनि लोकपाळ । गंधर्व यक्ष किन्नर अप्सरादि सकळ । सिद्ध विद्याधर ब्रह्मांडस्थ पुण्यसीळ । प्रदोषीं शिव सेविती ॥ ४६ ॥ प्रदोषीं पूज्य एक चंद्रमौळी । सर्व देव पूजक मुख्य हरी वनमाळी । ह्मणौनि प्रदोषीं शिवपूजन सकळीं । देव संतुष्ट होती ॥ ४७ ॥ याकारणें भक्तिभावें । प्रदोषपूजा करावी जीवें । यथाभवें यथावैभवें । तेणें शिव संतोषे ॥ ४८ ॥ शिव संतोषलियाविण । कोण निरसू शके शीण । बाप भोळा चक्रवर्ती कठिण । काय आहे पूजितां ॥ ४९ ॥ केवळ अनन्य भावें । तत्काळ चि प्रसन्न व्हावें । नामस्मरण-मात्रें करावें । आपुलिया सारिखें ॥ ५० ॥ यानंतरें गतविप्रजाया । विनवी शांडिल्या ऋपिराया । पूजाविधि पुसे तया । श्रवण करावें अग्रार्थी ॥ ५१ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिव-महिमावर्णने । प्रदोषमहिमावर्णनंनाम प्रकरणं समाप्तम् ॥ ३० ॥ २ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो भावसंतुष्टा भगवंता । भावें पावसी शरणागता । निर्जलाभ पूर्णा सदोदिता । तुज काय दुर्लभ पदार्थ ॥१॥ आपदापासूनि रक्षावया दीना । प्रबोधिसी स्वकीय पूजना । कां जे द्विधलियावांचूनि पाविजेना । ऐसा असे कर्मपथीं ॥ २ ॥ पत्र पुष्प फळ तोय भावें । यत्किंचित तुज अर्पावें । तें निमित्य करूनि तुवां यावें । यिछिलिया वेगळें ॥ ३ ॥ आता दारिद्रदहनार्थ ब्राह्मणी । पूजूं इछी डमरुपाणी । तो पूजाविधि पुसे चूडामणि । सांगे शांडिल्य ऋपिरावो ॥ ४ ॥ आइके विप्रकांते निर्मळे । शिवार्चनविधि प्रेमळे । येथुनिया तुमच्या भाग्यबळें । उदयो केला तत्वतां ॥ ५ ॥ हा च सर्व शास्त्रार्थ विशुद्धि । ईश्वराभिमुख[2] होतां बुद्धि । सद्य घोळगती सर्व सिद्धि । यदर्थीं संशयो नाहीं ॥ ६ ॥ ईश्वरविमुख

---

१ मदनास जिंकिलें आहे ज्यानें. २ आत्मस्वरूप.

अनाचार-। तत्पर होय जो कां नर ¹। तो इहामुत्र परम घोर । दुःख दारिद्र भोगी ॥ ७ ॥ तरी त्रयोदशी उभयपक्षीं । दिवा निराहार शिव लक्षी । स्नान करावे पूजापक्षीं । सूर्य असतां त्रिघटिका ॥ ८ ॥ शुक्लांबरधर नियमपर । शुक्ल भस्मोद्धूळनतत्पर । शुक्ल सत्वरूप सदाचार । सायंसंध्या जप करावा ॥ ९ ॥ मंडप शुक्ल धौतांबरी । शुक्ल फळ पुष्पीं चामिकेरी² । शुक्ल घटा निर्मळ मुकुरीं³ । ध्वजा तोरणी स्वशक्तितः ॥१०॥ निर्मळ करावें संमार्जन । मंगळमय उपलेपेन । रंगमाळा पद्मलेखन । पंचरंगीं सुरग ॥ ११॥ तेथें बैसोनिया स्थिर आसनीं । सर्व पूजासामग्री घेऊनि । आगमोक्तमंत्रीं पीठें मन्त्रूनि । भूतशुद्धि प्राणप्रतिष्ठा करावी ॥ १२ ॥ प्राणायाम त्रये वेळ । द्विजमत्रीं सुमंगळ । मातृकान्यासादि सकळ । हृदयीं ध्याविया दैवता ॥ १३ ॥ असो यथोक्त सहपरिवारीं । आवरण देवतें स्थानांतरीं । मध्यें ध्यावा त्रिपुरारि । पार्वतीसहित ॥१४॥ कोटिपूर्ण चंद्र निःकळंक । शैत्यरहित प्रकाशांक । पंचवक्र दशबाहु त्र्यंबक । अर्द्धचंद्रशेखर ॥ १५ ॥ पिंगजटाजूट⁶ रत्नमुगुट । रत्नकुंडलें तेजोत्कट । उँदारांग⁷ नीळकंठ । सर्वाभरणभूषित ॥ १६ ॥ वरदाभयादि दशायुधें । हस्तकीं कवळिलीं विविधें । गजचर्मपरिधान शुद्धें । व्याघ्रचर्म उत्तरी ॥ १७ ॥ भस्मोद्धूळन वाहुवलयें । मणिमेखळा किंकिणी स्वयें । वाकी गर्जती पदान्वयें । नृत्यकाळीं कां गमनीं ॥ १८ ॥ आश्रितजनकरुणाकर । ऐसा श्रीदाचा तोडर । वामांकारूढ निरंतर । गौरी विद्युत्पुंजगौरा⁸ ॥ १९ ॥ लावण्य शोभवी स्वप्रकाशें । सुरांगना सुंदरा जिचेनि अंशें । जिचेनि क्रीडालेशें । विश्व आलें रूपासी ॥२०॥ मनोनयनाल्हादिनी । मञ्जुळ शिवप्रियवादिनी । कुरवंडी होऊनि नयना-वरूनि । शोभा नांदे जगत्रयीं ॥ २१ ॥ विलासें मानूनि त्रिभुवनिंकृति । वसविली ज्येची आकृति । सुकुमारा सुंदरा अंगकांति । भूषणा रंगवी

---

१ इहपरलोकीं. २ सुवर्णाचे. ३ मुकुल=कमलपुष्प ? ४ धारवणें. ५ इपान. ६ पिंगट. ७ उदार=सुंदर ८ विद्युल्लतेच्या समुदायाप्रमाणें शुभ्र.

स्वप्रभा ॥२२॥ नील कुंचित कुंतलवृंगुंठि । कृष्ण मधुकर करिती घरटीं । अमरसुमनामोदतुष्टि । गुंजारव स्वानंदें ॥२३॥ मुगुटीं पृथक् नवरत्नरश्मी । नव कुंकुम सुरेख वाळेंदुवेश्मी । वदन सुहास्य सुप्रसन्न सुस्मि । सदन परमानंदाचें ॥२४॥ अधरीं शोभविली अरुणाभा । दंतीं झळके माणिक्यशोभा । कंठमाधुर्यप्रतिभा । कोकिळादि मुस्वर ॥ २५ ॥ अचंचळ तारुण्यवळें । वक्षस्थळीं उत्तुंग कुचकमळें । जाणों काय एके च वेळे । पान्हा पुरेलि त्रैलोक्या ॥२६॥ सर्वांग सुदरी दिव्यांवरी । दिव्य लोटकें साजिरीं । कंठाभरणें बाहुवलये करीं । दिव्य चुडे अभंग ॥ २७ ॥ असो ऐसी मंगळागौरी । मंगळवरद वामांकावरी । दिव्य सुमन चंदनें पूजित चरणावरी । मस्तकें ठेविती लोकपाळवधु ॥ २८ ॥ ऐसा रत्नसिंव्हासनीं । गौरीहर चिंतावा मनीं । सुप्रतिष्टित लिंगस्थानीं । आवाहन करावें ॥ २९ ॥ न्यासपूर्वक स्वशरीरीं । शिवस्वरूपता निजनिर्धारीं । पुष्पांजुळि अर्पूनि स्वशिरीं । बाह्यपूजा तन्मयें ॥३०॥ फळपुष्पगंधमिश्रित जळ । पंचामृत सद्य सुनिर्मळ । रुद्रमंत्रें अभिषेक प्रेमळ । करून उमामहेशा ॥ ३१ ॥ हेमरुचिर दिव्यांवर । आसन योजावें सुंदर । अर्घ्य अष्टगुण त्यानंतर । पाद्यआचमनादि उपचार । वैदिक मंत्रीं अर्पावे ॥ ३२ ॥ मधुपर्क पुनराचमन । मंत्रोक्त पंचामृतशुद्धोदकस्नान । उपवीतवस्त्रयुग्म गर्भकांचन । अंग प्रत्यांग भूषणें ॥ ३३ ॥ विलेपन अष्टांग गंध । पुष्पें सुरंग सुवास बहुविध । जें वोळिलीं आहेति प्रसिद्ध । केतुकीविना सर्व हि ॥ ३४ ॥ बिल्व मंदार कल्हार करवीर सेंरोरुहें । धत्तुरक कर्णिकार मल्लिका शिवस्नेहें । द्रोणपुष्पें बृहती माधवी चंपकादि स्वदेहें । प्रार्थावीं पूजाकालोद्भवें ॥ ३५ ॥ कुश अपामार्ग तुळसी । समर्पावीं गौरीहरासी । धूप काळागरु घृतप्लुत ग्गुग्गुळासी । दीप गोघृतें प्रदीप्त ॥ ३६ ॥ नैवेद्य शाल्योन्न परमान्न वरान्न । मोदकान्गुडजान चूर्णान्न ।

---

१ आवळून बांधलेले. २ बद्धकेश. ३ वेदमन्-ग्रह. ४ सुस्मित? ५ नैसर्गिकपणा. ६ विशाल. ७ कानांतील दागिने. ८ या ओवींत हि पांच चरण आहेत. ९ पुष्पविशेष १० कमलें. ११ विस्तीर्ण. १२ ममतकाळांतील. १३ आपाद्य. १४ चंदन.

घृतमंपुरमंडुकान्न । वटक बहु प्रकारिचे ॥ ३७ ॥ लेह्य पेय चोष्य खाद्य । यथा सूपशास्त्र आद्य । षड्रस जे सुस्वाद्य । कटाम्लतीक्ष्णक्षार-मधुमिश्र ॥ ३८ ॥ दधि दुग्ध मधु घृत । शिखरणि आम्ररस सुस्वादित । नैवेद्यें *नित्य त्रृप्त भगवंत । भावें पावे संतुष्टि* ॥ ३९ ॥ सुवासयुक्त निर्मळ । यथाकाळें सद्य वा सीतळ । गौरीरमणा समर्पावें जळ । आतृप्तपर्यंत आतृप्ता ॥ ४० ॥ आच्मन शुद्धाच्मन करोद्वर्तन । विध्युक्तप्रकारें करावें हवन । आगमोक्त का गुरुवचन । पुनर्नैवेद्य अर्पावा ॥ ४१ ॥ पुनर्जळपान शुद्धाच्मन । त्रयोदशगुणी तांबूलार्चन । दिव्य पक्क सद्य सदेठ वेष्टून । दिव्यांवरीं फळें अर्पावीं ॥ ४२ ॥ नाना रत्नें हिरण्यदक्षणा । पूजापूर्णार्थ गिरिजारमणा । कर्पूरदीपांकुर रत्नदीप जगत्प्राणा । निराजन कुरवंडी ॥४३॥ यानंतरें सर्व संमेळीं । महामंत्र पुष्पांजळि । समर्पावी चंद्रमौळी । भाळचंद्रेसहित ॥ ४४ ॥ नमन प्रदक्षणा विध्युक्तप्रकारीं । स्तुति भक्ति करुणाउत्तरीं । प्रार्थना अपराध क्षमा करी । करुणाकरा शंकरा ॥ ४५ ॥ प्रथम *संकल्प करावा । आगच्छ शिवेसहित सदाशिवा । दुःखदारिद्रपापताप-*युक्त जीवा । मुक्त करी अंगिकारी पूजा ॥ ४६ ॥ यथोक्त पूजावीं देवतें । जें आवरणीं अंगभूतें । सर्वात्मया शंकरातें । सर्वासहित सर्वस्वें ॥ ४७ ॥ मग येउनि स्वगृहासी । सदक्षणा भोजन ब्राह्मणासी । देऊ-निया पंक्तिकरासी । भोजन करावें शिवस्मरणें ॥ ४८ ॥ हा बोलिला पूजाप्रकार । जरी सर्वशक्तिवंत आहे नर । अशक्तांगिकारी करुणाकर । पुष्पें पत्रें संतुष्ट ॥ ४९ ॥ अतएव पक्षप्रदोषीं शिवार्चन । सकाम निःकाम शिवभजन । करितां यथेप्सितांधिक[1] पावोन । भोगांतीं सुखें शिवपदप्राप्ति ॥ ५० ॥ ऐसा जरी आहे सर्व सुरवाड । शक्ति-सारिखें हा हि निवाड । तरी कां हो दुःखदुरवाड । न पूजितां भोगावा ॥ ५१ ॥ शिवनाममात्रें सर्व हि विधि । पुष्पें पत्रें च उपचारसिद्धि ।

---

१ यथ+इप्सित+अधिक=इच्छेपेक्षां जास्त. २ स्वाधीनपणा.

तरी कां हो न धरावी बुद्धि । शिवपूजनीं मुजनीं ॥ ५२ ॥ जरी निः-काम आहे तरी पक्षपूजनें । प्रसन्न होऊनि पंचाननें । ज्ञान उत्पन्न कीजे विनासाधनें । मोक्ष पाविजे निजात्मता ॥ ५३ ॥ आतां असो मृतब्राह्मणजाया । पुनः प्रार्थी प्रणम्य ऋषिराया । ह्मणे जी जीवित्वा आमुचिया । साफल्य जालें भवत्कृपा ॥ ५४ ॥ आतां शुचिव्रत माझा नंदन । आणि धर्मगोता नृपसूनें । या दोघांसी शिवाराधन । उपदेशें हरी दारिद्र ॥ ५५ ॥ मग शाडिल्यें सिकविले मंत्र । पूजनबुध्या द्विजराजपुत्र । शिवालयापासूनि पवित्र । जाती प्रत्यक्ष पूजना ॥ ५६ ॥ बापगुरुउपदेशाची थोरी । शिवभक्ति बैसली जिन्हारीं । कैंचे उपचार भिक्षेवरी । भावार्थे भव तुष्टला ॥ ५७ ॥ च्यारी मास पूजितां पिनाकी । आश्चिर्य वर्त्तलें मृत्यलोकीं । तो शिवमहिमा शांभवादिकीं । श्रवण करावा सादर ॥ ५८ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिवमहिमावर्णने । पक्षप्रदोपपूजनविधि । प्रकरणं समाप्तम् ॥ ३१ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो गिरीशा गंगाधरा । नमो शरणागत करुणाकरा । नमो भक्तजनवज्रपंजरा । सर्व संतोषदायका ॥ १ ॥ शंकर ह्मणिजे सौख्यकारिता । दुःखदारिद्ररोगवियोगहरिता । पापसंतापअनुताप त्वरिता । भक्तिसंकल्पें निवारी ॥ २ ॥ हर सर्व संकटहर । शिव सर्व कल्याणकर । जिता कष्ट भोगावे अतःपर । मेल्या सुख ऐसा नव्हे ॥ ३ ॥ येणें देहें इहिं लोचनीं । सर्व हि सुख दाखऊनि । अंतीं दिव्यदेही करूनि । मानें विमानें स्वपद दे ॥ ४ ॥ जया स्वानद स्वर्गसुख देणें । आपुल्या कृपाकटाक्ष उदारपणें । विषयसुख द्यावया तयाकारणें । काय अशक्य आहे ॥ ५ ॥ भवविभवें चढे उन्माद । मग तया कैंचें शिवपद । ऐसें ह्मणावें तरी हा संवाद । ते चि कथा प्रसिद्ध ॥ ६ ॥ पूर्व प्रकरणांतीं प्रसन्नता । प्रदोषपूजनप्रभावता । वक्ष्माण प्रकार योजिला होता । तो

---

१ सूत, पुन.

चि बोलिजतसे ॥ ७ ॥ शांडिल्यें प्रबोधिली पक्षप्रदोषप्रभा । जयेसी ते मृतधेरामरवल्लभा । ते बाळकपाळकं प्रतिपाळिता शुभा । पक्षप्रदोष शिवार्चक ॥ ८ ॥ तव कोण्ही एके दिवसीं । राजपुत्र नदीतीरासी । गेला एकाकी स्नानासी । तेथें जाला नवलाव ॥ ९ ॥ तया आनंदें क्रीडतां । बाळ-वंटीं [१]विहिरे करिता । निधानकुंभ अवचिता । दृष्टीं देखिला तेणें ॥ १० ॥ हर्षे शिवस्मरण केले । नित्यकर्म संपादिलें । वळें उचलूनि घेतलें । मस्तकीं हेमकलशातें ॥ ११ ॥ गृहासी येऊन हर्षसंभ्रमें । मातें मातें आळवी प्रेमें । शिव प्रसन्न जाला नेमें । ह्मणौनि गृहीं ठेविला ॥ १२ ॥ सुखनिर्भर बोले ब्राह्मणी । दारिद्र हरिलें शूळपाणीं । वांटूनि घ्यावें दोघेजणीं । वस्त्राळंकार करावे ॥ १३ ॥ धन्य धन्य हें शिवार्चन । धन्य प्रदोषपक्षमहिमान । प्रत्यक्ष प्रत्ययो निधान । देखिलें आह्मीं अकिंचनीं ॥ १४ ॥ आइकोनि सार्धविभागवचन । संतोषला तो द्विजनंदन । यानंतरें तो महामन । राजपुत्र बोलिला ॥ १५ ॥ ह्मणे मातें हें तवपुत्रपूजाफळ । तयासी च दिधलें सकळ । मज हि देईळ शिवदयाळ । ते मी स्वतंत्र घेईन ॥ १६ ॥ स्वकीय दैवोपार्जित । तें चि जगीं श्लाघ्यवंत । परकीयार्थासी विरवत । जारगर्भ इव गर्भिणी ॥ १७ ॥ हें वाक्य होतां श्रवण । द्विजात्मजा हर्ष द्विगुण । राजपुत्र सुखेंलिप्सांतःकरण । पूजन करी शिवाचें ॥ १८ ॥ हृदयीं चढतावाढता भाव । प्रतिपक्षीं पूजी महादेव । ऐसियासी क्रमला स्वयमेव । संवत्छर येक ॥ १९ ॥ तव कोण्ही एके काळीं । वसतें शृंघारिली वनस्थळी । शिवकीर्ति च कार्यकुळीं । मांडिलें गायन ॥ २० ॥ शिवसुमनवरदा-मोदा । सेविता सुख सतें पद्वदा । लघु देवकुसुमें सांडूनि सदा । शिव-गुंजारव करिताती ॥ २१ ॥ शिवशोभा शोभायमान । सत वसतवते वन । जयाचें करिता प्रवेशन । परम सुख स्वभावें ॥ २२ ॥ असो

---

१ मेलेल्या ब्राह्मणाची बायको. २ निर्झर. ३ संतोषयुक्त अंतःकरणानें ४ गायक कुळें ? किंवा, काय व ककुळी=कोकिळा ? ५ सतत. ६ वसतव तें ? तें वन कसें, तर जेथें नेहमीं वसंतऋतु च आहे असें वाटतें.

तया सुवनाप्रति । द्विजराजपुत्र आले संगती । तंव तेथें क्रीडता देखती । गंधर्वकन्या शत एक ॥ २३ ॥ सुंदरा सुलक्षणा सुप्रकाशा । तनुतेज उजळी धराकाशा । तारुण्यता पावली विकाशा । सकळा कळाकुशळा हो ॥२४॥ पुरुषरहित शृंगारवनीं । क्रीडती निःशंक विलासिनी । ऐसियातें दुरी देखोनि । द्विजात्मज बोलतु ॥२५॥ आह्मा पुढें जावं नये आतां । नवं स्त्रिया विहरत असतां । स्त्रीसान्निध्य भाषणादि संतां । विमळाशया संत्याज्य ॥ २६ ॥ विलासिनी घनयौवनदुर्मदा । एकांतीं क्रीडतां प्रमदा । तयांचें सान्निध्यावलोकन भाषण कदां । न करावें धार्मिकीं ब्रह्मच्यारीं ॥ २७ ॥ दैववशें घडोनि आलें । तरी ब्रह्मचर्य बुडोनि गेलें । धार्मिकासी अधर्मी केलें । देव रक्षी तरी रक्षी ॥ २८ ॥ ऐसें बोलोनि द्विजनंदन । पुढें न करी च हो गमन । राजतनुज निःशंकमन । विहारपदवीप्रति आला ॥ २९ ॥ गंधर्वकन्यका वरानना । मध्य मुख्या पंकजनयना । येता देखोनि नृपनंदना । आश्चिर्य मानी मानसीं ॥ ३० ॥ ह्मणे कोण हा उदारांग । युवा सर्वांगसुंदर सुरंग । मातंगगमन महाभाग । लावण्यता रिघी ॥ ३१ ॥ लीलालोल विशाळाक्ष । मधुरस्मित पेशल दक्ष । मदनमूर्ति सुकुमार सुलक्ष । आश्चिर्य करी देखोनि ॥ ३२ ॥ येता देखोनि राजपुत्रा । लाघव मांडिलें पद्मनेत्रा । सकळा सखिया विचित्रा । तयांसी बोलती जाली ॥ ३३ ॥ पैल पुष्पवृक्ष दिसती दाट जेथें झेपावे भ्रमरथाट । तें पुष्प आणा तवं एकट । एथें च मी उभी असे ॥ ३४ ॥ ऐसें आइकोनिया बाळा । कारित चालिल्या गदारोळा । तवं येरीकडे वेल्हाळा । निकट देखिला शिवभक्त ॥ ३५ ॥ दृष्टादृष्टी होतां दोघांजणा । पंचबाणें भेदिलें प्राणा । अंतरीं कारिती शिवस्मरणा । दंपतिभाव भाऊनि ॥ ३६ ॥ यानंतरें गंधर्वनंदिनी । दिव्यांबरपल्लव पसरूनि । नाना उपचारें बैसऊनि । बोलती जाली मंजुळ ॥ ३७ ॥ तुह्मी कोण जी कोणाचे । कोण देशीहूनि आलेति साचे । तत्वतां सांगावें

१ आह्मां. २ तरुण. ३ हत्तीसारखें चालणें. ४ प्रवेशे. ५ मनोहर. ६ चतुर. ७ आरडाओरड.

हें साचें । मग तो बोलता जाला ॥ ३८ ॥ ह्मणे मी विदर्भराजनंदन । मातापिता पावलीं निधन । वैरीं हरिलें राज्यभुवन । पराधीं वास्तव्य ॥ ३९ ॥ सर्व सांगोनिया आपुलें । तयेसी पुसों आरंभिलें । तूं कोणाची कन्या काय हकित हें आपुलें । सांग सर्व मजप्रति ॥ ४० ॥ मग ते ह्मणे राजसत्तमा । श्रेष्ठ गंधर्व द्रविकनामा । तयाची नंदिनी मनोरमा । अंशुमती कळावती ॥ ४१ ॥ नृत्यगीतादि कळारंग । माझा ठाईं सदा सुरंग । सुरस्त्रियांचा मनोमृग । लुब्ध मम गायनें ॥ ४२ ॥ तुज देखोनिया येतां । सखिया दवडूनि एकांता । तुजसी बोलावया आर्त चित्ता । ह्मणौनि येथें बैसलिये ॥ ४३ ॥ माझा मनोदय चतुरा । जिवेंभावें तुझी दारा । काढूनि अमोलिक मौक्तिकहारा । कंठीं घाली तयाचे ॥ ४४ ॥ तुजवेगळें माझें मन । सर्वथा न पवे समाधान । नेणों कैसें तुवां अर्चन । केलें गौरीहराचें ॥४५॥ मी हि निरंतर अंतरीं । चिंतित असें शिवगौरी । तेणें पुण्यें प्राणेश्वरी । तुझी होईन गमतसें ॥ ४६ ॥ ऐसा देखोनि अनुसर । अनर्घ्य देखोनिया हार । राजपुत्र हर्षनिर्भर । बोलता जाला ॥ ४७ ॥ तूं बाळा पितुआधीन । कैसें साडिसी राज्यस्वजन । येरी ह्मणे महेशान । करील तें पाहें कौतुकें ॥४८॥ प्रातःकाळीं या चि स्थाना । वेगीं येईं नृपनंदना । अन्यथा न मानीं मम वचना । प्राणेश्वरा सुंदरा ॥ ४९ ॥ यानंतरें हर्षनिर्भर । द्विजजाजवळीं राजकुमर । येऊनि निवेदी समाचार । गृहा आले सांगातें ॥५०॥ आइकोनि संतोषें उपजननी । प्रभातें प्रविष्ट जाले तये स्थानीं । येरीकडे गंधर्वनंदिनी । सखियांसीं गेली स्वलोका ॥ ५१ ॥ तंव तिचा पिता पूर्व दिवसीं । कैलासें गेला शंकरासी । शिवें आज्ञापिलें तयासी । सकळां देवां देखतां ॥ ५२ ॥ धर्मगोप्ता नृपात्मज । पक्षप्रदोषीं पूजी मज । शांडिल्य जो ऋषिराज । उपदेशें तयाचा ॥ ५३ ॥ तरी तुझा आपुली मुख्य कन्या । तयासी द्यावी देवमान्या । साह्य करूनि फेडी

१ निधन. २ आवड. ३ अनकूल प्रसंग. ४ अमोल. ५ मानी ६ सेवा, वरणासरिता.

दैन्या । हतराज्य जोडुनी ॥ ५४ ॥ ऐसी आज्ञा करी चंद्रमौळी । ते गधर्व धरूनि स्वमौळी । प्रवेशला वनस्थळीं । स्वकन्यासमवेत ॥५५॥ तवं तया नृपात्मजासी देखिलें । वरासनीं बैसविलें । शंकरोक्त निवेदिलें । तवं पूर्वजा प्राप्त शिवलोक ॥ ५६ ॥ जयाचेन पुत्रपणें । पूर्वजा शिवलोक पावणें । तयाचें धन्य धन्य जिणे । येर भार भूमिके ॥ ५७ ॥ आतां ये मम कन्यकेसहवर्तन । संवत्सरायुत यथोचित भोग भोगून । अती पावाल शिवस्थान । दिव्य देहें दोघे हि ॥५८॥ मग ते अंशमती युवति । वनीं वरिला प्रिय पति । जाली आकल्प सौभाग्यवती । इहामुत्र जेवि देवी ॥ ५९ ॥ महोज्वळालंकार । दिव्य रत्नांबरे अपार । नाना वस्तु धनसंभार । देता जाला गंधर्व ॥ ६० ॥ अयुत एक मत्त मतांग । नीळ वाजी वायुवेग । नियुतें एक विचित्रांग । भरणींभूपित दिधले ॥ ६१ ॥ शें धनायुधीं समर्थ । एक दिधला दिव्य रथ । अजेधनुष अक्षय तूणीं युद्धार्थ । वर्मशक्ति शस्त्रास्त्रें ॥६२॥ सेना करावया कन्येसी । दिधल्या सहस्त्र एक दिव्य दासी । चतुरंग गंधर्वसैन्य सहायासी । अति उग्र दिधलें ॥ ६३ ॥ ऐसा धर्मगोप्ता राजकुमार । पावोनि दिव्य संपदा अपार । अंशमती स्त्री मनोहर । शिवार्चेनीं सप्रेम ॥ ६४ ॥ दिव्य तुरें वाजती गभीर । कौतुक पाहाती जन अपार । सुवासिनी वोवाळिती वोर्हर । ऐसा आला स्वाश्रमा ॥ ६५ ॥ गंधर्व बैसोनिया विमानीं । शेप कन्यका सर्वे घेऊनि । अशमती जामाता निरऊंनि । विमानारूढ आला स्वलोका ॥ ६६ ॥ यानंतरें नृपनंदन । गंधर्व सेनेसहवर्तमान । शत्रुचक्र निर्भाटून । राज्य घेतलें आपुलें ॥ ६७ ॥ ते गतभर्तृका द्विजपत्नी । मातृवत्प्रतिपाळी प्रेत्नीं । तिचा पुत्र तो बधुस्थानीं । परम प्रेमें सहवासी ॥ ६८ ॥ सिंव्हासनीं धर्मगोप्ता बैसला ।

---

१ स्वशीरीं. २ दहा हजार. ३ मतंग=हत्ती. ४ घोडे. ५ एक लक्ष. ६ समुदाय. ७ तूणीर=भाते. ८ धनुधर-दपल. ९ अशुमतीसेरीज इतर. १० स्ना गेन गरन.

मत्रीं पट्टाभिशेप केला । राणी अशमती जयेला । पुराणें स्तविती सदा ॥ ६९ ॥ ह्मणौनि हें महाव्रत पक्षपूजन । ईप्सितैश्वर्य पावला नृपनदन। दाहा सहस्राब्दें यथेष्ट भोग भोगून । दोघें आलीं शिवलोका ॥ ७० ॥ तेथें शिवपार्वतीसहवर्तमान । सुखें वसती विराजमान । सर्वथा नाहीं पुनरावर्तन । येवढा महिमा शिवार्चनीं ॥ ७१ ॥ हे व्रत जो भावें करी । तो धन्य कृतकृत्य ससारीं । प्रस्तुत पुढें श्रवण करी । त्याचें फळ पारिसावें ॥ ७२ ॥ तो शतजन्म जन्मला तरी । दारिद्र नेणे ससारीं । ज्ञानैश्वर्य नादे पुरी । अतीं पावे शिवाची ॥ ७३ ॥ जे पावोनि दुर्लभा नरशरीरा । पूजिती प्रदोषीं भवानीशंकरा । ते तरती नवल काय इतरा । तारक सग तयाचा ॥ ७४ ॥ आतां सोमवारीं सोमेश्वर—। पूजनमहिमा सद्य चमत्कार । ते चि कथा बोलिजेति सादर। परिसा परम प्रेमळ ॥ ७५ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामीरामदासकृते । शिवमहिमावर्णने। पक्षप्रदोषवर्णन ।नाम प्रकरण समाप्तम्॥३२॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो अनता अपरापरा । नमो विश्वेशा विश्वंभरा । नमो विश्वातीता निराकारा । योगरूपा सदाशिवा ॥१ ॥ स्वये शकर ऊर्ध्वरेता । प्रसिद्ध जयाची निस्पृहता। आणि आश्रितां इछाफळप्रदाता । कोण कळवळा कृपेचा ॥ २ ॥ जैसा सर्वसमर्थ सर्वज्ञ जनक । जें जें इछी अल्पज्ञ बाळक । तें तें पुरऊनिया कौतुक । हित करी तयाचें ॥ ३ ॥ तैसा शकर परमानद । सपूर्ण भोगऊनि विपयस्वादें । सेखीं देतसे स्वकीयपद । येवढा महिमा जयाचा ॥ ४ ॥ तये पूजेसी हि योगयागाऐसें । धन साधन नलगे अनायासें । जैसें सामर्थ्य असेलि तैसें । अर्चन करावें स्वभावें ॥ ५ ॥ धनमावनें अति दुर्बळ । तरी भावें पत्र पुष्प अथवा फळ । तें हि येथोक्त नसलें तरी केवळ । जें जोडे त्येणें चि प्रसन्न ॥ ६ ॥ शिव सतुष्ट सद्भावें । तैसें योगयागादि कर्मी न फावे ।

---

१ इच्छितऐश्वर्य. २ स्वाद.

अनायासें तत्फळ फावे । ऐसें सुगम तें नव्हे ॥ ७ ॥ योगयाग अधिकारियांप्रति । शिवाभक्त असो भलती याती । स्त्रियां सभर्तृकां अभर्तृकांप्रति । बोलिलें आहे ॥ ८ ॥ यदर्थी कथा मनोरमा । परिसा शिवार्चनमहिमा । राजा महा चित्रवर्मा । सकळगुणसंपन्न ॥ ९ ॥ तो परम भक्त अभेद । समान मानी शिव मुकुंद । परम दाता धर्मविद । यज्ञपुण्यप्रवीण ॥ १० ॥ तयाची अनुकूळ धर्मदारा । प्रसवली सामर्थ्यवंता कुमरा । कन्या एकि मनोहरा । प्राणाहूनि आवडती ॥ ११ ॥ ते कन्येचेनि भूपति । अति संतुष्ट जाला चित्तीं । जैसी हिमवंतासी[1] पार्वती । तैसें सुख मानिलें ॥ १२ ॥ तयेचें वर्णितां जातक । वर्तलें परम कौतुक । राजमनोधारणार्थ लोक । बरवें च सांगती ॥ १३ ॥ कोण्ही एक निःशंक निस्पृह । विप्र बोलिला निःसदेह । चतुर्दशाब्दीं हे इह । वैधव्य पावेल निश्चयें ॥ १४ ॥ तयाचेनि वचनबाणें । राजा खोंचला पंचप्राणें । निश्चय केला अंतःकरणें । कन्यावैधव्यविपर्यी ॥ १५ ॥ ते सीमंतिनी नाम राजकन्या । शाहाणी जाली सुलावण्या । सुखी सुखें विश्वमान्या । भाव्य वैधव्य परिसोनी ॥ १६ ॥ मैयित्री[2] याज्ञवल्क्यकांता । तयेसी जाली शरणागता । सौभाग्यवर्द्धनकर्म स्वता । सांग माते मजलागीं ॥ १७ ॥ तिचा देखोनि भावार्थ । तये प्रबोधिला परमार्थ । उमामहेश त्रैलोक्यसमर्थ । शरण जाई तयासी ॥ १८ ॥ सोमवारीं गौरीहर । भावें पूजी वो सादर । उपवासी निराहार । सुस्नाता होई सुवासना ॥ १९ ॥ मुखीं मौन स्थिरमति । भावें पूजी पार्वतीपति । ब्राह्मणा भोजन देऊनि विनीति । प्रार्थना करी शिवाची ॥ २० ॥ पापक्षयो शिवाभिषेकें । साम्राज्यपीठ पूजासंतोषें । सौभाग्य सर्वसुख सुवेषें । गंधमाल्याक्षतार्पण ॥ २१ ॥ धूपदानें सुगंधता । कांति दीपप्रदानता । अष्टैश्वर्य सद्भावता । जपेंकरूनि पाविजे ॥ २२ ॥ होमें होय कोशसमृद्धि । सुब्राह्मणभोजनें तोषिजे विबुधीं । करिता सोमवारीं शिवार्चनविधि । सर्वापदा नाशती ॥ २३ ॥

---

[1] हिमाचल. [2] मैत्रेयी.

परमोत्साह परम शोकीं । शिवार्चन सर्वथा न टाकीं । दृढ निर्धारें उमापिनाकी । परमानंदप्रदाता ॥ २४ ॥ ऐसी प्रबोधिली कुमारी । भाळ ठेवी चरणावरी । आज्ञा घेऊनि येऊनि करी । यथोक्त गौरीशिवार्चन ॥ २५ ॥ कन्या देखोनि उपवर । राजा करी वरविचार । नळादमयंतीचा कुमर । इंद्रसेन अपरेंद्र ॥ २६ ॥ तयाचा पुत्र चंद्रांगद । चंद्रासमान प्रभाकंद । तो जामात पाहिला आनंद । सर्वांसहित महीशा ॥ २७ ॥ आरंभला लग्नसोहळा । मुळें पाठविलीं महिपाळा । महोत्साहें सीमंतिनीबाळा । दिधली चंद्रांगदासी ॥ २८ ॥ यथाकुळ राजपूजन । तृप्त केले याचकजन । करित वधुवरवर्णन । गेले स्वस्थानाप्रति ॥ २९ ॥ मग श्वशुराचिये प्रीतीं । चंद्रांगद चंद्रकांति । कितिएक मास राहिला तव गति । आरंभिली दैवाची ॥ ३० ॥ एकदां क्रीडारोळेंकरी । चंद्रांगद बैसला नावेवरी । समागमें दोघे नावकरी । अर्वलेकर ॥ ३१ ॥ यमुनाजळकल्लोळीं । नाव फुटली तत्काळीं । चद्रांगद आणि दोघे कोळी । दैववशें बुडाले ॥३२॥ तेथें जाला हाहाकार । मीनलीं उभयकुळें सनागर । उलथला शोकसागर । मर्यादेवेगळा ॥ ३३ ॥ चद्रांगदाचा पिता । दायादीं जिंतिला जुंझता । कारागृहीं सहवनिता । घालूनि राज्य घेतलें ॥ ३४ ॥ येरीकडे नयवधू शोकानळें । अष्टौप्रहर आहाळे । तथापि शिवार्चन वाळें । धरिलें असे प्राणेसीं ॥ ३५ ॥ चद्रांगदवधुवर्ग सुज्ञ । जाणोनि तयासी जळमग्न । ऊर्ध्वदेहिक करूनि भग्न । हृद्भांडें शोकपाषाणें ॥३६॥ चंद्रांगद बुडाला जीवनीं । तो देखिला सर्पकामिनीं । जळक्रीडा करावयालागूनि । आलिया होतिया ॥ ३७ ॥ तया देखोनियां राजकुमरा । आश्चर्य करिती सुंदरा । मग घेऊनि पाताळविवरा । आलिया तक्षलोकासी ॥३८॥ होतां उरगकांतावलोकन । जाला सावधान सचेतन । देखता जाला तक्षकभुवन । इंद्रभुवनोपम ,शोभा ॥ ३९ ॥ कनकरचना रत्नखचित । तेज फांके

---

१ वरहें हलविणारे. २ गोत्रजांनी. ३ पोळे. ४ सूज्ञ. ५ अंतःकरणरूपी भांडें शोकरूपी पाषाणानें भग्न=विदीर्ण केलें. ६ नागस्त्रियांची दृष्टि.

सदोदित । पृथक मणिमयूख फांकत । नकळे तेथें अहोरात्रीं ॥ ४० ॥ तये तपये महा राजभुवनीं । रत्नरचित सिंव्हासनीं । सभामध्यमंडळीं स्वस्थानीं । महा तक्षकोत्तम ॥ ४१ ॥ दिव्यांबरी दिव्यालंकारी । दिव्य किरीट शोभती शिरीं । सहस्रफणिमंडळावरी । मणि बाळार्कोपम ॥ ४२ ॥ तेजें दिपती लोचन । दिव्य सुमनें दिव्य चंदन । काळाग्नि इव प्रतापवान । नागकन्या सेविती ॥ ४३ ॥ लावण्य चातुर्य स्थिर-यौवना । दिव्यांबरीं दिव्याभरणीं विराजमाना । स्रक चंदनचर्चित सुशोभना । करकर्णें कृतांजळीं ॥ ४४ ॥ ऐसा देखोनि तक्षकोत्तम । राजपुत्रें प्रणमिला सप्रेम । कृतांजळी कृतनेम । पुढें उभा राहिला॥४५॥ कोण हा कोठून आणिला सुकुमार । नागकन्या सांगती जोडूनि कर । यमुनाजळीं बुडतां सुंदर । आणिला तुह्माजवळिकें ॥ ४६ ॥ स्वमुखें पुसे नृपनंदना । तूं कोण कोणाचा पुत्र कोणा स्थाना-। पासूनि आलासी सुवदना । सांग सर्व आपुलें ॥ ४७ ॥ चंद्रांगदें कृतांजळी । सर्व सांगि-तली वंशावळी । नववधूगृहींहूनि जळीं । बुडालों येथें आणिलें ॥ ४८ ॥ जन्मांतरीचेनि पुण्यें । स्वामिपादाब्जें देखिलीं धन्यें । पूर्वजभाग्यें अति कारुण्यें । मजसीं असा बोलत ॥ ४९ ॥ ऐसें परिसोनि सुप्रसन्न । तक्षकोत्तम वरदवचन । बोले ह्मणे भेऊं नको निर्देपासन । सांग कोणा देवाचें ॥ ५० ॥ सकळ देवाधीश महादेव । वेदां नाकळे महिमार्णव । तयाचा उपासक हा जीव । अनन्यभावें सुभावें ॥ ५१ ॥ जयाचे वामांकीं जगदंबिका । धृत भाळीं चाळ मयंका । जयाचे कर्णीं नाग तक्षका । कुंडलता संप्राप्त ॥ ५२ ॥ जो सदा स्वाश्रिताजवळी । उपेक्षीना कोण्हे काळीं । तो ममाराध्य पंचमौळी । परिसोनि तक्षक तोषला ॥५३॥ ह्मणे तूं सदाशिवभक्त होसी । येथें राहावें स्वानंदेंसीं । दिव्य भोग या दिव्यांगनासीं । भोगी दिव्य शरीरें ॥ ५४ ॥ येथें जरा मृत्यु नाहीं कोंपि । अमृतपूर्णा असती वापी । कल्पद्रुमवनें तत्रापि ।

---

१ मण्याचें किरण. २ उगवत्या सूर्याचे तेजाप्रमाणें ज्याची प्रभा आहे असा मणी. ३ पुष्पमाला. ४ फेर्डे हि.

काय इच्छा तें साग ॥ ५५ ॥ ऐसें नागराज बोलता । राजपुत्र जाला प्रार्थिता । एकात्मज माझीं पितामाता । नवनधू वेधव्यदु खिता ॥५६॥ तयेसी सौभाग्यार्थ शिवार्चन । तव मज जालें निदान । दैवें तवप्राप्ति जोडलें निधान । मज पावली तदेशीं ॥ ५७ ॥ यानतरें तक्षकेश्वर । समर्पी दिव्याबरें दिव्यालंकार । दिव्य सुगध वस्तुसभार । दिव्य यान दिव्य कल्पद्रुम ॥ ५८ ॥ आणिक केले वरदान । स्मरणमात्रें मी पावेन । जळीं स्थळीं सर्वत्र गमन । तुज होईल निर्भयें ॥ ५९ ॥ सहायार्थ दिधला आपुला कुमर । वहनार्थ महा निशाचर । ऐसा करूनिया निर्भर । आज्ञा दिधली तत्काळ ॥ ६० ॥ का मग हयारूढभूत । सर्व सपत्नीसीं अकस्मात । यमुनाजळातूनि दीप्तिमत । प्रगट जाला निर्धोनिव ॥६१॥ तव ते सीमतिनी सती । स्नानार्थ आली यमुनेप्रति । सखियासीपरिवारी ती । सोमवारीं शिवार्चना ॥ ६२ ॥ जव तो देखिला नाचवित वाजी । स्वपतिसारिखा यमुनेमाजीं । नीर लोटलें नयनांबुजीं । तव तो आला समीप ॥ ६३ ॥ तेणें ते देखिली दीनवदना । आकठ सूत्राश्रुलोचना । तयेसी पुसे तू कोणाची नाना । दु खाकुळा बाळापी ॥६४॥ ऐसें पुसता अधोमुखी । अश्रुनयन परम दुखी । शब्द न फुटे मग सखी- । जनीं सर्व निवेदिलें ॥ ६५ ॥ वत्सरत्रय परम विकळा । सोमवारीं शिवार्चन करी सुसीळा । याननरें स्वमुखें प्रेमलीळा । सीमतिनी पुसे तया ॥ ६६ ॥ तुह्मी कोण जी मगळमूर्ति । मदनोपम दिव्य कीर्ति । पार्श्वे व्याळ दोघे गतिसेवास्फूर्ति । हे सुर सिद्ध गधर्व किं किन्नर ॥६७॥ माझा वृत्तात स्नेहें पुसा । काय मज पूर्वी जाणत असा । म्या हि देखिलेंसें वाटत असा । स्वजन जेसे ॥ ६८ ॥ ह्मणौनिया जी महाभागा । हें मजप्रति सर्व सागा । ऐसें बोलोनि मोहें सुभागा । दुर्भगेर्वे पडे शोकें ॥ ६९ ॥ मग सावरिली सखिजनीं । अश्रुधारा पडती नयनीं । स्वकाता जाणोनि मनीं । शोकाकुळ न बोलवे ॥ ७० ॥

---

१ रथादिर २ निधानाप्रमाणें. ३ काय शब्द असावे? ४ दुर्भग= दुर्दैवी, व इव=प्रमाणें.

सिद्धदेवेंच कर्णकुहरीं । सांगावया धरिली करीं । लाजिता पुलकांचिता शरीरीं । तयेप्रति बोलतु ॥ ७१ ॥ कोण्ही एके लोकांतरीं । तुझा पति म्यां देखिला सुंदरी । या दों ती दिवसांमाझारीं । तुज भेटेल सुव्रते ॥७२॥ तूं सोमवारीं करिसी गौरीहरपूजा । विपत्तीं हि न विसरसी वृषभध्वजा । गुरुवचनीं विश्वास वोजा । त्या न विसंभे उमाधव ॥ ७३ ॥ सर्व सुख असतां जीवा । भलते च करितसे सेवा । दुखामाजीं न विसरे देवा । ते चि भक्ति सदृढ ॥ ७४ ॥ हें असत्य न मनीं विमर्प । करीन शंकर-पदस्पर्श । हें परिसोनि जाला हर्ष । सुधाधारा शताधिक ॥ ७५ ॥ सीमंतिनी विचारी मनीं । हा च मम पति भर्त्रशेनि । म्यां सर्व लक्षणीं लक्षूनि । निर्धारिला असे ॥ ७६ ॥ पूजितां गिरिजाशूळपाणी । काय येक न पवे प्राणी । ऐसा गुप्तरूप अंतःकरणीं । संतोष रक्षिला पति-वाक्यें ॥ ७७ ॥ स्वस्थ करूनि स्त्रियेसी । वेगें आला स्वनगरासी । भेटावया मातापितयासी । उतावेळ परिवारें ॥ ७८ ॥ स्वयें राहिला शृंगारवनीं । तक्षकात्मज राजसुवनीं । पाठविला तेणें दायाद प्रबोधूनि । तत्काळ बाहेरी घातले ॥ ७९ ॥ चंद्रांगदवृत्तांत सांगितला । शत्रुमनो-रथ चूर्ण जाला । तक्षकात्मजासी ह्मणती भला । जीवदान आह्मा दिधलें ॥ ८० ॥ मातापिता कारागृहीं । कृप जालीं होतीं देहीं । ते सोडूनि आणिलीं तिहीं । परमानंद मानिला ॥ ८१ ॥ गतपुत्र मागुता भेटे । हें अघटित केवि हो घटे । कृपा केलिया नीळकंठें । काय नव्हे जन ह्मणे ॥ ८२ ॥ मृतभेटी महा कौतुक । पाहों पातले सर्व लोक । सर्वांसीं भेटोनि जननीजनक । भेटीलागीं चालिला ॥ ८३ ॥ नगरी शृंगारिली सादरें । वाजों लागलीं मंगळतुरें । ऐसीं परमोत्साहें गजरें । आला राजमंदिरा ॥ ८४ ॥ दृष्टीं देखोनि जनकजननी । चरणा लागला धावोनि । पृष्ठि भिजती आलिंगनीं । सुखाश्रुधारीं परस्परें ॥८५॥ ऐसा जाला सुखसोहळा । पत्रें पाठविलीं श्वशुरजनका भूपाळा । तेणें पुनर्विवाहें अर्पिली बाळा । चंद्रांगदा संपत्तीसीं ॥ ८६ ॥ ते सुमंतिनी सुवे-

१ असमाधान. २ खात्रीपूर्वक.

पिणी । शृंगारिली फणिमणिमयभूपणीं । तक्षकदत्त सुगंध चर्चिती घ्राणीं । दश योजनें ज्याचा सुवास ॥ ८७ ॥ कल्पवृक्ष जयेचा द्वारीं । जैसी अपरसुरेशनारी । चंद्रांगद नृप इंद्रासरी । देखोनि निवाली मातापिता ॥ ८८ ॥ यानंतरें इंद्रशेन । पुत्र स्वराजीं स्थापून । वनीं करूनि तप-साधन । योगगति पावला ॥ ८९ ॥ चंद्रांगद आणि सुमतिनी । अयुताव्द नाना विपयसुख भोगिती जनीं । अष्ट पुत्र आणि एकि कन्या कामिनी । प्रसवली ते ॥ ९० ॥ सोमवारीं शंकरार्चन । दोघें करिती अनन्यमन । शिवपूजाप्रभावें होतां निदान । दोघें आलीं शिवपदा ॥ ९१ ॥ परम रसाळ शिवचरित्र । भावें पढे परिसे पवित्र । तो सर्व सुखें पावोनि अत्र । अंतीं पावे शिवलोक ॥ ९२ ॥ आता शिवमहिमा महद्भूत । वेदमित्र आणि सारस्वत । याचिया पुत्राचें अख्यान सुचित्त । परिसावें शिवसज्जनीं ॥९३॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिवमहिमावर्णने । सोमवाराशिवार्चन । नाम प्रकरण समाप्तम् ॥ २३ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

ॐनमोजी भगवता । महादेवा रुचिरचरिता । सर्वकामद सेवा करितां । याचें काय अपूर्व ॥ १ ॥ तव कथाश्रवणपठणमात्रें । जन होताती पुण्यपात्रें । इहलोकीं परलोकीं चित्रें[१] । सुखें भोगिती यथेष्ट ॥२॥ आणि कौतुकें निवे मन । होतसे परम समाधान । नलगे कष्टरूप साधन । श्रोतयांवक्तयांसीं ॥३॥ केवळ कैवल्यपद स्पष्ट । मोकळें मुक्तिद मऱ्हाष्ट । श्रवण कीर्तन करा यथेष्ट । सार्वडे[२] सज्जन ॥ ४ ॥ विदर्भ-नगरीं द्विजोत्तम । वेदमित्र तयाचें नाम । वेदशास्त्रार्थविद परम । स्वकर्म-धर्मसीळ ॥ ५ ॥ तयाचा परम मित्र । सारस्वत नामें पवित्र । एक-देशवासी विचित्र । सख्य चाले तयांचें ॥ ६ ॥ तया दोघां दोनी पुत्र जाले । सुमेधा सामवान् नामाथिले । तया दोघांमध्ये सख्य चाले । पितयापरिस आगळें ॥ ७ ॥ ते दोघे समानसीळें । समानविद्याभ्यास-

---

१ नाना प्रकारचीं, २ भोळे, भोळसर.

वळें । समानत्वे प्रेम आगळें । एका वेगळे एक नव्हति ॥ ८ ॥ तया दोघांसी ह्मणती जनक । बोलती करूनियां कौतुक । तुमचा उद्वाह-समयो विदर्भनायक । यजूनि धन अर्चावें ॥ ९ ॥ यानंतरें ते द्विज-कुमार । यजिता विदर्भनगरेश्वर । हांसोनि बोलिला विनोदपर । तया दोघा द्विजात्मजा ॥१०॥ नैषधराजाची कामिनी । सोमवारीं शिवार्चनीं । दंपति पूजी सीमंतिनी । सपत्निक ब्राह्मण ॥११॥ तरी दोघीं कुमारीं । एक पुरुष एकी नारी । होऊनि जावे तिचा घरीं । ज्ञान पाहों तयेचें ॥ १२ ॥ राजाज्ञा अनुलंघ्यमान । कृत्रिमाचारें गुणनिदान । तत्वतां पाविजे लघुतापमान । पतनभेणें भयभीत ॥ १३ ॥ विशेषें देव नृदेव पिता गुरु । यांसीं कापथ्य सर्वथा हि नये करूं । करी तरी सद्य चमत्कारु । नाश होईल नान्यथा ॥ १४ ॥ असो ऐसे भयभीत निघाले । दंपतिवेषें राजभुवना आले । सुमंतिनीसी तत्काळ कळलें । उमामहेशप्रसादें ॥ १५ ॥ नमस्कारिली हांसोनि । मज हे उमामहेश-स्थानीं । सकळा युग्माऐसीं वहु धनीं । सर्वोपस्कारीं पूजिलीं ॥ १६ ॥ पूजा विसर्जितां महा सती । परमाद्भुत वर्तलें क्षितीं । लिंग मुद्रा लोपोनि युवति । जाली वनितावेषाची ॥ १७ ॥ भगवद्भक्तांसी करी रेंळी । कपटाचारेंकरूनि छळी । तो तत्काळ च भूमंडळीं । नाश पावे न संशयो ॥ १८ ॥ ब्राह्मण वेदवेदांगपारंगत । सारस्वतात्मज सामवान्विख्यात । शिवपदा योग्य तो स्वपदच्युत । स्त्री जाला सछेळें ॥ १९ ॥ पुरुषोन्नति गेली विसरोनी । मदनोत्तुंगता आली स्तनीं । चंपळाक्षी बिंबाधरा नितं-बिनी । कोमळांगी कुळस्वना ॥ २० ॥ मार्गी जाता सुमेधा । ह्मणे जी सर्वांगसुंदरा बुधा । सांडूनि कांताकंदर्पसुधा । कोठें जातां प्राणेशा ॥ २१ ॥ स्मरनिव्हळा स्वकांता । अव्हेरूं नये जी शास्त्रता । दोवे एकांतीं अहो शंकता । किमर्थ कोणाकारणें ॥ २२ ॥ तवं तेणें अव-लोकिलें । ह्मणे रे सखया काय जालें । येरी ह्मणे पुरुष नव्हे पाहिले । ममावयवविभवातें ॥ २३ ॥ येरु ह्मणे धरी धीर । नरक होती कारितां

---

१ लग्नसमय. २ विनोद. ३ सज्जन छळणानें.

व्यभिचार । यौवनदशेसी शरीर । नासोनि जाईल ॥ २४ ॥ पाप नेणे सुटे जिवासी । भोगणें लागे त्याचें त्यासीं । मी जाणें या शास्त्रार्थासी । माझेन हें न करवें ॥ २५ ॥ हे चि वाचिल्यापढल्याचें फळ । नश्वर सुखार्थ न चळावें सीळ । सागत परिसत हि कुश्चळ । तो वज्रखळ वर्जावा ॥ २६ ॥ तया राजदुर्जनाच्या बोलें । तुज हें जघन्य प्राप्त जालें । ह्मणौनि धार्मिकीं साांडिलें । पाहिजे दुष्ट सगासी ॥ २७ ॥ आतां उचलोनि पाउलें । सीघ्र नगराप्रति चाले । पुत्रवाक्य तुवां इछिलें । तैसें च होईल वो ॥ २८ ॥ काय करील पराधीना । अधोमुखें चाले लज्जायमाना । नगर प्रवेशली देखोनि आश्चिर्य वाटे जना । दाटी जाली मंदिरीं ॥ २९ ॥ देखोनि आइकोनि पुत्रवृत्त । शोक करितसे सारस्वत । जननी जाली स्नेहान्वित । कुरवाळितसे कन्यके ॥ ३० ॥ तिसीं सदशमुद्रा प्रीति वाटे । सारस्वताचें दुखें हृदय फुटे । अश्रुवृष्टीं कठ दाटे । आला राजसभेसी ॥ ३१ ॥ सर्वे वेदमित्र आणि सर्व लोक । पाहों दाटले सकाळिक । सारस्वत बोले करित शोक । पाहे मम पुत्र पार्थिवा ॥ ३२ ॥ तुझेन बोलें हे पुत्रदशा । मम सततीसी जाली निराशा । पुत्रेंविण पावलों सर्व क्लेशा । साग आता काय करूं ॥ ३३ ॥ भूप शापभयभीत । ह्मणे मी शिवार्चनमहिमा अविज्ञात । विनोदें करूं गेलों तव बहुत । अनर्थ चि जाला ॥ ३४ ॥ मग महर्षीतें पुसे राजा । काय करावें पुसतकाजा । ते ह्मणती रे महीभुजा । शिवगौरिकृत अनिवार ॥ ३५ ॥ तथापि रायें प्रार्थिला भरद्वाजमुनि । ते दोघे मित्रें सकन्यापुत्र घेऊनि । त्रिरात्र तीव्रव्रतें भवानी । आर्यिली अनन्यभावें ॥ ३६ ॥ ते जगन्मगळा प्रत्यक्षा जाली । जेसीं कोटि राकेंदुरस्में प्रकाशली । सर्व शोभासोभाग्यें अर्चिली । माग- वर ह्मणे वरदा ॥ ३७ ॥ येर ह्मणती हा यथापूर्व करी । अबा बोले भक्तकृत न निवारी । माते ब्राह्मण अपुत्र ससारीं । नाभि नाभि ह्मणतसे ॥ ३८ ॥ यासी पुत्र होईल सर्व पुरोत्तम । हें माझें वरदान परम । हे कन्या सुमेधा स्त्री

---

१ कृत्य. २ पूर्ण चंद्राचीं किरणें.

करा जे मम । भक्तया पूजी सीमंतिनी ॥ ३९ ॥ ऐसी प्रसन्न जाली भवानी । जे रामरामदासकुळस्वामिनी । जे प्रसिद्ध चि ये त्रिभुवनीं । परम पूज्य सदैव्यं ॥ ४० ॥ असों हे सर्व हि संतुष्ट जाले । देव्या अदृष्य हे स्वस्थाना आले । सारस्वता पुत्ररत्न जालें । सुमेधा दिधली कन्या ते ॥ ४१ ॥ ते परम सुंदरा सामवती । प्रसन्न जाली हेमवती । सुखें पावली प्रियपति । येथेष्ट भोग भोगिती ॥ ४२ ॥ ऐसें हें शिवार्चकाख्यान । श्रोतयावक्तया मंगळायन । उमामहेश तोषायमान । गातां आइकतां भावें ॥ ४३ ॥ त्याचें करितां पूजन । सायोज्यता पावती जन । यथाशक्तया हि दुर्जन । सज्जन सुख पावती ॥ ४४ ॥ ऐसा शिव कारुण्यनिधि । ज्याचे स्मरणें सर्व सिद्धि । त्याचें चरित कृतबुधि । परिसोत पुढें प्रेमळ ॥ ४५ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिवमहिमावर्णने । शिवपूजकसामर्थ्यवर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ३४ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

ॐनमो विचित्रा पंचवक्त्रा । नमो विचित्राभरणा विचित्रनेत्रा । विचित्रलीळा विचित्रा । भवबोधा विनाशना ॥ १ ॥ विचित्रचरिता विश्वंभरिता । विचित्रगुणा अगुणानंता । विचित्रवरदा भयत्राता । विचित्रापदापहारका ॥२॥ अकळा सकळागमशास्त्रार्था । निखळा अखळार्तिहरा समर्था । नमो सुरनाथा नाथा सुरार्था । शंभु स्वयंभु स्वतंत्रा ॥३॥ नमो विचित्र विश्वविकासका । नमो विचित्र कर्माकर्मप्रकाशका । नमो विचित्र यातना विध्वंशका । विचित्र कथाश्रवणमात्रें ॥ ४ ॥

प्रसन्न होय । याचें आश्चर्य असे काय । शिवभक्तार्चन तरणोपाय । तें चि बोलिजेतसे ॥ ८ ॥ अवंति नगरि मनोरमा । तेथें ब्राह्मण मदर नामा । त्यक्ताचार अजामेळोपमा । अनाचारता जयाची ॥ ९ ॥ पिंगळा नामें पत्नांगना । तयेसीं रत न शंके जना । सांडूनि आपुलिया सदना । रात्रिदिवस तिचा घरीं ॥ १० ॥ तव कोण्हीएके काळवेळीं । रुषभ नामा दैववळी । शिवयोगि तिचा राउळीं । आला वायुपुत्रपरि ॥११॥ तयासी देखोनियां येतां । दोघां उपदपति पतिता । तद्दर्शनमात्रे सुबुद्धिता । बाहेरि येऊनियां वंदिले ॥ १२ ॥ तिहीं दोघीं आरंभली सेवा । आसनीं बैसाविलें अपरदेवा । सर्वोपचारीं धृत सद्भावा । पुजा केली तयाची ॥ १३ ॥ तीर्थप्राशन केले भावें । मस्तकीं वंदिले दैवें । भोजन तांबूल देऊनि स्तवें । निद्रा करविली परियकीं ॥ १४ ॥ दोघीं केलें चरणसंवाहन । परमानदें अभिवदन । रात्रौ करूनियां शयन । प्रातःकाळीं गेला तो ॥ १५ ॥ इतुकें दुष्कृतामाजीं सुकृत । तयासी घडलें अकस्मात । स्वकाळें आरंभला अंत । कृतकर्मगति पावलीं ॥१६॥ शिवभक्तार्चनें विप्र अमंगळ । जाला दशार्ण धरणीपाळ । वज्रबाहो नामें विशाळ । पराक्रम जयाचा ॥ १७ ॥ तया कुटुंबिनी जाली सुमति । ते असतां पुत्रचिन्हें गर्भवति । मछरा प्रवर्तली तिची सवति । गरळ घातली चोरूनियां ॥ १८ ॥ तथापि ते दैवयोगें वाचली । अति दुःखें कृशांगी जाली । असो पूर्ण दिवसीं प्रसवली । पुत्र जाला सुलक्षण ॥ १९ ॥ तो राजपुत्र देखोनि सपत्नि । चरफड़ लागली पडली प्रेत्नीं । गरळ बाळका घातली यत्नीं । सकीर्ण जालें रडतसें ॥ २० ॥ तें दोघे बाळक माता । आक्रंदती अति दुखता । निद्रा न ये सपत्नि जिता । दोघें साडिलीं वनांतरीं ॥ २१ ॥ रोग वियोग क्षुधा तृषा भयें । फुटती बाळकमातेचीं हृदयें । पदींपदीं आडखुळोनि पडे रडे जाये । भळतिचकडे निर्जनीं ॥ २२ ॥ सर्वांग बदरी खादिरीं चिरलें । तृणसिखाकंटकीं खिळिउीं पाडलें । काय करिल विलाप करित चाले । पुत्राचिये-कांकुलती ॥२३॥ तव वणिजवाट सापडली । तेणें च

मार्गे लागली । जातां जातां पावली । येका वैश्यनगरासी ॥ २४ ॥ तेथिचे लोक अति धार्मिक । नारी पाहों पातल्या कौतुक । तिहीं परिसोनि सांगितिलें सकळिक । नगरेश्वरा पद्माकरा ॥ २५ ॥ तेणें राहविली मुसदनीं । प्रतिपाळी मातृस्थानीं । वैद्य औषधें अनुदिनीं । योजी परोपकारार्थ ॥ २६ ॥ तवं होणाराची भिन्न गति । वैद्यऔषधें जरी वांचती । तरी, कां कृतांत दुर्वार ह्मणती । विटंबती वियोगें ॥ २७ ॥ असो नाना यत्न करितां । बाळक निमाला दुखता । रोगिणी वियोगिणी राजकांता । शोक करी आक्रंदे ॥ २८ ॥ तिचा दीनवदनें विलाप । आइकतां लोक शोकरूप । शांतवन करूं जाती ते अमूप । अश्रुधारा सांडिती ॥ २९ ॥ तो वैश्य पद्माकर नगरपाळ । परदुखें परम विकळ । सज्जनहृदय अति कोमळ । नवनीतापरिस हि ॥ ३० ॥ नवनीत स्वसंतापें द्रवे । सज्जन देखोनि आइकोनि मार्दवे । परताप निरसी स्वभावें । जिवें सर्वस्वें श्रमोनि ॥ ३१ ॥ असो परम शोक-सागरीं । बुचकळत असतां तयेसी नगरीं । तवं शिवयोगि रुषभ ते अवसरीं । पातला पुराविख्यात जो ॥ ३२ ॥ तेणें विवेकवैराग्यवचनीं । शांतवन मांडिलें मानिनी । ह्मणे शोक सांडी स्थिर मनीं । परिस प्रपंचरचना हे ॥ ३३ ॥ हा वियोग दुखाचें रूप । मरत रडत च गेले अमूप । येथें वाचावयाचा सौक्षेप । बहुतीं केला बहुत च ॥ ३४ ॥ परि तो सर्व हि व्यर्थ जाला । जितुका आला तितुका गेला । जो कोण्ही चिरंजीवी केला । तो हि नेला स्वकाळें ॥ ३५ ॥ कल्पायुषी जे सुरगण । ते हि कल्पांतीं पावती मरण । ब्रह्मादि प्रकृति पावती निर्वाण । तेथें मनुष्य तें किती ॥ ३६ ॥ जितुकें दिसे तितुकें नासे ऐसिया श्रुति । अर्थविशेषें गर्जती । इंद्रजाळ मृगजळ मेवाकृति । स्थिर कैंचि पाहे पां ॥ ३७ ॥ या च कारणें वैरागी । सर्वसंगपरित्यागी । अथवा प्राक्तनवशें वर्ते जगीं । तरि हें मिथ्या जाणोनि ॥ ३८ ॥ पुत्र संपदा कदा न हर्षे । वियोग होतां न

१ अनिवार. २ यत्न, खटाटोप.

विमर्षे । स्वकीय तनुंता न स्पर्षे । होणार होता अविकंप ॥ ३९ ॥ आतां जरि जन्म मृत्यु निरशूं इछिसी । तरि शरण जाईं मृत्युंजयासी । उमापतिवांचूनि कवणासी । सामर्थ्य आहे यदर्थी ॥४०॥ तो च जन्म जरा मरण । दुख दारिद्र भय निर्वाण । जवं सांबेशवा न ये शरण । प्राणी भावें अनन्यें ॥ ४१ ॥ येरि वोले शोकाक्रांता । भवदवलोकन पावले आतां । मरणें तन्हि पालटली हे ममता । रक्षा तन्हि निवेलि ॥ ४२ ॥ कारुण्य देखोनि कृपानिधि । द्रवला शिव- योगि उदारधी । स्मरोनि पूर्वपुण्य पूजाविधि । मृत वाळक उठविला ॥ ४३ ॥ शिवमंत्रें मत्रूनि विभूति । वाळकप्रेतावरी टाकी सुमति । तत्काळ सजीव जाली आकृति । पद्मनेत्र उघडिले ॥ ४४ ॥ मृत जिवविला नदन । सकळीं केलें अभिवंदन । येरीं उचलूनि चुंविलें वदन । आळंगी सुखविन्हळा ॥ ४५ ॥ तयाचया चरणारविंदावरि । सुरकुंडी घाली जैसी भ्रमरी । येरे प्रेमें उठविली कुमरी । जैसी मरणीं रक्षूनि ॥ ४६ ॥ सन्मुख वैसऊनि वाळकेसी । गरळवेथा निरसा- वयासी । पुनरपि मत्रूनि विभूतीसी । स्वहस्तस्पर्शे लाविलें ॥ ४७ ॥ तेणें दिव्य शरिरें जाली । तत्काळ सुरशोभा आली । वरद वोलिला वोलि । यावजन्म अजरा होसी ॥ ४८ ॥ हा तुझा पुत्र वज्रायुधी । हें च नाम याचें विशेषीं । कीर्ति करिल अमानुषी । राज्य पावाल आपुलें ॥ ४९ ॥ या वैश्याचिया नगरीं । सुखें राहाणें तववरि । जवं तव पुत्र अभ्यास करी । धनुर्विद्यादि विद्यांचा ॥ ५० ॥ ऐसा तो शिवयोगि रुपभ । जननी वाळक करूनि सुप्रभ । यथेछागमन निर्दंभ । देशांतराप्रति गेला ॥ ५१ ॥ ऐसा शिवभक्तभस्ममहिमा । पुढें हे च कथा मनोरमा । परिसा जयासी शिवप्रेमा । नित्य नूतन अनुदिनीं ॥ ५२ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिव- महिमावर्णने । मंदरविप्राख्यानवर्णन । नाम प्रकरण समाप्तम् ॥ ३५ ॥

---

१ असतुष्ट होणें. २ पार्वतीसहित श्रीशंकरास.

॥ श्रीरामो जयति ॥

जयजय जी विश्वरा । जयजय जी परमोदारा । जयजय जी आश्रितनिर्भरा निर्भयकरा । सदाशिवा शिवप्रदा ॥ १ ॥ शिवयोगि गतभर्वी । उभयतां पूजिला होता सद्भावीं । त्यामध्यें दशार्णदेशें सर्वेभवीं । ब्राह्मण जाला वेश्यारत ॥ २ ॥ वेश्या जे का पिंगळा । ते पावली तद्‌र्चेनफळा । चंद्रांगदराजवाळा । सुमंतिनीसुता कीर्तिमालिनी ॥ ३ ॥ भद्रायू बाळसूर्यापरि । वाढों लागला वैश्यमंदिरीं । वैश्यपुत्र सुनयनामा सुपारि । सखा जाला तयाचा ॥ ४ ॥ दोघे क्रीडती उदारांग । संस्कार केले पद्माकरें सांग । गुरुसेवक महाभाग । सकळ विद्यापरिपूर्ण ॥ ५ ॥ या नंतरें राजकुमार । षोडशाब्दीं तरुणाकार । होतां पातला योगेश्वर । ऋषभाभिधा शिवभक्त ॥ ६ ॥ ते देखोनि राजजाया । पुत्र वरी घातला पायां । पुनः पुनः प्रणमूनियां । परमानंदें पूजिला ॥ ७ ॥ तया उभयाचेनि पूजनें । योगेश्वर संतुष्टला सुमनें । तयांसी बोले प्रसन्नाननें । परम प्रीतिकरूनि ॥ ८ ॥ कुशल आहेसि किं ताता । कुशला आहे तुझी माता । गुरुसेवा करूनि सुव्रता । सद्या विद्या पावलासि किं ॥ ९ ॥ माझें स्मरण तव मनीं । अचळ आहे किं अनुदिनीं । हें आइकोनि सुखाश्रु नयनीं । पुत्र घाली तत्पदावरी ॥ १० ॥ तूं च याचा प्राणदाता । तूं च याचा गुरु तत्वता । तूं या उपदेश करावया स्वतां । अनाथा पित्रुत्यक्तासी ॥ ११ ॥ ऐसा देखोनि परमादर । सन्मार्ग उपदेशी करुणाकर । त्रैसजूनि सन्मुख योगेश्वर । बोलता जाला ॥ १२ ॥ श्रुतिस्मृतिपुराणीं । वर्णाश्रमधर्म वर्णिले वाणीं । ते आचरावे अंतःकरणीं । दृढ भाव धरूनियां ॥ १३ ॥ सर्वदा चाल सन्मार्गीं । प्राणांतीं नको कुमार्गीं । देवाची आज्ञा वाहे जगीं । देवहेळन करूं नये ॥ १४ ॥ गो विप्र गुरु देवाचा । सेवक होई साचा । चांडाळा हि अतिथीचा । अव्हेर न करी सर्वथा ॥ १५ ॥ सत्याचें करावें संरक्षण । याचूनि वाचवणें गोब्राह्मण । देवस्व ब्रह्मस्व परस्व परस्त्रीरमण । याची तृष्णा

१ ऋषभ नावाचा. २ आनंदी मुद्रेनें.

तजी दूरि ॥ १६ ॥ सत्कथा सदाचारी । सद्वर्मी सदा गमनीं तृष्णा धरी । सदा सर्वसंग्रहो करी । धर्मादिकाचा स्वयें ॥ १७ ॥ स्नान संध्या स्वाध्याय जप होम । गो देव अतिथि पूजिता सप्रेम । पितृतर्पणादिकीं सुकर्मीं धृतनेम । आळस्य कदा न करावा ॥ १८ ॥ क्रोध द्वेष भय षडवृत्ति । पैशून्य कौटिल्य असत्संगति । दंभ उद्वेगादि कुस्थिति । वर्जाविया प्रयत्नें ॥ १९ ॥ क्षात्रधर्मीं हि अयुधें अहिंसा । युद्धीं हि शरणागत रक्षावा सहसा । शुष्क वैर मिथ्यालाप अपयशा । तजी स्वस्तव परनिंदा ॥ २० ॥ मित्री करावी सुखमया । दुखितासी करावी दया । प्रेम पुण्यवंत संग तया । उदासता कुबुद्धीसी ॥ २१ ॥ अत्याहार अतिक्रोध अतिनिद्रा । अतिश्रम अत्यालाप अतिक्रीडा महींद्रा । मृगया द्युत पान स्त्री स्त्रीजित दुर्विषय सुभद्रा । अत्यासक्ति याची तजावी ॥ २२ ॥ अतिविद्या श्रद्धा अति । अतिपुण्य अतिख्याति । अत्युत्साह अतिस्मृति । अतिधैर्य धरावें ॥ २३ ॥ सकाम स्वस्त्रियेसी । सक्रोध स्वशत्रूसी । सलोभ पुण्यनिचयासी* । अधर्मीसी औदास्य ॥ २४ ॥ सज्जनासी अति प्रीति । पापाडासी अप्रीति । दुर्बोध दुर्मंत्राप्रति । बधिरपर पैशून्या ॥ २५ ॥ धूर्त लंड शठ क्रूर कितव[१] खळ । पतित नास्तिक अधम अमंगळ । याचा संग त्यजावा तत्काळ । दूरंत[२] परिवर्जावे ॥ २६ ॥ कुटुंबपुत्रवित्तात्यासक्ति[३] । नसावी असावी सदा शिवभक्ति । पत्नि पतिव्रता माता गुरु श्वशुरोक्ति । याचा विश्वास धरावा ॥ २७ ॥ अनाथ कृपण वृद्ध स्त्री बाळ । याचा करावा प्रतिपाळ । याचकासी द्यावें यथोक्त सकळ । कीर्ति यत्नें करावी ॥ २८ ॥ लक्ष्मी सत्कीर्तिसभर । पुण्य सत्कीर्तिस्तर । सत्कीर्ति शोभे गौरव । चंद्र जैसा किरणीं ॥ २९ ॥ मातापितागुरुकोप सोहावे[४] । पुत्रमित्रापराध न पाहावे । देशकाळशक्तियुक्तीनें करावें । सर्व कार्य सर्वदा ॥३०॥ स्नानसंध्यादि सुकर्मी अत्वर । निद्रा स्वभोजनीं सत्वर । अनतार्थगर्भ

---

* पुण्यसंचयाविषयीं. १ द्युट, द्युतकार. २ लांब अंतरावरून. ३ वित्त+अति+आसक्ति. ४ सहन करावें.

तजी दूरि ॥ १६ ॥ सत्कथा सदाचारी । सद्वर्ती सदा गमनीं तृष्णा धरी । सदा सर्वसंग्रहो करी । धर्मादिकाचा स्वयें ॥ १७ ॥ स्नान संध्या स्वाध्याय जप होम । गो देव अतिथि पूजितां सप्रेम । पितृतर्पणादिकीं सुकर्मीं धृतनेम । आलस्य कदा न करावा ॥ १८ ॥ क्रोध द्वेष भय पठवृत्ति । पैशून्य कौटिल्य असत्संगति । दंभ उद्वेगादि कुस्थिति । वर्जाविया प्रयत्नें ॥ १९ ॥ क्षात्रधर्मीं हि अयुधें अहिंसा । युद्धीं हि शरणागत रक्षावा सहसा । शुष्क वैर मिथ्यालाप अपयशा । तजी स्वस्तव परनिंदा ॥ २० ॥ मित्री करावी सुखमया । दुखितासी करावी दया । प्रेम पुण्यवंत संग तया । उदासता कुबुद्धीसी ॥ २१ ॥ अत्याहार अतिक्रोध अतिनिद्रा । अतिश्रम अत्यालाप अतिक्रीडा महींद्रा । मृगया द्युत पान स्त्री स्त्रीजित दुर्विषय सुभद्रा । अत्यासक्ति याची तजावी ॥ २२ ॥ अतिविद्या श्रद्धा अति । अतिपुण्य अतिख्याति । अत्युछाह अतिस्मृति । अतिधैर्य धरावें ॥ २३ ॥ सकाम स्वस्त्रियेसी । सक्रोध स्वशत्रूसी । सलोभ पुण्यनिचयासी* । अधर्मीसी औदास्य ॥ २४ ॥ सज्जनासी अति प्रीति । पापांडासी अप्रीति । दुर्बोध दुर्मंत्राप्रति । बधिरपर पैशून्यां ॥ २५ ॥ धूर्त लंड शठ क्रूर कितव खळ । पतित नास्तिक अधम अमंगळ । याचा संग त्यजावा तत्काळ । दूरतः परिवर्जावे ॥ २६ ॥ कुटुंबपुत्रवित्तात्यासक्ति । नसावी असावी सदां शिवभक्ति । पत्नि पतिव्रता माता गुरु श्वशुरोक्ति । याचा विश्वास धरावा ॥ २७ ॥ अनाथ कृपण वृद्ध स्त्री बाळ । यांचा करावा प्रतिपाळ । याचकासीं यावें यथोक्त सकळ । कीर्ति यत्नें करावी ॥ २८ ॥ लक्ष्मी सत्कीर्तिसंभव । पुण्य सत्कीर्तिस्तव । सत्कीर्ति शोभे गौरव । चंद्र जैसा किरणीं ॥ २९ ॥ मातापितागुरुकोप सोहावे । पुत्रनिप्रापराध न पाहावे । देशकाळशक्तियुक्तीनें करावें । सर्व कार्य सर्वदां ॥३०॥ स्नानसंध्यादि सुकर्मी अत्वर । निद्रा स्वभोजनीं सत्वर । अनंतार्थगर्भ

* पुण्यसंचयाविषयीं. १ दुष्ट, द्युतकार. २ लाव अतरावरून. ३ वित्त+अति+आसक्ति. ४ सहन करावे.

अल्पाक्षर । ऐसें वाक्य बोलावें ॥ ३१ ॥ गुरुअवज्ञा ब्राह्मणा पापासी । भीत असावें अहर्निशी । कुटुंबब्राह्मणपंक्तिभोजनासी । अवंचक असावें ॥ ३२ ॥ संत आणि सत्कथा । सद्धर्म आणि सत्पथा । विमुख न व्हावें सर्वथा । सन्मुख न व्हावें अधर्मा ॥ ३३ ॥ पुण्य-देशीं ब्रह्मसंकुळीं । वसावें शिवान्वितीं सुप्रेमळी । गणिकाकामिककुटिळ-कुकर्मस्थळीं । न वसावे सर्वथा ॥ ३४ ॥ विप्र यति नियमी पुण्य तरुवर । पुण्य नदी पुण्य तीर्थ महत्सर[1] । धेनु वृष रत्न पतिव्रता सुर-गृह सुर । सदा अभिवंदावे ॥ ३५ ॥ प्रातःकाळीं होता जागृत । नमस्कारावा स्वगुरु उमाकांत । लक्ष्मीनारायण ब्रह्मा एकदंत[2] । स्कंद[3] कार्त्यायनी[4] सरस्वति ॥३६॥ इंद्रादि लोकपाळ । पुण्यश्लोक ऋषि निर्मळ । स्मरावे उद्यद्भानुमंडळ[5] । अवलोकूनि वंदावें ॥ ३७ ॥ फळ पुष्प गंध तांबूल । भक्षभोज्यादि भोग सकळ । शिवार्पण करूनि विमळ । मग आपण सेवावे ॥ ३८ ॥ दानधर्मादि सुकृत । शिवार्पण करावें सुकृत । काळोचित जें जें स्वकृत । शिवस्मरणें शिवार्पणें ॥ ३९ ॥ रुद्राक्षा-भरणाळंकृताकृति । भाळफलकीं त्रिपुंड्र विभूति । सदा सदाशिव-नामस्मृति । ध्यावे चरण शिवाचे ॥ ४० ॥ असो रूपमें सांगितले सर्व धर्म । वर्जिले सर्व अधर्म । ते कवणा वर्णवती आतां शिवमर्म । शिव-कवच सांगतु ॥ ४१ ॥ हृत्पंकजीं परमेशान । ध्यावा स्वप्रकाश दैदि-प्यमान । लीला साकार सच्चिदानंदघन । सायुध साळंकार ॥ ४२ ॥ करावे षडक्षर षडंगन्यास । कल्पावें शिवमय कवच शरिरास । शिवा सर्वात्मया उद्धरीं पतितास । नामस्मरणें हरी पापें ॥ ४३ ॥ सर्वभया-पासूनि सर्वत्र सर्वदा । रक्षीं शिवा सर्वव्यापका परमानंदा । भूतात्मया पंचभूतीं रक्षीं सावदा । सर्वज्ञा सदा सर्वेशा ॥ ४४ ॥ चतुर्मुखा त्रिनेत्रा नीलप्रकाशा । विद्युत्पुंज प्रदीप्त पीतप्रकाशा । विद्यावरदा भयकुठार पाणि परेशा । पूर्व दिशे रक्षावें ॥ ४५ ॥ कुठार वेदांकुश शूळपाशा ।

---

१ मोठें सरोवर. २ गजानन. ३ स्वामिकार्तिक. ४ पार्वती. ५ उगवणारें रविमंडळ.

कपाळढक्काक्षगुणधृक् महेशा । चतुर्मुखा त्रिनेत्रा नीळप्रकाशा । दक्षणे रक्षीं अघोरा ॥ ४६ ॥ शंख स्फटिकावदाता । वेदाक्षमाळा वरदाभय होता । चतुर्वक्त्र त्रिनेत्रा सद्योजाता । पश्चिमें मे रक्षात्रें ॥ ४७ ॥ वरदाभयाक्षमाळा टर्कहस्तक । वर्ण जैसा सरोजकिंजल्क । त्रिनयन चोरुं चतुर्मुख । वामदेव रक्षो उदीचि ॥ ४८ ॥ वेदाभयेष्टांकुशापाशहस्ता । कपाळढक्काक्षशूळधरा प्रपस्ता । पंचानना सिवद्युतिसमस्ता । ऊर्ध्वें रक्षीं ईशाना ॥ ४९ ॥ मूर्द्धी रक्षू चंद्रशेखर । भाल बाळशशांकधर । नेत्र त्रिनेत्र रक्षू विश्वेश्वर । मम नाशिकें सर्वदा ॥ ५० ॥ श्रुतीं वसो श्रुतिगीत कीर्ति । वक्त्रीं असो पंचवक्त्रमूर्ति । जिव्हा रक्षू वेदजिव्हस्फूर्त्ति । कंठी नीळकंठ मज रक्षू ॥ ५१ ॥ पाणिद्वयीं बाहुमूळीं । पिनाकपाणि धर्मबाहु सर्व काळीं । वक्ष दक्षयज्ञघ्नक पाळी । उदर रक्षू गिरींद्रधन्वा ॥ ५२ ॥ मध्य रक्षू मदनांतकृत । नाभि रक्षू हेरंबतात । कटि धूर्जटि अव्यात । कुबेरमित्र उरुद्वय ॥ ५३ ॥ जानुद्वयीं जगदीश्वर । जानुनी पुंगवकेतु ईश्वर । पादौ सुरवंद्यपाद निरंतर । मजलागीं रक्षू ॥ ५४ ॥ दिनादि यामीं महेश्वर । मध्य यामीं वामदेव ईश्वर । त्र्यंबक त्रितिय प्रहर । रक्षू चतुर्थ वृषभध्वज ॥ ५५ ॥ निशीं प्रथम याम चंद्रशेखर । द्वितिय निशायामीं गंगाधर । तृतिय यामीं गौरीहर । चतुर्थी संरक्षू शंकर । मृत्युंजय मृत्युपासूनि ॥ ५६ ॥ अतस्थ शिव रक्षो अंतरीं । स्थाणु बाह्य रक्षू निरंतरीं । अंतर्बाह्य त्रिपुरारि । सदा संरक्षू सदाशिव ॥ ५७ ॥ तिष्टतां रक्षू भुवनैकनाथ । प्रमथाधिनाथ क्रमितां पथ । निपर्णता वेदांतार्थ । रक्षू शुपुतीं सदाशिव ॥ ५८ ॥ शैव्यादि दुर्गीं

त्रिपुरारि । अरण्यवासादि प्रवासीं भवारि । भयापासूनि भयहारी । रक्षू वीरभद्र मज ॥ ५९ ॥ भूतपिशाचचोरव्याघ्रादि विविधें । विदारूत काळाग्नि रुद्रायुधें । भयद भीषणें प्रसिद्धाप्रसिद्धें । हरूनि रक्षूत मजलागीं ॥ ६० ॥ दुश्चिन्ह दुःस्वप्न दुःशकुन । दुर्गति दुर्भिक्ष दुर्व्यसन । उत्पातविपभयग्रहोग्रपीडन । निवारूनि ईश मज रक्षू ॥ ६१ ॥ ॐनमो भगवते सदाशिवाय । नमो सर्वलोकैकनाथाय । नमो निखळ सकळ तत्वात्मकाय । वरदावरेण्याय नमो नमः ॥ ६२ ॥ सकळ स्तव तव महिमार्णवा । न पवति कदा सदाशिवा । तवार्चन ध्यान दुष्कर देवा । भावें पावसी जिवातें ॥ ६३ ॥ तू अनाम बहुनाम नेमें । नाकळसी आकळसी प्रेमें । श्रुति शेप सिणलीं वर्णितां महिमे । इतरां पाड तो किती ॥ ६४ ॥ ऐसिया शंकरा शरण तुज । तव कवच हें लेववी मज । शिवयोगि रुपभराज । राजपुत्रा प्रबोधी ॥ ६५ ॥ सदाशिवकवच लेईल प्रेमें । त्याची सर्व हि बाधा शमे । सर्वसंतोप पावे नेमें । पापें हरती पूजितां ॥ ६६ ॥ मंगळदायक शिवकवच । पढेलि अथवा पूजिल साच । त्यासीं दुःख दारिद्र रोग वियोग न बाधी कांहीं च । अंतीं पावे शिवपद ॥ ६७ ॥ ह्मणौनि वत्सा आदरें । तू हें शिवकवच पैंठिरें । सर्वदा स्वानंदें विहरे । नित्यानंदें निर्भय ॥ ६८ ॥ ऐसें बोलोनि रुपभ योगि । दिव्य शंख दिधला तयालागीं । खड्ग दिधलें युद्धप्रसंगीं । शत्रुचक्रांतक जें ॥ ६९ ॥ पुनर्भस्म अभिमंत्रिलें । स्वहस्तें तच्छरीरीं चर्चिलें । तेणें अविकळ बळ जालें । द्वादशसहस्र दंतींचें ॥७०॥ रुपभ ह्मणे हें पड्ग तीक्षणधार । तपोमंत्रें मंत्रित अनिवार । यासी देखतां चि दुर्द्धर । शत्रु मरती भयें चि ॥ ७१ ॥ या शंखाचे निर्नादें । तडकती शत्रुचक्राचीं दोंदें । मूर्छित पडती भयदें । शस्त्रें गळती हातींचीं ॥ ७२ ॥ या शंखखड्गप्रभावें । शिवकवचभस्मभावें । द्वादशसहस्रगजशक्तिप्रभवें । अजित शत्रु जिंतिसी ॥ ७३ ॥ स्वराज्य सिंहासन

---

१ स्तवत ? २ धारण करील ३ वत्सा ४ पाहीं रे ? ५ शत्रूच्या व्यूहाचा नाश करणारे. ६ हत्तींचें. ७ खड्ग. ८ पदशब्दानें.

पावसी । अतुळ पृथ्वीपति होसी । अशिंपगर्भ निरोपूनि तयासी । यथेच्छा गेला शिवयोगी ॥ ७४ ॥ असो दशार्णभूभुज वज्रभुज । तयावरि चालिला मागधराज । हेमरथनामा चतुरंग सज्ज । करूनि सेना अनिवार ॥ ७५ ॥ युद्ध जालें घोरंदर । वज्रबाहु धरिला सहपरिवार । उपहत केलें नगर । हें वज्रायुपें परिसिलें ॥ ७६ ॥ सिंव्हरोषें गर्जायमान । वैश्यपुत्रसहवर्तमान । अश्वारूढ पावला जैसा पवन । हाकारिलें शत्रूसी ॥ ७७ ॥ हेमरथ हि महावीर । वज्रायुपी अपर सुरेश्वर । जैसे प्रळय घन गंभीर । तैसे गर्जती शर वर्षतां ॥ ७८ ॥ मर्दूनि एक महारथी । वज्रायुप आरूढला ते रथीं । वैश्यपुत्र मित्र सारथी । शैन्य संव्हारी शत्रूचें ॥ ७९ ॥ स्मरोनि गुरुचें अहिंसावचन । शंख त्राहाटिला कृतांतस्वन । खड्ग पडताळिलें देदिप्यमान । तेणें अचेतन रिपू जाले॥८०॥ मग सोडविलें जननीजनका । राजपरिवारासीं सर्व लोकां । सर्व संपतिगोधनादिका । सर्व हि वंदिती तयासी ॥ ८१ ॥ राजा विनवी कर जोडूनि । तूं कोण जी आमचा सर्वस्वदानी । काय सुरवर नरवेष धरूनि । कृपा रक्षिलें आमतें ॥ ८२ ॥ वज्रायुप ह्मणे राया । हा समयो नव्हे सर्व सांगावया । भद्रासी जावें सहजनजाया । चिंता सांडीं शत्रूची ॥ ८३ ॥ प्रस्तुत या मित्राचे घरीं । मातेसहित वास्तव्य करीं । आतां मी तेथूनि ये तोंवरि । सोडूं नको शत्रूतें ॥ ८४ ॥ मग तो सर्व समाचार । मातेसी सांगे कुमर । येरी वोवाळी हर्षनिर्भर । सुखाश्रू नयनीं लोटले ॥ ८५ ॥ असो ऐसें जालियावरि । रुपभ आला नैपधनगरीं । सांगोनि वज्रायुपाची थोरी । मागे कन्या कीर्तिमालिनी ॥ ८६ ॥ ते सुमंतिनीची नंदनी । सुंदर सुलक्षण विश्ववंदिनी । मातापिता संतुष्ट स्वजनी । यथायोग्य जामात ॥८७॥ मग सुदिनीं महोत्छाहेसीं । पाचारूनि वज्रायुपासी । लग्न लाविलें संभ्रमेसीं । पिता परिवारेसीं आणिला

१ (?) २ दशार्ण देशाचा राजा वज्रभुज नावाचा. ३ हेमरथ नांवाचा मगधदेशाचा राजा. ४ भयंकर समर. ५ नाश केला. ६ यमाच्या आरोळी प्रमाणें ज्याचा आवाज आहे असा. ७ शकरदर्शनार्थ. ८ वज्रायुपाची सावत्र आई ह्मणजे राजा वज्रबाहूची दुसरी बायको. ९ वैभवानें.

॥ ८८ ॥ जाला सर्व हि सोहळा । पुत्र श्नुषा देखोनि डोळां । वज्रबाहो ह्मणे भूपाळा । दैव धन्य कन्येचें ॥ ८९ ॥ तव जामात मम प्राणदाता। धीर वीर उदार दिव्यतनुता । हा कोण कोणाचा पुत्र आतां । सर्व सांग मजप्रति ॥ ९० ॥ राजा बोले हासोनि । हा तुझा पुत्र सहितजननी । जें तां सांडिली होती वनीं । रोगाक्रांते ह्मणोनियां ॥९१॥ यासी जोडली सत्संगति । तेणें जाली दिव्य कांति । प्रसन्न जाला पार्वतीपति । हा महिमा सत्संगाचा ॥ ९२ ॥ हा तुझा सुपुत्र भूपाळा । सर्व सांगितलें तया वेळा । तेणें जाला सुखसोहळा । मंगळ तुरें त्राहाटिलीं ॥ ९३ ॥ जालीं नमनें आलिंगनें । सुखाश्रु सांडिती सुनयनें । वोहरेंसहित सन्मानें । नगरा आला नरेंद्र ॥ ९४ ॥ काळेंकरूनि तो भूपति । स्वर्ग पावला पुण्यस्थिति । वज्रायुध राज्यस्थिति । चालवी परम धार्मिक ॥ ९५ ॥ सोडिला मागध हेमरथ शत्रु । तो जालासे परम मित्रु । ऐसा येैश्वर्य पावला राजपुत्रु । भगवद्भक्तभक्तिप्रसादें ॥ ९६ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिवमहिमावर्णने । वज्रायुधविभववर्णनं । शिवयोगि रुषभप्रसादस्तवनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ३६ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो स्वभक्त भक्तसंतुष्टा । पाहावया अंतरनिष्ठा । भलतिया वेषें वरिष्ठा । दर्शन देसी शंकरा ॥ १ ॥ तयाच्या तव अवलोकनें । दृढ निर्धार पाविजे मनें । मग स्तवावया तथा जनें । सत्व पाहिलेंसें दाविसी ॥ २ ॥ यन्हवीं निकुरें करितां शिव । कैंचें धारिष्ट धरितां जीव । तुझिये कृपेचें वैभव । आधीं च वरी तयातें ॥ ३ ॥ तुवां जयाचें सत्व पाहिलें । त्यांतून अपभ्रंशोन कोण राहिलें । परम संकटीं तुज चिंतीहिलें । तां च वाहिलें विमानीं ॥ ४ ॥ ह्मणौनि भुक्तिमुक्तिम-

क्विदानी । तूं चि परीक्षिता रक्षिता निदानीं । कोण सांभाळिता तुज-वांचूनि । दासालागिं दयाळा ॥ ५ ॥ भावें वंदितां सदाशिव । प्रेमें पालटोनिया जीव । स्वयें च जाला असे शिव । शिवलोकप्राप्तीसी ॥ ६ ॥ आतां परिसोत प्रेमळ । कथानुसंधानाचें मूळ । राज्य करितां तो निर्मळ । वज्रायुध स्वराष्ट्रीं ॥ ७ ॥ दूरि दवडूनिया दुखें । निर्भर सर्वदा सर्व सुखें । कीर्तिमालिनीसहित हरिखें । आला श्रृंगारवनासी ॥ ८ ॥ वनश्री शोभे वसंतकाळीं । विचित्र वृक्षांचिया वोळी । जळमेळिती जळपूर्ण आळीं । नव पल्लव आरक्त ॥ ९ ॥ शाखाग्रीं सुमनकळिकाघोष । सुमनें विकाशतीं सुतोष । नाना सुगंध सुरंग सुवेष । घ्राण नयन निववितीं ॥ १० ॥ तयाचिया परमामोदा । देवाआधीं भोग षट्पदा । पावोनि यथेष्ट विषयानंदा । गुंजारवें शिवस्तव ॥ ११ ॥ ठाइं ठाइं सुमनतरुत-ळीं । लिंगरूपी चंद्रमौळी । सहजपूजा सर्वकाळीं । गळितपुष्पीं होतसे ॥ १२ ॥ आम्रादि वृक्ष फळभारें । लवोनि आले शाखापदरें । कुकु-ळकुळ कूजें सुस्वरें । गायन करी शिवप्रिय ॥ १३ ॥ द्राक्षमंडपीं परम गोड । निर्बीज कृष्णद्राक्षाचे घड । सवनलें जाले अति जड । हळवेंट काय लवेलि ॥ १४ ॥ नाना रूपाच्या गवसणियां । घातलिया आच्छा-दावया । तन्हि मुमुक्षु पिपीलिका गवसूनियां । रस सेविती अखंड ॥ १५ ॥ आतां असो हे पाल्हाळ । नाना वृक्ष सदाफळें । शिवप्रसादीं कैंचें निर्फळ । सर्वकाळ शोभा संपूर्ण ॥ १६ ॥ स्त्रियांसहित सर्वसंतोषें । ते वनीं क्रीडतां वज्रायुधें । ब्राह्मण स्त्रीसहित वि-कळ वेषें । आक्रंदत धांवत देखिला ॥ १७ ॥ हाहाकारें करुणाकरि । महा व्याघ्रें मेळविली नारी । रक्षि रक्षि नृपकेसरि । शरण आलों तुज-प्रति ॥ १८ ॥ येरें धनुष्या लाविले बाण । आकर्ण वोढी सोडिले तीक्ष्ण । परि तो न मनी च घेतला प्राण । कंठ फोडिला विप्रवनि-

तेचा ॥ १९ ॥ महा व्याघ्रें विदारिली अंतुरी । देखोनि विप्र अति शोक करी । वल्लभे पतिव्रते मज सांडूनि ये अवस्थरीं । कैसी गेलीसी परलोका ॥ २० ॥ आतां मज कैंचा गृहस्थाश्रम । कोण माझा हरील श्रम । तुजवांचूनि कैंचा धर्म । रुदन करी गहिवरें ॥ २१ ॥ राया तुज देखतदेखता । व्याघ्रें मारिली माझी कांता । काय मी करूं सांग आतां । ऐसा परम आक्रंदे ॥ २२ ॥ काय जालें तुझें बळ । कोठें गेलें शौर्य सकळ । काय जाली अस्त्रविद्या विमळ । कोठें गेले खड्ग शंख ॥ २३ ॥ क्षतांपासूनियां तारी । तो च क्षेत्रि ऐसें संसारीं । तुवां केली स्वधर्महानि । धर्मेंविण धिग्जिणें ॥२४॥ तुझिये वनींचें श्वापद । तुज नावरे ऐसा मंद । शरणागत न रक्षवे हा अपवाद । यापरिस मरण बरें ॥ २५ ॥ ऐसा आइकोनि विप्रविलाप । शोकदग्ध जाला भूप । मनीं विचारी तो सक्रप । यथार्थ बोले ब्राह्मण ॥ २६ ॥ आजि माझें यश कीर्ति पुण्य वैभव । पारुषलें विमुख जालें दैव । शरणरक्षणेंविण जिणें अधव । ह्मणोनि ब्राह्मण बुझावी ॥ २७ ॥ मस्तक ठेविला चरणावरी । ह्मणे जी हतप्रभासी कृपा करीं । सर्वथा तूं शोक न करी । देईन सर्व आपुलें ॥ २८ ॥ राज्य राणी हें शरीर । अंगिकारी तुज जें वर । ब्राह्मण बोले प्रत्युत्तर । काय करूं सर्व हे ॥ २९ ॥ आरिसा काय अंधासी । गृह काय भिक्षुकासी । पुस्तक काय मूढासी । निष्क्रियो काय संपदा ॥ ३० ॥ स्वदेहेसीं सर्वस्व देतां । दोघांसी हि आहे अधिकारता । कांता देता घेता उभयतां । निरयीं जाती असंशयें ॥ ३१ ॥ परस्त्रीसंभोगपातक । त्याहूनि बरा ब्रह्मघातक । मद्यपानाहूनि अधिक । परदारागमन हें ॥ ३२ ॥ तूं ह्मणसी देईन स्वकांता । ते मी काय करूं माता । तुज अरक्षणे निरयता । त्याहूनि विशेष हा दोष ॥ ३३ ॥ माझेनि स्वर्पवेना तयेसी ।

रजोस्नाता होईल प्रतिमासीं । त्या भ्रूणहत्याचिया राशी । पडती माथा कवणाच्या ॥ ३४ ॥ ऐसें आइकोनि उभय दुरितें । राजा जाला बहु भयभीत । आतां निरसावया सर्व दुरितें । देहो दग्ध करीन ॥ ३५ ॥ ऐसा मनीं निश्चयो केला । महाकुंडीं वन्हि धडाकिला । सर्वस्वास उदास जाला । शिव स्मरिला मानसीं ॥ ३६ ॥ सुस्नात सुसमाहित जाणा । त्रिवार केली प्रदक्षणा । उडी टाकावी तंव तत्क्षणा । प्रगट जाला शंकर ॥ ३७ ॥ पंचमुख त्रिनयन दशभुज । कोटिसूर्यासम सुखद तेज । मृणालगौर मृदु गज- । चर्म केलें परिधान ॥ ३८ ॥ विचित्र व्याघ्राजिन उंचरी । दशायुधें दश हि करीं । अर्द्ध चंद्र शोभे भाळावरी । गंगाधर नागहार ॥ ३९ ॥ सर्वांगीं विभूतीची उटि । मुगुट कुंडलें बाहुभूषणें मुद्रिका बोटीं । मेखळा किंकिणी कटितटीं । चरणीं वांकी तोडर ॥ ४० ॥ ऐसा सर्वाभरणभूषित । वृषारूढ गौरी-कांत । पुढें देखे अकस्मात । वज्रायुध ते काळीं ॥ ४१ ॥ अंबरीं दाटलीं विमानें । सुर वर्षती सुमनें । इंद्रादि लोकपाळागमनें । जालीं सनकादि ऋषींचीं ॥४२॥ मंगळ तुरें गर्जती । सुरभारामध्यें भवानीपति । देखोनि अष्टभाव भूपति । बाष्पाश्रु पुलकें उभारले ॥ ४३॥ हर्षविन्हळ कृतांजळीं । स्तुति करितसे मंजुळीं । जयजय जी चंद्रमौळी । जयजय उमापति ॥ ४४ ॥ नमो सच्चिदानंदघना । नमो जगन्मया जगज्जीवना । करुणांभोधि पतितपावना । पावलासी अनाथा ॥ ४५ ॥ नमनपूर्वक नानापरी । भावें स्तविला त्रिपुरारि । पार्वतीसहित ते अवसरीं । बोले सुप्रसन्नता ॥ ४६ ॥ राया तुझिया नमनस्तवें । प्रसन्न जालों अनन्यभावें । आतां माग जें तुझेन जीवें । आवडे तें तें ॥ ४७ ॥ तुझें चित्त शोधावया । जें जें दाखविलें तितुकी माया । राजा पडोनि दिव्य पाया । मागता जाला ॥ ४८॥ मी आणि कीर्तिमालिनी । माझी मातापिता दोनी । वैश्य पद्माकर तत्कु-मर तव स्थानीं । पार्श्वगें करावीं ॥ ४९ ॥ यानतरें ते राणी । भक्त्या

प्रसाद्य शूळपाणी । वर मागे मधुरवाणीं । प्रसन्ना पंचाननातें ॥ ५० ॥ सीमतिनी आणि चंद्रांगद । पाववी आपुलें पार्श्वपद । तथास्तु ह्मणोनियां वरद । अदृश्य जाला देवासीं ॥ ५१ ॥ पावोनि शंकरवर यथेप्सित । किर्तिमालिनीसमवेत । भोग भोगूनि वर्षायुत । पुत्र राज्यीं स्थापिला ॥ ५२ ॥ वज्रायुध किर्तिमालिनी । मातापिता वैश्य दोनी । चंद्रांगद सीमंतिनी । सकळ आलीं शिवपदा ॥ ५३ ॥ ऐसें हें पवित्र पुण्य अख्यान । भावें करिती श्रवण पठन । ते इहक भोग विभव पावोन । अंतीं येती शिवपदा ॥ ५४ ॥ रुषभ शिवयोगि शुभद । विस्तरें वर्णिला विपद । आतां अन्यत्शिवयोगि वर्णनपद । सावद संतीं परिसावें ॥५५॥ • स्वस्ति श्रीम. । रामिराम. । शिवमहिमा. । वज्रायुध शिवपदप्राप्तिवर्णनं । नामप्रकरणं समाप्तम् ॥ ३७ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो नमो पतितपावना । परमानंददा पंचानना । हें अपूर्व नव्हे तव महिमाना । तव भक्त मुक्तिदायका ॥ १ ॥ तव भक्तदर्शनस्पर्षनभाषन । बहु जन्मार्जिताघविनाशन । तो तूं स्तवितां सद्भावें महेशान । तरता काय आश्चिर्य ॥ २ ॥ तव महिमा मंगळमय । याचें अपूर्व असे काय । भक्तचरित तरणोपाय । तव भक्तिप्रभावें ॥ ३ ॥ ह्मणौनि भक्तजनवछळा । भक्तसुलभा दीनदयाळा । नमन तुझिया चरणकमळा । करवीं धरवीं प्रत्यक्ष ॥ ४ ॥ आता आइकावें सादर । पुण्यश्रव मनोहर । भक्तचरित रुचिरतर । भुक्तिमुक्तिदायका ॥ ५ ॥ शिवयोगि वामदेव । महापुरुष महानुभाव । सदोदित स्वानुभव । सर्वसंगपरित्यागी ॥ ६ ॥ सर्व अवलक्षणमुक्त । सर्व योगलक्षणयुक्त । सर्वदां सदाशिवभक्त । अभेद अवेद महिमान ॥ ७ ॥ तो स्वेछा[1] विचरतां जनीं । भरला एके महा वनीं । अहेतुक विचरतां निजनीं । अपूर्व थोर वर्त्तलें ॥ ८ ॥ कोण्ही एक भयंकर । ब्रह्मराक्षस क्षुधातुर । जाणोनियां मनुष्याहार ।

---

१ आपल्या इच्छेनुसार.

भ्रांतेवक्र धाविनला ॥९॥ प्रगट विकेट दंतावळी। व्यथवित जिव्हा लाळी। सवेग बाहुयुग कवळी। योगी निर्भय निजबोधें॥१०॥शिवस्वरूप सदोदित। आपणासहित न देखे द्वैत । साकार निराकार भासे अद्वैत। आत्मत्व अखंड ॥ ११ ॥ द्वैतदर्शनें उपजे भय । अद्वैतानुभवें अभय। मनोवृत्ति चि असे तन्मय । जीवशिवीं समरस ॥ १२ ॥ उर्वरीत प्राक्तनें तनुताभास। भेटे परम सभाग्यास। जन्मजन्मांतरीं जयास । अशेष घडलीं साधनें ॥ १३ ॥ अतर्क्य तर्केना .लीळा। विसरला पसरल्या प्रपंचजाळा। देखत अदृश्या नित्य निर्मळा। आत्मरूपा अनुभवें ॥१४॥ निर्मळता आणि समळता। ज्ञानाभ्यास कोमळता। तो स्वंसवेद्य स्वतां। सर्वतता तद्रूप ॥ १५ ॥ ब्रह्मीं विश्व आभासत । ह्मणौनियां तें ब्रह्मोद्भूत । ब्रह्मीं च वर्त्ते तरी वर्त्तत । सागरतरंगन्यायें ॥ १६ ॥ उपजणें वर्त्तणें निवर्त्तणें। तरगता घडे न घडे सागरपणें । हें स्वयें सिंधु जाणे। आपआपणे नांदतु ॥ १७ ॥ तैसें पूर्वीं च स्वस्वरूप। मध्यें मिथ्या जीवत्वारोप । तेणेंकरितां योगसाक्षेप । तो च तो स्वयें स्वतसिद्ध ॥ १८ ॥ तों तो न भिये आपुलिये लीळे। सूर्य काय भिजेलि मृगजळें। तैसा स्वदेहेंसी जगज्जाळें। स्वसवेद्य तो सदा॥१९॥ धन्य तो योगी वामदेव। जया आठवे हि नाठवे भव। धन्य तयाचा अनुभव। देहीं दशा बाणली ॥ २० ॥ धन्य तो राक्षस भक्षावया। कवळूनि ठेला योगिराया। धन्य तें भस्मोद्धूलन धवळ काया। तें भस्म तया लागलें ॥ २१ ॥ वामदेवांगस्पर्शमात्रें। धौतकिल्बिष जालीं गात्रें। जातिस्मरण जालें विचित्रें। जन्मांतरें स्मरती ॥ २२ ॥ जैसें चिंतामणीस्पर्शें तत्काळ। धातु अधातु होती हेमें केवळ। तैसा ब्रह्मराक्षस अमंगळ। स्पर्शें हर्ष पावला ॥ २३ ॥ मुरकुंडी घातली चरणावरी। ह्मणे मी महापापी दुराचारी। दुर्बुर्ध्या स्पर्शता शरीरीं। सर्व स्मृति

१ व्याकुळ मुखानें. २ भयंकर. ३ आत्मज्ञानयुक्त असल्यामुळें. ४ ज्ञानस्वरूप वस्तु. ५ ज्याप्रमाणें लाटा समुद्रापासून उत्पन्न होतात व समुद्रांतच लय पावतात त्याप्रमाणें ब्रह्मापासून च या विश्वाची उत्पत्ति होते व त्यातच त्याचा लय व्हावयाचा. ६ उत्पत्ति, स्थिति आणि लय. ७ सुवर्ण. ८ दुष्ट हेतूनें.

पावलों ॥ २४ ॥ बहुतां दिवसाची तृषा क्षुधा । कारित होती परम बाधा । ते निरशली तत्स्पर्शसुधा । प्राप्त होतां हर्षलों ॥ २५ ॥ मी पतित अति दुर्बुद्धि । उद्धरीं करुणामृतवारिधी । स्पर्शमात्रें पावलों शुद्धि । तारीं कृपानुग्रहें ॥ २६ ॥ ऐसें देखोनि परमाश्चिर्यें । तया पुसिजे योगिवर्यें । तूं कोण कोण काळ कोणें अकार्यें । भोगिसी घोर यातना ॥ २७ ॥ ब्रह्मराक्षस ह्मणे स्वामी । पौथिवं पंचविसाविये जन्मीं मी । यवनराष्ट्रीं दुर्जय नामीं । होतों प्रसिद्ध पापात्मा ॥ २८ ॥ युवा पठ मदोत्कट । बहु स्त्रिया पारि परस्त्रीलंपट । नित्य नूतन स्त्रीसंभोगचट । धरूनि आणी बळें चि ॥ २९ ॥ स्वदेश परदेशीच्या नारी । एकदां भोगीं आणिल्यावरि । मग रक्षीं गृहांतरीं । नाना यातीचिया तया ॥ ३० ॥ त्यां भोगिलियावरि । पति तंवं नांगिकारी । मग त्या मरती माझा घरीं । पारि मज न ये घृणा ॥ ३१ ॥ मद्यपानें मदोन्मत्त । परस्त्रीसंग हत्या घडल्या बहुत । अंगना न गणती अगणित । तथापि संख्या परिसावी ॥ ३२ ॥ ब्राह्मणस्त्रिया भुक्ता बहुळा । सभर्तृका अभर्तृका रजस्वला । वर्णसंख्या स्मरे सकळा । अनुक्रमें सांगेन ॥ ३३ ॥ तीनि शतें विप्रनारी । राजस्त्रिया शतें च्यारी । सो शतें वैश्यकुमरी । सहस्र शूद्रयोषिता ॥ ३४ ॥ चांडाळी शत येक । पुलिंदस्त्रिया शत दशक । शैलुपांगना सहस्रार्द्ध रजक- । स्त्रिया शत चत्वारी ॥ ३५ ॥ वारांगना असंख्याता । त्यां भोगिल्या दुरात्मता । तऱ्हि माझिया दुष्ट चित्ता । जाली च नाहीं संतृप्ति ॥ ३६ ॥ शक्ति होती तंव पाप केलें । रोगें जितिलों मग राहिलें । जनीं स्वजनीं परित्यागिलें । मृत्यु पावलों स्वकर्में ॥ ३७ ॥ आयुष्यनाश अपयश । भाग्यभंग दुर्गतिविकाश । स्वर्गात्पतन पूर्वजांस । पुत्राचेन अधर्में ॥ ३८ ॥ मग मी स्वामी याम्यजेनीं । धरूनि नेलों जी बांधोनि । यथौघ निरयकुंडीं पचूनि । यातना नाना केलिया ॥ ३९ ॥

१ तुमचा अंगस्पर्श हेंच अमृत. २ कृपानुग्रहपूर्वानें. ३ पृथ्वीपति, राजा. ४ तरुण. ५ तों. ६ दया, करुणा ७ स्त्रिया. ८ अमित. ९ सहाशें. १० या नांवाची एक रानटी जात आहे. ११ ( शैल=पर्वत. ) डोंगरी लोकाच्या बायका. १२ धोबी. १३ रोगांनीं आपला पगडा बसविला. १४ यमदूतांनीं. १५ पापानुसार.

दोषावशेषें पिशाच । निर्जनीं वनीं जालों साच । सहस्र छिद्र दुःख संकोच । क्षुधातृषाक्रांत जी ॥ ४० ॥ दिव्य शरच्छत अवंघ्र । दुसरे जन्मी जालों व्याघ्र । तृतिय भवीं अजगर घोर । चतुर्थी वृक जन्मलों ॥ ४१ ॥ पंचम भवीं विडेरा हो । षष्ठीं सरड जालों पाहो । सप्तमीं मी श्वानदेहो । भोगी रति विटंबणा ॥ ४२ ॥ अष्टम भवीं वनश्वान । नवमीं वृषभता भोगून । दशमीं मृग कृष्णाॅनन । मर्कट एकादश भवीं ॥४३॥ द्वादश त्रयोदश चतुर्दश । गीध नकुळें काक वेश । पंचदश षोडश सप्तदशाष्टादश । भालु वनकुक्कुटें खरं मार्जार ॥ ४४ ॥ एकोनविंशतीं मंडुकें । विंशतीं कूर्मे उलुकें । एकविंशतीं द्वाविंशतीं दोषात्मक । वनेंमाहिष उपजलों ॥ ४५ ॥ त्रयोविंशतीं चतुर्विंशतीं । जालों शकटें वनदंती । पंचविंशतीं शमळाकृति । जालों ब्रह्मराक्षस ॥ ४६ ॥ क्षुत्पिपासासंकुळ । येथें आहे बहुकाळ । तव पावन तनु निर्मळ । देखिली दैवेंकरूनि ॥ ४७ ॥ भक्षाकारणें कवळिली । तव स्पर्शमात्रें तृप्ति जाली । पूर्वार्जिताची स्मृति आली । एवढा महिमा स्पर्शाचा ॥४८॥ एवढा महिमा तुझां ठाइं । कोणें योगें सांग ये समयीं । परमाश्चिर्य माझां हृदयीं । वाटत असे ये काळीं ॥ ४९ ॥ तीव्र तपें किं दृढ व्रतें दानें । किं काय दुर्गम तीर्थाटनें । किं उग्र मंत्र अनुष्ठानें । हठयोगें किं देवशक्तया ॥ ५० ॥ हें तत्वतां सांगें स्वामी नाथा । ह्मणोनि चरणीं ठेविला माथा । वामदेव ह्मणे सर्वथा । महिमा एका भस्माचा ॥ ५१ ॥ लागता मम देहस्थ भस्म । त्वद्देहदोष जाले भस्म । तेणें तुझां जीव अश्मैं—। सम तो स्मृति पावला ॥ ५२ ॥ या भस्माचें महिमान । कोण जाणे शिवावांचून । जेसा अकळ सकळा पंचानन ।

१ अवघ=एकदर सर्व २ लाडगा ३ विडारक=मांजर. ४ काळ्या तोंडाचा. ५ मुगुस. ६ कोल्हा. ७ रानकोंबडा ८ गाढव. ९ बेडुक. १० कासव. ११ घुबड. १२ रानह्मैस १३ गाडी, रथ, किंवा एका राक्षसाचें नांव आहे. १४ रानहत्ती. १५ शमल=नरक १६ भुकेनें व तहानेनें व्याकुळ. १७ दगडासारखा कठिण तुझा जीव असता ही माझ्या आंगच्या भस्मस्पर्शानें तो इतका मृदु झाला कीं तुला मागील जन्माची स्मृति झाली.

तैसा च भस्ममहिमा हि ॥ ५३ ॥ आतां प्रसंगें परिस कथा । जरी तरीं इच्छिसी दुःसह वेथा । शिवश्रवणेंविण सर्वथा । पतित नव्हे पावन ॥ ५४ ॥ शिवभक्ति श्रद्धावंता । भस्ममहिमा संक्षेपता । तुज मी सांगेन आतां । श्रवण करीं सादर ॥ ५५ ॥ पूर्वी तुजऐसा द्विजाति । ब्राह्मण होता मंदमति । सर्व धर्मबहिष्कृता कृति । द्राविड देशीं शूद्रेव ॥५६॥ सदा चोर वृषळीसंगीं । व्यभिचारकर्में तयालागिं । एकें शूद्रें निशा-भागीं । हाणोनि मारिलें जीवें ॥ ५७ ॥ तयाचें शव निंदिती जन । वोढून टाकिलें कैंचें दहन । भस्मपाद पातलें श्वान । तनूवरी तयाचें ॥ ५८ ॥ ललाटीं पोटीं बाहुमूळीं । चवडे उमटले वक्षस्थळीं । हें जाणोनि चंद्रमौळीं । विमानें प्रेरिले शिवदूत ॥ ५९ ॥ उजळित पातलें पोकळी । प्रकाश पडला भूमंडळीं । तवं तो बांधोनि कोलाहळीं । दूतीं नेइजे यमाचे ॥ ६० ॥ शार्करीं हिरोनि घेतला । दिव्यदेही तत्काळ केला । दिव्य विमानीं वाहिला । यमदूत ह्मणती तयांसी ॥ ६१ ॥ पापी बळात्कारें नेता । शिवदूत दाखविती प्रेता । भस्मांक उमटले देखता । तुमचा विषयो हा नव्हे ॥ ६२ ॥ शिवभूषण विभूति । नेतसे शिवसा-योज्यतेप्रति । आह्मां पाठविलें पशुपतीं । मग ते गेले यमदूत ॥ ६३ ॥ सकळा लोकादेखतां । शिवपद पावला प्रभावता । तें भस्मोद्धूलन मी करीं स्वता । त्याचा महिमा सर्व हि ॥६४॥ ऐसें आइकोनि ब्रह्मराक्षस । भस्ममहिमां श्रवणलालस । सत्संगें आपणयास । धन्य मानिता जाला ॥ ६५ ॥ ह्मणे मज पूर्व भवें राजविभवें । शिवभक्तार्चन घडलें दैवें । सफळ भूमिदानप्रभावें । चरण जोडले स्वामीचे ॥ ६६ ॥ ये ऐसिये घोरे विजनी वनीं । मज महा पातकियालागूनि । सुखकारक तारक गुरू दानीं । स्वामिसारिखा भेटला ॥ ६७ ॥ देऊनि समंत्र भस्म-सार । करी मज दीनाचा उद्धार । भस्मधारणविधिप्रकार । मंत्र द्रव्य देश काळ सांगावे सर्व ॥ ६८ ॥ कल्पवृक्ष सदा सफळ । परोपकारार्थ

---

१ व्यभिचारिणी. २ ज्याचे पाय भस्मानें भरलेले आहेत असा कुत्रा. ३ शिवदूतांनीं.

च केवळ । तैसें सज्जनाचें सीळ । असज्जन पावन ॥ ६९ ॥ ऐसा देखोनि अत्यादर । राक्षसाप्रति शिवयोगेश्वर । भस्मकथा सांगेलि ते सादर । श्रवण करा सुश्रोते ॥७०॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामीरामदासकृते । शिवमहिमावर्णने । रक्षवामदेवसंवादे । भस्ममहिमावर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ३८ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो भस्मोद्धूळनतत्परा । नमो भस्मलिप्तांग कृतोद्धारा । नमो भस्ममहिमा श्रवणपरा । परमानंददायका ॥ १ ॥ विभूतीचा महा महिमा । वर्णिता कोण पावे सीमा । तुझा आंगीं समरस उमा । ते हि दाखवी पृथक्ता ॥ २ ॥ हें विश्व च तुझी विभूति । तुझिया स्वरूपें शोभती । तुजहूनि वेगळिक ह्मणती । पूर्वपक्षीचिया ॥ ३ ॥ सिद्धांतीचिया ऐसा साक्षेप । भूषणायुधेंसी शिवरूप । ह्मणोनि विभूति तद्रूप । भिन्ना भासे अभिन्न ॥ ४ ॥ ऐसा विभूतिभूषित । सदाशिव सदोदित । चित्रविचित्र रूपचरित । परिवारेंसीं परमात्मा ॥ ५ ॥ तो नव्हे त्वंपदाख्य जीव । तत्पदात्मा सदाशिव । असिपदर्थानुभव । प्रकाशक परेश ॥६॥ पदत्रयादि सर्व पदें । जयाचया इछानुमोदें । साकारनिराकारता विनोदें । वर्ते जयाचया ॥ ७ ॥ जगजाळ मृगजळ । प्रकाशक अखंड मंडळ । स्वप्रभा सहज सोज्वळ । नित्य सत्य शाश्वत ॥ ८ ॥ अनुभवें पाविजे अधिष्ठान । तें च केवळ स्वप्रकाशमान । तो शिव सच्चिदानंदघन । सिद्धांत स्तव्य श्रुतीचे ॥ ९॥ जीव जो कां ज्ञानयोगि। ब्रह्मरूपें वर्ते जगीं। ब्रह्मरूप विश्व ज्यालागीं। जाचया चरणचिंतनें॥ १०॥ तो सदाशिव स्वात्माराम । सहज निज योगधाम । योगिजनमनविश्राम। अमूर्त मूर्तिता जयाची ॥ ११ ॥ नर अथवा सुर । स्तऊनि काय थोर । तैसा नव्हे हा शंकर । अखंडानंद अद्वय ॥ १२ ॥ तो कोण्ही एके काळयेळीं । सर्वैश्वर्य समाकुळीं । मंदरसिखरीं चंद्रमौळी । रत्नसिं-

हासनारूढ ॥ १३ ॥ वामांकीं विर्जु गोरटी । उमा शोभे जगजेठी । भोवंत्या रुद्राचिया शतकोठी । मध्यें शोभे महेश ॥ १४ ॥ शिवगण सेविती सकळ । नंदी आणि महाकाळ । वीरभद्र स्वतेजाळ । महाबळ मदोत्कट ॥ १५ ॥ शंकुकर्ण घंटाकर्ण कर्णधार । मणिभद्र वृकोदर कुंभोदर । कुंडोदर मंदोदर विकटवीर । केतु भृंगिरटी तो ॥ १६ ॥ भूतनाथ आणि अनेक । महाकाय महाबोज गुणाधिक । कृष्ण श्वेत हरित पीत लोहित एक । धुसरें धूम्रवर्ण विचित्र ॥ १७ ॥ विचित्रांग विचित्रबळ विचित्रलीळा । विचित्रअयुधें विचित्रवाहनें विचित्राभरण कीळा । कित्तेक सदाशिवा प्रवेष्टित वोळगेपाळों । नानावदन नानाकार ॥ १८ ॥ व्याघ्रवदन शूकरास्य गजानन । कित्तेक नक्रवक्र श्वानवक्र जंबुकानन । कित्तेक उष्ट्राश्वशरभसिंव्हवदन । भेरुंडप्रभ्रवकमुख ॥ १९ ॥ एकमुख द्विमुख बहुमुख अमुख । एकहस्त त्रिहस्त पंचहस्त अहस्तक । एकपाद बहुपाद बहुकर्ण अकर्णक । एकनेत्र अनेकनेकनेत्र ते ॥ २० ॥ बहु दीर्घ बहु वामन । एक ते मंडुकासमान । नाना आकृति नाना स्वनें । उपासिती उमेशा ॥ २१ ॥ वोळगावया शंकर । सुरासहित सुरेश्वर । अग्नि यम वरुण कुबेर । आले तेथें दिग्पाळ ॥ २२ ॥ चित्रसेनादि गंधर्व खेचर । किंपुरुष सिद्ध साध्य विद्याधर । वशिष्ठादि ब्रह्मऋषि नारद तुंबर । देवर्षि पितर पन्नग ॥ २३ ॥ गुह्यक आदित्य वसव । आठा असे विश्वेदेव । दक्षादि प्रजापाळ सर्व । उर्वश्यादि अप्सरा ॥ २४ ॥ समस्तीं सुरगणीं सेविला । सदाशिव सदानंद शोभला । तवं महातेजोमय महामुनि आला । दर्शना सनत्कुमार ॥ २५ ॥ कोटिसूर्यसम स्वप्रभाकर । महाप्रळय घनस्वन गंभीर । संवर्त्ताग्नि सिखा पिंगटाकार । जटाजूट मस्तकीं ॥ २६ ॥ पंचानन पंचदशलोचन । पंचप्रत्यानळगर्भ

१ विद्युत्प्रभा. २ शिवगणाचीं नावें. ३ हिरवा ४ पिवळा. ५ तांबडा. ६ सुगंधी द्रव्य. ७ धुराच्या रंगाचा. ८ प्रभा. ९ सेवेकरी. १० एक अष्टपाद जनावर आहे. ११ भेरुड=कोल्हा. १२ स्वर, आवाज. १३ प्रसन्न करून घेण्याकरितां. १४ मानवजातिवान प्राणी. १५ कुबेराचे सेवक. १६ अट संख्याक देव.

शाकून । दशहस्तोत्फुल्लावलोकन । भक्तजनानंदप्रद ॥ २७ ॥ अकळरुप निरूपाक्ष । सकळकळाधर अलक्ष । तथापि लक्षिती मुमुक्ष । भावें प्रभाव प्रेमळ ॥ २८ ॥ चंद्रखंडमंडित मौळी । कळित गारळ गळप्रभा निळी । भस्मोद्धूळन धवळ मुंडमाळी । दशबाहु शाळी विशाळ ॥२९॥ मुगुट कुंडलें किर्तिमुखें । स्तविता निवती परम सुखें । वीरकंकणें फणि-मणिमयूखें । मंडित भूषें मुद्रिकादि ॥ ३० ॥ प्रास॰ तोमर खट्वांग । त्रिशूळ टंक पिनाक नाग । बाण डमरु अभय भाग । दशहस्तीं दशायुधें ॥ ३१ ॥ गजचर्म परिधान व्याघ्रचर्मोत्तरी । मेखळाकिंकिणि अति सुस्वरीं । वाकी नेपुरें चरणीं तोडरीं । पुतळे त्रिपुरादिकांचे ॥३२॥ महाफणी मणिमंडित । नाग तक्षक श्रवणीं शोभत । सर्प यज्ञोपवीत सर्वांगीं धृत । धृतराष्ट्र धनंजय पद्म कर्कोट ॥ ३३ ॥ ऐसा उदारांग अति उदार । देखोनि उमामहेश्वर । अति प्रेमळ सनत्कुमार । प्रणम्य करी पुनःपुनः ॥ ३४ ॥ नम्र कंदरकृतांजळी । स्तुति करितसे मंजुळी । स्वमुख सांगितलें चंद्रमौळी । धर्म कृपाकटाक्षें ॥ ३५ ॥ हरारमाध्य सदाशिवा । धर्म न धरवती जी जिवा । अनायासें भुक्तिमुक्ति मानवा । ऐसें सांग दयाब्धि ॥ ३६ ॥ देखोनि देवऋषींचा भाव । दयार्द्र चित्त महादेव । बोलता जाला गुणार्णव । वेदवक्ता सुभक्ता ॥३७॥ सर्व श्रुतींचें

ललाटउरबाहुस्थानीं । स्कंदद्वयीं लावावें ॥ ४३ ॥ मध्यमानामिकांगुष्ठे । त्रिरेखा रेखाविया. सुनिष्टें । दोहीं बोटीं दोहीं सेवटें । मध्यें अगुष्टें दुसरेन ॥ ४४ ॥ प्रतिरेखेचां ठाई नव देवतें निर्माण । अकार गार्हपत्योग्नि भूरात्मा रजोगुण । ऋग्वेद क्रियाशक्ति प्रातः सवनप्रमाण । महादेव प्रथम रेखेसीं ॥ ४५ ॥ द्वितीयेसी उकार दक्षिणाग्नि नभ । सत्य यजुर्वेद मध्यंदिन सवन शुभ । इच्छाशक्ति अंतरात्मा उमावल्लभ । ऐसीं नव देवतें ॥ ४६ ॥ मकार आव्हनीय परमात्मा तमोगुण । द्यौः सामवेद तृतीय सवनप्रमाण । ज्ञानशक्ति शिव जगत्कारण । नव देवतें तृतीय रेखे ॥ ४७ ॥ या देवतांसी नमस्कारकृत । त्रिपुंड्र धरी शुचिर्भूत । तो वेदवर्ण्य माहेश्वरव्रत-। निष्णात स्नात सर्व तीर्थी ॥ ४८ ॥ ब्रह्मचारी गृहस्थ वानप्रस्थ । विधियुक्त भस्मत्रिपुंड्र धरी प्रशस्थ । ते सर्व पापें निर्मुक्त नेमस्थ । अंतीं पावती परम पद ॥ ४९ ॥ मुक्तिकामें त्रिपुंड्र धरी । सकाम हि जो संसारीं । तो पुनरपि मातेचा उदरीं । न संभवे असंभवें ॥ ५० ॥ महा पातकोपपातकें । वर्णचतुष्टयादि स्त्रीहत्यादिकें । वीराश्वइत्यादि कौतुकें । मुक्त होती यापासुनी ॥ ५१ ॥ नकळे मंत्र नकळे विधि । नकळे महिमा मंदबुधि । त्रिपुंड्रमात्रें सर्व सिद्धि । हरती सर्व पातकें ॥ ५२ ॥ परद्रव्यक्षेत्रहरण परस्त्रीगमन । परनिंदापीडन वनधान्यधामदहन । असत्य पैशून्य पारुष्य नीचसेवन । कूट[१]साक्षी वेदादिविक्रया ॥ ५३ ॥ गोमहिष्यादि दासदासी । मांसविक्रय रसविक्रय वस्त्रविक्रयासी । भूमिहिरतिलगुडलवणविक्रयासी । असे महापातक ॥ ५४ ॥ नीचान्नधान्यप्रतिगृहे[२]प्रसंग । दासीवेश्यावृ[३]पळीनटिअंगसंग । रजस्वलाकन्याविधवागमन अभंग । नाना दोष आणिख हि ॥ ५५ ॥ शिवनिंदा शिवभक्तनिंदा दोष । शिवस्वहरणाव अप्रायश्चित निशेष । आतां असो ये दुष्कृतें अशेष । हरती केवळ त्रिपुंड्र ॥ ५६ ॥ त्रिपुंड्रधारण रुद्राक्षाभरण । मुखीं सप्रेम शिवस्मरण । तो चांडाळ हि पुण्यपरायण । सर्ववर्णोत्तमोत्तम ॥ ५७ ॥ सप्तकोटि महामंत्र । पंचाक्षर

१ कूटन्देह, निंदा. २ प्रतिग्रह. ३ व्यभिचारिणी.

पुरस्सर विचित्र । आणिख हि असंख्यात पवित्र । जपलाभ त्रिपुंड्रधारणें ॥ ५८ ॥ पूर्वी जाले सहस्र पूर्वज । पुढें जे होती सहस्र वंशज । ते सर्व हि उद्धरती सहज । त्रिपुंड्रधारणमात्रें च ॥ ५९ ॥ तो येथें सकळ भोग भोगित । दीर्घायुषी सर्व रोगरहित । जीवितांतीं मरण पावत । सुखरूप स्वानंदें ॥ ६० ॥ अष्टैश्वर्य दिव्य शरीरें । दिव्य विमानारूढ आदरें । दिव्य शतस्त्रिया दिव्य चामरें । ढाळिती जाय दिव्य पदां ॥ ६१ ॥ विद्याधरसिद्धगंधर्वलोकीं । इंद्रादि दिग्पाळस्थळीं अनेकीं । प्रजेश्वरपुरीं सुकौतुकीं । दिव्य भोग भोगुनी ॥ ६२ ॥ ब्रह्मपदीं कल्पशतवरी । ब्रह्मशतत्रय विष्णुनगरीं । शिवपदीं वसे याउपरी । शिवसायोज्यें सर्वदां ॥ ६३ ॥ सनत्कुमारासी ह्मणे शंकर । हें सर्वोपनिषत्सार । भस्मत्रिपुंड्रमहिमा अपार । संक्षेपें तुज निरोपिला ॥ ६४ ॥ ऐसें बोलोनि भुवनेश्वरेश्वर । अदृश्य जाला सहपरिवार । स्वस्वस्थान पावले सुर । सनत्कुमार आला विधिपदा ॥ ६५ ॥ ब्रह्मराक्षसा ह्मणे वामदेव । एवढें विभूतीचें वैभव । तुज हि स्मरती पूर्व भव । मदंगस्थें स्पर्शनें[1] ॥ ६६ ॥ मग तो शिवयोगी तये वेळीं । भस्म मंत्रूनि दे त्याचे करतळीं । तेणें त्रिपुंड्र रेखितां च भाळीं । तत्काळ गेली राक्षसता ॥ ६७ ॥ सूर्यमंडळसम प्रभाकर । दिव्य जालें हो शरीर । दिव्यांबरें दिव्याळंकार । दिव्य सुमन चंदन शोभत ॥ ६८ ॥ भक्त्या पतितपावनासी । प्रणम्य प्रदक्षणा करूनि गुरूसी । दिव्य विमानारूढ दिव्यलोकासी । गेला दिव्य वैभवें ॥ ६९ ॥ वामदेव हि साक्षात शिव । उद्धरूनियां जड जीव । स्वइच्छा विचरें गुप्त वैभव । जगदुद्धारकारक ॥ ७० ॥ असो ऐसें हें भस्ममहिमान । गाती आइकती करिती पठन । ते इहलोकीं सर्व सुख पावोन । अंतीं येती शिवपदा ॥ ७१ ॥ जे करिती शिवकीर्तिकथन । शिवांघ्रिचिंतन शिवभक्तवंदन । भाळीं भस्मत्रिपुंड्रलेपन । ते सर्व न येती संसारा ॥ ७२ ॥

---

1 माझ्या आंगावरील भस्मस्पर्शानें.

स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिवमहिमावर्णने । भस्ममहिमाविधिवर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ३९ ॥ ॥ ३९ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो भावप्रिया भगवंता । भाविकजनकृपावंता । भाविकभजनें उमाकांता । तत्काळ च पावसी ॥ १ ॥ भाविकभजनीं विधि - । निषेध न पाहासी कृपानिधि । मंत्र तंत्र उपचार सिद्धि । काहि च नलगे भावार्थे ॥ २ ॥ नमो नमो भाविकभक्तवछळा । नमो नमो महेशा प्रणतपाळा । नमो नमो हृदिस्था हृदिस्थप्रेमकळा । सर्व जाणसी सर्वज्ञा ॥ ३ ॥ शिवायनमः इतुकें च पद । वाची कां परिसे प्रेमविद । एणें च कृतकृत्य संतपट्पद । भक्तिसरोजामोद हा ॥ ४ ॥ याकारणें प्रति प्रकरणीं । आधीं शिवस्मरण करी वाणीं । तेणें परमानंदमय श्रवणीं । परिसा चरित शिवाचें ॥ ५ ॥ वेदवेदांगतत्वजाणते । ब्रह्मविद शिष्यांतरवेत्ते[१] ते उपदेश करिती जयांतें । ते सद्य सिद्धि पावती ॥ ६ ॥ अन्य सामान्य जे जन । उभय सर्वज्ञतेविण वचन । उपदेशिती जया तयातें साधन । कैसें सिद्धिदायक ॥ ७ ॥ ऐसें पुसतां देवर्षि । सुत सांगे सुहर्षी । भावार्थ जयाचें हृदय स्पर्शी । तो च होय कृतार्थ ॥ ८ ॥ सच्छ्रद्धा सर्व धर्मासी । रक्षी माता पुत्रासी जैसी । श्रद्धा पावती सर्व सिद्धीसी । इहलोकीं परलोकीं ॥ ९ ॥ भावें करितां भजन । शिळा होय सुप्रसन्न । भावें करी गुरुपूजन । मूर्ख हि पावे गुरुत्व ॥ १० ॥ मंद तरिहि मानव सचेतन । गुरुना पावे हें नव्हे गहन । मृत्तिकेचा गुरू अचेतन । द्रोणता फळद निषादा[२] ॥ ११ ॥ भावें फावे मंत्रसिद्धि ।

---

१ उपदेश करणारा आणि ऐकणारा २ परमेश्वराची सगुण मूर्ति. ३ एकलव्य व्याधाने द्रोणाचार्याची मृत्तिकेची प्रतिमा करून त्यांस श्रद्धेनें गुरू मानून निशाण मारण्याचा अभ्यास केला व गुरुकृपेनें तो त्यांत प्रवीण झाला. ( महाभारत )

पुरस्सर विचित्र । आणिख हि असंख्यात पवित्र । जपलाभ त्रिपुंड्रधारणें ॥ ५८ ॥ पूर्वी जाले सहस्र पूर्वज । पुढें जे होती सहस्र वंशज । ते सर्व हि उद्धरती सहज । त्रिपुंड्रधारणमात्रें च ॥ ५९ ॥ तो येथें सकळ भोग भोगित । दीर्घायुषी सर्व रोगरहित । जीवितांतीं मरण पावत । सुखरूप स्वानंदें ॥ ६० ॥ अष्टैश्वर्य दिव्य शरीरें । दिव्य विमानारूढ आदरें । दिव्य शतस्त्रिया दिव्य चामरें । ढाळिती जाय दिव्य पदां ॥ ६१ ॥ विद्याधरसिद्धगंधर्वलोकीं । इंद्रादि दिग्पाळस्थळीं अनेकीं । प्रजेश्वरपुरीं सुकौतुकीं [१] दिव्य भोग भोगुनी ॥ ६२ ॥ ब्रह्मपदीं कल्पशतवरी । ब्रह्मशतत्रय विष्णुनगरीं । शिवपदीं वसे याउपरी । शिवसायोज्यें सर्वदां ॥ ६३ ॥ सनत्कुमारासी ह्मणे शंकर । हें सर्वोपनिषत्सार । भस्मत्रिपुंड्रमहिमा अपार । संक्षेपें तुज निरोपिला ॥ ६४ ॥ ऐसें बोलोनि भुवनेश्वरेश्वर । अदृश्य जाला सहपरिवार । स्वस्वस्थान पावले सुर । सनत्कुमार आला विधिपदा ॥ ६५ ॥ ब्रह्मराक्षसा ह्मणे वामदेव । एवढें विभूतीचें वैभव । तुज हि स्मरती पूर्व भव । मदंगस्थें स्पर्शमात्रें ॥ ६६ ॥ मग तो शिवयोगी तये वेळीं । भस्म मंत्रूनि दे त्याचे करतळीं । तेणें त्रिपुंड्र रेखितां च भाळीं । तत्काळ गेली राक्षसता ॥ ६७ ॥ सूर्यमंडळसम प्रभाकर । दिव्य जालें हो शरीर । दिव्यांबरें दिव्यालंकार । दिव्य सुमन चंदन शोभत ॥ ६८ ॥ भक्तया पतितपावनासी । प्रणम्य प्रदक्षणा करूनि गुरूसी । दिव्य विमानारूढ दिव्यलोकासी । गेला दिव्य वैभवें ॥ ६९ ॥ वामदेव हि साक्षात शिव । उद्धरूनियां जड जीव । स्वइच्छा विचरे गुप्त वैभव । जगदुद्धारकारक ॥ ७० ॥ असो ऐसें हें भस्ममहिमान । गाती आइकती करिती पठन । ते इहलोकीं सर्व सुख पावोन । अंतीं येती शिवपदा ॥ ७१ ॥ जे करिती शिवकीर्तिकथन । शिवांघ्रिचिंतन शिवभक्तवंदन । भाळीं भस्मत्रिपुंड्रलेपन । ते सर्व न येती संसारा ॥ ७२ ॥

---

[१] माझ्या अंगावरील भस्मस्पर्शानें.

स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिवमहिमावर्णने । भस्म-महिमाविधिवर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ३९ ॥ ॥ ३९ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो भावप्रिया भगवंता । भाविकजनकृपावंता । भाविकभजनें उमाकांता । तत्काळ च पावसी ॥ १ ॥ भाविकभजनीं विधि - । निषेध न पाहासी कृपानिधि । मंत्र तंत्र उपचार सिद्धि । काहि च नलगे भावार्थें ॥ २ ॥ नमो नमो भाविकभक्तवछळा । नमो नमो महेशा प्रणतपाळा । नमो नमो हृदिस्था हृदिस्थाप्रेमकळा । सर्व जाणसी सर्वज्ञा ॥ ३ ॥ शिवायनमः इतुकें च पद । वाची कां परिसे प्रेमविद । एणें च कृतकृत्य संतषट्पद । भक्तिसरोजामोद हा ॥ ४ ॥ याकारणें प्रति प्रकरणीं । आवीं शिवस्मरण करी वाणीं । तेणें परमानंदमय श्रवणीं । परिसा चरित शिवाचें ॥ ५ ॥ वेदवेदांगतत्वजाणते । ब्रह्मविद शिष्यांतरवेत्ते[1] ते उपदेश करिती जयांतें । ते सद्य सिद्धि पावती ॥ ६ ॥ अन्य सामान्य जे जन । उभय सर्वज्ञतेविण वचन । उपदेशिती जया तयांतें साधन । कैसें सिद्धिदायक ॥ ७ ॥ ऐसें पुसतां देवर्षि । सुत सांगे सुहर्षी । भावार्थ जयाचें हृदय स्पर्शी । तो च होय कृतार्थ ॥ ८ ॥ सत्श्रद्धा सर्व धर्मासी । रक्षी माता पुत्रासी जैसी । श्रद्धा पावती सर्व सिद्धीसी । इहलोकीं परलोकीं ॥ ९ ॥ भावें करितां भजन । शिळा होय सुप्रसन्न । भावें करी गुरुपूजन । मूर्ख हि पावे गुरुत्व ॥ १० ॥ मंद तन्हि मानव सचेतन । गुरुना पावे हें नव्हे गहन । मृत्तिकेचा गुरू अचेतन । द्रोणता फळद निषादा ॥ ११ ॥ भावें फावे मंत्रसिद्धि ।

---

१ उपदेश करणारा आणि ऐकणारा २ परमेश्वराची सगुण मूर्ति. ४ एकलव्य व्याधानें द्रोणाचार्याचा मृत्तिकेची प्रतिमा करून त्यांस श्रद्धेनें गुरु मानून निशाण मारण्याचा अभ्यास केला व गुरुकृपेनें तो त्यांत प्रवीण झाला. (महाभारत)

अवद्ध असो नसो विधि । अनन्यभावें भजता शुद्धि । नीच हि पावे भगवता ॥ १२ ॥ भावें देव नित्य जवळीं । कछ वछासी जैसा न्याहाळी । साभाळितसे सर्वकाळीं । कल्पक्षयीं न विसभे ॥ १३ ॥ जैसा जैसा भक्तभाव । तैसा तैसा च होय देव । निराकार च सावेव । यासी कारण भाव च कीं ॥ १४ ॥ भावार्थेविण प्रवीण । जितुकें करिल तितुका सीण ॥ यज्ञ दान पूजन व्रताचरण । वध्यवृक्ष सुमनामा ॥१५॥ भावार्थेविण निश्चयो न घडे । अभावें सर्व सशयीं पडे । तेथें कार्यसिद्धि कैसी जोडे । अभाविका अभाग्या ॥१६॥ मत्र ह्मणिजे मात्रुकामेळ । तीर्थ तरी केवळ जळ । देव सावेव धातु का सीळ । गुरु ह्मणिजे मानव ॥ १७ ॥ ब्राह्मण जड देहधारी । दैवज्ञ तैसा च आकारी । भेषज येथें च सिद्ध करी । सकळा हि देखता ॥ १८ ॥ याचा ठाइ भाव शुद्ध । तयाचें कार्य होय सिद्ध । भावार्थाविण प्रसिद्ध । ठकला च केवळ ॥१९॥ या कारणें भाव कारण । भावें च पुण्यपापप्रसारण । तया एकें भावेंविण । काहिं च न घडे ॥२०॥ अत्र चित्र कथाकौतुक । सर्व धर्मबहिष्कृत भाविक । तयास तत्काळ च त्र्यबक । जाला अति सुप्रसन्न ॥ २१ ॥ पाचाळ राजाचा जठरजातु । नाम तयाचें सिंव्हकेतु । सर्व गुणसपूर्ण प्रख्यातु । पारधी गेला महावना ॥ २२ ॥ तयाचा सेवक शबर । पशु पाहाता फिरता कातांर । तव एक शिवागार । स्फुटितस्फुट देखिलें ॥ २३ ॥ तयामाजीं प्रवेशोनि पाहे । तव भिन्नपीठी लिंग पडलें आहे । सुदर सूक्ष्म तेथें राहे । भाव बैसोनि तयाचा ॥२४॥ प्रेमभावें नमस्कारी । उचलूनि वाहिलें सिरीं । निधानप्राप्तीचिये परि । नृपात्मजाप्रति आणिलें ॥ २५ ॥ ह्मणे स्वामी माझें भाग्य थोर । शिवलिंग सापडलें सुदर । येथें रगलें अभ्यतर । पुजा करीन मी विधि सागे ॥ २६ ॥ ऐसें परिसोनि बोले हासोनि । अभिषेक करावा सकल्प

---

१ यत्रात समया. २ भाव विना श्रद्धा विरहित यज्ञ दान वगैरे करणे हें फलपुष्प न देणाऱ्या वृक्षापासून फुलाच्या सुवासाची इच्छा करण्याप्रमाणें व्यर्थ होय. ३ औषध. ४ औरस पुत्र. ५ अरण्य. ६ मोडकळीस आलेल. ७ स्थानभ्रष्ट,

करूनि । सर्वोपचार अनुष्ठिष्ट आणूनि । चितामस्म अर्पावें ॥ २७ ॥ गीत नृत्य वाद्य करावें । शंकर संतोषवावा भावें । परम संकटीं हि न टळावें । अपुलिया नेमासी ॥ २८ ॥ लिंगस्पर्शी अधिकार नसे । तया पुजाविधान कायसें । तथापि भावार्थाचें सामर्थ्य नसे । विधिअधिकारा आधीन ॥२९॥ परि हासरसें सांगे राजकुमर । परि भावें परिसे चंड-काख्य शबर । स्वगृहासी येऊनि महेश्वर । नित्य नेमें पूजित ॥ ३० ॥ मंत्राचा असेचना अभ्यास । बाहातां येतां च नये ब्राह्मणांस । एते तार्‍हि प्रत्यह तयास । यावें काय दुर्वळें ॥ ३१ ॥ ह्मणौनिया केवळ भावें । आवडी आपुलिया जीवें । चिताभस्म नित्य वाहावें । विधिनिषेध तो नेणे ॥ ३२ ॥ ऐसें असतां एके काळीं । पुजूं जातां चंद्रमौळी । चिताभस्म भूमंडळीं । न दिसे दूरीं फिरतां हि ॥ ३३ ॥ वहु श्रमोनि गृहासी आला । स्त्रियेसी बोलता जाला । भस्म न मिळे शिवार्चनाला । सांग प्रिये काय करूं ॥ ३४ ॥ शिवार्चन माझें टळतां । प्राण सांडिन हे तत्वता । पापरूपें काय आतां । वाचों शिवाविन्मुख ॥ ३५ ॥ आजि माझिया देवासी । उसिर जाला पूजनासी । क्षुधा लागली असेलि त्यासी । उकसमुरूसीं स्फुंदतु ॥ ३६ ॥ हें परिसोनि पुण्य कांता । शबरांगना ते पतिव्रता । ह्मणे स्वामी न करावी चिंता । एक उपाय करावा ॥ ३७ ॥ अग्नि लावावा स्वमंदिरा । माजि मी प्रवेशेन प्राणेश्वरा । चिताभस्म महेश्वरा । पूजानेमा न टळावें ॥ ३८ ॥ तवं तो ह्मणे वल्लभे । धर्मार्थकाममोक्षसाह्यशुभे । गुणवती युवति सुप्रभे । दग्ध कैसी होसी तूं ॥३९॥ शबरी ह्मणे मी भाग्य सौभाग्यवति । सदाशिवभक्त माझा प्रियपति । विशेष शिवकार्यी हे आकृति । लागतां परम सार्थक ॥४०॥ परोपकारार्थ तनु पडे । तरि शिवपद पाविजे रोकडें । तया शंकराकारणें ऐसें घडे । तरि पूर्वजांसी तपोफळ ॥४१॥ ऐसा देखोनि तिचा भाव । संतोषला तो शांभव । शुचि सुस्नाता साळंकृता तदैव । कळा

---

१ ब्राह्मणाना बोलावलें तर ते यईनात २ प्रत्य.ां, दररोज ३ विशेषेंकरून श्रीशंकर सुप्रसन्न होण्याकरिता जर माझी तनु सर्व होत आहे तर आपल्या पूर्वजांचें तप फळास आलें असेंच ह्मणावें लागेल.

आली पुण्याची ॥ ४२ ॥ गृहीं धडकल्या वन्हिज्वाळा । प्रदक्षिणा केल्या तीनि वेळां । नमस्कारूनि स्वामिचरणकमळा । हृदयिं स्मरिला सदाशिव ॥ ४३ ॥ शिव शिव स्मरत वैखरीं । प्रवेशली ते वन्हिपंजरीं । भस्म जालें क्षणाभीतरीं । शबर पूजी परमेशा ॥ ४४ ॥ पूजांतीं चिताभस्म समर्पितां । आठवली वामांगस्थिता कांता । तत्काळ देखिली साळंकृता । पूजा पूर्ण उभयता ॥ ४५ ॥ परमाश्चिर्ये दाटला कोळी । ह्मणे अग्निजाळीं स्वकल्लोळीं । सूर्यकळा नृपदंडमूळीं । विप्रकोपसंकल्पें ॥ ४६ ॥ म्यां स्वहस्तें दग्ध केली होती । ते च कैसेनि आली मागुती । शतधा वाढलिये प्रीती । पुसता जाला प्रियेसीं ॥ ४७ ॥ भस्मभूता पुनरागता । पूर्वेवत दिसे गृहता । हें कैसें जालें सांग आतां । शबरी बोले सहर्षें ॥ ४८ ॥ स्वामी मी पावकीं प्रवेशलें । तत्काळ आपणा विसरलें । संताप नेणें निवालें । जैसी अमृत प्रवेशें ॥ ४९ ॥ शुषुप्तिपारि क्षणार्द्धार्द्धे । जागृता तैसी तुज सार्द्ध । कृतांजळी चंद्रार्द्ध- । शेखर शंकर पूजना ॥ ५० ॥ ऐसीं परस्परें बोलती हर्षायमान । तवं पुढें पातलें दिव्य विमान । शत चंद्रार्चि दैदिप्यमान । चत्वारि आले शिवगण ॥ ५१ ॥ दोघें दंपति धरुनि करीं । आदरें वाहिलीं विमानावरीं । दिव्य देह दिव्यांबराळंकारीं । शिवलोकाप्रति नेलीं ॥ ५२ ॥ शिवगणस्पर्षमात्रें । तत्काळ सारुप्य पावलीं गात्रें । शिवलोकीं वसती विचित्रें । दिव्य भोगेंसमन्वितें ॥ ५३ ॥ याकारणें सर्व हि पुण्यकर्म । भावें सफळ हें मुख्य वर्म । नीच निषाद अधर्म । भावें पावला शिवपद ॥ ५४ ॥ काय वर्णवरिष्ठीं जन्मोनि । काय श्रुति पुराण विचार विद्या अभ्यासूनि । परमेशभक्तिभावें धन्य त्रिभुवनीं । ह्मणोनि भाव धरा तरा ॥ ५५ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामीरामदासकृते । शिवमहिमावर्णने । भावार्थ वर्णनं नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ४० ॥

॥ श्रीरामो जयति ॥

नमो रुद्रा रुद्राक्षभूषणा । नमो रुद्रा रुद्राक्षधर प्राणा । पवित्र करिसी हरिसी दूषणा । धारणमात्रें मद्देहा ॥ १ ॥ रुद्राक्षमहिमा वाचि-

तां परिसतां । सर्व पापमुक्त होती तत्वता । सर्वसुख पावोनि स्वता । अंतीं पावती शिवपदा ॥ २ ॥ रुद्राक्षधारणाचें फळ । कासया ऐसें स्तवावें अतुळ । महामुनि वर्णिती विमळ । तत्वदर्शी सर्वज्ञ ॥ ३ ॥ सहस्र रुद्राक्ष जो धरी । तो वंदिजे सर्व सुरवरीं । तो तत्वता ये पृथ्वीवरी । रुद्रतुल्य नान्यथा ॥ ४ ॥ सहस्र रुद्राक्षांच्या अभावें । बाहुदंडीं सोळा सोळा धरावे भावें । मणगटीं बारा बारा थावरावे । एका सिखेमंडळीं ॥ ५ ॥ द्वात्रिंशत्कंठमाळा । चत्वारींशश्च मौळिमंडळा । मेळऊनि प्रवाळ मुक्ताफळा । स्फटिक हेम रौप्यमणी ॥ ६ ॥ वैडूर्यादि नाना रत्नें । मध्यें वोऊनिया यत्नें । सर्वांगीं मिरवी जो प्रेत्नें । तो शिवतुल्य सर्वथा ॥ ७ ॥ मणिमुक्तादि दुर्मिळ । तरि धरावे शिवाक्ष च केवळ । तया न स्पर्शे पापजाळ । जेवि तम तमांतकां ॥ ८ ॥ रुद्राक्षमाळेनें मंत्रजप । करितां अनंत फळद्रूप । शैववैष्णवादि साक्षेप-। पूर्वक सर्वेहीं जपावें ॥ ९ ॥ जयाचे शरीरीं एक हि । रुद्राक्ष भस्म-त्रिपुंड्र नाहीं । त्याचा जन्म निरार्थक महीं । मनुष्यामाजि सर्वथा ॥ १० ॥ रुद्राक्ष धरिला असतां शिरीं । उदक घालितां मस्तकावरी । गंगास्नानफळ निरंतरी । घरीं भांडस्नानें हि ॥ ११ ॥ रुद्राक्ष पूजी देवतार्चनीं । एकें जळाभिषेकें याचुनी । जें फळ यथोक्त लिंगार्चनीं । तें पावे तो प्रत्येह ॥ १२ ॥ एकमुख अथवा पंचमुख । एकादश कां चतुर्दशमुख । सर्वांचें समान फळसुख । पुजा समान शिवपुजे ॥ १३ ॥ दारिद्री हि धारण पूजा । करितां होय महाराजा । भक्त अभक्त नीच नीचतर सहजा । पावे महा महिमान ॥ १४ ॥ यदर्थी परिसावें पुण्य अल्यान । काश्मिरदेशाधीश भद्रशेन । तया सुधर्मा नाम नंदन । जाला अति सुसीळ ॥१५॥ तयाच्या च प्रधानाचा

---

१ शेंडीमध्यें २ बत्तीस ३ चाळीस. ४ मस्तकाभोंवती. ५ रुद्राक्ष. ६ तमांतक जो सूर्य त्याजवर अंधःकार ज्याप्रमाणें राहूं शकत नाहीं, त्याप्रमाणें ज्यानें रुद्राक्ष धारण केले आहेत त्याच्या शरिरास कोणतींही पापें स्पर्श करूं शकत नाहींत. ७ सर्वांनीं. ८ घरीं भांड्यांत भरलेल्या पाण्यानें स्नान केलें तरी. ९ दररोज.

पुत्र । करक नामें बाळमित्र । अद्भुत तयाचें क्रीडाचरित्र । भस्मरुद्राक्षलालस ॥१६॥ भस्मोद्धूळन करिती आवडीं । रुद्राक्षाभरणाची बहु गोडी । शिरीं कर्णीं कंठीं भुजादंडीं । सर्वांगीं लेती आनंदें ॥१७॥ राजा अति कौतुकेंकरीं । रत्नाळंकार घाली शरीरीं । दिव्य गंधें दिव्य सुमनें परोपरी । दिव्यांबरें लेववीं ॥ १८ ॥ तैसा च प्रधानपुत्रासी । लेववी नेसवी आदरेंसीं । परि तें नावडे तयांसीं । रुद्राक्षाभस्मावांचूनि ॥ १९ ॥ तेणें रायासीं वाटे चिंता । कोण जोगी पावला पुत्रेंता । तवं पराशर गृहा आला अवचिता । धाता च जो दुसरा ॥ २० ॥ साष्टांग नमन करी राजा । केली विधिप्रकारें पुजा । कर जोडूनि मुनिराजा । पुसता जाला विनयेंसीं ॥ २१ ॥ स्वामी मम कुमर प्रधानकुमर । दोघां नावडती रत्नाळंकार । भस्मरुद्राक्षाभरणतत्पर । सिकविता हि नाइकती ॥ २२ ॥ यानंतरें त्रिकाळज्ञ ऋषेश्वर । बोलता जाला पराशर । आइक राया परम रुचिर । याचें जन्मातरचरित ॥ २३ ॥ नदिग्रामीं महानंदा नामें । वेश्या होती सत्वनेमें । सुरुपा सुदरा विभवाभिरामें । अप्सरा चि जैसी अपर ते ॥२४॥ शिवभक्ति शिवभक्तभक्तिरता । हर्षें विनोदें राजवनिता । मर्कट कुक्कुट नाचवी स्वता । हास्य करी सखियांसीं ॥२५॥ विनोद करितांतः-करणें । केलीं मर्कटासी रुद्राक्षाभरणें । एक रुद्राक्ष कुक्कुटाकारणें । शिखेसीं असे बांधला ॥ २६ ॥ कोण्ही एके काळीं शिवव्रती । वैश्य आला तिच्या गृहाप्रति । रुद्राक्षाभरणविभूति । मणिकरुणीं शिवलिंग ॥ २७ ॥ तयासी पूजिलें अति प्रीतीं । ह्मणे ए कंकणीं बैसली वृत्ति । तीनि दिवस होइन युवति । ब्रि हें याल जरि मज ॥ २८ ॥ तें मानलें दोघां जणां । परस्परें केलें भाषाप्रमाणा । परि हें यत्न करीं शुचि प्राणा । गति येणें च माझिया ॥ २९ ॥ मग नाट्यमडपस्तंभीं मणिकंकण । यत्नें टेविलें आज्ञाप्रमाण । प्राणपतीसह आपण । पहुडली सुखें सेजारीं ॥ ३० ॥ अवशेष रात्रीं उपःकाळीं । अग्नि प्रज-

१ कोणी तरी योगी पुरुष माझ्या पोटा पुत्ररुपानें जन्मास आला असावा असें राजास वाटलें.

ळला नाट्यमंडळीं । वेगीं धावोनिया वेल्हाळी । मर्कटकुक्कुट सोडिलीं ॥ ३१ ॥ कंकण काढावया न पुरे च वाव । दग्धता भंगला तत्रस्थ देव । तें देखोनि वैश्याचा जीव । तळमळूं च लागला ॥ ३२ ॥ अभेद अखड आत्मलिंग । तेथें मज न देखवे भग । अविद्यांख्य तनुतेचा करीन त्याग । पावेन सदाशिवातें ॥ ३३ ॥ तारि प्रिये प्रेरूनि दूता । ग्रामबाहेरी करवी चिता । तवं ते जाली अति दुःखिता । आज्ञे अग्नि धडकिला ॥ ३४ ॥ तें पाहावया मिळाले जन । वैश्यें केल्या प्रदक्षिणा वंदन । शिवस्मरण अग्निप्रवेशन । [1]येरी पश्चातापें परतली॥३५॥ स्वगृहाप्रति आली । परम शोकें बोलती जाली[2] । माझा पति निमाला गेली । मनोवृत्ति तयासवें ॥ ३६ ॥ म्या तयासीं शपथ केलें । तें सर्व ही व्यर्थ जालें । असत्याचें जळो ज्यालें । निंदता निरय न चुकती॥३७॥ तारि मी जाइन स्वपतिसांगातें । वधुपरिवार आश्वासिती तीतें । परि ते न मनी विप्रां शिवप्रियातें । वांटिली अतुळ संपति ॥ ३८ ॥ सत्य सर्व पुण्याचें रूप । सत्यें सत्य होय तप । सत्यपरित्यागें चि पाप । तें सत्य रक्षीनें सर्वथा ॥ ३९ ॥ असत्य भव विभव काया । याची धरूनि मिथ्या माया । अंतरायें सदाशिवा देवराया । तेणें दोन्ही अंतरती ॥४०॥ ऐसा निश्चय करूनि । सदाशिव स्मरिला ध्यानीं । शिव शिव स्मरे वचनीं । प्रदक्षणा करी विरक्ता ॥ ४१ ॥ जय शंकर ह्मणौनि उडी टाकी । तव करीं धरिता जाला पिनाकी । ह्मणे भली सत्यव्रता लोकीं । मम प्रेम अचंचळ ॥ ४२ ॥ जितुका तुवां देखिला प्रकार । तितुकी मम माया साचार । शोधावया तुझें अंतर । तवं तूं दृढनिश्चया ॥४३॥ आतां चाल दिव्य लोका । दिव्य देवांसीं भोग भोगी कां । जें जें तुज दुर्लभ तें कां । माग जालों प्रसन्न ॥ ४४ ॥ एरी लोटली चरणावरी । प्रेमजळें प्रक्षाळन करी । जेवि कन्या होती अति दूर । भेटली बापा कृपाळा ॥ ४५ ॥ ह्मणे सदाशिवा पतितपावना । ऐसी आइकन होतें भक्तभावना । तें कारुण्य प्रत्यक्ष नयनां । दाखविलें माझियां ॥ ४६ ॥

---

[1] मायारूप शरिराचा. [2] महानंदा. [3] खरोखर.

प्रत्यक्ष सुप्रसन्न सन्मुख । तरि मी भुवनत्रयविषयविन्मुख । देईं स्वपद-सेवासुख । राहेन चरणाजवळकें ॥ ४७ ॥ आतां पुरे भोग कामना । पुनर्भव निरशीं पंचानना । माझिया बंधुवर्गा अंगलगा दीना । सहित देईं स्वपदासीं ॥ ४८ ॥ तथास्तु ह्मणोनि त्रिपुरारि । विमानीं वाहिली सहपरिवारीं । पावली तत्काळ शिवपुरीं । दिव्य देह धरूनि ॥ ४९ ॥ मर्कट कुक्कुट निकट असती । तरि तयांसी हि तत्काळ चि नेती । ते स्वकाळें शमोनि भूपति । आले तुमचिया उदरासी ॥ ५० ॥ मर्कट तो तव नंदन । कुक्कुट तो हा प्रधानसून । पूर्वजन्मसंस्कारें महामन । रुद्राक्षभस्मप्रिय हे ॥ ५१ ॥ ये जन्मीं शिवार्चनप्रेमें । शिवलोक पावती नेमें । परिसोनि पराशरोत्तरें अमृतोपमें । संतोषला भूपाळ ॥५२॥ पुनः प्रणम्यपूर्वक प्रीतीं । भविष्य पुसेलि ऋषिप्रति । तो शिवकथारस श्रोतीं । परिसावा सभाग्यीं ॥ ५३ ॥ सदाशिवकथाश्रवणभाग्य जया । इंद्राचें वैभव तुच्छ तया । इंद्र असमर्थ शिवपद पावावया । श्रोता पावे सद्भावें । ५४ ॥ जें शिवपद सुरदुर्लभ । तें श्रवणमात्रें सुलभ । तरि आतां धरूं लोभ । श्रवणकीर्तनार्चनीं कृपणेव ॥ ५५ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामीरामदासकृते । शिवमहिमावर्णने । रुद्राक्षमहिमावर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ४१ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो नमो मृत्युंजया । हरिसी आश्रित मृत्युभैया । जीवत्वा शिवत्वा उभया । अभिनवानंदें ॥ १ ॥ सद्य शिवानुभव । तेथें वेगळा कैंचा जीव । सहजस्वरूपीं वाव । मृत्यु स्थिति उत्पति ॥ २ ॥ आतां जड जीव स्थूळ देही । जो तत्वता नाशवंत पाही । सदाशिव-

१ नातलग २ ज्याप्रमाणें कृपण मनुष्य संपत्तीचा लोभ धरून संचय करतो त्याप्रमाणें आपण नवविधा भक्तीचा लोभ धरून ज्ञानसंचय करून अंतीं शिवपद पावूं ३ जीव आणि शिव या उभयतांच्या ठिकाणीं आढळून येणारें मृत्यूचें भय तें, हे सदाशिवा, तू हरण करितोस.

स्मरणें तो हि । राहे अकल्प अविनाश ॥ ३ ॥ शिवभजनें शिवभुवनीं । शिवत्व पावले जीव होउनी । तरि तें आश्चिर्य काय तये स्थानीं । अमर आहेति अवघे च ॥ ४ ॥ मृत्युलोकीं हि केले अमर । हा तवं स्मरणाचा वदिवार । शिवभक्त आहेति अजरामर । ते कवणा वर्णवतील ॥ ५ ॥ तुझें नाम च शिवकल्याण । तेथें कैचें अकल्याण । तनु मन काष्ट पाषाण । उघडें शिवस्वरूप ॥ ६ ॥ हे मुख्य रुद्रपद्धति । तया रुद्राध्ययनाची ख्याति । प्रसंगें परिसावी श्रोतीं । कीर्ति सदाशिवाची ॥ ७ ॥ पूर्व प्रकरणांतीं भूपति । पुसता जाला पराशराप्रति । पुत्रप्राक्चरित्रें[1] फेडिली भ्रांति । आतां भविष्य सांगावें ॥ ८ ॥ कल्पवृक्ष कामगौ चिंतामणि । सत्संगापुढें सर्व ठेंगणीं । यांप्रति गेलिया निवती प्राणी । संत स्वयें येऊनि निववितीं[2] ॥ ९ ॥ ऐसें आइकोनि स्तवन । पराशर बोले प्रसन्नानन । राया तुझा सद्भाव देखोन । अवाच्य हि परि सांगतसें ॥ १० ॥ पित्रुमूर्तिसंख्या वछरीं[3] । तस्याश्वास्य वासरीं[4] । तत्पुत्रक्रीडा निर्धारीं । अवलोकिजे हा तव पुत्र ॥११॥ ऐसें मुनिवचन परिसोनि । स्वसंभोग्या सेविली सभास्थानीं । ऋषी उठवी वसन सावरूनि । शंका निरसी तयाची ॥ १२ ॥ पराशर ह्मणे न धरी भय । यासीं मी सांगेन उपाय । मृत जीववी रुद्राध्याय । सर्वोपनिषत्सार जें ॥ १३ ॥ सर्व रचनेआधीं केवळ । शिवस्वरूप जें निर्मळ । त्या आत्मस्वरूपास्तव तत्काळ । ब्रह्मा निर्मिला रजोमय ॥ १४ ॥ तयासी बोधिला सृष्टिक्रम । प्रबोधिले वेद जे स्तविती विक्रम । तयांचें हि सार सर्वोत्तम । रुद्राध्याय प्रबोधी ॥ १५ ॥ शिवरूप शाश्वत सकळाद्य । संधिनिर्मुक्त जें सद्य । तें च जेथें प्रतिपाद्य । विश्वरूपें तद्रूपता ॥ १६ ॥ तें यजुर्वेदस्थ परमामृत । ब्रह्म-

---

१ पुत्राचें मागाल जन्मांतील चरित्र सांगून. २ निरिच्छ होण्याकरिता कल्पवृक्ष, कामधेनु यांकडे चालत जावें लागतें परंतु संत हे स्वतः घरीं येऊन आपली इच्छा तृप्त करितात. ३ वारा. ४ सप्त+अश्व+आस्य=सूर्याच्या घोड्याच्या मुखाइतके ह्मणजे सातवे दिवशीं.

दक्षणमुखें प्रगटत । तें परपरा स्वर्गींहूनि आगत । ऋषियोगें महिमंडळीं ॥ १७ ॥ जो सर्व मत्रस्वरूप । जया पाठें परम तप । जो कैवल्य स्वस्वरूप । तत्प्राप्तीचीं साधनें ॥ १८ ॥ तया रुद्राध्यायाध्ययनें । महा पापें दग्ध केलीं जनें । राहिलीं यमाचीं शासनें । लोपोनि ठेलीं प्रेतपेता ॥ १९ ॥ यम ब्रह्मया गेला शरण । रुद्रजाप्य पवित्र प्राण । यमावतीसी येइल कोण । मम वृत्ति लोपली ॥ २० ॥ ऐसें आइकोनि विधाता । करावया रुद्राध्ययनघाता । भूमडळीं जाला पाठविता । अश्रद्धा दुर्मेधा अविद्या ॥ २१ ॥ तेणें चचळ जालीं मनें । साडिलीं लोकीं रुद्राध्ययनें । मग यम स्वकीय शासनें । सुखें राहिला स्वराज्यीं ॥२२॥ पूर्व जन्मार्जित दोषीं । प्राणी होतीं अल्पायुषी । ते रुद्रजाप्ये दीर्घायुषी । ऐश्वर्यारोग्य वळ धृति ॥ २३ ॥ रुद्राध्यायें महारुद्र । स्नापिता पावती सुभद्र । रुद्राध्यायें सुस्नात ते अभद्र । आणि मृत्यु पासूनि निस्तरती॥२४॥ रुद्राध्यायें जपें । स्नान करिती जे सकल्पें । ते मृत्यु तरती सुखरूपें । शिवपदवी पावती ॥ २५ ॥ शत रुद्राभिषेकें नर । शतायुषी होय निर्धार । सर्व पापनिर्मुक्त शकर- । पद पावे सेवटीं ॥ २६ ॥ एक रुद्रायुत स्नानें । महीं शक्राचेन महिमानें । वर्षायुत तव नदनें । आनदें निःपाप नादिजेल ॥२७॥ विप्र ज्ञानयज्ञतपोनिष्ट । शात सर्वत्र समदर्शी स्वाचारशिष्ट । सुद्धाध्ययन स्वरादि स्पष्ट । तें च फळद प्रत्यया ॥२८॥ दुराचारी विस्वरित । अशुद्धाध्ययन करित । तेणें विशेष वाढे दुरित । फळ कैंचें तयाचें ॥ २९ ॥ अवद्धें वेद पढता भावें । अध्ययनाचें फळ फावे । ऐसें बोलावया स्वभावें । कोणिहि समर्थ नव्हे च ॥ ३० ॥ भावार्थाविण काहिं च नाहीं । तथापि योगें वेद व्याकरणादि स्वकर्मी

---

१ ब्रह्मदेवाच्या दक्षिणबाजूकडील मुखातून निघालेला जो यजुर्वेद त्यात आत्मस्वरूपाचें वर्णन आहे. २ प्रेतपति=यम. ३ मदबुद्धिचा मनुष्य. ४ रुद्राध्यायाचा दहासहस्र जप झाला तर. ५ इद्राच्या वैभवानें मडित. ६ दहासहस्र वर्षे. ७ शुद्ध अध्ययन. ८ रुद्राध्यायाचा जप करणारा ब्राह्मण कसा पाहिजे तीं लक्षणें यात सागितलीं आहेत. ९ गलित पाठ. १० याज्ञिक कर्म.

कांहीं । भावार्थे कृतकृतलता हें घडणार नाहीं । भगवद्भक्तिवांचुनी ॥३१॥ भावार्थें पूजितां सदाशिवा । मूर्खा पडिता शक्ता अशक्ता समान ठेवा । मानसार्चनीं फळ पुण्य हि प्रत्यक्ष नलगे देवा । नामें गति अभावें हि॥३२॥ आता विमळाशयीं रुद्राध्यायी । सांग पढतां फळ अक्षयीं । ऐसें सांगोनि तये समयीं । गेला ऋषि स्वाश्रमा ॥ ३३ ॥ राजा पुत्रासहित हर्षे । क्रमलीं संपूर्ण बारा वर्षे । ब्रह्मरेखे परिस्पर्षे । मृत्यु पुत्रा सप्तम दिनीं ॥ ३४ ॥ पूर्व सूचना पराशरादि मुनि । रायें पाचारिलें प्रार्थुनी । यथोक्त प्रकारें पूजनीं । सुखासनीं बैसविले ॥ ३५ ॥ प्रतिष्ठूनि शत-सहस्र घट । जळपूर्ण पुण्य तरंशिखा एकवट । रुद्राध्ययन घडघडाट । करितीं अपररुद्र चि ते ॥ ३६ ॥ सत्या संपूर्णता तत्काळ । प्रेतें विकासिले नेत्रकमळ । उठोनि बैसला सकळ । सांगता जाला जनका ऋषीं ॥ ३७ ॥ एक दंडधारी उग्ररूप । मज बांधोनि नेता सकोप । दुसरा महावीर कृतप्रताप । तेणें मज सोडविलें ॥ ३८ ॥ हें परिसोनि परमानंदें । रायें पूजिलीं ऋषिवृंदें । भोजनदक्षणादि होऊनि आल्हादें । सभे बैसले सर्व हि ॥ ३९ ॥ हरली पुत्रवियोगचिंता । भरली हृदयीं सुखसरिता । तव तो दिव्यरूप अवचिता । नारद आला देवर्षि ॥४०॥ तया ब्रह्मविदातें देखोनि । रायासहित हर्षले मुनी । समस्तीं सप्रेम अ-भिवंदुनी । पुजा केली भूपाळें ॥ ४१ ॥ यानतरें रायें प्रार्थिलें । स्वामी कोठूनि येणें जालें । काहीं अपूर्व जें देखिलें । तें सांगावें दया-निधी ॥ ४२ ॥ नारद जाला बोलता । मज स्वर्गीहूनि उतरतां । आश्चिर्य देखिलें आला, होता[१] तव पुत्रासी अतक ॥ ४३ ॥ हें जा-णोनि चद्रमौळीं । वीरभद्र प्रेरी गणसमेळीं । तव पुत्र पाशनिबद्ध पोकें-ळीं । नेता देखोनि कोपला ॥ ४४ ॥ तवं यम आला धावत । केलें प्रणम्य दंडवत । कर जोडूनिया विनर्नीत । नमो रुद्रा वीरभद्रा ॥४५॥ जी जी गतायुपा राजतनुजा । म्यां आणिलें महाराजा । यदर्थी अपराध

---

१ पवित्र झाडाच्या डाहाळ्या २ जणू काय मूर्तिमंत रुद्र च. ३ आका-शातून.

काय माझा । सांगा स्वामी . दयानिधि ॥४६॥ तवं तो बोले हास्यवदन । यासी केलें रुद्राभिषेचन । हा अयुतायु जाला संशयमनें । तरि पूस चित्रगुप्तासी ॥ ४७ ॥ तत्काळ चि पुसिलें यमें । सांप्रत अयुतायु जाला नेमें । वीरभद्र प्रणमूनि प्रेमें । सोडूनि गेला स्वलोका ॥ ४८ ॥ वीरभद्र गेला कैलासभुवना । मी येथें आलों तव सभास्थाना । परिसोनि राजा ऋषि सर्व जना । जाला अतुळ सुहर्ष ॥ ४९ ॥ ऐसें संतोषऊनि सर्वांतें । नारद गेला स्वर्गातें । ऋषि गेले स्वाश्रमातें । राजा राजभुवनासी ॥ ५० ॥ ऐसें हें रुद्रमहिमान । भावें पढती आइकती जन । त्याचे कोटिजन्मार्जित दोषदहन । सुखें पावती शिवपदा ॥ ५१ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिवमहिमावर्णने । रुद्रजपाभिषेकवर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ४२ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो शिवा अतर्क्यैश्वर्या । नमो शिवा अतर्क्य कृतकार्या । नमो शिवा जगदेक आर्या । अतर्क्यानंददायका ॥ १ ॥ नमो शिवा स्वतंत्रमना । नमो अघटित कृतघटना । नमो नमो विचित्र विश्वनटना । कृतमर्यादा अमर्यादा ॥ २ ॥ पूर्वं प्रकरणीं रुद्रजप–। महिमा वर्णिला अमुप । आतां अन्य धन्य परिसा प्रताप । शिवकीर्ति श्रद्धया ॥ ३ ॥ उमामहेश्वरव्रतार्चनकथा । सर्व सिद्धिदायक सर्वथा । आनर्त्त देशीं वेदरता । ब्राह्मण होतें वास्तव्य ॥ ४ ॥ तो पुत्र कळत्र धन धान्यें । वर्तत असतां जनमान्यें । तया शारदा नाम्नी कन्या लावण्यें । गुणाढ्यिली जालीसें ॥ ५ ॥ द्वादशाब्दीं तारुण्यविकें । मागितली पद्म विप्रें मृतपत्निकें । तया श्रीमतासी दिधली जनकें । सुमुहूर्तें उत्साहें ॥ ६ ॥ मध्यान्हकाळीं विवाह जाला । सायंसंध्ये सरोवरा आला । संध्या करूनि अंधारीं तयाला । येतां जाली सर्पदृष्टि ॥७॥ तो निमाला पूर्वार्जितें । दुःखी करूनि उभय कुळातें । संस्कारूनि गेले स्वाश्रमातें । शारदा राहिली पितुगेहीं

१ दहा हजार वर्षे आयुष्य. २ जरी याबद्दल मन साशंक असेल. ४ प्रणाम करून.

॥ ८॥ तवं कोण्हीएके काळवेळीं । पिता बंधु नसतां जवळी । नैधृत धृत-शिष्य करकमळीं । आला गृहा ऋषि अंध ॥ ९ ॥ तयासी केलें प्रणम्य पूजन । अभ्यंग पादाभ्यंग रुचिभोजन । अनन्य भावें धूपदीपादि पुष्प चंदन । सुखी जाला सुभावें ॥१०॥ तेणें आशिष दिधला विचित्र । तुज तेजस्वी कीर्तिवंत होईल पुत्र । तयासी तवं नव्हते नेत्र । नेणता निघालें मुखांतुनी ॥ ११ ॥ परिसोनि ते गतभर्तृका बाळा । अश्रुधारा श्रवती डोळां । प्रार्थी जोडूनि करकमळा । स्वामी मी अमंगळा वैधव्यें ॥१२॥ भवदाशिष स्वातीजळ । परि मी शुक्ति नव्हें कापासौषधि केवळ । सिद्ध गळीं पाहे सीळफळ । कां विफळ वाक्य हों पाहे ॥ १३ ॥ नामि नामि ह्मणे मुनि । मी बोलिलों न देखोनि । परि असत्यता माझां वचनीं । कल्पांतीं हि घडेना ॥ १४ ॥ आतां माझें वाक्य व्यर्थ न जाय । आणि तुझें सीळ अक्षयीं होय । ऐसा सांगेन जो उपाय । तो तूं करी निर्धारें ॥ १५ ॥ उमामहेश्वरव्रत करीं । विचित्र पुत्र पावसी सुंदरी । शारदा ह्मणे वंदिन शिरीं । आज्ञा समर्थाची जे ॥ १६ ॥ मग बोलता जाला मुनि । चैत्र कां मार्गशीर्षी सुदिनीं । अष्टमी चतुर्दशी शुद्ध मनीं । व्रतारंभ करावा ॥ १७ ॥ संकल्पविधिवत्प्रातस्नान । नित्यकर्म सर्व हि करून । पावोनिया स्वभवन । मंडपशोभा करावी ॥ १८ ॥ यथोक्त पद्मपंचरंगीं । संमार्जन रंगमाळा मध्यभागीं । पूर्ण सवस्त्र कुंभ लक्षणांगी । तेथें स्थापावा सद्भावें ॥ १९ ॥ तयावरी सौवर्णप्रतिमा । महेश्वर सहितउमा । यथाविभवें भावें उत्तमा । पुजा करावी उपचारीं ॥ २० ॥ पंचामृतादि शुद्धोदकाभिषेक । रुद्रैकादश पंचाक्षर शताष्टक । अभिमंत्रूनि गौरित्र्यंबक । पुनः स्वस्थानीं स्थापावीं ॥२१॥ स्वयें शुक्लांबरधर सुधि । शुद्धासनीं बैसावें स्थिरबुद्धि । संकल्प कृतांजळीं करावा आधीं । भवानिशंकरापुढें ॥२२॥ माझीं शतजन्मार्जितें । घोररूपें जें दुष्कृतें । तत्रार्चेनें अपरमितें । निरशी दीनदयाळा

---

१ आशिस्=आशिर्वाद. २ आपला आशिर्वाद. ३ शिंप. ४ निवळ कापूस.

॥ २३ ॥ सौभाग्य विजयो आरोग्यता । धर्म ऐश्वर्यार्थ आतां । स्वर्गापवर्गसिध्यर्थ स्वता । करितसे शिव शिवार्चन ॥ २४ ॥ ऐसा संकल्प उच्चारुनी । न्यास ध्यान करावें मनीं । पार्वतीपरमेश्वर ध्यानीं । स्फुरद्रूप स्मरावीं ॥ २५ ॥ दिव्य रूपें मनोहरें । दिव्यालंकार दिव्यांबरें । दिव्य गंध माल्यें सुंदरें । आयुधेंसी प्रसन्नें ॥ २६ ॥ आवाहन आसन सकल्पून । आरंभावें अर्घ्यप्रदान । त्रिवार सपुष्प सफळ जीवन । येणें मंत्रें अर्पावें ॥ २७ ॥ नमस्ते पार्वतीवल्लभा । त्रैलोक्यवर-दर्पभा । त्र्यंबका महादेव स्वप्रभा । अर्घ्य अंगिकारी नमोस्तुते ॥ २८ ॥ नमस्ते देवदेवेशी महादेवी । अंबिके वरदे शांभवी । प्रपन्न भयहारिणी स्वभावीं । अर्घ्य अंगिकारी शिवप्रिये ॥ २९ ॥ यानंतरें सर्वोपस्कार । समर्पावे रुचिरतर । पुजूनि पार्वतिशंकर । होम करावा मूळ मंत्रें ॥ ३० ॥ अष्टोत्तरशत तिलाज्याहुती । हऊनि पुजा करावी मागुती । भोजनपूजनें विप्रदंपति । युग्में संतुष्ट करावीं ॥ ३१ ॥ मग आपण करावें निशीं भोजन । वाग्नियतें हविष्यान्न । ऐसें संवछरपर्यंत शुद्ध मन । उभय पक्षीं सुलक्षीं ॥ ३२ ॥ मग उद्यापन करावें । यथापद्धति पूर्ण भावें । हें व्रत आचरेलि तो पावे । अलभ्य काम यथेप्सित ॥ ३३ ॥ त्रिसप्त कुळजासीं दिव्य । भोग भोगी स्वर्गी भव्य । इंद्रादि लोकपाळस्थळें सेव्य । विधि विष्णु मुख्य करूनि ॥ ३४ ॥ शिवलोकीं वसे कल्प शत । मग शिवरूपीं प्रवेशत । वंछे तूं हि करीं हे महाव्रत । अलभ्य फळ पावसी ॥ ३५ ॥ ऐसें ऋषीनें आश्वासिलें । ते शारदेनें अंगीं केलें । तवं तिचा पिता बंधु हि आले । तिहीं प्रार्थिलें ऋषीतें ॥ ३६ ॥ शारदामुखें व्रतकार्य । आइ-कोनि राहाविला तो आर्य । व्रत आचरवी आचार्य । तैसें आचरती जाली ॥ ३७ ॥ संपूर्ण हि व्रतसउद्यापन । जालिया गुरुसांनिध यथाविधान । भावें प्रसन्न जाली प्रगटोन । पार्वती भक्तवछळा ॥ ३८ ॥ प्रगट देखोनि जगन्मंगळा । प्रेमाश्रु श्रवों लागले डोळां । प्रकाश जाला ऋषि-नेत्रकमळा । दोघें चरणीं लोटलीं ॥ ३९ ॥ तयासी उठऊनि कृपाभरें ।

१ इच्छेनुसार. २ एकवीस. ३ वसे. ४ मान्य केलें.

कुरवाळितसे वरदकरें। वर मागा जो अभ्यंतरें। अपेक्षित जो तुह्मा॥ ४० ॥ मुनि प्रार्थी कृतांजळी। हे शारदा गतभर्त्तृका बाळीं। म्यां न देखोनियां डोळीं। अशिप इसीं दीधला ॥ ४१ ॥ भर्त्तृसह सुख संभोगीं। सुपुत्र पावसी सुप्रसंगीं। तें मम वाक्य सत्य करीं वेगीं। ह्मणौनि केलें प्रणम्य ॥ ४२ ॥ हास्यमुखें बोले भवानी। पूर्व जन्मीं हे मानिनी। द्राविड देशीं विप्रसदनी। द्विजपत्नी सपत्निसीं ॥ ४३ ॥ इची जेष्ट सवती अति सुंदरा। गुणलावण्यें प्रिय प्राणेश्वरा। इनें प्रवर्तोनि सवतीमत्सरा। पति तीप्रति जावं नेदी ॥४४॥ मग ते भर्त्तारसंगेंविण। अबाळेंका अबळा जाली क्षीण। सेखीं पावोनि गेली मरण। पतिरतिवाचुनी ॥ ४५ ॥ इचा विप्र एक सेजारी। तेणें कामबाणें धरिली करीं। इनें धिःकारिला परि अंतरीं। इच्या वेधें निमाला ॥ ४६ ॥ हे हि निमाली दैवगति। पूर्व संकल्पें जाला होता पति। परस्त्रीसंगीं संकल्पगति। विवाह होतां च निमाला ॥ ४७ ॥ इनें सवतीपतीसी विघडिलें। तेणे दोषें बाळवैधव्य प्राप्त जालें। ज्या नारी विघडिती दंपतिरति बोलिलें। तया बाळवैधव्य जन्म त्रिसप्त ॥ ४८ ॥ असो इचा पूर्वजन्मपति। पांड्य राष्ट्रीं जाला विप्रयाती। लक्ष्मीवंत सहयुवति। नांदत असे सुखें ॥ ४९ ॥ पार्वती बोलिली वर। स्वप्नीं भोगिसीं प्राक्जन्मवर। मत्पूजनें पापराशि अपार। दग्ध जालिया तत्काळ ॥ ५० ॥ तेणें स्वप्नपतिसंगें। पुत्र पावसी प्रसगें। काळांतरें भेटाल सांगें। प्रत्यक्ष हि उभयता ॥ ५१ ॥ तयासह भोग भोगून। अंतीं करावें सहगमन। दोघें पावाल शिवभुवन। वरदानें माझिया ॥ ५२ ॥ ऐसें बोलोनिया भवानी। अदृश्य जाली विश्वजननी। यानंतरें ते चिह्नी। स्वप्नीं पावली पतिरति ॥ ५३ ॥ गौरिवरे तो स्वदेशीं। स्वप्नीं भोगितसे तयेसी। जागृतिहूनि अधिकतेसी। परि परस्परें जाणती स्वस्वस्थळीं ॥ ५४ ॥ असो स्वप्नपतिसंगें सुंदरा। स्वकाळें जाली गरोदरा। प्रसव सुलक्षण कुमारा। बाळार्कसम तेजसा ॥ ५५ ॥

---

१ सवतीसह. २ पुत्रहीन. ३ नुकताच मिळालेला पर.

तें देखोनि दंङ्ग पाहाती जन । ह्मणती कुळद्वयीं लाविलें लांछन । तव जालें गगनवचन । हे निर्दोष ह्मणोनि ॥ ५६ ॥ उमामहेशपूजनें पुत्रा । हे पावली पद्मनेत्रा । हें असत्य ह्मणतां अपवित्रा । जिव्हा झडेलि तत्काळ ॥ ५७ ॥ हें परिसोनि हि विकल्प केलें । त्याच्या जिव्हा झडोनि कृमीविमर्ले[1] । यानंतरें सर्वांमुखीं जालें । जयजयकार शिवनामें ॥ ५८ ॥ जन ह्मणती हे देवगति । कन्या सत्य पतिव्रता सति । ईश्वरइछा पुत्र प्रसवती । पुरुष पशु घटादिक ॥ ५९ ॥ नारी पुसोनिया एकांतीं । निःसंशयें तिसी मानिती । व्रतबंध वेदाभ्यास पुत्राप्रति । उपतिष्टला वरदानें ॥ ६० ॥ शारदेच नाम नंदना । सहित पित्रु परिवार सुमना । यात्रे आली शिवदर्शना । गोकर्णेश्वरासी ॥ ६१ ॥ तेथें अकस्मात जाली भेटि । परस्परें दृष्टादृष्टि । वळखी काढावया गोष्टि । आरंभिली आदरें ॥ ६२ ॥ मनें मनासी साक्षी आली । उमामहेश्वरें प्रसन्न जाली । स्वमीची सुखावाप्ति सत्य केली । तवं मिळालीं सर्व हि ॥ ६३ ॥ मग तो शारदाजनकें जनें । स्वगृहासी आणिला सन्मानें । शारदेसहि[2] वरदानें । नाना भोग भोगित ॥ ६४ ॥ सर्व तथा जालें देहावसान । शारदा स्मरोनि गौरीवचन । करूनि गौरीहराचें ध्यान । सहगमन केलें ॥ ६५ ॥ तथं विमान आलें सृष्टीं । देव करिती पुष्पवृष्टि । सकळा जनादेखतां दृष्टीं । दोघें गेलीं शिवपदा ॥ ६६ ॥ ऐसें हें पुण्य अख्यान । भावें पढती परिसती जन । ते भुक्ति मुक्ति सर्व सुखें पावोन । सदा वसती शिवलोकीं ॥ ६७ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिवमहिमावर्णने । उमामहेश्वरव्रतवर्णन । नाम प्रकरण समाप्तम् ॥ ४३ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो पुराणपुरुषा पुरातना । नमो पुराणप्रिया सनातना । नमो पुराणप्रशसा प्रकाशना । स्वप्रकाशा शंकरा ॥ १ ॥ पुराण

---

१ प्राप्त झाला. २ शारदेसह.

तें दुर्लभ हें सुलभ ॥ १७ ॥ अमृतें अमरता तोंवरि । जंव प्रळयो असे दुरी । कथामृताची नवलपरि । मरण मारी तत्वतां ॥ १८ ॥ जैसजैसा कीर्तनसीळ । तैसी बुद्धि होय निर्मळ । स्वरूप देवाचें तत्काळ । प्रकाशोनि समरसीं ॥ १९ ॥ तेथें जीवत्व च न साहे । अमरपण हि कोण वाहे । भक्त मुक्त निःसंदेहें । सर्वस्वेंसी सर्वदां ॥ २० ॥ ऐसे कैंचे ते अमरत्वीं । अत्यासक्त विषयतत्वीं । ऐश्वर्य तारुण्यें भोगत्वीं । निरंतर ते तत्पर ॥ २१ ॥ कथामृतसेवनें विरक्त । होती परिग्रहनिर्मुक्त । अमराचेनि स्वर्गत्यक्त । परमापत्ति न करवे ॥ २२ ॥ ते हि हरिहर-किंकर । सदा सेविती लोभातुर । विटंबति मग कैवार । करूनि रक्षिती हरिहर ॥ २३ ॥ असो अमृताहूनि आगळा । कीर्त्तनप्रेमाचा जिव्हाळा । पुस्तकवाचन घननीळा । परम प्रिय कलियुगीं ॥ २४ ॥ त्याहूनि भक्ताचें गायन । निःशंक निस्पृह निरभिमान । तेणें तोषे जगजीवन । भजनाधिक्यें भगवंता ॥ २५ ॥ नृत्यघागरियांचे घोळ । करताळिका मृदग टाळ । उपाग वीणें स्वरकल्लोळ । रंगें श्रीरंगभक्ति ॥ २६ ॥ अकृताभ्यास भोळे दास । अनन्य आवडती देवास । गाती नाचती घडकळास । प्रेमें नाठवे तयासीं ॥ २७ ॥ रंगीं लोटांगण घालिती । दंडवत अभिवंदिती । एकमेका क्षेमें देती । जैसा देव भेटला ॥ २८ ॥ आरार्त्तिकांचा हारिख । पाहाती सप्रेम श्रीमुख । तेणें देवा परम सुख । भक्तां क्षण'हि न विसंभे ॥ २९ ॥ संसार काय बापुडें । पाप घडेलि तें केवढें । राहे एका नामापुढें । एवढें 'विधिसि न रेंवेचि ॥ ३० ॥ पुण्यफळ स्वप्रकाश । साटवणें नाहीं अवकाश । दाटोनि उततलें आकाश । दश्यादश्य कोंदलें ॥ ३१ ॥ करी ते भरी ते हि भरले ।

पुरोनि तैसें च उरलें। कोण्ही नाहित निर्गुजलें। आडळेंविण अनंत॥ ३२ ॥ यज्ञदानादि सर्व-सुकृत । घडे विघडोनि दुष्कृत । जे सर्व धर्मबहिष्कृत । ते हि तरती श्रवणें च ॥३३॥ कीर्तनश्रवणाचें हें फळ । पारें परिसा उभयाचें सीळ । पडित पाहिजे प्रेमळ । सर्वज्ञ सर्वगुणान्वित ॥ ३४ ॥ दांत शांत करुणावंत । शुचि सुनत साधु संत । क्रोधमदमत्सर-विरहित । नित्य निस्पृह समदर्शी ॥ ३५ ॥ मितभाषी अमित अर्थ । सरळ प्रबोधक समर्थ । अशेष अर्थ जो यथार्थ । तो अनयासें बोधवी ॥ ३६ ॥ तत्रं चि विद्यागुणगौरव । जव यांचों न धरी मानव । अर्थी होता याचकभाव । विद्यागुणें गेलें महत्व ॥ ३७ ॥ याचकांचे निरोपणीं । भाव नुपजे अंतःकरणीं । दीन दुर्बळ तें पुराणीं । कैसें वैसों शकेलि ॥ ३८ ॥ ह्मणौनि निस्पृहतेपासीं । जन वोळगती अनायासीं । सहज गुरुता हे तयासी । वचन दुर्लभ त्याचें ॥३९॥ धूर्त दुर्वृत्त दुर्जन । कुटिल जिगीप जे दुर्मन । जें का नगर दयाहीन । तयाप्रति न सांगावें ॥ ४० ॥ उच्छिष्ट स्थळ अमंगळ । संमार्जनहीन केवळ । द्यूतागारादि सकळ । वर्ज्यस्थानें वर्जावीं ॥ ४१ ॥ पुण्य ग्रामीं संतमेळीं । पुण्य देशीं कां देउळीं । पुण्य नदी पुण्य स्थळीं । पुण्य कथा करावी ॥ ४२ ॥ श्रद्धा-संपूर्ण मानस । हरिहरकथेसी लाळस । विरस करूनि कथारस । नवचे संसारकार्याती ॥ ४३ ॥ शुचि मौन सावधान । श्रोता सफळ तो पावन । श्रवणीं अभक्त निर्फळ जन । जन्मोजन्मीं अति दुःखी ॥ ४४ ॥ तांबुलादि उपायनीं । पुराण पूजिलें नसतां जनीं । भक्तया परिसतां हि मनीं । तो दरिद्री तत्त्वता ॥ ४५ ॥ कथा होतां भगवंताची । वृत्ति रंगेना जयाची । उठोनि जाइल जो तयाची । नाशे दारा संपदा॥४६॥

---

१ कीर्तन करणारा व ऐकणारा. २ याचना. ३ या ठिकाणीं कीर्तनसार. ४ पैशाची मागणी करून कथा किंवा पुराण सांगणारे. ५ गोळा होतात. ६ दुसऱ्याचा पाडाव करण्याची इच्छा बाळगणारे. ७ मोठ्या भक्तीनें पुराण ऐकत आहे परंतु पुराण ग्रंथाचें दक्षणा विडा सुपारी इत्यादि साधनांनीं जो पूजन करीत नाहीं तो जन्मदरिद्री समजावा.

सोष्णिषं मस्तकायें च । पुराणीं वैसती साच । ते अवगति पावती नीच । पापी मनुष्याधम ॥ ४७ ॥ तांबुलचर्वण भक्षण । जळपान विलक्षण । ते स्वविष्ठा भक्षी जाण । यमकिंकर दंडिती ॥ ४८ ॥ होऊनि तुंगासनारूढ । कथा परिसती जे मूढ । ते वायस होती दृढ । यमयातन पावती ॥ ४९ ॥ आर्ध्यासनीं वीरासनीं । कथा परिसती बैसोनि । ते होतिल अर्वसेनि । जनीं अर्जुनपादप ॥ ५० ॥ वंदनेविण आइकता । विषदैम होय तत्वता । निजोनि परिसेलि जो स्वता । तो आजगर होइल ॥ ५१ ॥ समानासनें गुरुतल्प । सम निश्चयेसी पाप । निंदा गुरूची तरि रूप । होय श्वान गर्दभ ॥ ५२ ॥ पुराणज्ञा मंदमती । मर्त्यंबुधि जे पाहाती । ते जन्मोनि क्रिमी होती । येथें संदेहो नाहीं॥५३॥ आरंभलें असतां पुराण । कदापि हि न करी श्रवण । घोर यातना निर्वाण । तो पावेलि स्वभावें ॥ ५४ ॥ कथेसी देती अनुमोदन । धन्य जन ते पावन । दिव्य विमानीं बैसोन । शिवपद ते पावती ॥ ५५ ॥ कथाश्रवणीं अविश्वासी । विघ्न करील जो कथेसी । कोटि वछर तयासी । नरक ग्रामशूकरता ॥ ५६ ॥ जे परिसविती पुण्य कथा । जना कृतार्थकृत सर्वथा । ते ब्रह्मपदीं वसती यथा । कल्प कोटि शत साग्र ॥ ५७ ॥ पुराणिकासी आसन । कंबळ अजिन नव वसन । ग्रंथासी सूत्रवेष्टन । ते स्वर्गसुख भोगून । शंकरपदीं शोभती ॥ ५८ ॥ महापातकी श्रवणमात्रें । तरती परिसतां चरित्रें । शिवपदप्राप्ति विचित्रें । कथाश्रवणमहिमानें ॥ ५९ ॥ यदर्थी पुण्य इतिहास । कथा परिसा सावकाश । जेणें होऊनि स्वप्रकाश । पापी पावती शिवपद ॥ ६० ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिवमहिमावर्णने । पुराणप्रशंसावर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ४४ ॥

---

१ डोक्यावर पागोटे अगर रुमाल घालून. ( उष्णीष=पागोटें ). २ उच ठिकाणीं बसून ३ मखमलीप्रमाणें मोल्यवान आसनावर. ४ पांढऱ्यापायाचे. ५ विषवृक्ष. ६ मातागमनीपणा. ७ या ओवीस सुद्धांत पांच चरणें आहेत. ८ व्याघ्रचर्म.

॥ श्रीरामो जयति ॥

ॐ नमोजी दीनोद्धरणा । पतितपावनकरणा । सद्य अघसागरोत्तरणा । दयाकल्पांबु अपारा ॥ १ ॥ अकळा सकळागम शास्त्रार्था । लीळा स्वतंत्रा समर्था । आश्रित तारिसी सर्वथा । विधिनिषेधा निषेधु ॥२॥ विधिनिषेधीं विश्वजन । किंकर केलें त्रिभुवन । ते तव किंकराधीन । नामस्मरणमात्रें चि ॥ ३ ॥ तुझिया श्रवणें संकीर्तनें । भावें तरताती महिमानें । परि पिशाचकृत बंधनें । तरतां नव्हता परिसिला ॥ ४ ॥ देहस्मरण नाहीं जया । विधिनिषेध काय तया । भाव भक्ति कोंडुनियां । हृदयीं वैसे तयाचे ॥ ५ ॥ ते हि उद्धरिले श्रवणें । तें चि परिसा हो श्रवणें । बधिरता नसतां श्रवणें । सार्थक सकळीं करावें ॥ ६ ॥ दक्षिण देशीं वाष्कळ नाम । खळसंकुळ एक ग्राम । जन ते दुर्जन परम । विचित्र पापें जयांचीं ॥ ७ ॥ सर्व धर्मविवर्जित । सर्व पापउपार्जित । त्यान्ही वर्ण उपासित । नित्य नूतन पातकें ॥ ८ ॥ भय नाहीं त्यांच्या चित्ता । कोण्ही नाहीं निवारिता । अवघे विसरले भगवंता । तनुमदें अति मंद ॥ ९ ॥ अघसागरिचें ढीवरें । ते नगरीचे नारीनर । यथेष्ट करिती कर्मजार । त्याहीमध्यें महा थोर । विदुर नाम द्विजाधमें ॥ १० ॥ तरुणी स्त्री सांडूनिया घरीं । लोळे वेश्यासेजेवरी । इकडे तयाची अंतुरी । जारपुरुषीं रमतसे ॥११॥ जारपुरुषीं परम प्रीति । करित असतां रति एकांतीं । तवं तें देखे तिचा पति । इचा संगति पळाल्या ॥ १२ ॥ कांता धरूनिया स्वकरीं । मुष्टिप्रहरें तिसीं मारी । सोडवाया नाहीं घरीं । मग सुंदरी बोलिली ॥ १३ ॥ मज कां करितोसि निकरु । स्मरविव्हळा काय करुं । तूं जालासि वेश्यावरु । धीर न धरवे आतां ॥ १४ ॥ तवं तो जीवीं च समजला । तयेप्रति बोलता जाला । माझ्या बोलें घेई मोला । मग तूं जाई

१ दुष्ट लोकांनीं गजबजलेला. २ धर्मांचा त्याग करणारे ३ पापाचा संचय करणारे. ४ ढीग. ५ या ही ओवीस पांच चरणें आहेत. ६ गद्दबज. ७ सांगण्यावरून.

निःशंक ॥ १५ ॥ तें मानलें दोघां जणा । द्रव्य घेऊनि स्त्रीचें जाणा । वेश्या देतसे दक्षणा । ऐसे काळ बहु गेले ॥ १६ ॥ पति तो निमाला तयेचा । थारा मोडला दोषाचा । दोषाश्रम तो देहो तिचा । बाळकासीं स्वगृहीं ॥ १७ ॥ तवं ते एकली मदिरीं । विधवा नारी दुराचारी । गेला सांगाती संसारीं । दुःखी निराधारा ते ॥ १८ ॥ तारुण्यें जालें पाठिमोरें । कोण्ही न पुसे रति आदरें । सुकलें पद्म तें मधुकरें । जैसे तेजिजे निर्गंध ॥ १९ ॥ तवं ते एके पर्वकाळीं । पुण्य जनांचे संमेळीं । गोकर्णेश पंचमैाळी । तेथें आली सहज चि ॥ २० ॥ पुण्य जनांची संगति । तीर्थस्नान देवगति । आली पुराणिकाप्रति । देवदर्शन करूनियां ॥ २१ ॥ सर्व बैसले पुराणीं । तवं तो दोषफळें वाखाणी । जारस्त्रीचे दंड वांणीं । तेणें उदंड वर्णिले ॥ २२ ॥ ते वैसले तिचा चित्तीं । खडे जैसे चोळे भिंती । दंडभेणें भग्नवृत्ति । दीनवदनें । रडतसे ॥ २३ ॥ हृदय फुटतसें गहिंवरें । कापे थरथरां शरीरें । लोक गेले परि निर्धारें । आपण वैसली तेथें ॥ २४ ॥ मग घातलें दंडवत । विनवी जोडूनिया हात । मज हे घडले जी न कळत । जारपुरुषाचे संग ॥ २५ ॥ कैसी साहों मी यातना । भय वाटते माझ्या मना । शरण आलिये मज दीना । करी उद्धार कृपाळा ॥ २६ ॥ ऐसी संतप्त अनुतापें । प्रार्थितसे ग्लानिरूपें । तवं तें देखोनियां सकृपें । नैाभीकार दीधला ॥ २७ ॥ पापअनुताप तुज आला । दोष पूर्वील प्रगट केला । पुढें विषव्रत वीट घेतला । जालीसी कृतोर्धेतेयोग्य ॥ २८ ॥ दोष झांकूनियां लाघवें । पुढें हि धरिला असे जीवें । त्यासी ताराया वैभवें । तारकाचीं न चलती ॥ २९ ॥ तरि तूं येथें राहें आतां । सांडी यमदंडाची चिंता । नित्य सत्कथा परिसतां । पद शांकर पावसी ॥ ३० ॥ मग ते पतिता पायांवरि । मानी कृतार्थता अंतरीं । भावें पुराण श्रवण करी । अति विरक्ता मुक्त्यर्थ

१ वश्ये असा दुसरा पाठ आहे. २ बाळकासह. ३ सहचारी. ४ तारुण्यावस्था निघून गेली. ५ टाकावें. ६ वाणीनें. ७ ना भी=भिऊ नकोस असें सांगितलें. ८ कटाळा. ९ उद्धार करण्यायोग्य.

॥ ३१ ॥ तो कृपाळ सद्गुरराणा । अनाथ देखोनि कृतकरुणा । करितु वैराग्यश्रवणा । भक्तियोग शिवाचा ॥ ३२ ॥ ते सुस्नाता युक्ताशना । मुक्त विकल्प स्थिर आसना । अक्षमाळा भस्मोद्धूळना । जटावल्कलधारिणी ॥ ३३ ॥ अंतर्बाह्य निर्विकारा । विलंब नलगे कृतोद्धारा । अंतीं प्रेरी शिव किंकरा। तिसीं नेलें शिवपदा ॥ ३४ ॥ दिव्य देहें शिवभुवनीं । सहपरिवारें शिवभवानी । श्रवत प्रेमाश्रु लोचनीं । केलें प्रणम्य देखोनियां ॥३५॥ आश्वासिली कृपाभरें । मौळि स्पर्शिला स्वकरें । जैसी कन्या कृपाभरें । मायबापीं कृपाळीं ॥ ३६ ॥ शिवपद पावलीं दंपती । आकृति लाधोनियां शाश्वती । त्यां सकळांसी परम प्रीति । देखोनियां इयेसी ॥ ३७ ॥ दोघां भवानी शंकरा । पतिसहित पूजिती दारा । मधुर मधुप स्तवनगिरा–। सहित शिरपद्में पदीं ॥ ३८ ॥ तें देखोनि द्विजमानिनी । करकमळीं विनवी भवानी । माझा पति कवणे स्थानीं । गौरि बोले हास्यास्यें[१] ॥ ३९ ॥ तुझा पति अति पतित । दोषें पिशाचतनु बिभूत[२] । विंध्याचळीं विटंबत । कृतकर्मे आपुलिया ॥ ४० ॥ येरी प्रार्थितसे वंदुनी । कैसा पावे शिवभुवनीं । तवं ते बोलिली भवानी । शिवकथाश्रवणमात्रें ॥ ४१ ॥ हें परिसोनि द्विजनायका । मौनें अवलोकी भूमिका[३] । कृपा द्रवली जगदंबिका । गंधर्वासी पाचारी ॥४२॥ तव तो पातला तुंबर । जो नारदाचा सहचर । केला साष्टांग नमस्कार । कर जोडूनि विनवितु ॥ ४३ ॥ आज्ञा करी शैलबाळी । तुवां जावें विंध्याचळीं । सहितद्विजकांता वेल्हाळी । विमानावरी बैसोनि ॥ ४४॥ पिशाचरूप इचा पति । शिवकथाश्रवण त्याप्रति । करावें भलतिये रीतीं । तेणें होईल निर्दोष ॥ ४५ ॥ आज्ञा मस्तकीं वंदिली । वेगीं विंध्याचळा आलीं । पिशाचआकृति देखिली । भीम भीषण रक्ताक्ष ॥ ४६ ॥ हासे रडे पडे पळे । मग तो बांधोनि पाशीं वळें । वीणा वाहोनिया

१ मस्तक. २ नवरा बायको. ३ ज्या दंपती इच्यापूर्वी शिवपद पावल्या असतील त्या. ४ हास्य मुखानें. ५ धारण केली आहे. ६ खालीं मान घातली.

निःशंक ॥ १५ ॥ तें मानलें दोघां जणा । द्रव्य घेऊनि स्त्रीचें जाणा । वेश्या देतसे दक्षणा । ऐसे काळ चढ गेले ॥ १६ ॥ पति तो निमाला तयेचा । थारा मोडला दोषाचा । दोषाश्रम तो देहो तिचा । बाळकासीं स्वगृहीं ॥ १७ ॥ तव ते एकली मंदिरीं । विधवा नारी दुराचारी । गेला सांगाती संसारीं । दुःखी निराधारा ते ॥ १८ ॥ तारुण्यें जाळें पोठिमोरें । कोण्ही न पुसे रति आदरें । सुकलें पद्म तें मधुकरें । जैसें तेजिजे निर्गंध ॥ १९ ॥ तवं ते एके पर्वकाळीं । पुण्य जनांचे समेळीं । गोकर्णेश पंचमैळी । तेथें आली सहज चि ॥ २० ॥ पुण्य जनांची संगति । तीर्थस्नान दैवगति । आली पुराणिकाप्रति । देवदर्शन करूनियां ॥ २१ ॥ सर्व बैसले पुराणीं । तव तो दोषफळें वाखाणी । जारस्त्रीचे दंड वोणीं । तेणें उदंड वर्णिले ॥ २२ ॥ ते वैसले तिचा चित्तीं । खडे जैसे बोले भिंती । दंडभेणें भग्नवृत्ति । दीनवदनें । रडतसें ॥ २३ ॥ हृदय फुटतसें गहिवरें । कापे थरथरां शरिरें । लोक गेले परि निर्धारें । आपण बैसली तेथें ॥ २४ ॥ मग घातलें दंडवत । विनवी जोडूनिया हात । मज हे घडलें जी न कळत । जारपुरुषाचे संग ॥ २५ ॥ कैसी साहों मी यातना । भय वाटते माझ्या मना । शरण आलिये मज दीना । करी उद्धार कृपाळा ॥ २६ ॥ ऐसी संतप्त अनुतापें । प्रार्थितसे ग्लानिरूपे । तव तें देखोनियां सकृपें । नाभीकार दीधला ॥ २७ ॥ पापअनुताप तुज आला । दोष पूर्वील प्रगट केला । पुढें विपव्रत वीर्टे घेतला । जालीसी कृतार्थतेयोग्य ॥ २८ ॥ दोष झांकूनियां लाघवें । पुढें हि धरिला असे जीवें । त्यासी ताराया वैभवें । तारकाचीं न चलती ॥ २९ ॥ तरि तूं येथें राहें आता । सांडी यमदंडाची चिंता । नित्य सत्कथा परिसतां । पद शांकर पावसी ॥ ३० ॥ मग ते पतिता पायांवरि । मानी कृतार्थता अतरीं । भावें पुराण श्रवण करी । अति विरक्ता मुक्तवर्थ

---

१ वदय असा दुसरा पाठ आहे. २ बाळकासह. ३ सहचारी. ४ तारुण्यावस्था निघून गेली. ५ टाकावें. ६ वाणीनें. ७ ना भी=भिऊ नकोस असें सांगितलें. ८ कंटाळा. ९ उद्धार करण्यायोग्य.

॥ ३१ ॥ तो कृपाळ सद्गुरराणा । अनाथ देखोनि कृतकरुणा । करितु वैराग्यश्रवणा । भक्तियोग शिवाचा ॥ ३२ ॥ ते सुस्नाता युक्ताशना । मुक्त विकल्प स्थिर आसना । अक्षमाळा भस्मोद्धूळना । जटावल्कलधारिणी ॥ ३३ ॥ अंतर्बाह्य निर्विकारा । विलंब नलगे कृतोद्धारा । अंतीं प्रेरी शिव किंकरा । तिसी नेलें शिवपदा ॥ ३४ ॥ दिव्य देहें शिवभुवनीं । सहपरिवारें शिवभवानी । श्रवत प्रेमाश्रु लोचनीं । केलें प्रणम्य देखोनियां ॥३५॥ आश्वासिली कृपाभरें । मौळि[१] स्पर्शिला स्वकरें । जैसी कन्या कृपाभरें । मायबापीं कृपाळीं ॥ ३६ ॥ शिवपद पावलीं दंपती । आकृति लाधोनियां शाश्वती । त्यां सकळांसी परम प्रीति । देखोनियां इयेसी ॥ ३७ ॥ दोघां भवानी शंकरा । पतिसहित पूजिती दारा । मधुर मधुप स्तवनगिरा-। सहित शिरपद्में पदीं ॥ ३८ ॥ तें देखोनि द्विजमानिनी । करकमळीं विनवी भवानी । माझा पति[२] कवणे स्थानीं । गौरि बोले हास्यास्यें[४] ॥ ३९ ॥ तुझा पति अति पतित । दोषें पिशाचतनु बिभृत[५] । विंध्याचळीं विटंबत । कृतकर्में आपुलिया ॥ ४० ॥ येरी प्रार्थितसे वंदुनी । कैसा पावे शिवभुवनीं । तवं ते बोलिली भवानी । शिवकथाश्रवणमात्रें ॥ ४१ ॥ हें परिसोनि द्विजनायका । मौनें अवलोकी भूमिका[६] । कृपा द्रवली जगदंबिका । गंधर्वासी पाचारी ॥४२॥ तवं तो पातला तुंबर । जो नारदाचा सहचर । केला साष्टांग नमस्कार । कर जोडूनि विनवितु ॥ ४३ ॥ आज्ञा करी शैलबाळी । तुवां जावें विंध्याचळीं । सहितद्विजकांता वेल्हाळीं । विमानावरी बैसोनि ॥ ४४ ॥ पिशाचरूप इचा पति । शिवकथाश्रवण त्याप्रति । करावें भलतिये रीतीं । तेणें होईल निर्दोष ॥ ४५ ॥ आज्ञा मस्तकीं वंदिली । वेगीं विंध्याचळा आलीं । पिशाचआकृति देखिली । भीम भीषण रक्ताक्ष ॥ ४६ ॥ हासे रडे पडे पळे । मग तो बांधोनि पाडी बळें । वीणा वाहोनिया

१ मस्तक. २ नवरा नायको. ३ ज्या दंपती इच्यापूर्वी शिवपद पावल्या असतील त्या. ४ हास्य मुखानें. ५ धारण केली आहे. ६ खालीं मान घातली.

रसाळें । शिवचरित्रें गातसें ॥ ४७ ॥ तेणें कीर्तनश्रवणमात्रें । हरिलीं सकळांचीं विचित्रें । ज्ञानप्राप्ति दिव्य गात्रें । महिमा कीर्तनश्रवणाचा ॥४८॥ मग तो तेजोमय शरीरें । वाहोनि विमानीं आदरें । दोघें जणें यें वधुवरें । वेगीं आणी शिवलोका ॥ ४९ ॥ सद्य पतितपावनी । कथाश्रवणें शिवसुरनीं । दोघें नादती आज्ञुनी । एवढा महिमा श्रवणाचा ॥ ५० ॥ मार्वे परमानदजनक । शिवचरित परिसती लोक । ते निस्तरती सर्व शोक । अतीं सद्य पावती शिवपद ॥ ५१ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामीरामदासकृते । शिवमहिमावर्णने । श्रवणमहिमावर्णन । नाम प्रकरण समाप्तम् ॥४५ ॥

---

## ॥ श्रीरामो जयति ॥

नमो महादेवा भक्तपक्षा । नमो नमतजनकृपाकटाक्षा । नमो कृतदेवउपेक्षा । नरभक्तवज्रपजरा ॥ १ ॥ तुझी कृपा जयाचे शिरीं । तयाचे कृतात हि पाय धरी । क्रूर[1] ग्रह हि निग्रह न करी । तवाज्ञा माथा सकळाचे ॥ २ ॥ तुझीं स्थापिलीं सर्व हि प्रस्थानें । तुवां दिधलियासी महिमानें । तुजवेगळीं सर्व हि दीनें । तुज आधीनें भगवता ॥ ३ ॥ तव औदार्यें मृत्यु च मृत्यु पावे । तव औदार्यें ग्रहासी हि ग्रहगति भावे । राहूचें शिर ठार्के आडवें । ग्रहण करी ग्रहेंद्रा ॥ ४ ॥ चद्र विश्वासी स्वयें भोगी । क्षीणत्व कळक त्याचे अगीं । मगळ अमगळप्रद जगीं । महत्व कैचें तयासी ॥ ५ ॥ बुध त्रिभुवामाजि सौम्य । तरि जनकजमनीचें वैरम्य । बृहस्पति तारेचें अगम्य । कर्म वारू न शके चि ॥ ६ ॥ शुक्रासी च ग्रहगति आली । एकाक्षता[3] प्राप्त जाली । शनीश्वराची गति मदली । प्राप्त जाली विमुखता ॥ ७ ॥ हे जरि ग्रह स्वयें च समर्थ । तरि याचा यांसी कां न चुके च अनर्थ । हरिहरभक्ताप्रति व्यर्थ । सामर्थ्यें या सकळाचीं ॥८ ॥ दुःख दारिद्र भोग रोग । भोगिती अभक्ताचें अग । हरिहरभक्त ते

---

१ सकळ दोष. २ शनीप्रमाणें क्रूर. ३ एक डोळा जाणें.

अभंग । नामस्मरणपंजरी ॥ ९ ॥ विघ्न उत्पातः घात भय । हरिहरभक्तांचें करिल काय । स्मरतां भगवंताचे पाय । मंगळ नित्य नूतन ॥ १० ॥ सुलग्न सुदिन चंद्रतारादि ग्रहबळ । विद्या अदृष्ट सर्व हि सफळ । अपशकुन दे शकुनाचें फळ । हरिहरचरणस्मृतिमात्रें ॥ ११ ॥ हरिहरस्मरणें अभीष्ट । हें काय आश्चर्य वरिष्ट । दासनाम स्मरतां कुर्कुट । अमंगळ होय मंगळ ॥ १२ ॥ असो भुवनैक मंगळ शिवस्मरण । निरशी दुःख दारिद्र जन्म मरण । यदर्थीं करावें पुण्यकथाश्रवण । शिवभक्तमहिमा जो ॥ १३ ॥ परिसा शिवभक्तीची प्रौढी । भुवनत्रयीं कीर्ति गाढी । मृत्यु मृत्यु पावे येवढी । ख्याति सदाशिवभक्तांची ॥ १४ ॥ ब्रह्मपुराणीं गंगातटीं । श्वेतऋषीची पर्णकुटि । नित्य ध्यातसे धूर्जटि । गौतमाचा प्राणसखा ॥ १५ ॥ मुखीं शिवनामस्मरण । ध्यानीं मनीं शिवचरण । शिव त्याचा जीवप्राण । शिवाविण अंनु नेणें ॥ १६ ॥ शिवस्मरणें नित्यनेम । अतिथीपूजनीं शिवप्रेम । शिवपूजन जप होम । शिवालागि सर्व हि ॥ १७ ॥ शिवावाचूनि कांहिं च नाहीं । देहत्याचा विसरु देहीं । शिव सबाह्य सघन पाहीं । हें हिं स्मरण समरस ॥ १८ ॥ ऐसा तो शिवभक्त मुनी । नित्य निरंतर शिवभजनीं । पूर्ण आयुपाचा दिनीं । मृत्यु आला दूतांसी ॥ १९ ॥ दूत प्रवेशले भीतरीं । तव शिवप्रतिमा साजिरी । भयभीत राहिले दुरी । मृत्यु धिःकारी तया ॥ २० ॥ जो कां कोट पंजरीं । वृक्षाग्रीं पर्वतशिखरीं । भू स्वर्ग पाताळ विवरीं । जो दुर्निवार कृतांत ॥ २१ ॥ ह्मणे तो दूता अति भयभीता । गतायुषा कार्य नेतां । एर ह्मणती याच्या चित्ता । सदाशिवें वसविलें ॥ २२ ॥ दूत ह्मणती स्वामी नाथा । आह्मा होय परम वेथा । प्रवेश न करवे सर्वथा । मग तो मृत्यु पातला ॥ २३ ॥ पाशपाणी पुढें जाला । तवं तो नंदीनें हटकिला । येरु ह्मणे न्यावयाला । आलों श्वेता गतायुषा ॥ २४ ॥

---

१ कोंबडा. २ अन्य, दुसरें. ३ प्रत्यक्ष मरण. ४ दूतासह. ५ कोठें हि गेलें तरी जो नेल्याशिवाय सोडावयाचा नाहीं ६ ' का न ' असें पाहिजे. ७ ज्याच्या हातीं पाश आहे असा मृत्यु.

नदी ह्मणे जाय मूढा । कैसा होसी पाहों पुढा । श्वेत पुजी चद्रचूडा । कैसा नेसी पाहेन ॥ २५ ॥ पचाननापुढिल वाळ । कैसें नेइल तें श्रृंगाळ । मृत्यु न मनी च तत्काळ । श्वेतावरी टाकी पाश ॥ २६ ॥ तेणें नदीसी कोप आला । दडें प्रचडें ताडिला तेथें मृत्यूसी मृत्यु जाला । दूत पळोनिया गेले ॥ २७ ॥ भेणें कापती थरथरा । निकळ वोलती स्खळद्गिरा । प्रेतनाथा कर्पुरगौरा । क्रोध आला जी स्वामी ॥ २८ ॥ आह्मी म्यालों शाभवतेजें । मृत्यु पुढें जाला पैजे । नदी निवारिता सहजें । पाश घाली शिवभक्ता ॥ २९ ॥ नदी कोपला प्रचड । तयासी रुद्रें दिधला दड । ताडूनि पाडिला नितड । मृत्यु मारूनि पृथ्वीसी ॥ ॥ ३० ॥ यमधर्मासी क्रोध आला । महा माहिप पाचारिला । सेनासिधु सिद्ध जाला । भट उद्भट चालिले ॥ ३१ ॥ एवढें आरभलें घोर । तें काहिं च नेणे द्विजवर । सदाशिवस्मरणतत्पर । प्रेमे नामें उच्चारी ॥ ३२ ॥ सदाशिवा भवभयहरा । आश्रित जीवा करुणाकरा । भक्तजनवज्रपजरा । दीनानाथा दयानिधि ॥ ३३ ॥ बाळ अज्ञान काहिं नेणें । पितया त्याचा कैवार घेणें । तैसें सदाशिवा तेणें । भक्तपक्ष रक्षिजे ॥ ३४ ॥ असों यमधर्माचे भार । प्रगट गुप्त भयकर । चित्रगुप्त काळ दुर्द्धर । निर्रय मूर्तिमत ते ॥ ३५ ॥ भूत वेताळ आधि व्याधि । आक्षी कुक्षी रोग प्रसिद्धि । उत्पात विशुचिका रोधी । पचप्राण तत्काळ ॥ ३६ ॥ ज्वर निज्वर नाना ताप । वीर सेनासह प्रताप । भूमि उतरला प्रेतप । बळें न्यावया शिवभक्त ॥ ३७ ॥ वाप भक्ताचा साह्यकारी । गजर देखोनि दासद्वारीं । नदी कार्तिकेय पाचारी । युद्ध दुर्द्धर माडलें ॥ ३८ ॥ वीर करिती कोलाहळ । हाकी होत हलकालोळ । एक काळ एक महाकाळ । भूमडळ भयभीत ॥ ३९ ॥ मृत्यु आणि मृत्युजय । भिडती यम कार्तिकेय । किती धैर्य धरिल काय । सहपरिवारें सहारी ॥ ४० ॥ हाहाकार थोर जाला । ह्मणती यमधर्म मारिला । शेषं परिवार पळाला ।

---

१ सिंव्ह. २ कोल्हा ३ अडखळत वोलणें ४ हे यमधर्मा ५ शकरास ६ सज्ज केला. ७ उत्तम प्रकारचे ८ नरक. ९ स्वद. १० अवशिष्ट.

सूर्या सांगे सर्व हि ॥ ४१ ॥ पुत्रपराजय परिसोनि । सूर्य आला वि-
धिभुवनीं । सर्व दिग्पाळ मिळोनि । विष्णु आदि अवघे च ॥ ४२ ॥
वाद्यें न वाजत देवांचीं । भूमीं उतरले मुके चि । भयविव्हळ हृदयें
त्यांचीं । अमरा मृत्यु देखोनि ॥ ४३ ॥ अहो या मृत्युंजयाविण । आज्ञा
उरिकें अमरपण । सकळ निघाले शरण । त्राहि त्राहि शंकरा ॥ ४४ ॥
स्वामि गतायुपा श्वेता । न्यावयासि आला होता । तुझी च आज्ञा भ-
गवंता । मर्त्य अमर्त्य मर्यादा ॥ ४५ ॥ परि हा भवदाज्ञाधारी । निर-
पराधी सचराचरीं । सर्व जीवशासनें करी । स्थिति रचना निर्मळ ॥ ४६ ॥
आमची प्रार्थना लक्षावी । याची उपेक्षा न करावी । कृपाकटाक्षें जीववीं ।
ह्मणौनि केलें प्रणम्य ॥ ४७ ॥ आइकोनि देवांची विनवणी । प्रसन्न
जाला शूळपाणी । सर्वांप्रति गंभीर वाणीं । स्वयें बोलता जाला ॥ ४८ ॥
माझे दास हरीचे दास । यांची न पाहावी वास । ममहरिनामाचा
विश्वास । तिकडे येणें नवजावें ॥ ४९ ॥ देव ह्मणती महादेवा ।
कोणा न रुचे तुझी सेवा । अनायासें कैवल्य ठेवा । आवघे स्मरती
हरिहरा ॥ ५० ॥ शिवा शंकरा गौरीहरा । पद्मनाभा दामोदरा ।
रघुपति रामा सीतावरा । ह्मणता काय कठिण जी ॥ ५१ ॥ शिव
ह्मणे हे मनुजवाणी । याचस्तव स्तविजे पुराणीं । प्रेमळ हरिहर नाम-
स्मरणीं । तेथें नवजावें येमें ॥ ५२ ॥ देव प्रार्थिती कृतांजळी । आज्ञा
प्रमाण चंद्रमौळी । हरिहरदास सर्व काळीं । वंदिजेति यमधर्में ॥ ५३ ॥
शिव नंदीसी आज्ञा करी । गंगाजळें सहपरिवारीं । यम शिंपुनियां
सावद करीं । जयजयकारें गर्जती ॥ ५४ ॥ विष्णु आदि सकळ सुरीं ।
शिव पूजिला उत्तर तीरीं । आज्ञा घेऊनि सहपरिवारीं । हर्षें आले
स्वस्थाना ॥ ५५ ॥ पाहा हो दासाचा अभिमानी । ऐसा दुसरा कैंचा
जनीं । आह्मी तयाचां भजनीं । आळस न करूं सर्वथा ॥ ५६ ॥
एकमेकाचे संगतीं । भावें हरिहर भजों प्रीतीं । पावों सर्व सुखसंपत्ति ।
भक्तिविण कां दुःख भोगुं ॥ ५७ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामि-

---

१ सूर्याचा मुलगा यम ह्मणून.

रामदासकृते । शिवमहिमावर्णने । भक्ताभिमान वर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ४६ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो नमो दीनदयाळा । नमो नमो आश्रितवत्छळा । नमो नमो शरणागतपाळा । नमो कृपाळा महेशा ॥ १ ॥ वेदां न वर्णवे महिमान । देवां दुर्लभ तव दर्शन । तो तूं अनायासें सुप्रसन्न । यथारुचि भजनें हि ॥ २ ॥ कैंचें अध्ययन कैंचें ध्यान । कैंची संध्या कैंचें स्नान । कैंचा विधि कैंचें विधान । सर्व हि धर्मविरहित ॥ ३ ॥ कैंचा सद्गुरु सत्संगति । नेणोनि तुझी महिमोन्नति । नेणोनि तुझी स्वरूपस्थिति । आचारविचारविरहित ॥ ४ ॥ कैंचें तत्वता शिवस्मरण । कैंचें यथोक्त नामोच्चारण । तवाशयें स्पर्शतां अंतःकरण । दर्शन देशी दयाळा ॥ ५ ॥ पूर्व प्रकरणीं श्वेत द्विजवर । त्याचा शिवें करूनि कैवार । यम दंडिला सहपरिवार । शिवत्व दिधलें स्वभक्ता ॥ ६ ॥ तरि तो ब्राह्मण स्वधर्मनिष्ट । विशेष शिवभक्त वरिष्ट । तो सहज च सर्वगुण श्रेष्ठ । होय शिवपदा योग्य ॥ ७ ॥ मेध्य भिल्ल अंत्यजेंव । जया स्पर्शतां भिती जीव । तयासी भेटला सदाशिव । विप्राआधीं वरदाता ॥ ८ ॥ हे ब्रह्मपुराणीं पुण्य कथा । गंगास्तवनीं असे सर्वथा । शतावे अध्यायीं श्रोत्रपथा । येतां सर्व सुखप्रदा ॥ ९ ॥ ब्रह्मा ह्मणे परिस नारदा । सर्व पापघ्नी सर्व पुण्यदा । भक्तिमहिमा परमानंदा । सदाशिवाचा भावार्थे ॥ १० ॥ गोदावरीचे दक्षण तीरीं । श्रृंगिरी नाम पुण्य गिरी । तयाचे उत्तर भागीं त्रिपुरारि । आदिकेश शिवलिंग ॥ ११ ॥ सिंधुद्वीप महामुनि । तयाचा बंधु वेदाभिधांनी । भक्तिभावें अनुदिनीं । पुजा करी तयाची ॥ १२ ॥ विविधीं वैदिक मंत्रीं । अभिषेक करी सूर्यशिर सूत्रीं । गंगा-

---

१ आशय=ठिकाण, वस्ति; जन्ममरण तापापासून तू आह्मास मुक्त करशील अशी जी तुझ्यासंबधानें आमची आशा आहे त्या आशेनें आमच्या अंतःकरणांत एकदां घर केलें ह्मणजे. २ पापाचा नाश करणारी. ३ वेद या नांवाचा.

मूर्ते बिल्वपत्रीं । नाना वन्य सुपुष्पीं ॥ १३ ॥ वनफळें सु-रसाळें । नेवेद्य समर्पी नित्य काळें । धूपदीपादि सकळें । यथा मिळतोपचारें ॥ ॥ १४ ॥ गंगास्नोथि महाभांग । शिवभक्त भववीतराग । मध्यान्हासि आलिया गगनग । पर्यटन करी उदरार्थ ॥ १५ ॥ वेदपारंग ऋषि वेद । प्रेमळ पुजाविधिविद । भक्तिभावें अति सावद । नित्य पुजी महेशा ॥ १६ ॥ पुजा करूनि गेला बुध । तवं कोण्हिएक आला व्याध । करूनि श्वापदाचा वध । मांसेंसहित श्रमोनिया ॥ १७ ॥ तवं तें देखिलें शिवस्थान । विश्रांति पावलें त्याचें मन । भीतरीं पाहिलें प्रवेशोन । अपूर्व लिंग देखिलें ॥ १८ ॥ देखतां च तो सदाशिव । खुंतोनि बैसला त्याचा भाव । हा माझिया जिवाचा हि जीव । प्रभु देव हा माझा ॥ १९ ॥ मज भजन पूजन कांहीं न कळे । परि हा भरला माझिये हृदयखोळे । डोळे झांकितां टाकितां हि नुखंळे । माझिये अभ्यंतरींचा ॥ २० ॥ महादेव बाह्य अंतरीं । नित्य निरंतर मज बरोबरी । हा प्रेरील ते च परीं । भजन याचें करीन ॥ २१ ॥ मग गंगेसी केली बुचकुळी । पात्र कैंचें धरिली गुरुळी । भरता च पाळा वाम करकमळीं । दक्षिणें मांस हिरवें च ॥ २२ ॥ करैंवदनें वेचटला । शिवलिंगाजवळी आला । चरणें शंभु उघडा केला । पुजा लोटूनि द्विजाची ॥ २३ ॥ गंडूष टाकिला शिवावरी । पाळा वाहिला वाम करीं । मांस वाहोनि त्रिपुरारी । पूजिला भावें अनन्यें ॥ २४ ॥ मांसासहित आला आश्रमा । रात्रीं निद्रा केली विश्रामा । तवं स्वप्नीं देखे सर्वोत्तमा । लिंगरूपा ईश्वरा ॥ २५ ॥ नित्य पारधी करितां त्यासी । उसिर लागतां तळमळी मानसीं । क्षुधा तृषा माझिया देवासी । बहुत लागली असेलि ॥ २६ ॥ क्षुधा कपाटीं लागे पोट । तृषा हों पाहे हृदयस्फोट । म्हणे आधीं पूजिन नीळकंठ । मग मी शेष सेवीन ॥ २७ ॥ वाप भोळा

चक्रवर्ती । महादेव कृपामूर्ति । जव न देखे भिल्लाकृति । तव वाट पाहे वछवेंत ॥ २८ ॥ जो नाकळे विधिविष्णूसीं । अधोर्ध्व पाहाता रूपासीं । तो आकळिला सद्भावेसी । धन्य भाव भक्ताचा ॥ २९ ॥ जो प्रळयरुद्र सृष्टि सन्हारीं । जो मायातीत निर्मम निर्विकारी । जो योगारूढ निर्द्वंद्व पुरारि । तो वाट पाहे भिल्लाची ॥ ३० ॥ सर्वकाळ सिद्ध च आहे देव । परि तो हृदिस्थ च न पवे मानव । तरि तयाहिहूनि अधिक भाव । जेणें अकल देव आकळे ॥ ३१ ॥ तया भावार्थाचा वारा । काहिं तन्हि लागो या शरिरा । ह्मणौनि वर्णितसे आर्यागिरा । देवा भक्ताचा सोहळा ॥ ३२ ॥ एन्हवीं काय हे महाराष्ट्र वाणी । ईविण पडली होती वैणि । व्याकर्ण निरुप्ति श्लाघ्यवाणी । ते तरि पदोपदीं कळतसे ॥ ३३ ॥ आता असो हे आडकथा । शिवस्तवें पाविजे सर्वथा । व्याधें वेधिलें विश्वनाथा । धन्य भाव तयाचा ॥ ३४ ॥ तव तो वेद वेदेविदावर । पुजाकाळीं आला सत्वर । देखे विध्वशूनि पुजाप्रकार । मास पाला वाहिला ॥ ३५ ॥ शिव शिव ह्मणे सोवळा । काडर्के लोटिला मासगोळा । पुष्कळ घालूनि गगाजळा । शुद्ध केलें शिवलिंग ॥ ३६ ॥ मग नित्यवत केलें आर्चन । अविधिस्मरणें काटाळे मन । ऐसे क्रमले बहुत दिन । मग कोप आला मुनीसीं ॥ ३७ ॥ शिवगुरु अमर्यादापराधी । अवधि न करावा तयाचे वधीं । ऐसें चितूनि तो सुबुद्धि । पाहात राहिला गुप्तता ॥ ३८ ॥ तव तये च दिवसीं । उसिर लागला भिल्लासी । शिव वाट पाहे तव तयासीं । देखिलें एता ॥ ३९ ॥ प्रत्यक्ष वोले कैलासराज । वछा श्रमलासि उसिर लागला तुज । तुज दृष्टीं न देखता मज । आजि वेळु न गमे चि ॥ ४० ॥ भिल्ल ह्मणे जी सदाशिवा । तुझेन विश्राति माझिया जीवा । तू क्षुधातृषाक्रांत देवा । ह्मणोनि पूजिला पूर्ववत ॥ ४१ ॥ आज्ञा घेऊनि गेला व्याध । ब्राह्मणासी प्रजळला क्रोध । ह्मणे मी वेदविद सदाचारशुद्ध ।

---

१ गाय जशी आपल्या वत्साची वाट पाहाते त्याप्रमाणें. २ ऋषीप्रणित वेद ३ भाषा. ४ माण. ५ वेद जाणणारामध्यें श्रेष्ठ असा ' वेद ' नावाचा ऋषि.

अपरिग्रही अनुष्ठानी ॥४२॥ विशेष अभिषेकविधिवत्पूजन । जितेंद्रि-
यता करी शिवभजन । ऐसिया मज एक वचन । स्वप्नीं हि कहीं न बोले
॥ ४३ ॥ भिल्ल पापात्मा वञ्चचित । नित्य प्राणिवध कृत । सर्व
धर्माधिकारविरहित । स्पर्शे तो हि हों नये ॥४४॥ पुजा तरि ऐसी करी ।
गडुप टाकी शिवावरी । जेणें पापें पचिजे घोरीं । महा निरयीं अकल्प
॥ ४५ ॥ ऐसियासी बोले प्रीतीं । कदां न पाहे मजप्रति । तरि तया
भिल्लाचा प्राणघाती । होईन मी निश्चयें ॥४६॥ शकर बोलिला हासोनि ।
आपुलें कल्याण विचारीं मनीं । मग सिळा टाकी मम मूर्द्धनीं । भिल्ल
मजमाजीं मिळाला ॥४७॥ मग करीं उचलिली होती सिळा । ते भूमीवरी
टाकिली लीळा । आवरूनि क्रोधाचा उमाळा । ब्राह्मण आला आश्रमा
॥४८॥ अत्यत प्रस्तावलें चित्त । नित्यनेम करितां दुश्चित । पुनः प्रभातें
नित्योचित । सारूनि आला पुजेसी ॥ ४९ ॥ तवं लीळा धरिली
चद्रमौळी । सवर्ण शलाका भग्न तत्काळीं । वाहे तेथें भडभडा उकळी ।
अशुद्धाची अनावर ॥ ५० ॥ आश्चिर्य करितसे वेद । ह्मणे थोर
जाला प्रमाद । महोत्पात हा दुर्वेद । कोणासी काय होइल ॥५१॥
ऐसें चित्तीं विस्मित । मृत्तिका गोमय कुशें शोधित । गंगाजळें
प्रक्षाळित । तवं ते उकळी नावरे ॥ ५२ ॥ मग तैसें च सांडूनि ते
काळीं । नित्यवत पूजू लागला शुळी । तव भिल्ल हि आला ते च
वेळीं । देखे शिव रुधिराग ॥ ५३ ॥ जवळीं येऊनि पाहिलें करें ।
मूर्ध्नी भगोन भरला रुधिरें । थोर दाटला गहिवरें । उतटों पाहे
हृदय ॥ ५४ ॥ माझिया स्वामीचा मस्तक फुटला । स्वामी अंतरीं
दुखी जाला । वरिवरि पुजूनिया तयाला । स्वमस्तक नेव[2] घरासीं
॥ ५५ ॥ तरि मजएवढा पतित । दुसरा नाहीं हो निभ्रांत ।
राजा भंगे धड असतां दूत । तरि तो स्वामिघातक ॥ ५६ ॥

---

१ शिर. २ न्यावें. ३ राजाच्या दूतानें आपण स्वतः शाबूत राहून राजास मारूं देणें हें जितकें स्वामिघातकीपणाचें कृत्य आहे, तितकें च माझ्या स्वामीचें (शिवाचें) मस्तक फुटलें असतानां मी आपलें मस्तक धड घेऊन घरीं जाणें हें कृत्य निंद्य होईल असें भिल्ल ह्मणतो.

तरि हा महाराजाधिराज । 'मन्नाथ जगन्नाथ वृषभध्वज । हा दुखवेला सगळें असोनि मज । काय आतां जिऊंनियां ॥ ५७ ॥ कोणें प्रहर केला यासी । मी जरि तेव्हां असतों पासीं । तरि वारा लागों ने दितों स्वामीसी । प्राण वेचितों शिवार्थ ॥ ५८ ॥ आतां स्वामीसीं तों क्षत जालें । धिग त्या सेवकाचें उयालें । ह्मणोनिया शस्त्र काढिलें । धगधगीत तेजाळ ॥ ५९ ॥ तेणें ब्राह्मणा आली हुडहुडी । भयें बळलीसें बोबडी । नेत्रासी पडली झांपडी । थरथरा कांपे सर्वांग ॥ ६० ॥ शस्त्र घालावें जव शिरीं । तवं हस्त धरिला त्रिपुरारीं । दिव्य रूप ते अवश्वरीं । प्रगटलें भक्तभावार्थे ॥ ६१ ॥ वेदासी ह्मणे वेदस्तव्य । पाहे व्याधभाव असंभाव्य । मी भावाचा भोक्ता सेव्य— । भावें करूनि सकळांसी ॥ ६२ ॥ तुवां मृद्गोमयकुशोंकरीं । प्रक्षाळूनि पूजिलें वरिवरि । व्याधें दुखवोनि अंतरीं । आत्मनिवेदन मांडलें ॥ ६३ ॥ तरि वेद मंत्र विधि निषेध । मज च पासूनि प्रगटले नानाविध । परि अंतरप्रेमाचा प्रबोध । न ये सर्वथा अभ्यासें ॥ ६४ ॥ तरि मी अंतरात्मा सदाशिव । जाणे अभ्यंतरींचा भाव । कर्मकळाप विद्याविभव । हे हि माझी च प्रेरणा ॥ ६५ ॥ परि एकाएकीं च जीवें । मजमाजीं मिसळोंनि जावें । हें सामर्थ्य एके भावें । दुसरा नाहीं उपाय ॥ ६६ ॥ मग आधीं आलंगिलें भिल्लासी । उपरांत हृदयीं धरिलें ब्राह्मणासी । तू हि भला भक्त होसी । ह्मणौनि आश्वासिला ॥ ६७ ॥ प्रसन्न जाला श्रीशंकर । भिल्ला विप्रा दिधले वर । ह्मणौनि शंकर करुणाकर । मंगळप्रद अमंगळा ॥ ६८ ॥ देवाभक्ता जाली भेटि । हर्षे कोंदली सर्व सृष्टि । भावें कथा कर्णपुटीं । आइकतां होती शिवभक्त ॥ ६९ ॥ स्वभावें हि परिसतां कथा । सर्व पापनिर्मुक्त सर्वथा । सर्वसुख भोगूनि मौथा । बैसती पदीं शिवाचे ॥ ७० ॥ आतां असो या मृडमहिमार्णवाचा । पार कोण्ही हि न

१ मम नाथ. २ जिवंत राहून. ३ प्रहार. ४ जिणें. ५ शेवटीं.

पवती साचा । मूळाश्रयें म्यां आपुली वाचा । पवित्र केली शिवस्तवें ॥ ७१ ॥ पुढें महाविष्णुभक्तिभाव । परिसोत कां महानुभाव । केवळ श्रवणमात्रें जीव । जड हि पावती हरिपद ॥ ७२ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । शिवमहिमावर्णने । भिल्लभावार्थ विप्रभक्तिवर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ४७ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

ॐ नमो लक्ष्मीकांता । नमो अच्युता अनंता । नमो सनातना सदोदिता । व्यक्ताव्यक्तस्वरूपा ॥ १ ॥ नमो विष्णु भक्तवच्छला । नमो जिष्णु[1] जयनसीळा । नमो सहजस्वभावें कृपाळा । जगत्रय प्रतिपाळका ॥ २ ॥ तूं निरवयव निरभिमानी । स्वलीलास्थितीचा अभिमानी । अप्रार्थितां सर्व जनीं । सांभाळ करणें तुजलागीं ॥ ३ ॥ तूं सर्व जीवांचा अंगिकारी । प्राणसखा सचराचरीं । इंद्रियें विषयव्यवहारीं । जीववितें तुझी सत्ता ॥ ४ ॥ तूं जीवाचा हि जीव । तूं देवाचा हि देव । अकळ तुझें लीळालाघव । तू विश्वरुप विश्वात्मा ॥ ५ ॥ जी तुज अधिष्ठानावांचूनि । जीवजाळ भासे कैसेनि । असो अशेष हि तूं च असोनि । विश्वविकारा वेगळा ॥ ६ ॥ विकार आकार अविकार निराकार । हें कांहिं च नव्होनि अवघें तूं च सर्वेश्वर । हा तुझा एकदेशित्वें निवडतां निर्धार । तरि अनत तूं हें न घडतें ॥ ७ ॥ वाग्मनेंद्रियादिकां[2] अवेद्या । साकार स्वरूपें हि स्वसंवेद्या । तुझी विश्वरूपता हे सद्या । अपार च कीं हो ॥ ८ ॥ तेथें नाना प्रकारिचे नाना स्थानीं । प्रगट गुप्त जीव त्रिभुवनीं । तयांमाजि तुझा भाव उठतां मनीं । तूं सर्वां सन्मुख सावद ॥ ९ ॥ इतर हि दिग्पाळांश[3] । वसविती लिंगकरणकोश । परि तो हि तुझे सत्तेचा

---

[1] नेहमी विजयी होणाऱ्या हे जिष्णु=विष्णु. [2] मन आदिकरून जीं सूक्ष्म इंद्रियें आहेत त्यांना तू अगोचर आहेस. [3] इंद्रादि लोकपाळ.

अवकाश । स्वतंत्र स्वप्रकाश ते नव्हती ॥१०॥ लोकपाळामाजि श्रेष्ठ शक्र । तया सायोज्यता देणें च वक्र । साधकांसीं कदा नसे अवक्र । येथें येतिल ह्मणऊनि ॥११॥ तो कृपेण बळी याचक- । उणें होतां छळी लोक । तो हि भगवंताचा सेवक । सकामामाजि श्रेष्ठ ॥ १२ ॥ तयाचें च सर्वदा संरक्षण । स्वयें करितसे नारायण । करूनि नानापरि अवतरेण । तेथें इतर ते किती ॥ १३ ॥ ह्मणौनि सर्वाश्रयभूत । अशेष कृपावंत भगवंत । तयासी जालिया शरणागत । सीमा कैंचि सुखार्णवा ॥ १४ ॥ तयाचें ध्यान स्तवन अवघें अतुडे । ऐसें ब्रह्मयासी तें हि न घडे । आशय च होता तयाकडे । तत्काळ कृपाळ पावतसे ॥ १५ ॥ जळाश्रय जो जळशायी । न कळतां कैसा केवढा कवणे ठायीं । एकार्णवता जळमयीं । केवळ असतां ॥ १६ ॥ तयावरि नाभिकमळनळस्थ मुकुळ । प्रगटोनि विकाशलें अष्टदळ । केसरामोदीं मधुकरेंवँ सोज्वळ । ब्रह्मा एके मुखेंसीं ॥ १७ ॥ ह्मणे मी येथें एकट काय करूं । मज कोणाचा आहे आधारु । ऐसा असतां अति चिंतातुरु । जाली आकाशवाणी ॥ १८ ॥ स्वर स्पर्शसर्व्या सेवटिल वर्णद्वय । पदोच्चारें जो अर्थान्वय । तो करी तनं विधि ह्मणे हें काय । कोण बोलिलें तया पुसों ॥ १९ ॥ अवलोकन अवलंबितां मनें । प्रति दिशेसी जालीं आननें । वक्ता न दिसे मग मनें । विचार करी वचनाचा ॥ २० ॥ तव तो भगवंत बुद्धिदाता । स्फूर्ति पावला विधाता । शब्द कळला परि हे हि आतां । काय कैसें करावें ॥ २१ ॥ तद्उद्योगपर होतां बुद्धि । तेणें च प्रेरिली परमार्थसिद्धि । ह्मणे माझा जनक जो

---

१ इंद्राकडून त्याच्या भक्ताला सायोज्यता मुक्ति मिळणें अशक्य, कारण मग त्याला आपलें इंद्रपद द्यावें लागेल. ह्मणून तो नेहमी साधक जनांच्या कृत्यामध्यें विघ्न आणतो. २ बळीला कृपण हें विशेषण कां दिलें बरें ? ३ अवतार. ४ ब्रह्मदेव देखील भगवताचें वर्णन करण्यास असमर्थ आहे. ५ जळरूपता. ६ कळी. ७ मधु-लोलुप भुंगा ज्याप्रमाणें विकासलेल्या सुगंधित पुष्पातून ज्याप्रमाणें बाहेर पडतो त्या-प्रमाणें भगवताच्या नाभिकमलापासून ब्रह्मदेव प्रगट झाले. ८ एकवीस. ९ जी आकाशवाणी ब्रह्मदेवानें ऐकली त्यांत एकदर २१ वर्ण आहेत व त्यांतील शेवटचे दोन वर्ण ' तप ' असे आहेत.

त्रिशुद्धि[1]। तो मज न दिसे परि आहे ॥२२॥ जो दृश्यदृष्टीचा प्रकाशक द्रष्टा । तो कैसा दिसे जी देखण्या स्पष्टा । ऐसा अचिंत्य चिंतितां त्वष्टा । स्पष्ट च देखता जाला ॥ २३ ॥ मेघशाम चतुर्भुज । कमळनयन तेजपुंज । पीतांबरपरिधान विज । जैसी अचंचळ मेघनी ॥ २४ ॥ मुगुट कुंडलें वैजयंति । कंठीं कौस्तुभ झळके जोति । हृदयीं पदक द्विजपदाकृति । बाहु भूषणें मुद्रिका ॥ २५ ॥ शंख चक्र गदा कमळ। विचित्र कासेकांची तेजाळ । मणिमेखळा किंकिणी जाळ । चरणीं वाकी तोडर ॥ २६ ॥ वोलासी नावरे लावण्यठेव । सुमनीं भ्रमरगुंजारव । ऐसा आविर्भवला आदिदेव । अंकीं लक्ष्मी साळंकृता ॥२७॥ ऐसी अवघी वैकुंठरचना । आविर्भवली प्रत्यक्ष नयना । सर्वे च आछादली जैसी शयना-[2] । माजि स्वप्नसृष्टि हे ॥ २८ ॥ बाप भक्तजनमनोहर मुरारि । ध्यानावलंब नव्हे निराकारी । ह्मणौनि स्वस्वरूप साकारीं । सगुण सुंदर दाखविलें ॥ २९ ॥ ऐसें स्वकारुण्य अनुमोदनें । मन लाचाविलें ध्यानें । कां जे सृष्टिरचनेसी समाधानें । राहिलें पाहिजे स्वकीय ॥ ३० ॥ यानंतरें कर्णजात । मधुकैटभ मळोद्भूत । दैत्य उद्भवले[3] अद्भुत । क्रीडतां हरिशरीरीं ॥३१॥ तया सापडलें नाभिनाळ ।वरी चालिले दोघे सबळ । तवं देखिलें महाकमळ ।प्रवेशले तया भीतरीं ॥३२॥ तेथें देखिला ब्रह्मा निर्मळ । यांचीं चित्तें असतीं समळें[4] । ह्मणती आह्मांहूनि अधिक तेजाळ । नेत्रीं वक्रीं विशेष ॥ ३३ ॥ ह्मणौनि धाविनले तयाकडे । दोघे जाले ते देंहडे[5]। मारावया अति वेगाडे । एतां देखोनि पळतसे ॥ ३४ ॥ कमळाबाहेरि जरि पडावें । तरि रोकडें च जळीं बुडावें । ह्मणौनि भीतरीं च भोंवता भोंवे[6] । ऐसा कासाविस केला ॥ ३५ ॥ तवं ते स्फुरली अंतरकळा । स्मरिले तया प्रणतपाळा । तेथें कैंचि अवकाशवेळा । पळाचे न शतांशें ॥३६॥ जयजया जी निरामया । नमो नमस्ते अप्रमेया[7] । धांव धांव जी स्वकीया । रक्षिं रक्षिं

१ श्रीवत्सलांछन. २ कटिबंधन. ३ दृश्य झाला. ४ मलयुक्त, दुष्ट. ५ मोटे. ६ इकडून तिकडे फिरू लागला. ७ अवर्णनीया.

मुकुंदा ॥ ३७ ॥ ते संधीसी वेगळी व्हावया योगनिद्रा । प्रगटावया इंदिरानंदभद्रा । स्तविली मूळमाया जे मुनींद्रा । मार्कंडेया वेद सप्तशतीं ॥ ३८ ॥ आतां असो हें गोविंद । सर्वत्र सन्मुख सावद । प्रगट जाला परमानंद । जैसा देखिला होता ॥ ३९ ॥ सात्विकभावें दाटला धांता । ह्मणे जय जय जी भगवंता । भक्तकरुणाकरा अच्युता । पावलासी आकांतीं ॥ ४० ॥ तयासी देऊनि नाभिकार । मस्तकीं स्पर्षिला दक्षणकर । तवं ते मधु कैटभ सोहोदर । अट्टाटहासें गर्जती ॥ ४१ ॥ ते दोघे हरि एकला । घोरंदर संग्राम जाला । तथापि जीवा ईश्वराला । काय साम्यता घडों शके ॥ ४२ ॥ मग त्या जळा आकाशाचिया खोळें । दोघे धरिले स्मित सुनीळें । मारूनि सांडिली करवोळें । विशाळ दिसोळे ते जळीं ॥ ४३ ॥ मग विष्णु जाला अदृष्ट । दुर्गंध उठिला उत्कृष्ट । तेणें आपँ गोठों लागलें स्पष्ट । ते हे धरा धारक ॥ ४४ ॥ मेध्यास्तव जाली ह्मणउनी । इचें गुणनाम जालें मेदिनी । विष्णुकर्णोद्भव मेद्य ह्मणउनी । विष्णुमय रचना हे ॥ ४५ ॥ स्थूळ सूक्ष्म दोहीं रूपीं । विष्णु च जगजगव्यापी । तथापि हि भक्तानुकंपी । भक्तभावें साकारी ॥ ४६ ॥ भक्तभावें अरूपा रूप । भक्तभावें अगुणीं गुणारोप । भक्तभावें आपेंआप । भिन्न होत्सातें अभिन्न ॥ ४७ ॥ पडलिया समयानुसार । देवाभक्ताचे अवतार । दोघे विधिनिषेधाचे कर्त्तार । दोघे दोहींवेगळे ॥ ४८ ॥ केवढे संकटीं रक्षिलें । कोणें कोणेपरि लक्षिलें । सर्वथा नवेचे उपेक्षिलें । आशयमात्रें आपुलिया ॥ ४९ ॥ ईश्वरावतार नव्हे विभक्त । तो अक्षा हि जयाचा भक्त । आह्मां जड जीवां तरि युक्त । शरण जावें हरीसीं ॥५०॥ तें शरण जाणें

---

१ ब्रह्मदेव. २ अशाश्वत आणि शाश्वत यांची साम्यता कशी होईल? ३ खोळ=पोट. ४ शामवर्ण अशा विष्णूनें. ५ तरवारीनें. ६ मोठ्या शरिराचे. ७ पाणी. ८ मेध्य=बळी देण्यास योग्य. वास्तविक 'मेदिनी' हा शब्द 'मेदस्' पासून झाला आहे आणि मेद=चरबी; ह्मणून या ठिकाणीं 'मेदास्तव' असा शब्द पाहिजे होता, व त्याचा अर्थ मधुकैटभ मेल्यामुळें जो मांसाचा कर्दम झाला त्यामुळें. ९ भक्तावर दया करणारा. १० न कांहे.

तरि सोपें स्वभावें । केवळ भावें नाम घ्यावें । नाममात्रें च राम म्हावें । तरि कां राहों अनाथ ॥ ५१ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ४८ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो सकळादिस्वरूपा । नगो सकळावशेषरूपा । नमो सकळ चित्स्वरूपा । निष्खळा[1] पुष्कळा[2] ॥ १ ॥ तुजें प्रगटावें निजमहिमान। याळागि तुवां स्त्रजिलें[3] जन । तेथें हि भज्य भजक भजन । सज्जन दुर्जन विचित्र ॥ २ ॥ जरि हे जीवत्व निर्माण नसतें । तरि तुझें शिवत्व कैसें प्रकाशतें । दुर्ज्जनोंकरितां रूढ तें । सज्जनाचें गौरव[4] ॥ ३ ॥ अभक्ता यमयातना होती । हरिभक्त वैकुंठाप्रति जाती । एणें प्रसिद्ध वाढली ख्याति । तुझिये भक्तीची भगवंता ॥ ४ ॥ हें हि चित्रविचित्र सत्याऐसें । विकाशे तुझिया ळीळाविलासें । जें परमार्थियें सत्य ना असत्यसें । अधिष्ठानास्तव च कीं ॥ ५ ॥ विशेषवत् अशेष । तू आत्मा निर्विशेष । तुजकारण किंळा कार्यदोप । अघटित घटितां भासे हि ॥ ६ ॥ घटना अघटना भासाभास । हे अनुभव कडेसणी[5] विचाराभ्यास[6] । आणि सहज विश्व सावकास । तूं आत्मा सदोदित ॥ ७ ॥ तुज नेणतां हें आवघें च साच । तुज जाणतां अवघा तू च । तेथें कैंचें उच निंच । मी तू हि अभेद ॥ ८ ॥ अभेद च तूं तत्वतां । स्वजातीय[7] विजातीय[8] स्वगतता[9] । भेदत्रय बाधातीता[10] । मीसह विश्व तू च हें ॥ ९ ॥ काय आहे तुजवाचूनि ।

---

१ निष्कल=निर्गुण, किंवा भाग करता येत नाहीं असा. २ पुष्कल=परिपूर्ण, भव्य ३ सृजणें=उत्पन करणें. ४ जगात दुर्जन आहेत म्हणून सज्जनाना सज्जन हें नांव मिळून त्यांचा गौरव होतो. ५ खरोखर ६ विचार. ७ एका वृक्षास जसा दुसरा वृक्ष, हा सजातीय भेद. ८ वृक्षास जसा पाषाण विजातीय- ९ वृक्षास ज्याप्रमाणे त्याच्या फांद्या पानें फुलें वगैरे अवयव. १० या तिन्ही भेदाविरहित तू परब्रह्म वस्तु आहेस.

मुकुंदा ॥ ३७ ॥ ते संधीसी वेगळी व्हावया योगनिद्रा । प्रगटावया इंदिरानंदभद्रा । स्तविली मूळमाया जे मुनींद्रा । मार्कंडेया वेद सप्तशतीं ॥ ३८ ॥ आतां असो हें गोविंद । सर्वत्र सन्मुख सावद । प्रगट जाला परमानंद । जैसा देखिला होता ॥ ३९ ॥ सात्विकभावें दाटला धाता । ह्मणे जय जय जी भगवंता । भक्तकरुणाकरा अच्युता । पावलासी आकांतीं ॥ ४० ॥ तयासी देऊनि नाभिकार । मस्तकीं स्पर्शिला दक्षणकर । तवं ते मधु कैटभ सोहोदर । अट्टाटहासें गर्जती ॥ ४१ ॥ ते दोघे हरि एकला । घोरंदर संग्राम जाला । तथापि जीवा ईश्वराला । काय साम्यता घडों शके ॥ ४२ ॥ मग त्या जळा आकाशाचिया खोळें । दोघे धरिले स्मित सुनीळें । मारूनि सांडिली करवाळें । विशाळ ढिसाळे ते जळीं ॥ ४३ ॥ मग विष्णु जाला अदृष्ट । दुर्गंध उठिला उत्कृष्ट । तेणें आपैं गोठों लागलें स्पष्ट । ते हे धरा धारक ॥ ४४ ॥ मेध्यास्तव जाली ह्मणउनी । इचें गुणनाम जालें मेदिनी । विष्णुकर्णोद्भव मेद ह्मणउनी । विष्णुमय रचना हे ॥ ४५ ॥ स्थूळ सूक्ष्म दोहीं रूपीं । विष्णु च जगजगव्यापी । तथापि हि भक्तानुकंपी । भक्तभावें साकारी ॥ ४६ ॥ भक्तभावें अरूपा रूप । भक्तभावें अगुणी गुणारोप । भक्तभावें आपेंआप । भिन्न होत्सातें अभिन्न ॥ ४७ ॥ पडलिया समयानुसार । देवाभक्ताचे अवतार । दोघे विधिनिषेधाचे कर्त्तार । दोघे दोहींवेगळे ॥ ४८ ॥ केवढे सकटीं रक्षिलें । कोणें कोणेपरि लक्षिलें । सर्वथा नवंचे उपेक्षिलें । आशयमात्रें आपुलिया ॥ ४९ ॥ ईश्वरावतार नव्हे विभक्त । तो मक्षा हि जयाचा भक्त । आह्मां जड जीवां तरि युक्त । शरण जावें हरीसीं ॥५०॥ तें शरण जाणें

---

१ ब्रह्मदेव. २ अशाश्वत आणि शाश्वत याची साम्यता कशी होईल ? ३ खोळ=पोट. ४ शामवर्ण अशा विष्णूनें. ५ तरवारीनें. ६ मोठ्या शरिराचे. ७ पाणी. ८ मेध्य=बळी देण्यास योग्य. वास्तविक ' मेदिनी ' हा शद्ब ' मेदस् ' पासून झाला आहे आणि मेद=चरवी, ह्मणून या ठिकाणीं ' मेदास्तव ' असा शद्ब पाहिजे होता, व त्याचा अर्थ मधुकैटभ मेल्यामुळें जो मांसाचा कर्दम झाला त्यामुळें. ९ भक्तावर दया करणारा. १० न भाई.

तरि सोपें स्वभावें । केवळ भावें नाम घ्यावें । नाममात्रें च राम म्हणावें । तरि कां राहों अनाथ ॥ ५१ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ४८ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो सकळादिस्वरूपा । नमो सकळावशेषरूपा । नमो सकळ चित्स्वरूपा । निष्कळा[1] पुष्कळा[2] ॥ १ ॥ तुझें प्रगटावें निजमहिमान । यालागि तुवां सृजिलें[3] जन । तेथें हि भव्य भजक भजन । सज्जन दुर्जन विचित्र ॥ २ ॥ जरि हे जीवत्व निर्माण नसतें । तरि तुझें शिवत्व कैसें प्रकाशतें । दुर्ज्जनोंकरितां रूढ तें । सज्जनाचें गौरव ॥ ३ ॥ अभक्ता यमयातना होती । हरिभक्त वैकुंठाप्रति जाती । एणें प्रसिद्ध वाढली ख्याति । तुझिये भक्तीची भगवंता ॥ ४ ॥ हें हि चित्रविचित्र सत्याऐसें । विकाशे तुझिया लीळाविलासें । जें परमार्थिर्ये सत्य ना असत्यसें । अधिष्ठानास्तव च कीं ॥ ५ ॥ विशेषवत् अशेष । तूं आत्मा निर्विशेष । तुजकारण किळा कार्यदोष । अघटित घटितां भासे हि ॥ ६ ॥ घटना अघटना भासाभास । हे अनुभव कडेसणी विद्याभ्यास । आणि सहज विश्व सावकास । तूं आत्मा सदोदित ॥ ७ ॥ तुज नेणतां हें आवघें च साच । तुज जाणतां अवघा तूं च । तेथें कैंचें उच निंच । मी तूं हि अभेद ॥ ८ ॥ अभेद च तूं तत्वतां । स्वँजातीय विजातीय स्वँगतता । भेदत्रय बांधातीता । मीसह विश्व तू च हें ॥ ९ ॥ काय आहे तुजवांचूनि ।

---

१ निष्कल=निर्गुण; किंवा भाग करता येत नाहीं असा. २ पुष्कल=परिपूर्ण, भव्य ३ सृजणें=उत्पन्न करणें. ४ जगांत दुर्जन आहेत ह्मणून सज्जनांना सज्जन हें नांव मिळून त्यांचा गौरव होतो. ५ खरोखर ६ विचार. ७ एका वृक्षास जसा दुसरा वृक्ष, हा सजातीय भेद. ८ वृक्षास जसा पाषाण विजातीय. ९ वृक्षास ज्याप्रमाणें त्याच्या फांद्या पानें फुलें वगैरे अवयव. १० या तिन्ही भेदांनिरहित तू परब्रह्म वस्तु आहेस.

जें तितुकें च देव दवडूनि । कोणतें सार कासेनि ठेऊं झांकूनि । कोणतें असार उघडें साडूं ॥ १० ॥ ह्मणौनि नामें रूपें विश्व उघडें । तुझें स्वरूप वाडेंकोडें[2] । तुझिया कृपाकटाक्षें जोडे । [3]जया हा तुझा अनुभव ॥ ११ ॥ तो तुझा भक्त अनन्य । महा भागवत मुनिमान्य । तयाचा महिमा अति धन्य । उत्तमोत्तम ते भक्ति ॥ १२ ॥ तैये प्राप्तीचें कारण । केवळ रामनामस्मरण । भोळ्या भावें हें प्रमाण । श्रुतीं स्मृतीं पुराणीं ॥ १३ ॥ केवळ कळीमाजि हरिनाम । सद्य प्रतीतिकारक सप्रेम । जन्हि न टके सांग नेम । वर्णाश्रमाचार हि ॥१४॥ नामस्मरणेंविण केवळ । आचार विचार होय विकळ । कळीमाजि साधन सबळ । नाम येक रामाचें ॥१५॥ तये नामीं प्रेमा जयाचा । महिमा वर्णिजेलि आतां तयाचा । येवढा प्रकाश बुद्धीसी कैंचा । जे अशेष वर्णवे ॥१६॥ तुझे भक्त परम आप्त । वैकुंठ क्षीराब्धि विश्व व्याप्त । असंख्यात प्रगट गुप्त । नाना योनीं अयोनीं जे ॥१७॥ ते मज अशेष हि वर्णवती । एवढी असावी कीं मति । कांहिंयेक श्रोतयाप्रति । सांगेन जें तें परिसावें ॥ १८ ॥ पूर्वं प्रकरणीं अव्यक्ताशयें । ब्रह्मा रक्षिला स्मरणान्वयें । मेदिनी श्रजूनियां स्वयें । उत्पत्तीसीं प्रेरिला ॥ १९ ॥ तेणें मानसपुत्र प्रजेश्वर । रचिले विरंचिलें सादर । जयापासूनि चराचर । जाली सर्व रचना हे ॥ २० ॥ तयामाजि कर्दम प्रजापति । तयाची धर्मपत्नि देवहुति । तयापासूनि पुत्रोत्पत्ति । जय विजय कपिल मुनि ॥ २१ ॥ कपिल साक्षात्शार्ङ्गधर । स्वप्रकाश योगेश्वर । जय विजय दृढ निर्धार । परम भक्त हरीचे ॥ २२ ॥ अनुदिन अनन्य प्रेमळ तेणें । हरिपद पावले अविचळ । दोघे जाले द्वारपाळ । चतुर्भुज पीतांबरधारी ॥२३॥ वेदशास्त्रसंपन्न कर्मकुशळ । धर्मनिष्ट च भक्त प्रेमळ । [10]यांसी प्रार्थूनियां

---

१ करावें. २ कोटीपट मोठें असें. ३ ज्या अनन्य भक्तानें परमेश्वरस्वरूपाचा अनुभव प्राप्त होतो ती भक्ति मुमुक्षुचे ठिकाणीं ज्या कारणानें प्राप्त होईल तें कारण. ४ दीन. ५ सपूर्ण ६ अव्यक्त रूपाचें मूळ ठिकाण जो विष्णु त्यानें. ७ उत्पन्न करून. ८ प्रजापति, ९ स्थावरजंगमात्मक. १० जयविजयांस.

प्रबळ । दक्षणा दिधली यजमानें ॥ २४ ॥ ते अग्रजानुज वांटूनि घेतां । अग्र भागाशय अग्रजचित्ता । अनुज ह्मणे या वित्ता । आधिक नेदी कां कीनि ॥ २५ ॥ बाप अनर्थाचें स्थान अर्थ । बंधुबंधुसी कळह मांडला व्यर्थ । निजलाभपूर्ण परमार्थ । अविच्युत जयाचा ॥ २६ ॥ तयासी अर्थाचें काय प्रयोजन । परंतु वस्तुस्वभावमहिमान । अनर्थी पडलें तयांचें मन । कोपा चढले दोघे हि ॥ २७ ॥ वित्तलुब्ध होतां चित्त । हरिपदींहूनि जाले च्युत । जे ठेविती नाचुनी अच्युत । तयां अधस्थां कैंचि ऊर्ध्व गति ॥ २८ ॥ प्रस्तुत च या श्रवणाचें फळ । धन असिलें जरि बहुळ । तरि हरिप्रीत्यर्थ प्रेमळ । वेची तो चि संचक ॥ २९ ॥ आपणें धन उपार्जिलें । तें आपल्या प्रयोजनासि आलें । अथवा श्रीमंताहातीं अर्पिलें । अनंत उपतिष्टे ॥ ३० ॥ जड दगडप्राय धन । तेणें जोडे हरिनिधान । जयालागिं बळीनें केलें निवेदन । त्रैलोक्य राज्य प्राणेंसीं ॥ ३१ ॥ असो हे कोमळ बुद्धि परमार्थी । अर्थ तदर्थ तन्हि यदर्थी । कांहिं तन्हि वेचावें अनर्थी । व्यर्थ चि ठकोनि जावों नये ॥३२॥ आपुले नव्हती विघडेती प्राण । तेथें कुटुंब कोणाचें कोण । आधीं अर्चूनि रामचरण । योचें हि पाळण करावें ॥ ३३ ॥ पुत्र कळत्र धन जीवनें । राम आर्चावा सज्जनें । परि याचिया चि उपार्चनें । राम विसरों नये हो ॥ ३४ ॥ हें काय नेणती भक्तराज । मी प्रार्थितसें हें सहज । सर्व साधारणीं हि हृदंबुज । उकललें पाहिजे ह्मणउमी ॥३५॥ आतां असो हा आडताळा । कथाअनुसंधान पडतोळा । जयविजयासी उमाळा । नावेरे चि क्रोधाचा ॥ ३६ ॥ दोघे सोहदर शत्रुत्वा आले । स्नेह सांडूनि शापिते जाले । जय विजयाप्रति बोले । गज होई उन्मत्ता ॥ ३७ ॥ विजय ह्मणे जेष्ट क्रुरा । तूं हि अवलंबीं नक्रशरीरा । गंडिके-

---

१ वडील व धाकटा. २ अर्पण ३ परमार्थाच्या उलट अर्थानें शब्द योजला आहे. ज्यात वास्तविक सार नाहीं असें, धन. ४ शरिरात बिघाड झाला ह्मणजे आपला स्वत.चा प्राण देखील आपल्या स्वाधीन राहात नाहीं. ५ कुटुंबाचें ६ चोज पुरवताना ७ हृदयकमळ. ८ अडथळा. ९ यथार्थविचार.

माजि जळचरा । राहे येथें ॥ ३८ ॥ ऐसें परस्परें शापितां । पालटली ते पूर्व तनुता । तत्काळ च जालिया अनुता । गज नक्र आकृति ॥ ३९ ॥ येक जळीं येक स्थळीं । मुख हि न दिसे कव्हणे काळीं । परि दोहींचे हि हृदयांतराळीं । क्रोधानळ जैसा सागरीं ॥ ४० ॥ वाप भगवंताची माया । जो देह प्राप्त होय जया । तेथें चि रुचि उपजे तया । सुखें नांदती संसारीं ॥४१॥ वनीं सहपरिवारीं गजराज । जीवनीं सहकुटुंबें जळेंज । खेळेंमेळें असतां सहज । किती काळ क्रमलें ॥ ४२ ॥ वनकुंजर मदोन्मत्त । अनघड विशाळ दंत । जैसा अपर ऐरावत । सम प्रदेशें क्षिरपती ॥ ४३ ॥ दोन्ही गंडस्थळें च्यान्ही कुसी । लिंग पाखरे अहिगिंसी । क्रीडा करित हस्तिनीसीं । तरुसिखरें पाडितु ॥ ४४ ॥ मस्तकावरि टाकित्ती धुळी । अंतराला ह्मणउनि च काय वनमाळी । किंकोंटता उठे किंकाळी । तो चि काय हाकार हरीसी ॥ ४५ ॥ कुंजरा प्रिय जळेंकेळी । सर्वदा विशेष ऊष्णकाळीं । मंदोष्मा रश्मोष्मा आणि जळी । व्यावायोपाय ह्मणौनियां ॥ ४६ ॥ कोण्हे येके काळीं समाजें । गज गंडिकेमाजि मंजें । हस्तिणीवेष्टित भोजें । आनंदेंसीं क्रीडतु ॥ ४७ ॥ परस्परें सिंचिती सैरां । हस्तिणी शुंडादंडधारा । अभिषेक च काय प्राणेश्वरा । करिती हरिपदप्राप्तिद ॥४८॥ तेणें खळबाळिलें जळ । जळज क्षोभला तो विशाळ । यळखोनि सोहोदर तत्काळ । वज्रमिठी घातली पदीं ॥ ४९ ॥ श्रृंगाररस होता माजला । माजि विभछ प्रवेशला । शक्रश्रृंगारवन जाळूनि गेला । वन्हि जैसा क्षणमात्रें ॥ ५० ॥ देहासी मांडता निदान । तेव्हां कैंचे स्वजन । आवघीं च पळालीं सांडून । व्यसनीं पडला स्वयें च ॥५१॥ नक्र वक्र नखें रोउनी । जळामधें चालिला घेउनी । श्वापद अशक्त

---

१ अन्य, भिन्न. २ नक्र. ३ दुसरा. ४ शरिराचे कांहीं भाग. ५ मोठ्यानें ओरडून आवाज करतांना. ६ हाका मारणें. ७ जलक्रीडा. ८ मस्त होऊन. ९ आवडीनें, संतोषानें. १० अफाट. ११ हें अभिषेकाचें विशेषण. १२ इंद्राचें नंदनवन. १३ संकटांत, दुःखांत.

जीवनीं । धावा करी हरीचा ॥ ५२ ॥ धाव धाव देवराया ! नक्रमिठी पडली पाया । कोण सोडवी तुज वांचूनिया । अनाथनाथा भगवंता ॥ ५३ ॥ ऊर्ध्व शुंडा धरिलें कमळ । नेत्रीं न्याहाळी अंतराळ । चिंती हरिचरण सोज्वळ । सजळ जाले लोचन ॥ ५४ ॥ नमो प्रणतजन-पाळका[1] । नमो जगज्जाळचाळका[2] । नमो भवमळक्षाळका[3] । अभयवरदा माधवा ॥ ५५ ॥ नमो रमेशत्रुहरा । नमो भक्तसाह्यकरा । नमो सर्वदा सादरा । अंतर्बाह्य व्यापका ॥ ५६ ॥ गगनीं सघना सनातना । स्वतसिद्धा सचेतना । सर्व जीवांच्या जीवना । तथापि स्वभक्तपक्षा ॥ ५७ ॥ सहजा सर्वभूतीं समा । जयासी जैसा होय प्रेमा । तयासी तैसा मेघशामा । भवफळदा निरुपमा ॥ ५८ ॥ भक्तालागि विरुदावळी । सर्व तोरडि चरणकमळीं । मिरविसी अयुधें तेजाळी । दासद्वेषी दंडावया ॥ ५९ ॥ त्रिकुंठराजधानीराजा । सत्वर गमना गरुडध्वजा । स्वप्रकाशा लीला जळजा । मछकछा मुकुंदा ॥६०॥ नमो वेदा उद्धारका । नमो हरि धरणीधारका । मार्कंडेयभयहारका । वटपत्रशयनरूपा ॥ ६१ ॥ शेषशयना नारायणा । जळीं भूगोळ-तारणा । त्याहूनि जड हे मम धारणा । तरि नाहीं कां गोविंदा ॥६२॥ सहितशत्रुं सोहोदरीं । तुळणा तरि नव्हे मंदरा । जो तें मथिला दामोदरा । सुरासुर सिणले जेव्हां ॥ ६३ ॥ तुजवांचुनिया श्रीहरि । कोण दीनाचा कैवारी । अझुणी न पवसी मुरारी । कां विलंब लाविला ॥ ६४ ॥ होता वेकुंठीं जगजेठी । धावा पडतां कर्णपुटीं । सभा सांडू-निया उठी । गरुड पुढें झेपावे ॥ ६५ ॥ आरुढ जाला गरुडध्वज । बोले उचलूनि दक्षण भुज । आइका रे सकळ मनुज । जो मम नाम स्मरेलि ॥ ६६ ॥ तो कोटादिव विकळ जाला । तन्हि मी न विसंभे

१ जे तुझ्या ठिकाणीं लीन झाले आहेत अशा जनांचा प्रतिपाळ करणारा. २ या ब्रह्मांड चक्रास गति देणारा. ३ संसारांत अक्षयीं होणाऱ्या पापाचें क्षालन करणारा. ४ स्मृति किंवा वद ? ५ सोडणी असा दुसरा पाठ आहे व तो बरा दिसतो ६ बुद्धि. ७ सुराअसुरासहित ८ मंदराचल पर्वत ९ त्वां. १० काष्ठाप्रमाणें मूढवत् होऊन पडला.

तयाला । अविकळ असतां मज स्मरला । कैसा मी तया विसंभों ॥ ६७ ॥ श्रीहरीचे मनोसागरीं । उत्पन्न होतां कृपालहरी । गज पहुडला वज्रपंजरीं । भवभय कैंचें तयासी ॥ ६८ ॥ जेणें मनासी दिधला वेग । सिध्य संकल्प ज्याचे अनुग । लघिमा सिद्धि जे सवेग । ज्याचेनि अवलोकनें ॥ ६९ ॥ तो श्रीहरि बहुत कळवळिला । भक्त माझा निर्बुजला । वेगें खगारूढ पावला । त्वरा न ये सांगता ॥७०॥ धन्य भूमीसी भाग्य आलें । जेथें श्रीहरीचीं पाउलें । दिव्य तेजें उजळलें । भरा अंबर ते ठाईं ॥ ७१ ॥ नाभी ह्मणे पद्मनाभी । चक्र प्रेरी कर जळदाभी । ग्राहो सांडूनि तनुलोभी । गज बाहिर काढिला ॥ ७२ ॥ कुरवाळी श्रीहरि कुंजरा । प्रेमें कांपतसे थरथरा । नयनीं सुखाश्रुच्या धारा । अष्टभाव दाटले ॥ ७३ ॥ हरिकरस्पर्शें सावध जाला । हर्षें तनु पाहों लागला । पूर्व देह कुरवंडी केला । पाहे हरिरूपें हरि ॥ ७४ ॥ नीळ कांति धवळ तेज । विशाळ नयन चतुर्भुज । पीतांबरधर अधोक्षज । सुमनार्चित चर्चित गंधें ॥ ७५ ॥ किरीट कुंडलें मणिमाळा । बाहुवटई रत्नकिळा । कांची किंकिणि मेखळा । वाकी तोडर बिरुदाचा ॥ ७६ ॥ शंख चक्र कौमोदकी । अमर पद्म वेरहस्तकीं । सुवर्ण यज्ञोपवीत पदांकीं । वक्ष शोभे विप्राच्या ॥ ७७ ॥ उदारांग अति उदार । धीर गंभीर शोभापार । श्रीहरि देखोनि सुखसागर । अमर्याद दासांतें ॥ ७८ ॥ दुंदुभि मंगळ तुरें । अंबर गर्जे जयजयकारें । सुमनें वर्षती सभारें । आले दिव्य विमान ॥ ७९ ॥ गज जयजयवंत वाहिला । नक्र विजय तो राहिला । खदखदुनी हांसिनला । म्यां जिंतिला गोविंद ॥ ८० ॥ ज्याच्या नामें तरती प्राणी । तो मी देखतसे ये क्षणीं । मज दुर्धरवे चक्रपाणी । तुजहूनि

---

१ वज्राप्रमाणें आहेत पंजर=हात ज्याचे अशा विष्णूच्या कृपालहरींत. २ अनुचर. ३ अष्टमहासिद्धींतील तिसरी सिद्धि. ४ घाबरला. ५ गदा. ६ उजव्या हातांत. ७ विप्राच्या पदांका=वत्सलांछन. ८ चक्रपाणीला माझा उद्धार करवत नाहीं, तेव्हां.

सबळ मम शमळ ॥ ८१ ॥ हास्यमुखें लक्ष्मीकांत । चतुर्भुज केला अंकित । तुटला वैराकार निवें । हरीनें नेलें स्वपदासी ॥ ८२ ॥ अन्य कथा अति रसाळ । इंद्रद्युम्न जो भूपाळ । नदीतीरीं हरिप्रेमळ । नेत्र लाऊनि ध्यानस्थ ॥ ८३ ॥ तवं पातला घटोद्भव । तया भासलें लाघव । ह्मणे पावसी कुंजरभव । तो माधवें उद्धरिला ॥ ८४ ॥ महिमा नामस्मरणाचा । पांग फिटला मरणाचा । आपण आळस न करूं वाचां । नाम स्मरतां रामाचें ॥ ८५ ॥ सदृढ भक्ति होती त्याची । आह्मी मानवें कलयुगींचीं । परि नाममहिमा न वंची । स्मरणें तरणें हें सत्य ॥८६॥ श्रेष्ठ कनिष्ठ तुटे भेद । पतितपावन कीं गोविंद । सर्वां समान परमानंद । नामस्मरणें देतसे ॥ ८७ ॥ विशेष कलयुगीं तारक । वर्णित आले व्यासादिक । पुढें परिमार्वे कौतुक । महिमा भगवद्भक्ताचा ॥८८॥ श्रवणपठणें च केवळ । लाभे हरिपद अविचळ । सावध होऊनि सकळ । श्रवण करूत सुश्रुना॥८९॥ इतिश्री मद्भक्ति-रहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । गजेंद्रमोक्षवर्णन । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ४९ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

ॐ नमो जी तपप्रकाशा । नमो तपांतरकोशा । नमो तप-प्रिया परमेशा । तपोधननिधाना ॥ १ ॥ नमो तपफळप्रदा । नमो तप-संतुष्टा वरदा । नमो तपकृतपरमानंदा । तपस्वीप्राणरक्षणा ॥ २ ॥ पूर्वे प्रकरणीं गजेंद्रोद्धार । आतां परिसा मृकुंड ऋपेश्वर । परम तपें पर-मेश्वर । आराधिले जेणें ॥ ३ ॥ मृकुंडु नामें महा मुनी । जो विख्यात त्रिभुवनीं । शालिग्राम क्षेत्रीं अनुदिनीं । महत्तप तपतसे ॥ ४ ॥ युगायुं-पर्यंत । ब्रह्मध्याननिरत । निराहारक्षमायुत । सत्यसंध जितेंद्रिय ॥ ५ ॥ आत्मवत् पाहे सर्व भूतांसी । नित्य निस्पृह विपयांसी । सर्व जीवीं हित-

---

१ मायिक, आपाधिक २ पाप ३ वैररूपानें असलेला. ४ विपरीत भाव. ५ तप=स्वस्वरूपानुसंधान. ६ युगाचा काल संपेपर्यंत. ७ आपलें वचन पाळणारा.

बुद्धि त्यासी । तपोधन धाम तनुना ते ॥ ६ ॥ तत्तपासी भयभीत । इंद्रादि देव जाले बहुत । आले हरीसी शरणांगत । स्तुति करिती देवाची ॥७॥ नारायणा अक्षया अनंता । शरणांगतपाळका अच्युता । मृकुंडुतपें त्रासलों आतां । रक्षि रक्षि आश्रिता ॥८॥ जय देवाधिदेवा । शंखचक्रधरा माधवा । जय लोकस्वरूपा केशवा । जय ब्रह्मांडहेतवे[1] ॥ ९ ॥ नमो तुज देवदेवेशा । नमो तुज लोकपावन लोकेशा । नमो तुज सर्वांतरकोशा । साक्षिभूता श्रीहरि ॥ १० ॥ नमो तुज ज्ञानगम्या । नमो तुज ध्यानरम्या । नमो तुज अनुगम्या । मधुकेशिविदारणा ॥ ११ ॥ नमो चैतन्यस्वरूपा । नमो भूम्यादि सर्वरूपा । नमो श्रेष्ठा शुद्धा अरूपा । नमो अगुणा गुणनिधि ॥ १२ ॥ नमो ब्रह्मण्यदेवा जगद्धिता । नमो हिरण्यगर्भा जगद्धाता । सूर्यादि हव्यकव्यभुजा भगवंता । अच्युतानंता नमोस्तुते ॥ १३ ॥ नमो नित्या सत्या निजानंदा । नमो स्मृतार्तिहरणा[2] मुकुंदा । नमो आश्रिताश्रया गोविंदा । नमो नमस्तेस्तु पुनर्नमः ॥१४॥ ऐसी सुरवरांची स्तुति । परिसोनियां कमळापति । प्रत्यक्ष जाला मंगळमूर्ति[3] । शंखचक्रगदाब्जधर ॥ १५ ॥ विकसत्पद्मपत्राक्ष । सूर्यकोटिप्रभा सुलक्ष । चतुर्भुज घनशाम प्रत्यक्ष । साळंकृत परब्रह्म ॥ १६ ॥ पीतांबराधर अति सुंदर । हेम यज्ञोपवीत श्रीवत्सधर । दिव्य पदयुग्म नमस्कार । जगत्रय करी जया ॥ १७ ॥ ऐसा देखोनियां सन्मुख । देवासी जालें परम सुख । हरलें तत्काळ द्वंद्वदुःख । पाउलें दोन्ही वंदिलीं ॥ १८ ॥ यानंतरें मेघगंभीर । घोषें घनशाम सुंदर । बोले सुरवरा अभ्यंतर । कळों आलें तुमचें ॥१९॥ मृकुंडुचेनि तपोंकतेजें[4] । कोमाइलीं तुमचीं वदनांबुजें । तरि भेव[5] नका तयाचेन वोजें । ऐसें सर्वथा घडेना ॥ २० ॥ होतु कां संपत्ति अथवा विपत्ति । सज्जन सुखदाते सर्व भूतीं । स्वानंदें निर्भर चित्तवृत्ति । विषयीं अति उदास ॥ २१ ॥ निरंतर विषयलोलुंगत[6] । कामरूप जयाचें चित्त । तयां पर-

---

१ ब्रह्मांडाला कारणरूप असा तू. २ अर्ति=दुःख. ३ मंगलप्रद सगुण मूर्ति. ४ तपोरूपी सूर्याच्या तेजानें. ५ भिऊ. ६ अधना.

स्पर्शे द्वेष उपजत । प्रवर्त्तती निघाता ॥ २२ ॥ तापत्रयें संतापला । कैसा सीतळ होइल जीवाला । परपीडक जो कां तयाला । केंवि घडे सत्तमता ॥ २३ ॥ मनसा कर्मणा वाचा । सदा वधक जो पराचा । तो मूढधी ऐसें साचा । वदे बुधसमुदाव ॥ २४ ॥ लोभाभिभूत ज्याचें मन । तो सदा साशंक अकिंचन । तया जरी लाभ हि होतां समाधान । नव्हे पुढिले चिंतेनें ॥ २५ ॥ साशंक सर्वदा दुखी । निःशंकतां सदा सुखी । भूतद्रोही तो दुर्मुखी । भूतकृपाळ संतुष्ट ॥२६॥ ऐसें बोलोनियां शार्ङ्गधर । देवासी दिधला अभय वर । तुम्ही जावें, अमरेश्वर । बाधा न करी तुमतें ॥ २७ ॥ तुह्मासी मी रक्षितसें सदा । सुखें सेवित राहा स्वपदा । ऐसें वदोनि देवांदेखता तदा । अदृश्य जाला अच्युत ॥ २८ ॥ देव संतुष्ट आले स्वाश्रमा । मृकंडुप्रति हरि तुष्टात्मा । प्रगटला तपोवना मनोरमा । सुतनु तेजें उजळिलें ॥ २९ ॥ ब्रह्म निराकार चिंती ध्यानीं । तें च साकार स्वप्रकाश मुनी । आविर्भवलें जाणोनि ज्ञानी । विशाळ नयन विकाशिले ॥ ३० ॥ तवं प्रगटलें अनुपम्य । जें योगेश्वरा ध्यान गम्य । जें कां मनोनयन रम्य । चित्स्वरूप चतुर्भुज ॥ ३१ ॥ अतसीकुसुमाभ कमळनयन । चांचल्यांशें तळपों सिकले मीन । संपूर्ण तपें अवलोकन । भाग्यें लाहिजे भागवतीं ॥ ३२ ॥ स्वानंदसदन हास्यवदन । उदारांग पीतवसन । दिव्यालंकार गंध सुमन । अर्चित चर्चित सायुध ॥ ३३ ॥ ऐसा देखोनियां समोर । सात्विक भावें दाटला थोर । रोमांचित तपोशरीर । लोटले चरणावरी ॥ ३४ ॥ केलें नमन दंडवत । चरणीं भाळ सफळभूत । हर्षाश्रुजळें प्रक्षाळित । जैसा विधि पुण्य जळें ॥३५॥ स्वशिरीं धरूनियां अंजुळी । स्तुति करितसे मंजुळी । नमो परमानंददा वनमाळी । परमात्परा परेशा ॥ ३६ ॥ नमो नामजात्यादिविहीना । नमो शब्दादि अगोचरा सनातना । नमो बहुरूपा निरंजना । सदोदिना शाश्वता ॥ ३७ ॥ नमो पुराणपुरुषा

---

१ निघात=टोला. २ उत्तमपणा, परिपूर्णता. ३ मूर्ख बुद्धीचा. ४ मृकंडु ऋषी. ५ जवसीच्या फुलाच्या रंगाप्रमाणें. ६ स्वानंदाचें अपूर्व धाम घरच.

वेदांतवेद्या । नमो हिरण्यगर्भादि जगदाद्या । नमो जगद्रूपा जगद्वद्या । चिन्मयानंदस्वरूपा ॥ ३८ ॥ वद्य वदन वदक । स्तव्य स्तवन स्तवक । वाच्य वाचा वाचक । विजनजन तू निरंजना ॥ ३९ ॥ नमो तत्त्वज्ञानांजन निधाना । नमो मुनिजनध्यान समाधाना । नमो सर्वरूपा सर्वाभिधाना । सर्वातीता सर्वमया ॥ ४० ॥ नमो वीतरागं विश्रामा । नमो निष्कामाभिरामा । नमो शरणागतवछळा रामा । किंकरकरुणाकरा ॥ ४१ ॥ स्तवनहर्षे सुनिर्भर । शंखचक्राब्जगदाधर । दीर्घ चतुर्भुज सेंवळग सुंदर । चंदन चर्चित पसरिले ॥ ४२ ॥ मृकुंडु मुरकुंडी घालु पाहे पाईं । देवें आळंगिला धरिला हृदयीं । अंतर्बाह्य नुरे च ते ठाईं । देवभक्तमिळणीं ॥ ४३ ॥ ऐसे एक हो तांते स्वामीसेवक । विभक्ततेचें दाखविती कौतुक । पद्महस्तकें स्पर्शे सुमस्तक । हरि ह्मणे माग माग मृकुंडु ॥ ४४ ॥ तुझिया तपस्तवनें । अति संतुष्ट जालों मनें । आइकोनि विष्णुवचनें । मृकुंडु बोलता जाला ॥ ४५ ॥ देवाधिदेवा भक्तवल्लभा । पद्मनयना पद्मनाभा । मस्तकीं न्यस्त हस्त जळदाभा । कृपावचनें बोलसी ॥ ४६ ॥ योग याग दान दमन । कर्म धर्म वेदाध्ययन । उग्र तप शताग्नि धूम्रपान । करितां ऐसा न भेटसी ॥ ४७ ॥ जो तू ब्रह्मादिकां दुर्लभ । तो तू मजपासीं उभा सुलभ । अत पर थोर कोण लाभ । कृतार्थ जालों स्वामी ॥ ४८ ॥ अनंत ब्रह्मांडीं विषय निर्विषय सुख । ते तुजपासूनि पावती तत्राभिमुख । तो तू प्रत्यक्ष उभा मज सन्मुख । अत पर काय मागों स्वामी ॥ ४९ ॥ आपुलें स्वात्मत्व दिधलें दासा । अत पर काय मागों श्रीनिवासा । तुजवेगळ काहिं रुचे या मानसा । तरि तू च साक्षी भगवंता ॥ ५० ॥ देव ह्मणे भक्तराजा । तुवा रुणी केलें मज अधोक्षजा । तरि मी पुत्र होईन तुझा । अनृणत्वकारणें ॥ ५१ ॥ तुवा सर्व समर्पिलें मज । तरि

१ शांत २ कंकणासहित ( भुज ) ३ तपस्या स्तवनानं ४ ठेवला आहे ज्यानें ५ या जन्मांतील तुझें ऋण फेडण्याकरितां पुढल्या जन्मांत तुझा पुत्र होऊन तुझ्या ऋणांतून मुक्त होईन.

मी होईन तवात्मज । दीर्घायुषी दिव्य तेज । कल्पक्षयीं अविनाश ॥५२॥ मजसहज तुह्याकारणें । अजन्म्यासी लागती जन्म घेणें । विशेष तुझिया उदरा येणें । तुझे उत्संगीं रिघावया ॥ ५३ ॥ तूं मम नाम स्मरसी प्रेमें । मी आपुलें नाम ठेवीन तुझेन नामें । ताता ताता ह्मणेन नेमें । तेणें होईन उत्तीर्ण ॥ ५४ ॥ मी अवघा हि तुज अधीन । पुत्रता हे न मनीळ तुझें मन । तरि मज लक्ष्मीकांताचें भजन । कैसें विफळ होईल ॥ ५५ ॥ माझे भक्त अति निःकाम । मी चालवी त्यांचें योगक्षेम । भक्तकुटुंबी हें माझें नाम । विबुध सदां वर्णिती ॥ ५६ ॥ सकाम जे भजती सहज । त्याचें स्वल्पें च पुरलें भोजें । निःकामाचें तारि मज । सर्वस्वेंसीं चालवणें ॥ ५७ ॥ कल्पवृक्ष जें झाड । याचका इछाफळ दे वाड । सहज सेवी त्याचें कोड । सर्व पुरवीं स्वकाळें ॥ ५८ ॥ तया सकळाचा जो कळादानी । अंतरसाक्षी भक्ताभिमानी । तया भगवंता सर्वथा जनीं । निःशंक निःकाम भजावें ॥ ५९ ॥ आतां असो हें मृकुंडूमी वर । देऊनि मस्तकीं ठेऊनि कर । कृपां कुरवाळूनि शरीर । अदृश्य जाला श्रीहरि ॥ ६० ॥ श्रीहरि अथवा हरीचे दास । जे कुळीं होती सौभास । तो वंश जाईल हरिपदास । ऐसें श्रीपति बोलिला ॥ ६१ ॥ मृकुंडु मानी कृतकृत्यता । वंशेंसीं पावलों अच्युता । आला प्रणमूनि अनंता । तपस्थळींहूनि आश्रमा ॥ ६२ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमा-वर्णने । मृकुंडु आख्यानं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ५० ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमोस्तुते निरहंकारा । नमोस्तुते निराकारा । नमोस्तुते निर्विकारा । निराधारा सर्वाश्रया ॥ १ ॥ नमोस्तु जगत्तरंगार्णवा । नमोस्तु जगद्धरिणाबुदिवा । नमोस्तु जगदाकार माधवा । नमो घन सुनीळा

१ सन्निध. २ आवड, संतोष. ३ मोठें, पुष्कळ. ४ अंश किंवा प्रतिबिंब रूपानें. ५ जगत्+हरिण (हरण)+अबुद (अबुध=अज्ञान)+इवा.

चिद्धना ॥ २ ॥ नमन करावया दुसरें । तुझे अनतत्वीं कोठें थारें[1] । अभिनव तुझें तुजमाजि स्फुरे । देवभक्तत्व अभेद ॥ ३ ॥ ऐसिया सुंदरा श्रीरामा । सुचित्य सुखद सेवकां आह्मां । किरणा कीर्णतेसी कैंची सीमा । बाळार्कबिंब पाहावें ॥ ४ ॥ आत्मा अनंताकाश व्यापक । तयासी कैसे ध्याती लोक । ह्मणौनि एकदेशी स्थान मस्तक । प्रतिशरीरीं कल्पिलें ॥ ५ ॥ यालागि जेवढा ज्याचा देह जीव । तेवढा च तया सन्मुख देव । भीम देखोनि धरिल भेव । ह्मणौनिया कृपाळु ॥६॥ पूर्व प्रकरणीं मृकुंडूसी वर । देऊनि अदृश्य जाला सर्वेश्वर । स्वस्वरूप बाह्याभ्यंतर । निरंतर व्यापिलें ॥ ७ ॥ मृकुंडु निरंतर हरीसी ध्याय । तयासी पुत्र जाला मार्कंडेय । जो अपर श्रीहरि च काय । उत्पन्न गुणसंपन्न ॥ ८ ॥ धर्मवछळ दयाळ । आत्मज्ञ संतसंघ निर्मळ । तेजोमय मार्तंडमंडळ । तेवि सुखद सुप्रकाश ॥ ९ ॥ जितात्मा सर्वतत्वज्ञ । दांत शांत कृतज्ञ । क्षमा सहिष्णु त्रिकाळज्ञ । तप करी हरिप्रसर्थ ॥ १० ॥ पुराणसहिता वरावया । वरद वर दे मार्कंडेया । तस्मात्मुनिजन जाणती तया । नारायण ऋषिविशेषीं ॥ ११ ॥ चिरंजीवी महा भक्त । हरिहरनमनीं विभक्त । सर्वसंशयविमुक्त । सदानंदस्वरूपीं ॥ १२ ॥ जगत्सेकार्णवीभूत । तेव्हां स्वप्रभाव भगवंत । दाखविता जाला अच्युत । जयालागीं ॥ १३ ॥ मृकुंडुतनयो विष्णवानुग । मार्कंडेय महाभाग । घोर जळमयीं मुक्तांग । शीर्णपर्णवत पडलासे ॥ १४ ॥ बाप भगवंत कृपानिधि । नीरें शरीरा न बाधी । प्राणी प्राणा न अवरोधी । मृदुशय्येवरी पहुडला ॥ १५ ॥ स्वयें नारायण जळशायी । मार्कंडेय रूपें अधिक नवलाई । शेषपृष्टि हि नाहीं ते ठाई । केवळ जळीं हरिभक्त ॥ १६ ॥ ऐसा होता कोणकाळवरि । जोंपर्यंत हरिशर्वरी । ते संख्या परिसावी चतुरीं । परम भागवतीं ॥ १७ ॥

---

१ 'थारे' असा दुसरा पाठ आहे व तो बरा दिसतो; त्याचा अर्थ आश्रय, ठिकाण असा आहे २ सत्यप्रतिज्ञ ३ सर्व पृथ्वी जलमय झाली तेव्हां ४ विष्णु+अनुग=अनुचर ५ कुजलेले, वाळलेलें शीर्णपर्ण=गिंवाचें झाड. ६ पाणी. ७ शय्येप्रमाणें. ८ विष्णूची रात्र. ९ भगवद्भक्त पुरुषांनीं.

दशभिः पंचभिश्चैव निमिषीं । काष्ठा बोलिजे महा पुरुषीं । तिसा काष्ठांची कळा ऋषि । बोलती काळविद ॥ १८ ॥ तिसा कळांचा एक क्षण । सा क्षणाची घटिका प्रमाण । दो घटिकांचें मुहूर्त जाण । तिसा मुहूर्तांचें अहोरात्र ॥ १९ ॥ तिसा दिवसाचा एक मास । दो मासाचा रुतुभास । तीं रुतूचें विद्वांस । अयन बोलती ॥ २० ॥ अयनद्वयाचा एक वत्छर । तो देवाचा एक वासर । दिन उत्तरायण निरंतर । दक्षणायन ते निशि ॥ २१ ॥ मानुषी प्रमाणाऐसें च । पितृप्रमाण असें साच । ह्मणौनि सूर्यचंद्रयोगें च । कव्य दांतव्य तयांसी ॥ २२ ॥ दिव्यांब्द सहस्रैर्या अयुंत । देवयुगाचें परिमित । देवयुग सहस्रद्वयें कल्पांत । बोलिजे मुनेश्वरीं ॥ २३ ॥ ब्रह्मयोचे एके दिवसीं । संख्या बोलिजे चौदा मनूसीं । असो जितुकें प्रमाण दिवसासी । तितुकी च ब्रह्मशोर्वरि ॥ २४ ॥ ते काळीं जगत्रय । अशेष पावतसें क्षय । आतां अन्यत्प्रमाणोपाय । परिसावा विचक्षणीं ॥ २५ ॥ मानुषीं काळप्रमाणता । चतुर्युग सहस्र ब्रह्मदिवसता । तद्वत् मास वर्ष शत सहस्रता । संख्या कल्पपर्यंत ॥ २६ ॥ परार्धद्वय काळ । तत्शत संख्या एक वेळ । तो विष्णूचा दिवस केवळ । तितुकीच रात्री जाणावी ॥ २७ ॥ तावत्काळपर्यंत । मार्कंडेय जळीं जीर्ण पर्वत । मग विष्णु स्वशक्ति प्रेरित । ब्रह्मरूपें सृष्टि करावया ॥२८॥ इछामात्रें हरूनि जळ । सृष्टिरचना केलें स्थळ । देखोनि विस्मित मृकुंडुबाळ । वंदी चरण हरीचे ॥२९॥ आतां च जळ आतां च स्थळ । मी च देखतसें केवळ । एतावता हरिलीळा अकळ । हरि सर्वत्र संपूर्ण ॥३०॥ कैंचा आकार निराकार । कैंचा विकार निर्विकार । मज प्रत्ययो घडला साचार । हरि सर्वत्र संपूर्ण ॥३१॥ कैंचा मार्कंडेय कैंचे प्राण । कैंचा काळ कैंचें प्रमाण । कैंचें निर्माण कैंचें निर्वाण । हरि सर्वत्र संपूर्ण ॥३२॥ ऋषि मार्कंडेय विस्मित ऐसा । दिसे जागा ना निदसुरासा । कृतांजळी

१ श्राद्धकर्मांत. २ यावयाचें तें. ३ अब्द=वर्ष. ४ दहा सहस्र. ५ या-बद्दल दासबोध द. ६ स. ४ ओवी २ पहा. ६ रात्र. ७ एकंदरीनें.

धरूनि शिरसा । स्तवन करी हरीचें ॥ ३३ ॥ नमो सहस्र शिरसा देवराया । नमो नारायणा अनामया । अनाधारा अप्रमेया । विश्वाधारा विश्वेशा ॥ ३४ ॥ नमो अजा सहजा निजानंदा । नमो सदानंदविग्रहा गोविंदा । नमो अनंता अक्षरा अतर्क्या मुकुंदा । अकळा सकळा नमोस्तुते ॥ ३५ ॥ नमो ज्ञानज्ञ यज्ञतिरूपा । नमो सच्चिदानंदस्वरूपा । नमो मनातीता रूपारूपा । शद्बातीता शद्बमया ॥ ३६ ॥ सकळार्थ वर्णावया समर्थ वाणी । स्वर वर्ण व्याकरण खाणी । श्रुतीं स्मृतीं पुराणोपपुराणीं । विश्वमुखीं विस्तारली ॥३७॥ ते वाचेसी वाट न फुटे च एकाकी । मग अंतःकरणस्फूर्तीसी केली मित्रकी । तन्हि तुझें स्वरूप *नाकळे विवेकी । वेडावेंलीसी राहिली ॥ ३८ ॥ जयाप्रति सांगोनि सम*जवावें । तो तुझा तूं च तयेसहित स्वभावें । मग सलज्ज एकपिंडीं वधुभावें । खुणावली मौनावली ॥ ३९ ॥ ह्मणौनियां चिन्मात्रैक मूर्ति । अकळ शद्बजाळ संस्फूर्ति । स्वसंवेद्य स्तव्यस्तवकवृत्ति । तुझा तूं च नमोस्तुते ॥ ४० ॥ ऐसें परिसोनियां स्तवन । संतोषला जगज्जीवन । प्रीति पावोनिया वचन । बोलता जाला वरदवर ॥ ४१ ॥ तपें स्तोत्रें मज तोषविलें । माझें कर्म तुवां देखिलें । मद्दर्शन विफळ नव्हे सार्थक जालें । माग वर मृकुंडुजा ॥ ४२ ॥ मार्कंडेय ह्मणे भगवंता । स्वभक्ता रक्षिसी भागवता । ते तुझे कैसें भागवत आतां । सांग सांग श्रीरंगा ॥ ४३ ॥ तुझिया भक्ताची स्पृहा करी । तो हि तव भक्त होय हरि । ह्मणौनि माझिये अभ्यंतरीं । प्रीति जाणावया तयां ॥ ४४ ॥ जरि तूं सुप्रसन्न जालासी । ज्या तुझा महिमा नेणवे श्रुतीसी । तो तूं स्वमुखें सांग संशयासी । उरी नुरे मुरारि ॥ ४५ ॥ मुकुंद ह्मणे मार्कंडेया । परिस प्रेमळा भक्तराया । भागवतमहिमा वर्णावया । अब्दकोटि न पुरती ॥ ४६ ॥ मद्रूप माझे भक्त । ऐसें जाणती ते च मुक्त । भक्त मजहूनि विभक्त । भावी ते मूढ पशुवेपी ॥४७॥ म्यां तुज वरदान केलें । तुवां

---

१ आमय=रोग. २ विग्रह=साकार देह. ३ वेड लागल्या प्रमाणें. ४ मार्कंडेया. ५ भागवत पुराण. ६ इच्छा.

हें अनुपम्य मागितलें । तरि परिस आतां आपुलें। परम गुह्य सांगेन ॥४८॥ भक्तरूपें सर्व भूतें । म्यां रक्षिजेति भगवंतें । मद्रूप ह्मणौनि तयातें । वोळंगे माझी कृपाळुता ॥ ४९ ॥ आत्मया आत्मजा नाहीं भेद । तैसे मद्भक्त आणि मी अधोक्षज अभेद । प्रकरणपर वाखाणे आत्मपद । तो नव्हे मी परमात्मा ॥ ५० ॥ मद्भक्ता भागवताचीं लक्षणें । तें सर्व जीवांचीं संरक्षणें । पृथक् होसाते एकात्मपणें । स्वसंतोषें वर्तती ॥ ५१ ॥ द्वैविवें आपणासी आपण । याचें असें च ना कारण । किंवा विश्वरूप मी नारायण । भक्त तो मद्द्वेष करीना ॥ ५२ ॥ मद्भक्ताचा द्वेष करी । त्यासी मी च स्वयें संहारी । परंतु मद्भक्ताचा अभ्यतरीं । द्वेष नाहीं तत्वता ॥ ५३ ॥ माझिया भागवताचीं लक्षणें । तुवां पुसिलीं भक्तें सुलक्षणें । तरि परिस शुद्धांतःकरणें । स्वमुखें वर्णी श्रीहरि ॥ ५४ ॥ जे सर्वभूतहितकारी । सर्वस्वेंसीं परोपकारी । जे सर्वभूतसख्यकारी । ते च भागवतोत्तम ॥ ५५ ॥ कर्मणा मनसा वाचा । परपीडादि पातकाचा। स्पर्श च नेणे जीव ज्यांचा। ते सुभागवतोत्तम ॥५६॥ निस्पृह अपरिग्रहसीळ । सत्त्व संतुष्ट शांत निर्मळ । धार्मिक सदाचार अचळ । ते सुभागवतोत्तम ॥ ५७ ॥ मातापिताशुश्रूषापर । देवतार्चनरत निरतर । तत्साह्यकर्त्ते जे हरिहर । पूजा देखोनि हर्षती ॥ ५८ ॥ वर्णी यति गुरु पूजक । सर्वनिंदा निःकळक । जे कां परगुणग्राहक । हितवक्ते समदर्शी ॥ ५९ ॥ गंगाविश्वेश्वरादि तीर्थी क्षेत्रीं । भ्रमती निर्भ्रम जे श्रोत्री । हरिहरप्रतिमा पाहाती नेत्रीं । अर्चिती वंदिती स्तविती जे ॥ ६० ॥ देव देवसद्में पद्मतटाकें । वापी कूप कांसारादिकें । वृक्षाराम विश्रामदायकें । कारिती अथवा उद्धरिती ॥ ६१ ॥ तुळसी वंदन पूजन रोपण । जळसिंचन तृणछेदन गंधा घ्राण । तत्काष्टमणिमाळाधारण प्रदक्षिण । मंजुरिकादळीं हरि अर्चिती ॥ ६२ ॥ तुळसीमृत्तिका गंगामृत्तिका श्वेत । ऊर्ध्वपुंड्र धरिती शखचक्रांकित । कमळाक्षमाळा कमळाकांत । स्फुरद्रूप अंतरीं ॥ ६३ ॥ वेदार्थ धर्मशास्त्रार्थ वक्तार ।

---

१ प्राप्त होतें. २ शिव आणि जीव. ३ देवघर.

पुराणश्रवण पठण निरंतर । अतिथी सज्जन पूजनतत्पर । सत्य वाग्व्रत जितात्मा ॥ ६४ ॥ शिवपदार्चन प्रेमळ । भस्मत्रिपुंड्रमंडित भाळ । तनु भस्मोद्धूळन धवळ । रुद्राक्षमाळालंकृत ॥ ६५ ॥ शिवाविष्णूसी समान बुद्धि । मृदोर्ध्वे पुंड्रावरि भस्मत्रिपुंड्र विधि । शंखचक्रांकधारक दृढव्धी । हरिहरस्मरणतत्पर ॥ ६६ ॥ यज्ञ तप व्रत दानें । करिती हरिहरार्चनें । हरिहरमूर्तिध्यानें । कीर्ति सदां कर्णपुटीं ॥ ६७ ॥ जेथें नसती सर्वावगुण । जेथें वसती सर्व सद्गुण । जेथें माझें नामस्मरण । कीर्तन माझें अखंड ॥ ६८ ॥ मम नामस्मरणें सगद्गदित । मद्वक्त्रावलोकनें रोमांचित । मम कीर्तनानंदें डुल्लत । मजपुढें लोळती ॥६९॥ मम नामांकित केवळ भोळे । वेद शास्त्र कांहीं च न कळे । मज भगवंतासी तीं सर्व हि कळे । तो मी वळगें त्याजवळीं ॥ ७० ॥ मत्प्राप्तीकारणें सर्व हि श्रम । मत्प्राप्तीविण सर्व हि विराम । तो मी च स्वयें श्रीराम । मन्नामस्मरणीं तिष्ठतसें ॥ ७१ ॥ मन्नामकीर्तनश्रवणें । म्यां असंख्यात तारिले नारायणें । मदाश्रयेंविण न सीणिजे कोणें । विशेष आतां कलियुगीं ॥ ७२ ॥ सर्व धर्मबहिष्कृत । मम नामस्मरणमात्रें तरत । ऐसें साधन कोण वीर्यवंत । पतित पावन करावया ॥ ७३ ॥ ऐसिया मम नामान्वित ज्याचें वदन । तें मद्रूप माझें हि सदन । नवल त्याचें माझें अनुमोदन । ते मद्रूप मी तद्रूप ॥ ७४ ॥ ऐसीं भागवतलक्षणरूपें । म्यां तुज सांगितलीं सक्षेपें । अशेष न वर्णवती अमूपें । आब्दसहस्रें वर्णितां ॥ ७५ ॥ याकारणें तूं हि विप्रवरा । पुनर्युगांतवरि करीं सदाचारा । मम नामरूपस्मरणपरा । पद निर्वाण पावसी ॥ ७६ ॥ ऐसा मार्कंडेयासि देऊनि वर । अदृश्य जाला सर्वेश्वर । तैसा च हरिभक्त ऋषेश्वर । शाळग्राम सुक्षेत्रीं ॥ ७७ ॥ जप तप ध्यान यज्ञ दान । करितां विशुद्ध जालें मन । हरिकृपां उत्पन्न जालें ज्ञान । तेणें कैवल्य पावला ॥ ७८ ॥ याकारणें हरीचे दास । हितकारक सर्व भूतांस । ह्मणौनि हरिरूप मार्कंडेयास । देवें स्वमुखें निरोपिलें ॥ ७९ ॥ श्रुति स्मृति पु-

---

१ पांढऱ्या मृत्तिकेच्या किंवा गो.पी.चंदनाच्या.

राण युक्ति । सर्वथा करावी हरिभक्ति । परम सुगम नामोक्ति । वाचा वदनीं अविकळ ॥ ८० ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । मार्कंडेयोपाख्यानं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ५१ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो नामस्मरणमात्रें मुकुंदा । अशेषाघहरा स्वपदप्रदा । नमो आश्रितजनवरदा । दामोदरा नमोस्तुते ॥ १ ॥ ममात्मा सर्व भूतात्मा । ममत्वा सर्वत्वातीत तूं स्वात्मा । अवघा आत्मा च कैंचा अनात्मा । मह्यमेव नमोनमः ॥ २ ॥ देव होऊनि यजावें देवासी । तेथें पृथक्त्व कैंचें भक्तासी । ऐसिया सुखसंभ्रमासी । मह्यमेव नमोनमः ॥ ३ ॥ स्वता स्वस्वरूप सागर । सामरस्यें परि तरंग तदाकार । स्वयें श्रीहरि विश्वंभर । अविभक्त भक्त भजनेंसीं ॥ ४ ॥ ह्मणौनि देवभक्त अनन्य । ते च भक्तिप्रेम मुनिमान्य । लोकत्रयीं धन्य धन्य । केवळ नामें आतुडे ॥ ५ ॥ पूर्व प्रकरणीं कथा अन्वय । वर्णिला भक्तराज मार्कंडेय । आता अग्र कथाप्रेमनिर्चय । परिसा महिमा हरीचा ॥ ६ ॥ यज्ञमाळी सुमाळी सोहोदर । भक्तिचरित अति रुचिर । पठतां परिसतां पापसंहार । वाजी-मेधफळ लाभे ॥ ७ ॥ कोण्हीयेक विप्र वनांतरीं । वेदमाळी नामें निर्धारीं । वेदवेदांगपारंग श्रीहरि- । पूजक परम धार्मिक ॥ ८ ॥ सर्व-भूतदयायुक्त । असतां आरंभलें अयुक्त । अत्यंत जाला धनासक्त । कुटुंबभरणाकारणें ॥ ९ ॥ अविक्रय वस्तु विक्रय करी । चांडाळादि प्रतिग्रह भरी । तप तीर्थ व्रत अर्थावरीं । देऊनि धन संचिलें ॥ १० ॥ तयासी जाले दोनी कुमर । यज्ञमाळी सुमाळी सुदर । अति सुलक्षण मनोहर । कांतिवत साजिरे ॥ ११ ॥ दोनी नंदन आणि बहु धन । वेदमाळी पावला समाधान । हर्षे निर्भर जालें मन । अति श्लाघ्यता मानित ॥ १२ ॥ मग कोण्हीएके दिवसीं । अवलोकिता जाला स्वधना-

---

१ ध्वय, साठा. २ अश्वमेध. ३ योग्यता.

सी । तर्थं गणना न करवे त्यासी । अंकसंख्या कुंठित ॥ १३ ॥ बाप हरिपूजाप्रभाव समर्थ । सहज हि केलियां नव्हे व्यर्थ । अनर्थामाजि परमार्थ । आरंभला अभिनव ॥ १४ ॥ आपुलें हि नव्हे देवाचें । सुवर्ण ठेविलें देखोनि साचें । मन लुब्ध जालें अज्ञीचें[1] । मागतां रुदन मांडिलें ॥ १५ ॥ रुदनापासूनि जालें रजत[2] । तें च देव पालटलें घेत । रक्षिलें अज्ञींचें मनोगत । ऐसी वस्तु हिरण्य हें ॥ १६ ॥ धन्य भगवदर्चनमहिमा । धनिवृत्ति पावली उपरमा[3] । देवमाळी स्वअंतरयामा । विवेकीं प्रवर्तला ॥ १७ ॥ अन्यायार्चित बहु अर्थ । याचा केला अति स्वार्थ । तर्न्हि अद्यापि हि मनोरथ । माझा न मनीं संतुप्ति ॥ १८ ॥ कनकाचळ यावा घरीं । एवढी तृष्णावाढी धरी । ठेऊं कोठें कवणेपरीं । यत्न हे चिंता लागली ॥ १९ ॥ अतएव धिग् हे मनोवासना । बहुत जाली विटंबना । काया जीर्ण जाली परि हे जना । तृष्णातरुणी वाढतसे ॥ २० ॥ जीर्ण विरंग जाले नेत्र । जीर्ण बधिर जाले श्रोत्र । जीर्ण विरूप जालें वक्र । दंत जीर्ण उमळले ॥ २१ ॥ जीर्ण केश जीर्ण त्वचा । जीर्ण जिन्हा विकळ वाचा । जीर्ण शक्ति इंद्रियांचा । जीर्ण जाला समूह ॥ २२ ॥ तृष्णा जीर्ण नव्हे पापिणी । नित्य नूतन हे तरुणी । इच्या संगें पंडित गुणी । मूढता पावे प्रसिद्ध ॥ २३ ॥ तृष्णार्त न मनी परनिंदा । तृष्णार्त न मनी जनापवादा । तृष्णार्त विश्रांति नपवे कदा । इहलोकीं पर कैंचि हो ॥ २४ ॥ तृष्णेचें विचित्र वैभव । जिवाला विभव लाघव । देखत देखत च होत वाव[4] । हा विवेक हों नेदी ॥ २५ ॥ हे भवतृष्णा कृष्णमुखी । इनें विश्व हें केलें दुखी । इच्या परित्यागेंविण सुखी । नव्हती शाश्वताशय ॥ २६ ॥ पुत्र कळत्र प्रीतीचीं होतीं । हे हि पाळावीं याचिये रीतीं । परि परमेश्वर तों नव्हती । जें अनन्य भावें भजावें ॥ २७ ॥ म्यां अर्चूनि अन्यायधन । केवळ करावें यां अधीन । तरि माझें पर-

१ अज्ञानी मनुष्याचें. २ रुपें. ३ शांति. ४ व्यर्थ. ५ काळतोंडी. ६ पुत्रकलत्रांच्या.

लोकसाधन । तत्वतां राहिलें च कीं ॥ २८ ॥ तरि माझिया वाचिल्या पढल्याचें फळ । हें चि जालें कीं केवळ । हे माझी मज लाज न वटे तों निर्फळ । ग्रंथ संतउपदेश ॥ २९ ॥ आतां असो हे मृगतृष्णा । सांडूनि भजों आत्मयां कृष्णा । सेवितां संसारशार्वरीकृष्णा । सुप्रकाश न पविजे ॥ ३० ॥ मग तो वेदमाळी महाभाग । द्रव्याचे केले च्यारी भाग । दोनि दोहीं पुत्रांसी देऊनि विभाग । दोनि आपण घेतले ॥ ३१ ॥ अशेष दोष प्रायश्चित्त । पावावया पद अच्युत । आरंभिलें पुण्यसंचित । व्यय करूनि धनाचा ॥ ३२ ॥ आरंभिले तडागाराम । जेथें प्राणी पावती सुविश्राम । संतोषें विश्वात्मा श्रीराम । पुण्याचळ वाढती ॥ ३३ ॥ हरिहरादि देवालयें । हरि हरलिंग प्रतिष्ठा स्वयें । अन्नदानादि दानें विनयें । करी गंगातटाकीं ॥ ३४ ॥ हरिप्रीत्यर्थ व्यय केला । मग नरनारायणस्थानासि आला । तेथें मुनिआश्रम देखतां जाला । सदा फळ पुष्प मनोहर ॥ ३५ ॥ तेथें शोभती मुनिवर । जैसे खांडववनीं अमर । मध्यें शोभे सुरेश्वर । तैसा मुनि जानंति ॥ ३६ ॥ अमरा प्रिय अमृतपान । ऋषींतें सेव्य ब्रह्मज्ञान । ब्रह्मोपनिषदाचें व्याख्यान । ब्रह्मध्यानें सामरस्यें ॥ ३७ ॥ ब्रह्मसाक्षात्कार बाणला देहीं । विषय रागादिकीं विदेही । शीर्णपर्णाशैन स्वप्रकाश पाहीं । जैसीं वाळार्कमंडळें ॥ ३८ ॥ तयाप्रति येऊनि वेदमाळी । दंडवत जाला भूमंडळीं । यानंतरें जानंति ते काळीं । करी अतिथीपूजन ॥ ३९ ॥ बैसों घातलें मृगासन । कंदा मुळा फळाचें आशन । सुसीतळ केलें जळदान । आश्रमधर्म संपादिला ॥ ४० ॥ यानंतरें वेदमाळी । विनविता जाला कृतांजळी । भगवंता निःकल्मष कृतकृत्य ए काळीं । जालों भवदर्शनें ॥ ४१ ॥ आतां करीं शरणागतोद्धार । तूं सद्गुरु सघन दानशूर । ज्ञानोपदेश करीं करुणाकर । ह्मणौनि केलें प्रणम्य ॥ ४२ ॥ ऐसा देखोनियां सद्भाव । सुप्रसन्न जाला श्रीगुरुराव । जानंति मुनि अनुमहानुभव । करिता जाला हास्य-

---

१ ब्रह्मस्वरूप. २ कडु लिंबाचा पाला खाणें.

मुखें ॥ ४३ ॥ जानति ह्मणे वेदमाळी । स्मर स्मरारिप्रिय नामावळी। नारायण नाम नित्य काळीं । जप करीं आखंड ॥ ४४ ॥ ध्याई विष्णु विश्वरूप । जो चिदात्मा चित्स्वरूप । वेदीं वर्णिजे स्वस्वरूप । चैतन्यघन स्वप्रकाश ॥ ४५ ॥ जें जगदादि निर्मळ । जें गगन्मूळाचें हि मूळ । जयास्तव हें जगज्जाळ । वीचिवत भासत ॥ ४६ ॥ जयाचा करितां स्तवनवाद । जाळे नाना दर्शनभेद । तयामध्यें मुख्य अभेद । वेदांत सिद्धांत जो ॥ ४७ ॥ तेथिचा ऐसा अनुभव । जें जालें जयापासाव । तें तन्मय च कीं अनुभव । सद्य प्रत्ययकारक ॥ ४८ ॥ तो महाविष्णु परमात्मा । साकार निराकार स्वात्मा । तदंश केवळ जी॰ वात्मा । जळतरंगाकारता ॥ ४९ ॥ तरंगाकारता वाकडी । काढितां न ये जैसी काडी । निश्चळ जळ च निवडी । तो चि पावे जीवन ॥ ५० ॥ सतरंग जळ जो घोटी । तरंग आडकेति ना त्याचे कंठीं । ह्मणौनि प्रगट श्रुतीची गोष्टि । जगद्विष्णुस्वरूप ॥ ५१ ॥ आवघें जगद्विष्णुविलास । बोधें च अमोघ सावकाश । तेथें मिथ्या जो जीवाभास । भासला होता ॥ ५२ ॥ तो निरसावयाचें साधन । याचें विवेकाचें परिशोधन । साधक च व्हावया निधान । विधानयुक्त हरिभक्ति ॥ ५३ ॥ निधान भक्तीचें मुख्य भावार्थ । मग जे मिळती ते च पदार्थ । भावें विश्वासेंविण व्यर्थ । बाह्य बुध्या खटपट ॥ ५४ ॥ अनन्य ऐसें आहे पद । ह्मणिजे तत्वता नसोनि भेद । भक्तिसुखाचा स्वानंद । अच्युतत्वें अविच्युत ॥ ५५ ॥ ऐसी भक्ति ते उत्तमोत्तम । तेथें हरे द्वयाचा श्रम । देवाभक्ता सुविश्राम । स्वस्वरूप सरूपें ॥ ५६ ॥ या सर्व हि अर्थीचें मूळ । गुह्याचें हि गुह्य सफळ । नामस्मरण मात्र केवळ । नारायणा रामाचें ॥ ५७ ॥ तें वदनीं वसों दे अविचळ । असों दे हृदयीं तनु सुनीळ । चतुर्भुज अंबुजाक्ष तेजाळ । आयुधाभरणाबरार्चित ॥ ५८ ॥ विष्णुमय सर्व हें प्रमाण । तथापि तजीं सर्व अवगुण । यैजीं सर्व हि

---

१ जलतरंगाप्रमाणें २ पासून. ३ पाण्याचा घोंट घेई ४ सत् किंवा असत् कोणतेही गुण असोत, त्याचें यजन कर.

सद्गुण खूण ¹ उपदेशिली मुनींद्रें ॥ ५९ ॥ पूर्वी स्वाचार हरिपूजन। सत्क्रियायोगें शोधूनि मन। प्रबोधिलें आत्मज्ञान। पुढें हि क्रिया तद्रूपें ॥६०॥ असो वेदार्थ पावोनि वेदमाळी। शरीर सोडिलें काशीस्थळीं। हे कथा श्रवणपठणें प्रेमळीं। पाविजे सुखें हरिपद ॥ ६१ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये। रामिरामदासकृते। विष्णुमहिमावर्णने। वेदमाळी। नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ५२ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो भक्तजनाशयपाळका। नमो भक्तजनचित्तलक्षका। नमो भक्तवचनमात्रें क्षाळका। पातकी पापकर्दम ॥ १ ॥ भक्तवचनें अभक्त पापी। भक्तभिडे पुण्यरूपी। करूनियां देसी पुनरपि। स्वपद भक्तांगीकृता ॥ २ ॥ हरिभक्ताचा शरणागत। तो मुख्य भक्त मानी भगवंत। अथवा भक्त जयावरि कृपावंत। तो भलता असो भलतैसा ॥ ३ ॥ तयावरि हरीची अति प्रीति। हरि तयाचा होय सांगाती। लळे¹ पाळी बहुता रीतीं। जैसा पौत्रासी पितामह ॥ ४ ॥ आवडतया सुपुत्राचें बाळक। बहुत स्वप्राणापरिस अधिक। तज्जनकसुखार्थ तज्जनक²। पाळी तेविं हरि भक्तभक्तां³ ॥ ५ ॥ पौत्र पितामहता हि अनसारिखी। हरीची कृपा सर्वसारिखी। भक्त आणि भक्तभक्त समसुखी। श्रीहरीचे स्वपदीं हो ॥ ६ ॥ श्रीहरि सर्वस्नेहातीत। परि तो भक्तस्नेहान्वित। सर्व विषयीं उदास परि लोलुंगत। भक्ताचिये संगतीं ॥७॥ जेणें शरणांगताकारणें। लक्ष्मी शापिली नारायणें। अश्विनीकुमरकरुणें। अश्विनी होसी ह्मणोनियां ॥ ८ ॥ कोण्ही एके काळवेळीं। शेषशयनीं वनमाळी। चक्र दिधलें लक्ष्मीजवळि। दैत्य येतां वधावा ॥ ९ ॥ तंव ते⁴ अश्विनौकुमर। करू

---

१ लडिवाळपणाचे हट्ट. २ आपल्या आवडत्या मुलास मुल व्हावें, त्यास वरें वाटावें ह्मणून त्याचा बाप त्याच्या मुलाचे ह्मणजे आपल्या नातवाचे ज्याप्रमाणें कोड पुरवितो, त्यावर प्राणापेक्षां ही जास्त प्रीति करतो त्याप्रमाणें भगवंत हा आपल्या भक्ताचे जे भक्त आहेत त्यांचे कोड पुरवितो. ३ भक्तांचे भक्त. ४ जल वन देवी, यक्षिणी.

सन्मार्गप्रेरणाचें पुण्य । स्वकीयाचरणापरिस धन्य । नित्य विष्णुगृहीं अनन्य । करी हरिपरिचर्या[1] ॥ ४० ॥ ऐसियापरी स्वकाळीं[2] । जनीं वनीं बंधुजाळीं[3] । वार्द्धक्य पावोनि एके वेळीं । पंचत्व पावले सहोदर ॥ ४१ ॥ यज्ञमाळी हरिपूजापरायण । तयासी तुष्टला नारायण । विमान शत संकुळीं[4] आरोहण । मुनि स्तविती सुर पूजिती ॥ ४२ ॥ गंधर्व गाती अप्सरा नाचती । नाना स्वनाचीं वाद्यें वाजती । मंगळ आरार्तिका वोवाळिती । पुष्पें वर्षती भूतळीं ॥ ४३ ॥ ऐसिया हरिप्रियाचा होता वास । ह्मणोनि सुमनीं पूजिती महीस । जयजयकार परमोल्हास । देखती लोकपाळांतें ॥ ४४ ॥ दिव्य देहो दीप्तिमंत । दिव्यांबराभरणभूषित । दिव्य गंध सुमनार्चित । देखे यममार्गातें ॥ ४५ ॥ तवं प्रेतशरिराभिभूत । विवस्त्र क्षुधातृषाक्रांत । पाशबद्ध ताडिता आक्रंदत । दुखें धावे इतस्ततः ॥ ४६ ॥ आंगीं फुटलिया शस्त्रधारा । रुधिर भरलेंसें शरिरा । रुदे स्फुदे कांपे थरथरां । अति निर्घातें हाणतां ॥ ४७ ॥ ऐसें देखोनियां यज्ञमाळी । अति द्रवला हृदयकमळीं । विष्णुदूतांसी कृतांजळी । पुसता जाला ॥ ४८ ॥ जी हा कोण आहे प्राणी । बहुत करिताति जाचणी । तवं ते बोलती हास्य वाणी । हा सुमाळी भोगी स्वकर्मफळ ॥ ४९ ॥ हें परिसोनियां सोहोदर । झळंबला संसारमायेचा पदर । मग पुसतां जाला सत्वर । कवणें गुणें सुटे हा ॥ ५० ॥ तुह्मी माझे शाश्वतबंधु । संता सप्तपदीं मित्रसमधु । संसार एकोदरता मिथ्या बोधु । परि दर्शनबाधा झळंबिलें ॥ ५१ ॥ तवं ते ह्मणती भवाब्धिपारगा । परम भागवता भगवंतानुगा । अनुज उद्धरीं पुण्य देगा । गोचर्ममात्रोपलेपनाचें[5] ॥ ५२ ॥ हरिद्वारीं स्वकरें पूर्वभवें । तुवां उपलेपन[6] केलें स्वभावें । तूं विश्वंभर नामप्रभावें । वैश्ययाति होतासी ॥ ५३ ॥ तूं सांडिलासि बधुजनीं । क्षुधा शोक संतप्त निर्धनी । वृष्टि-

---

१ परमेश्वराची सेवा. २ योग्य काळ आला तेव्हां. ३ वडील बंधु जनीं व धाकटा वनीं. ४ कुळासमवेत. ५ गाईच्या कातड्याच्या मापाइतका जमिनीचा भाग. ६ गंध किंवा उटी लावणें.

काळीं फिरतां विजनीं । हरिमंदिर देखिलें ॥ ५४॥ तेथें गळोनि जाला कर्दम । तो तों निराशिला पात्रावया विश्राम । परि तो कृपानिधि श्रीराम । उपलेपन मानिलें ॥ ५५ ॥ तेणें महापुण्यप्रभावें । ब्राह्मण्य हरिभक्ति पावलासि वैभवें । आतां कल्पकोटि शतें भक्तिभावें । हरिसन्निध यसशी तूं ॥ ५६ ॥ पुढें तेथें च उत्पन्नज्ञानें । मोक्ष पावसी समाधानें । अनुज उद्धरीं पुण्यदानें । गोचर्ममात्रोपलेपनाच्या ॥ ५७ ॥ महा पातकाचा निधि । उपलेपन मात्र गोचर्मावधी । तत्पुण्यें उद्धरेलि हें विबुधीं । हरि-किंकरीं प्रबोधिलें ॥ ५८॥ तैसा च तत्काळ यज्ञमाळी । संकल्प करितां च हृदयकमळीं । बंधुवेष्टित यमदूतमंडळी । ते दुरीच्या दुरी पळाले ॥ ५९ ॥ बाप भगवद्भक्तीचें महिमान । भगवंतें प्रेरिलें विमान । सुमाळी हि दैदिप्यमान । वाहोनि आणिला तेथें ॥ ६० ॥ ते दोघे सोहोदर । विमानीं भेटले हर्षनिर्भर । पूजिती सुर स्तविती मुनिवर । गर्जे आले वैकुंठा ॥ ६१ ॥ यज्ञमाळी हरिसारूप्यता । पावोनि दिव्य भोग भोगूनि स्वतां । चिरकाळें स्वइच्छा उत्पन्न ज्ञानता । मोक्ष पावला हरिपदीं ॥६२॥ सुमाळी दत्तोपलेपनसुकृतें । दिव्य भोग भोगूनि अयुतायुतें । उत्तम ब्राह्मणजन्म पुनरागतें । पावला सर्वगुणसंपन्न ॥ ६३ ॥ वेदपारग[2] धनवंत । सदाचारसीळ कृत सुकृत । विशेष हरिभक्तिप्रेमार्जित । हरि-पूजापरायण ॥ ६४ ॥ गंगास्नान विश्वेशदर्शन । हरिहर अभेद महामन । अंतीं पावला परम स्थान । जें योगियां दुर्लभ ॥ ६५ ॥ एवढें उपले-पनाचें फळ । तरि एकदां तन्हि करूत प्रेमळ । सर्वदां करूनि पूजिती गोपाळ । त्याचा महिमा न वर्णवे ॥ ६६ ॥ हरिपूजन स्वभावें हि घडे । तया भवबंध स्वप्नीं हि न घडे । हरिपूजक पूजिता जोडे । हरिकृपा अनयासें ॥ ६७ ॥ हरिभक्ताचेन सगमात्रें । महापातकी शुद्ध क्षणमात्रें । शुश्रुषानिरत प्रीतिपात्रें । होती महाविष्णूचीं ॥ ६८ ॥ हरिनामस्मरणा-हूनि जगीं । साधन समर्थ नाहीं कलियुगीं । पावों इछिती परमानंदा-लागि । तिहीं नाम स्मरावें ॥ ६९ ॥ सर्व धर्मकर्महीन पतित । नाम-

१ पुन्हा परत, २ सकल वेदार्थ जाणणारांमध्यें प्रवीण.

पुण्य अख्यान । हरिपदप्राप्तिद सुभद्रा ॥ २६ ॥ जें गातां आइकतां । सर्वपापनिर्मुक्त तत्वता । सर्वसुख भोगूनि स्वतां । हरिपुरीं [1] वसविजे ॥ ॥ २७ ॥ पूर्वीं कृतयुगीं गुळिक । नामें होता लुब्धक । जयाचें महा मळिन जीवकंचुक । दोष मूळ दोषकारक ॥ २८ ॥ परदारी परद्रव्य-हरण । परनिंदा परपीडण । गोब्राह्मणादि प्राणहरण । देवस्वांदिहर पा-तकी ॥ २९ ॥ गणितां तयाचीं पातकें । न पुरती कोटि आब्दकें । तो सौवीर नगरा कोण्हिएकें । काळें आला चौर्यार्थ ॥ ३० ॥ तया नग-राचे उपवनीं । सरोवर संपूर्ण जीवनीं । सीतासीत विकसित पद्मपद्मिनी । मधुर मधुकर रुंजती ॥ ३१ ॥ तत्तटीं विष्णवालय । कळस झळकती हेममय । दिव्यांबराळंकारीं अव्यय । पुजायुक्त श्रीहरि ॥ ३२ ॥ तेथें दिव्यांबराळंकारीं । पुजूं आलिया नरनारी । तेहीं अर्चूनियां मुरारि । गेलीं स्वस्वसद्मासी ॥ ३३ ॥ गुळिकें देखोनि दिव्य कळस । देवपुजाअर्थ वहुवस । सतोषलें तयाचें मानस । देवास्वापहाराकारणें ॥ ३४ ॥ प्रवेशला विष्णुभुवनीं । तवं तेथें वैसला उदंक मुनि । तपो-निधि विष्णुध्यानीं । शात निस्पृह निर्मळ ॥ ३५ ॥ सर्वभूतप्राणसखा । आत्मवत विश्व लेखा । सबाह्य प्रकाशूनि चित्सुखा । दिव्य दर्शन एकांतीं ॥ ३६ ॥ तवं तो अर्थापहारी दुर्जन । अति संतापला देखोन । ह्मणे हा मम जीवीं कां अवरोधन । ह्मणौनि निर्धन मांडिलें ॥ ३७ ॥ पाव देऊनि उरावरी । मुक्त खड्ग दक्षण करीं । वाम हस्तें दृढ धरी । कंठ छेदावयासी ॥ ३८ ॥ उदंक ह्मणे लुब्धका साधु । वृथा कां करिसी मम वधु । म्यां काय केला तवापराधु । हें सांग विचारूनियां ॥ ३९ ॥ कृतापराधासी कृतबुद्धीं । शिक्षा करिती यथाविधि । निरापराधांचये वधीं । न प्रवर्ते कोण्ही हि ॥ ४० ॥ विरोधी मूर्ख मिथ्या द्रोही । त्याचा हि

---

१ पारधी. २ कचुक=आंगरखा. ३ 'अघरूपी' असा दुसरा पाठ आहे. ४ देवस्व=देवाच्या नावानें असलेली मालमत्ता; तिचें हरण करणारा. 'देवस्वाद-हर' असा दुसरा एक पाठ आहे. ५ त्यांनीं. ६ देवाजवळ होतें नव्हतें तेवढें सर्व चोरून नेण्याकरितां. ७ अडथळा. ८ मारण्याचा बेत. ९ म्यानांतून बाहेर काढलेलें.

अन्याय लक्षिती पाहीं । परंतु धार्मिक जन जे कांहीं । ते मिथ्या वैर न करिती ॥ ४१ ॥ बहुधा प्रकारें वाध्यमीन । तयासी हि क्षमा करिती सज्जन । ते उत्तम पुरुष जनार्दन- । प्रीतिपात्रें शांतिता ॥ ४२ ॥ शुष्क वैरकारी दुर्ज्जन । द्वेपिती मृग मीन सज्जन । ढिवर लुब्धक दुष्ट मन । विषयतृष्णेस्तव तन्हि ॥ ४३ ॥ मृग मीन मारिती भक्षावया । सज्जना धिःकारिती पापपक्ष रक्षावया । मी विपक्ष वीतराग मज मारावया । काय आहे निमित्त ॥ ४४ ॥ बाप माया मोहकारिणी । कैसे मोहिले आहेति प्राणी । पुत्र मित्र कलत्राचा भरणीं । पापकर्मे करिताति ॥ ४५ ॥ सकळामधूनि एकला च जाय । यमयातना वरपडा होय । हें हि विश्व न देखे काय । तथापि उमजला च नुमजे ॥४६॥ वृथा हे कुटुंबममता । पापफळ भोगी स्वतां । होणार तें तरि तत्वता । विपरीत नव्हे सर्वथा हि॥४७॥ होणार जरि प्रेत्नें पालटतें। तरि हें विश्व कां दरिद्रें जितें आणि मरतें। ब्रह्मरेखा ब्रह्मयातें। दुर्निवार हें प्रसिद्ध॥ ४८॥ हा कोटि ग्रंथाचा सिद्धांत । तरि कासया करावें दुरित । ह्मणोनि संत स्वानंदभरित । सदाचार न सांडिती ॥ ४९ ॥ बाप सज्जनोपदेशमहिमा । वाक्यें कडतारिलें अंतर्यामा । तत्काळ पावला उपरमा । भयभीत पतित पदयुग्मीं ॥ ५० ॥ सत्संगें हरिमूर्तिदर्शनें । निःपाप अनुतापला निज मनें । ह्मणे मी पापात्मा लुब्धक अनुदिनें । येथें हि पाप अर्चिलें॥५१॥ ऐसिया मज पापिष्टातें । विधीनें कां श्रजिलें जी मातें । श्रमऊनि पूर्वजातें । आपणासहित बुडवावया ॥ ५२ ॥ ऐसी मज पापियाचे तत्काळ प्राण । जातां होय अग्रपापखंडण । या पापाजाळामाजि कोण । पुर्ण्ये पावलों तव पदाब्जा ॥ ५३ ॥ ते हि माझी लाज वाटे मज । ज्यां पापरूपें वधिलें होतें तुज । जळोत हे मम कर पाद निर्लज्ज । तुज

---

१ विकारवश. २ कोळी. ३ गुंतलेला. ४ प्रत्येक मनुष्याच्या संचितक्रियमाणानुसार त्याला या जन्मीं जा कांहीं सुखदुःखें भोगावी लागतात, तीं ब्रह्मदेव त्याच्या मस्तकावर, त्याच्या जन्मापूर्वी, लिहून ठेवित असतो, ते ब्रह्मलिखित प्रत्यक्ष ब्रह्मदेवाला निवारण करता येत नाहीं. ५ पातक. ६ आगी मिनली. ७ शांति.

पुण्यरूपा स्पर्शले ॥ ५४ ॥ ऱ्यां दुष्ट स्पर्श केला तव हृदयां । ह्मणौनि पुन:पुना पडे पाया । ऐसी स्पर्शे पापकाया । कृतकृत्य जाली परिसेवं ॥ ५५ ॥ ऐसिया अनुतापें अति विव्हळ । हृदय फुटों पाहे केवळ । प्राण न राहती च एक पळ । तत्काळ तनु त्यागिली ॥ ५६ ॥ तो अनुताप नव्हे ऐसा । आला सवें च गेला तैसा । त्याचा प्रताप नामस्मरणाऐसा । पाप हरूनि मोक्ष दे ॥ ५७ ॥ तो पडला देखोनि उदकें । शिंची श्रीमद्विष्णुपादुदकें । तेणें विमान प्रेरिलें वैकुंठनायकें । दिव्यदेही तो केला ॥ ५८ ॥ गुळिक ह्मणे जी मुनिशार्दूळा । श्रीमत्सद्गुरु पतितकृपाळा । तुझिया वचनोपदेशें दयाळा । पावलों पद शाश्वत ॥ ५९ ॥ ममापराध क्षमा करीं । ह्मणौनि पुन:पुना प्रणम्य करी । प्रदक्षणा करूनि बैसे विमानावरि । पुष्पवृष्टि केली उदका ॥ ६० ॥ दिव्य वाद्याचा गजरीं । गीत नृत्य जयजयकारीं । गुळिक पावला हरिमंदिरीं । आश्चिर्य करी मुनिराज ॥ ६१ ॥ आता प्रत्यक्ष प्रत्ययो देखोन । हरिमूर्तिदर्शन पादाबुशिंचन । तेणें मिळे पावला विमान । त्या हरीतें स्तवील उदक ॥ ६२ ॥ तें हरिस्तवनामृत अति मधुर । शाश्वत माधुर्येक रसाधार । परिसोत हरिपरायण अति चतुर । भक्तितत्वार्थ जाणते ॥ ६३ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । गुळिकोद्धारण । नाम प्रकरण समाप्तम् ॥ ५४ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो प्रगट परमेश्वरा । नमन करितां हि नाहीं दुसरा । द्वैताभासें अद्वैतेश्वरा । कार्य कारण अभेदा ॥ १ ॥ परिसा भगवद्रूप भगवद्दास । चिन्मय च कि चिद्विलास । तो चिदात्मा विष्णु साभास निराभास । चित्स्वरूप आखड ॥ २ ॥ अपूर्वाभास मृगजळ । सुप्रकाश च किं केवळ । तद्भासत च मिथ्या विश्वजाळ । अधिष्ठान आत्मा

---

१ परिसाप्रमाणें. २ कर्मा.

तद्रूपें ॥ ३ ॥ जें मिथ्या च तें कोठूनि भासे । सत्य च तद्रूपें प्रकाशे । रजताकारें आभासे । शुक्तिका हे जैसी ॥ ४ ॥ तत्वता ब्रह्मरूप च परि विश्वता । हे विचित्र लीळेची प्रगल्भता । हें ऐसें हि असोनि स्वता । पुरुष एव सर्व हि ॥ ५ ॥ हें सर्व हि समान सरळ । तथापि प्रभा तत्वतें मडळ । तैसें विश्वरूपें ब्रह्म निर्मळ । परि विष्णु सर्वभूतात्मा ॥६॥ तयाचीं रूपें आणि नामें । तें सहज ब्रह्ममय नेमें । करावीं त्वपदशोधन क्रमें । हे विपत्ति जीवत्वीं ॥ ७ ॥ तत्पद ईश्वरकृपानुमोदन । तरि च होय जीव त्वपद शोधन । ईश्वरबुध्या ईश्वरत्व परि बोधन । जीवत्वें साम्य घडेना ॥ ८ ॥ जन्हि शुद्धशबळभेदें । जीवेश्वरवर्णन तत्वपदें । तन्हि ईश्वरतनुता स्तविती श्रुतिपदें । जीवतनुता नारकी[1] ॥ ९ ॥ जीव कळिमळें अति मळिन । नाना निरयीं पच्यमान । ईश्वर नामस्मरणें च पावन । जाले होताति आता हि ॥ १० ॥ जीवकृपणाचें घेता नाम । पापफळ भोगिजे हा नेम । ईश्वरनामें कैवल्यधाम । पाविजे हें ! प्रसिद्ध ॥ ११ ॥ जीवाचीं ध्याता कुकर्मे । पापार्धभाग कृत स्वकर्मे । ईश्वराचीं ब्रह्महत्या चौर्य जार कर्मे । गाता ते चि तरताति ॥ १२ ॥ एतावता ईश्वर सहज स्वरूपें । केवळ ब्रह्म नामें रूपें । ऐसिया श्रुति स्मृति साक्षेपें । नित्य स्तवन करिताति ॥ १३ ॥ जीवासी साधनें ईश्वरत्व पावावें लागे । ईश्वर सहज च स्वस्वरूप निजांगें । जन्हि हें विश्व तयामाजि वागे । तन्हि तेणेंसीं अद्वैत ॥ १४ ॥ ह्मणौनि रूप नाम गुण कर्म कीर्तन । स्वभावें च ब्रह्म सनातन । तया ईश्वराचें जें वर्णन । तें च अध्यात्मनिरूपण हें ॥ १५ ॥ नवनीतामाजि न रिघे रवि । शर्करा नलगे पाखडावी । अमृतासी वस्त्रपळवीं । शोधावें नलगे ॥ १६ ॥ तैसें भगवन्नाम रूप ब्रह्म स्वभावें । तें अनुभवें आता नलगे साधावें । जयाचेन स्मरणमात्रें हें आघवें । विश्व च होय तद्रूप ॥ १७ ॥ आता तन्मय श्रोते वक्ते सज्जन । तल्लिन चि ते परिसा हरिकीर्तन । उदक

---

[1] नरकवासी.

मुनिराज सुस्तवन । करी श्रीहरीचें प्रेमें ॥ १८ ॥ नमो नारायणा आदिदेवा । नमो जगज्जीवनार्णवा । नमो जगन्निवासा वेद्य अनुभवा । करणी करणी कळेना ॥ १९ ॥ नमो निराकार च साकारा । शंखचक्रगदाब्जधरा । नमो पीतांबरधर सुंदरा । सर्व शोभा अधिष्ठाना ॥ २० ॥ नमो नाभिजाब्जजजनका । तन्नाहकारीं उद्भव लिंगका । दाविसी विश्वस्थिति विनाश कौतुका । शाश्वतीं जळतरंगवत ॥ २१ ॥ नमो निर्ममा निर्लोभा । तथापि स्मृतार्तिहरा रयिवेल्लभा । पद्मापति पद्मनयना पद्मनाभा विचित्रवीर्या विश्वेशा ॥ २२ ॥ आदिपुरुषा वेदांतवेद्या । नमो सर्व सिद्धांता सवन सद्या । नमो आदिमध्यांतरहिता विश्वाद्या । तेजोमया मुकुंदा ॥ २३ ॥ अक्षरा अनंता अच्युता । नमो ज्ञेयरूपा ज्ञाननिंदा ज्ञानात्मकता । कृपा करीं मज भगवंता । वेष्टिसर्मष्टिस्वरूपा ॥ २४ ॥ नमो नामजातिगुणविहीना । नमो सर्वात्मका सर्वाभिधाना । नमो योगधाम परम निधाना । निजलाभसंपूर्णा ॥ २५ ॥ स्थूळ सूक्ष्म नानाकार । विश्व वाँचारभण विकार । ते सर्व हि तू च सर्वेश्वर । तद्रूपें च तदन्यता ॥ २६ ॥ तू स्वता विश्व होसी । स्वता विश्व वसवितोसी । तो चि विश्वता विश्व नव्हसी । अभिनव नवल हें तुझें ॥ २७ ॥ विश्वता कर्मतंत्र जीव । तू स्वतंत्र सदाशिव । जीव भव प्रादुर्भाव । तयावेगळा तू स्वता ॥ २८ ॥ तुजवेगळी हे जीवता । कैसी भासेलि भगवंता । ऐसिया तूतें जो भजता । तया भव च अनुभव ॥२९॥ तुझा च तुज न भज नर । तया नाथिला च भव भयंकर । हा तुजों अद्वैत चा द्वैत प्रकार । विनेद परमानंदाचा ॥ ३० ॥ भव तंव वास्तवरूपें नाहीं । तथापि तुज न भजता भासे पाहीं । तुज न भजता सर्वथा तो

हि । तव स्वरूप श्रुतिवाक्यें ॥ ३१ ॥ ऐसा तूं अकाळ लीळाविग्रही[1] । मजलागि करीं अनुग्रही । मिथ्या खटपट दुराग्रही । काय होय तुजवीण ॥३२॥ तव कृपाप्रसाद फावे । तरि तव रूप निवळे स्वभावें । शुष्काग्रह करितां स्वानंदें निवे[2] । तुजविण हें घडेना ॥ ३३ ॥ ह्मणौनिया जी वरदा । सर्व स्वरूपा परमानंदा । निर्मळा निश्चळा निरंजनाभेदा । अभेदातीता तद्रूपा ॥ ३४ ॥ भेदें द्योतिजे[3] अभेद । अभेदें द्योतिजे भेद । ह्मणौनि भेदाभेदानुवाद । तुझां ठाईं वडेना ॥ ३५ ॥ स्वजातीय विजातीय स्वगत । तन्हि प्रत्यक्त्वें[4] अवगत । तूं अनंत अखंड सदोदित । लीळाविलास हा तुझा ॥ ३६ ॥ नमो अनाधारा विश्वाधारा । परमानंदा परमात्परा । हृद्गुहानिवासा[5] सर्व शरिरा । बाह्याभ्यंतर व्यापका ॥ ३७ ॥ परंज्योति मूर्तिमंता । अदृश्या अप्रमेया दृश्यभूता । विष्णुसंज्ञित अप्रमिता[6] । नमो नमस्तेस्तु मापैति[7] ॥ ३८ ॥ नमो जीवसंजीवना । चाळका इंद्रिय प्राण पवना । नमो स्वसंवेद्या सद्या सघना । वाचा याचक अवाच्या ॥ ३९ ॥ नमो नित्या सत्या शाश्वता । नमो शरणागत कृपावंता । नमो भावप्रिया भगवंता । नमो श्रीमंता वैकुंठा ॥४०॥ ज्याचें नामस्मरणाचें भोज । वैकुंठपद पाववी सहज । निर्माल्य शेषतीर्थ चरणरज । मुक्तिदातया नमोस्तुते ॥ ४१ ॥ सर्वा ब्रह्मांडांतिल एक च खळ । पापें करिल पेंजा सर्व काळ । तो राम ह्मणतां एक च वेळ । उद्धरी तया नमोस्तुते ॥ ४२ ॥ तुजएवढा नाहीं कृपानिधि । मजएवढा नाहीं अपराधी । तूं पावन मी पतित जडधी । उद्धरीं शरण आलों जी ॥ ४३ ॥ ऐसा स्तविला लक्ष्मीकांत । प्रगट जाला कृपावंत । उदंक मुनि शरणागत । देखता जाला प्रत्यक्ष ॥ ४४ ॥ सुनीळ तनु तेजाळ सुंदर । आकर्णाक्ष चतुर्भुज पीतांबरधर । दिव्य अंगदांग मनोहर । पाहीं सुगंधचर्चित सुमनार्चित ॥ ४५ ॥ शंख चक्र कौमोदकी । धग-

---

१. स्वकीय इच्छेनें भक्तमनोरथपूरणार्थ धरलेला देह तो. २. स्पष्ट होईल. ३. शांत होईल. ४ प्रकाशित करतो. ५ हृदयरूपी गुहेंत वास करणारा. ६ गणति करतां येत नाहीं किंवा जाणता येत नाहीं असा. ७ मा=लक्ष्मी, तिचा पति, विष्णु.

धगित आयुधें हस्तकीं । उत्फुल्ल पंकज कौतुकीं । मिरवे करसरोजीं ॥ ४६ ॥ वाम स्कंदावरूनि दक्षिण कुक्षितळवरि । हेम यज्ञोपवीत-शोभा साजिरी । हृदयीं श्रीवछलांछन मिरवी श्रीहरि । ब्रह्मण्य देव ब्रह्ममूर्ति ॥ ४७ ॥ स्वरूप सघन जैसें गगन । तैसें विमळ विशाळ महामन । कारुण्य स्निग्ध अवलोकन । भुवनैक निधान प्रगटलें ॥४८॥ ऐसा देखोनियां श्रीहरि । उदंक सप्रेम नमस्कार करी । मस्तक ठेऊनि चरणावरि । दंडवद्धरामंडळीं ॥४९॥ अष्टभाव दाटले ते वेळे। पाद प्रक्षाळिले प्रेमाश्रुजळें । हरिप्रेमोदकें उदंकें निर्मळें । सर्व हि समर्पिलें ॥५०॥ उचलूनि हृदिस्थें हृदयीं । आलंगिला तये समयीं । तनु मनें मिळाले एकें ठाईं । वेगळे होतां हि अवेगळे ॥ ५१ ॥ अवलोकी श्रीविष्णुवदन । नयनीं मिसळले नयन । श्रवणीं श्रवण तल्लीन । मुखीं मुख स्मरणेंसीं ॥ ५२ ॥ प्राण तुळसी गंधावग्रहणें । प्राणीं प्रवेश केला प्राणें । करीं कर कवळिले चरणें । चरणीं केली निवासता ॥ ५३ ॥ हरिलिंग-मय जालें पुलिंग । गुह्याहुह्य समानभाग। तत्काळ ऐक्या आला अंतरंग। मनीं मन मुरालें ॥ ५४ ॥ चित्तीं चित्तासि जाली विश्रांति । अहमात्मता अहंकृति। बुद्धि बुद्धीसी मिळाली स्वनिश्चिती । अंतःकरण अंतः-करणीं स्फुरणें ॥ ५५ ॥ स्वयें आत्मा तरि एक । निरशले मिथ्याभास जीवकंचुक । सबाह्य नुरे च देवभक्त जाले एक । जाणों मुळीं च अभेद ॥ ५६ ॥ मुळीं असते वेगळे । तरि न मिळते कव्हणे काळें । अविद्योपाधि भिन्नता भव जालें । तन्निरासें तन्मयता ॥ ५७ ॥ भक्तवछळ ह्मणे वछा । वर माग जे तुझी इछा । जन्हि तुज सर्वस्वें अनिछा । तन्हि मद्दर्शन नव्हे निर्फळ ॥ ५८ ॥ ऐसें बोले उदार उदारांग । पुनः प्रणम्य करी उदंक विनितांग । स्वामी तूं सर्वज्ञ सर्वांतरंग । अतःपर वर तें काय ॥ ५९ ॥ तुझी भक्ति अव्यभिचारिणी । जन्मोजन्मीं असो चक्रपाणी । तव स्मरणें जीवखाणी । मुखें सभ्रेन असंभवदा ॥ ६० ॥

---

१ जमिनीवर साष्टांग नमस्कार घातला. २ हृदयांत वसणारा जो विष्णु त्यानें.

हें परिसोनि श्री अधोक्षज । करांबुजें स्पर्षे शिरांबुज । दिव्य ज्ञान प्रेरिलें सहज । देखे सर्वस्वयेंसीं हरिरूप ॥ ६१ ॥ क्र्यायोगें मदारा- धन । करीं सिद्धस्वरूपें परि साधन । धरीं नरनारायणस्थान । मुक्त च मोक्ष पावसी ॥ ६२ ॥ त्वत्कृत हें स्तोत्र जे पढती परिसती । ते सर्व- कामसंतुष्ट मोक्ष पावती । हे मम वरदानमहिमोन्नति । सर्वदा असो तव स्तवीं ॥६३॥ एन्हवीं तन्हि भगवत्कृपाप्रसादवाणी । ते च सफळ सात्वि- कजनश्रवणीं । बहिर्मुख कामिक शुष्क व्याकरणी । आहे ती च सर्वत्र ॥ ६४ ॥ गंगावोघा आलें डहुळें । तें चि स्नानमात्रें दे मुक्तिफळ । कर्मनाशेचे विषय माधुर्यें नितळ । सिद्ध स्वता उच्छेदी ॥ ६५ ॥ भक्त विरक्त ज्ञानी वित्पन्न । तो दुर्लभ च कीं सर्वगुणसंपन्न । वेद व्याकरण- वंत छळक दुर्जन । होती ब्रह्मराक्षस ॥ ६६ ॥ भोळे भाविक भगवद्भ- क्ति । केवळ नामें च तरले हे पुराणोक्ति । अंतरप्रेम मुक्तेविण बाह्य शुक्ति । वित्पत्ति मुक्त स्थळीं न शोभे ॥ ६७ ॥ आतां असो हे उदं- कासी वर । देऊनि अदृश्य जाला सर्वेश्वर । बदरिकाश्रमीं ऋपेश्वर । हरिरूप जाला हरिभक्तया ॥ ६८ ॥ याकारणें हरिभजन पूजन नामस्म- रण । प्रत्यकें मुक्तीचें कारण । ध्यान प्रणम्य प्रदक्षण । अवलोकन संस्तुति ॥ ६९ ॥ जया अपेक्षा मोक्षाची । तेणें भक्ति करावी भगवं- ताची । भगवद्भक्तीविण गति कैंची । विशेष आतां कलियुगीं ॥ ७० ॥ याकारणें विचक्षणीं । आळस न करावा नामस्मरणीं । केवळ नामें च होय मिळणी । हरिस्वरूपीं ह्मणौनियां ॥ ७१ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । उदंकमोक्षवर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ५५ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो निजलाभपूर्णा । नमो सर्वगुणसंपूर्ण न अति जीर्णा । पुरातनस्वरूपा ॥ १ ॥ नमो असंमान्या । नमो भावा-

---

१ ' क्रियायोगें ' असा दुसरा पाठ आहे. २ गढुळ पाणी, डहुळणें=घुसळणें.

र्थसेव्या । नमो नामसंतुष्टा श्रुतिस्तव्या । नमो भक्तभावस्वरूपा ॥ २ ॥ आराध्यदेव अति समर्थ । वरि भक्ताचा दृढ भावार्थ । तरि ते भक्तिप्रेम व्यर्थ । होइल कां हो ॥ ३ ॥ देव समर्थ श्रीनिवास । भावार्थ दुर्बळ भक्तास । तरि भावानुरूप तयास । होइल प्राप्ति ॥ ४ ॥ आराध्यदेवत दुर्बळ । भक्तभावार्थ प्रबळ । तरि इच्छिला मनोरथ सफळ । केंवि हों शकेलि ॥ ५ ॥ देवत च कामफळद । केवळ जड विषयविद । तयासी मागतां कैवल्यानंद । उभय विक्षेप साक्षेपें ॥ ६ ॥ जयाचा हातीं च जें नाहीं । तयासीं तें मागतां च पाहीं । कैसा संतोष उपजेलि देहीं । भक्ततृष्णा हि राहिली ॥७॥ कामधेनुचेनि स्वभावें । विश्वामित्रीं पुजी भावें । तये भावार्थी फळ फावे । ऐसें केंवि घडों शके ॥ ८ ॥ अथवा सज्जनभावें दुर्जन पूजिला । तो श्रम भावार्थेसीं व्यर्थ जाला । निरर्थक काळ हि निर्फळ गेला । ससर्गदोष विशेष ॥ ९ ॥ तैसें वामकरादि विधान । जेथें मद्यमांसादि जीव बळिदान । तेथें रोचनार्थ फळश्रुति स्तवन । परि साधकें विचारावें कीं ॥ १० ॥ तथापि न भेटे तें हि देवत । तरि व्यर्थ च पूर्वजासीं निरयपात । कदापि भेटे हि तरि किंचित । नश्वर सामर्थ्य नारकी ॥ ११॥ ब्राह्मणवोहर नारिनर । नरमाहिष मार्जार । हे बळी देतां मुक्ति हें साचार । मानिती ते हि अहित ॥ १२ ॥ जरि दोष नाहीं बळिदान करितां । तरि देवत च कां भितें प्राण हरिता । तरि तयासी कोण धरिता । सन्हारितां जीवासी ॥१३॥ ह्मणौनिया हा पापमार्ग । सतीं करूं नये संसर्ग । भक्त्या भजावा भवानीभर्ग । श्रीनिवास मुकुंद ॥ १४ ॥ समर्थ देव समर्थ भाव । तरि सामर्थ्या आलें गौरव । ज्याचिया चरितश्रवणें रौरव । चुकती पातकियाचे हि ॥ १५ ॥ अथवा देवा समर्थाच्या भजनें । अल्पें हि महत्फळ पाविजे जनें । त्याचें मंगळ महिमान सुमनें । परिसा मंगळदायक ॥ १६॥ पूर्व प्रकरणीं उदकमोक्षवर्णन जालें । आतां जयध्वजाख्यान आरंभलें ।

---

१. पचन होण्याकरिता. २. नरकवासी. ३. शिवभवानी.

जये हरिभक्तीनें कृतार्थ जाले । तये स्तविती देवऋषि ॥ १७ ॥ आहो इति आश्चर्य करूनि । सनकादिकां सांगे नारद मुनि । हरिभक्ति सर्वपापशमनी । सर्वपुण्यफळप्रदा ॥१८॥ हरिभक्तीची लागली गोडी । तया परमानंदाची प्राप्ति कल्पकोडी । श्रीहरि च तयाची जोडी । सर्व ऐश्वर्येसहित ॥ १९ ॥ जे हरिभक्तिपरायण । जे विश्वासें करिती नामस्मरण । जे मी प्रणमीन ब्राह्मण । याचें काय आश्चर्य ॥ २० ॥ वर्ण अथवा वर्णबाह्य होत । हरिभक्त नामस्मरणवत । हरिरंगें रंगलें ज्यांचें चित्त । तयासी नित्य नमोनमः ॥ २१ ॥ तयांचे जे का अंगसंगी । जे रंगले त्याचा रंगीं । नमन भावें तयालागि । ते तत्वता हरिरूप ॥ २२ ॥ निजतां भुंजैतां चालतां बोलतां । बैसतां उठतां सर्व स्वभावतां । जे नामें स्मरती अच्युता । त्यासी नित्य नमोनमः ॥ २३ ॥ त्याचें दर्शन स्पर्षन पूजन । नमन स्मरण अथवा ध्यान । एकें च अनेक जनार्दन । उद्धरीं भवसागरीं ॥ २४ ॥ यदर्थी पुरातन इतिहास । परिसा हरिलीळा हरिदास । अवशत्वें हि जगन्निवास । प्रसन्न जाला अवलीळा ॥ २५ ॥ सोमवंशोद्भव जयध्वज । विख्यात हरिभक्त महीभुजे । नित्य आराधी गरुडध्वज । दीपदानें संमार्जनें ॥२६॥ अति कोमळें करतळें । सुंदर सामुद्रिकें मंगळें । दिव्य कंकणें दशांगुळें । चंदनचर्चित भुजद्वय ॥ २७ ॥ तिहीं हस्तकीं महाराजा । स्वयें संमार्जन करी वोजा । कर जोडूनि तिष्टती सेवकफौजा । दीप लावी स्वहस्तें ॥ २८ ॥ ऐसें नित्य करी हरहरिमदिरीं । तवं कोण्ही एके काळीं नृपकेसरि । आला पुण्य सरिता रेवातीरीं । स्नान संध्या सारिली ॥ २९ ॥ विचित्र सुमनाचें विचित्र । हरिमंदिर केलें तत्र । संमार्जन करूनि पवित्र । प्रदीप्त दीप लाविले ॥ ३० ॥ हें देखोनि

---

१ कोटीसंख्या. २ भोजन करीत असताना. ३ राजा. ४ 'दोहीं' असें पाहिजे व तसा एक पाठ आहे. 'तिहीं' असें कायम ठेवलें तर, त्याचा अर्थ, वर वर्णन केलें आहे अशा प्रकारचे जरी त्याचे हात सुंदर, नाजुक, वगैरे होते, तरी अशा त्या हातांनीं, असा करावा.

राजचरित । वीतिहोत्रें प्रिय पुरोहित । अंतःकरणीं अति विस्मित । विनित विनविता जाला ॥ ३१ ॥ तो वेदवेदांगपारग भक्तितत्वज्ञ । ह्मणे राया तूं विष्णुभक्त वरिष्ट सर्वज्ञ । विष्णुप्रिय पूजाविधानज्ञ । तथापि दीपसंमार्जनतत्पर ॥ ३२ ॥ तरि हा काय महिमा कळला तुज । हें तत्वता सांगावें मज । तवं हास्यमुखें ह्मणे चोज । परिस आतां सादर ॥ ३३ ॥ माझें पूर्वजन्मार्जित । जातिस्मरणें मज स्मरत । परमाश्चिर्यप्रद विस्मित । श्रोते होती ज्या श्रवणें ॥ ३४ ॥ पूर्वीं कृतयुगाभीतरीं । सारोचिष मन्वंतरीं । रेवत नाम विप्र ससारीं । वेदवेदांगपारग ॥३५॥ अयाज्येयाजक ग्रामयाचक । अवक्रियादि वस्तु विक्रयक । पिशुन निष्ठुर निषिद्धकर्मकारक । त्यजिला लोकीं बंधुवर्गीं ॥ ३६ ॥ दरिद्री दुखी सीर्णांग । पापें बाधित व्याधितांग । ऐसा हि धनार्चनार्थ दुर्भग । पृथ्वीपर्यटण सदा करी ॥ ३७ ॥ फिरतां पडला नर्मदातीरीं । कासश्वासें प्राण गेले क्षणाभीतरीं । मागे तयाची अंतुरी । बंधुमति अति सुंदरा ॥ ३८ ॥ ते कामाचारा जारा । यथेष्ट करी दुराचारा । मी चांडाळ आलों तिचया उदरा । इंद्रकेतु विख्यात ॥ ३९ ॥ पुण्य अथवा पाप बहुत । जालिया होइजे लोकविख्यात । वंद्य कां निंद्यत्वें जाणत । जन सर्व हि तयातें ॥ ४० ॥ ते मम देहजननी । त्यागिली होती बंधुजनीं । मज तिचा जठरीं जन्मोनि । सुबुद्धि लागेलि कोणाची ॥४१॥ मी पापकारी परदारी । निर्दय हिंसक चोरी करी । मेरुतुल्य सुवर्णादि हरी । अर्थ पुण्यजनांचें ॥ ४२ ॥ गोब्राह्मणादि पशु जन । यांचें बहुत केलें हनन । सदां करी मार्गावरोधन । वज्रचित्त पापात्मा ॥ ४३ ॥ मद्यपानी मांसाशनी । लंपट परदारागमनीं । एकदां पूजाशून्य हरिभुवनीं । परस्त्रीनियंतें पातलों ॥ ४४ ॥ तेथें परस्त्रीसहित निजावया । वस्त्रें झाडिलें देवालया । दोघां च पुरतिया ठाया । नीरजें केलें दीपार्थ

---

१ सूर्य किंवा अग्नि. २ पूर्व जन्मांतील स्थितीचा आठव. ३ ज्यांना यज्ञ वगैरे करण्याचा अधिकार नाहीं अशा शूद्र वगैरे लोकांकडून किंवा लोकांकरिता यज्ञ करणारा. ४ चहाडखोर. ५ नासकें किंवा रोगट शरीर. ६ हतभागी ७ दमाने. ८ जयध्वजाचें पूर्वजन्मांतील नांव. ९ निरंतर किंवा सारोसार. १० धूळ सारून्नी, केर काढला.

॥ ४५ ॥ जितुक्या झाडिल्या अंशकणिका । तितुकिया जन्मार्जिता पातका । क्षयो जाला आश्चिर्य आइका । हेतु हि नसतां हरीचा ॥४६॥ सुरतार्थ प्रदीप्त दीप लाऊन । जारस्त्री मार्गी मनोनयन । दीपप्रकाशें पुरपाळक जन। येगें आलेत्या स्थाना ॥ ४७॥ हा परदूत अथवा तस्कर। ह्मणोनि आरंभिला मार । मी काय देवं प्रतिउत्तर । मत्कर्म हीन त्याहुनी॥४८॥ मग खड्ग काढूनि तीक्ष्णधार। तत्काळ छेदिलें माझें शिर । तवं आश्चिर्य वर्तलें थोर । दिव्य विमान पातलें ॥ ४९ ॥ दिव्यार्चन दिव्य शरिरीं। मज वाहिलें विमानावरि । प्रवेशलों वैकुंठनगरीं । जे देवांसी दुर्लभ ॥ ५० ॥ तेथें ब्रह्मकल्पशतपर्यंत । परमानंदें होतों वसत । यानंतरें ते च संख्या सुख भोगित । सत्यलोकीं राहिलों ॥ ५१ ॥ दिव्य भोग अनुभवित जीवीं । तावत्काळवरि राहिलों दिवीं[३] । यानंतरें पावलों भुवीं[४] । यदुवंशीं नृपजन्म ॥ ५२ ॥ तेणें अच्युत पुण्यप्रभावें । अच्युत संपदा पावलों विभवें । संमार्जनदीपप्रादुर्भावें । पापबुध्या जालों निःपाप ॥५३॥ तया अच्युतालया भक्तिभावार्थें । संमार्जनदीपादि संपादीं यथार्थे । तयाचें फळ न वर्णवें समर्थें । शेषें अशेषास्यें वर्णितां ॥ ५४ ॥ याकारणें द्विजसत्तमा । दीपें संमार्जनें यजीं पुरुषोत्तमा । जातिस्मरें जाणोनि महिमा । सद्य प्रत्यय पावोनि ॥५५॥ जो एकाकी निस्पृह नर । भावें पूजिल परमेश्वर । तो पद पाविलि परात्पर । यथा मीळितोपचारें हि ॥ ५६ ॥ अवशें यत्किंचित संमार्जनमात्रें । पावन जालों पापगात्रें । दीपें दिव्य देहें विचित्रें । दिव्य लोक देखिले ॥ ५७ ॥ एथें हि दिव्य बुद्धि दिव्य संपदा । सदां भक्तिभावें यजीं गोविंदा । अशेषार्चनफळानुवादा । न करवे कदां चतुर्मुखा ॥ ५८ ॥ ऐसें परिसोन राजवचन । वितिहोत्र सुखाश्रु लोचन । स्पृहा करी जैसा कृपण धनार्चन । हरिपूजारत जाला ॥ ५९ ॥ धन्य धन्य तो च वक्ता । जो तत्काळ भक्त

---

१ पहारेकरी. २ भेदेपणा किंवा चोरी यापेक्षां ३ आकाशांत. ४ भूमीवर. ५ वरील पुण्यफळाचें वर्णन करितां करितां शेष ही मौनावला. ६ अवसो=रात्रपूर्वभाग.

करी अभक्ता । ज्याचया वक्तृत्वा व्यक्ता । वर परमेश्वराचा ॥ ६० ॥ शुष्क वाणि बहिर्मुख । स्वयें च नेणे भक्तिसुख । क्रियाहीन जनदुख। काय निरशूं शके हो ॥ ६१ ॥ वित्पत्तिबळें वैखरी । विचित्र नवरस रचना करी । परि तें नटनाट्य वरिवरि । काय बोधी तत्वज्ञा ॥ ६२ ॥ तें च जरि तत्वज्ञाचां ठाईं जोडे । तरि पूर्व पुण्य उजेरी पडे । तद्वाक्यश्रवणें निवडे । तत्काळ जाळ मायेचे ॥ ६३ ॥ जगीं तो च धन्य श्रोता । जो तत्काळ चमत्कारे चित्ता । सद्य प्रवर्त्ते स्वहिता । सर्वज्ञ आणि भावार्थी ॥ ६४ ॥ दुश्चित नित्य निरंतरीं । श्रवणीं साहित्य पाहे वरिवरि । वृत्ति भरली असे भरीं । बहु श्रवण करावया ॥ ६५॥ याचा कंठ नाहीं सुरस । तेणें हरिकथा मानी विरस । यासीं जनरंजनीं नाहीं रस। ह्मणोनि उठोनि जाय ॥ ६६ ॥ तो च जरि भक्त भावर्थी । तरि तत्काळ प्रवेशे परमार्थी । बाह्य न लक्षी कृतार्थी । अंतर सुखें सुखरूप ॥६७॥ जन्हि सर्व साहित्य काळे । तन्हि वृत्ति तिकडे न वळे । हरिप्रेमसुखसंमेळें । परमानंदें डुल्तु ॥ ६८ ॥ ऐसा श्रोता भाग्यबळें भेटे । तरि अपांग वक्तृत्वाचा पांग फिटे । श्रोता वक्ता परमार्थी संघटे । सुखरूप स्वरूपीं ॥ ६९ ॥ ह्मणोनिया तो वितिहोत्र । तत्काळ जाला प्रेमामृतपात्र । ते कथा सुत सांगे सुचित्र । भक्तिमहिमा मुनींद्रा ॥७०॥ ज्ञानता अथवा अज्ञानता । हरिपूजा घडतां प्राणभूता । श्रीहरि स्वतां मुक्तिदाता । ह्मणौनि हरि पुजावा ॥ ७१ ॥ अनित्य हा असुख संसार। अनित्य स्वजन संपत्तिसंभार । कृतांत निकट निरंतर । ह्मणौनि हरि पुजावा ॥ ७२ ॥ नारद ह्मणे रे लोक हो । वृथा गर्व करितां कां हो । कृतांतग्रस्त हा देहो । हरि भजा भ्रम तजा ॥ ७३ ॥ जरि जन्मकोटि सहस्त्रवरि । पुण्य उपार्जित जन्मांतरीं । तयासी हरिभक्ति संसारीं । घडोनि येइल सभाग्या ॥ ७४ ॥ सुलभ वृत तप दान दमन । सुलभ तीर्थाटण वेदाध्ययन । सुलभ यज्ञ व्याकरणाभ्यासन । हरिभक्ति अति

---

१ उत्कर्प. २ जिवंत प्राण्याला. ३ यमराज.

दुर्लभा ॥ ७५ ॥ सुलभ केवळ ज्ञानगोष्टी । क्रियायोगेंवांचूनि सृष्टि । बोधलब्ध रुक्ष होती कष्टी । हरिभक्ति सुदुर्लभा ॥७६॥ क्रियायोगेंविण ज्ञान । तें च केवळ अज्ञान । तें च भगवद्भक्त्या विज्ञान । होऊनियां उपतिष्ठे ॥ ७७ ॥ निउनकर्मक्रिया हरिभक्त्या । संपूर्ण होतसे नामोक्त्या । नामस्मरणपुण्यशक्त्या । सर्व संपूर्ण हरि करी ॥ ७८ ॥ नित्य सेवितां नामामृत । साधन कां हो होइल मृत । युगास्तव होतां कर्मधर्मपात । भक्ति निपात हों नेंदीं ॥ ७९ ॥ हरिभक्ति आणि भक्तिपूर्वक कर्म । करावें हें पुराणींचें वर्म । नामस्मरणें उभय धर्म । स्वतसिद्ध सफळ हें ॥८०॥ दुर्लभ भरतवर्षे कर्मभूमि । तत्रापि मानुष्य दुर्लभ वर्णोत्तमीं । ज्याची स्पृहा करिती सुर व्योमीं । भक्ति करावया हरीची ॥ ८१ ॥ तरावया संसारार्णव । हरिभक्ति सुदृढा नाव । विलंब न करूत मानव । नामस्मरणारोहणा ॥ ८२ ॥ वेगीं यजीं पुजीं स्मरें श्रीहरि । सावध होईं विलंब न करीं । समीप आली कृतांतनगरी । पादप दिसों लागले ॥८३॥ जगदाधार जगद्रूप । श्रीपति जयावरि सकृप । तो च कृतकृत्य कल्याणरूप । पूज्य वंद्य संस्तव्य ॥ ८४ ॥ जे निस्पृह हरिहरभक्त । तयांसीं पूजिती ते होती मुक्त । भोजन देतां एक एक शिक्थ । अनंत फळें उपतिष्ठे ॥ ८५ ॥ भगवद्भक्त जेथें वसती । पवित्र होतसे ते क्षिति । जया घडे सत्संगति । ते हि होती तद्रूप । ८६ ॥ विष्णुमूर्ति शाळग्राम ज्याचां घरीं । आर्चितां तुळसी शोभे द्वारीं । तेथें विश्वमूर्ति मुरारि । स्फुरद्रूप नांदतु ॥ ८७ ॥ तें सर्वतीर्थांचें जन्मस्थान । तें तपोवनाचें पावन । तयाचें करितां सेवन । सद्य श्रीहरि आतुडे ॥ ८८ ॥ तुळसी शाळग्राम हरिचित्तचित्र । जे गृहीं नाहीं ते स्मशानतुल्य अपवित्र । हरिहरभक्तीविण विप्र विचित्र । ते हि श्वपचाधमें ॥ ८९ ॥ ह्मणौनि हरिभक्ति करावी भावें । ध्यान पूजन नाम ध्यावें । सर्वस्वभावें शरण

---

१ ज्ञानोपदेश लुब्ध. २ कोरडी. ३ यमपुरी. ४ वृक्ष. ५ स्तवन करण्यास योग्य. ६ सद्य. परतु या ठिकाणीं शीत असा अर्थ असावा. ७ अंत्यज.

जावें । हरि उद्धरी स्वभक्तां ॥ ९० ॥ हरिनामस्मरणेंविण गति । नाहीं ह्मणे पुडतोपुडति । कळी हा नामें च निस्तरती । ह्मणौनि नाम स्मरावें ॥ ९१ ॥ भगवद्भक्तीचें महिमान । इंद्रकेतु जाला पावन । आतां परिसा सुधर्माख्यान । श्रोतेवक्तेतारक ॥ ९२ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामीरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । जयध्वजोपाख्यानवर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ५६ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

जय जय जी जयवंता । जय अद्वयस्वरूपा अनंता । नवल तुझया जयाचें स्वता । दुर्जेनवीण ॥ १ ॥ दुजयासी करूनि क्षय । आपण अक्षयीं तो जय । जो स्वयमेव अन्वय । तया जयजयकार नवलावो ॥ २ ॥ व्यापूनि सबाह्य सकळाकाश । तूं च सघन सावकाश । तुजवीण अणुपुरता अवकाश । नाहीं आणि अणुता हि ॥ ३ ॥ तूं नित्य सत्य निर्मळ निश्चळ । तुझा ठाईं नाहीं मी तूं खळखळ । निरंजन निरामय निष्खळ । कळंकरहित स्वप्रभ ॥ ४ ॥ तनुतेवांचूनि सचेतन । स्पर्शरहित सघन । साम्यतेसी उपमीय गगन । त्रय प्रकारें प्रसिद्ध ॥५॥ निरंश थोर अविनाश । काळत्रयें सम ब्रह्म आकाश । ब्रह्म चैतन्य सचेतन स्वप्रकाश । आकाश भकास शून्यता ॥ ६ ॥ हा ब्रह्मानुभव ब्रह्मभूता । तया शून्य कैंचें ब्रह्म च स्वतां । पूर्णामृत घटीं रिक्तता । काय घडों शके हो ॥ ७ ॥ तथापि हि अप्रत्येकीं प्रत्येकता । अभिन्नत्वें च परि भिन्नता । भासे सघनीं च गगनता । हे अकळ लीळा प्रत्यक्ष ॥८॥ तैसी च विश्वजाळमयी माया । ब्रह्मीं न घडे हा शास्त्रन्याया । सेवट च नाहीं स्वरूपा जया तया । बाहेरिता कैंची ॥ ९ ॥ अंतरीं बाहेरीं नाहीं ठाव । याचा ऐसा अंतरभाव । विश्वाभा भासत च परि वाव । ब्रह्मस्वरूप तद्रूपें ॥ १० ॥ शुक्तिचा ठाईं ना दुरांस । संदेहीं देहि देहीसी रजताभास । मिथ्यत्वें दृश्यता कैंची त्यास । तद्रूपें स्वयें शुक्तिका

---

१ छंद. २ आमन्प्रतिबिंब. ३ ' नाहीं दुरांश, असा दुसरा पाठ आहे.

॥ ११ ॥ ह्मणौनि तुजमाजि तुझें चराचर कैसें । भासे बुधां अबुधां सत्य मिथ्या ऐसें । जन्हि स्वस्वरूप जैसें आहे तैसें । असता हि मिथ्या वैष्यम्य ॥१२॥ जया हें होय तुझें ज्ञान । तयासी च तू आत्मा सर्वाधिष्ठान । एतद्विपर्यी जे अज्ञान । त्यासी काय ह्मो हें विपरीत ॥१३॥ तथापि हि तव विनोदें । निर्द्वंद्वता च उठिली द्वंद्वें । तुझी अभेदता असतां हि मिथ्या भेदें । भ्रमां सत्यत्व दाविलें ॥ १४ ॥ भ्रमें तुज आत्मया निसरले । विषयआशयें असुरत्वा आले । निर्भ्रम ते तुज शरण जाले । तव कृपामृतपात्रें ॥१५॥ दुर्जन सज्जना सील विरुद्धें । अति द्वेष करिती क्रोधें । तया दुर्द्धरासी महद्युद्धें । करिसी भक्तकैवारें॥१६॥ ते वधूनियां निरंतर । जयो पावसी तू जगदीश्वर । ह्मणौनिया तुझा जयजयकार । सुर करिती सर्वदा ॥ १७ ॥ तू जया मारिसी तारिसी । तयां उभया हि स्वपद देसी । ह्मणौनि सर्वात्मा समान होसी । सदोदित स्वरूपें ॥ १८ ॥ चैतन्य घन अदह्य अछेद्य । अरूप अमूप स्वसवेद्य । मारणें तारणें हें विश्ववेद्य । लीळाविळास विचित्र ॥ १९ ॥ आता अधिष्ठान विलासरूप । जो सर्वात्मा भक्त सकृप । तो जयजयकारें जगदेक भूप । स्तविला स्तवनप्रकाशा ॥ २० ॥ आता अम्रकथा भगवताची । जयेसी अमृतशाश्वत रुचि । सुधर्माख्यान बोलिजेलि तें चि । परिसा पंडित सज्जन ॥ २१ ॥ भावें भगवतासी प्रदक्षणा च्यारि । जो नित्य करील निर्धारीं । त्याचया पुण्यफळातें वैखरी । सर्वथा वर्णूं शकेना ॥ २२ ॥ यदर्थी नारदें देवॠषीप्रति । इतिहास बोलिला पूर्वस्थिति । इंद्रजीवसवाद श्रवणपठणें होती । दग्ध महा पातकें ॥ २३ ॥ एकदा वैवस्वत मैन्मतरीं । बृहस्पति सुरपति सभेभीतरीं । सर्व हि सुर परिवारीं । बैसले असता ॥२४॥ इंद्र ह्मणे बृहस्पतीसी । तू सर्व तत्वार्थ जाणसी । अतीतें ब्रह्मकल्परचनेसी । मजप्रति सागावें ॥ २५ ॥ वाचस्पति ह्मणे पुरदरा । मी हि नेणें या विचारा । सपूर्ण सागातया सर्गे प्रकारा । समर्थ नव्हे सर्वथा ॥ २६ ॥ यथार्थ च सर्वार्थ हि जाणतां । तुजयासी पुसावें हे

---

१ बृहस्पतीला. २ मन्वतरीं. ३ भिन्न. ४ उत्पत्ति.

योग्यता । काहिं च नेणोनि आणणें सर्वस्वता । तो च मूर्खशिरोमणी ॥ २७ ॥ निरहकार पुसता हि न सागती । साहकार न पुसता हि सागती । प्रगटावया स्वकीय महती । ते च लघुता तत्वता ॥ २८ ॥ असो गुरु ह्मणे शिष्याप्रति । प्रसिद्ध तुझी दैवी सपत्ति । तरि हे फेडावया भवप्रश्नभ्राति । विवेकसुधर्माप्रति चाले ॥ २९ ॥ तो सिद्धस्वरूप सर्वज्ञ शुद्ध । त्याचेनि अल्पज्ञासी हि होय बोध । तो तुझे पुरीं च आहे प्रसिद्ध । परि नेणसी अवैराग्यें ॥ ३० ॥ हें परिसोनि दैवीसमाजें । गुरुयोगें सशयनिरसकाजें । सुधर्मविवेकाप्रति भोजें[1] । शक्र अवक्र पातला ॥ ३१ ॥ तेणें देखोनि अभ्यागत । सहजें केलें स्वागत । आत्मसपदा समर्पूनि त्वरित । परमानदमय केला ॥ ३२ ॥ देखोनि विवेकसुधर्मऐश्वर्य । इद्रें जीवीं केलें आश्चर्य । स्मरोनि पूर्वदशाकार्य । सुलीनतेनें पुसतसे ॥ ३३ ॥ जो चि समर्थ सर्गार्थ काजीं । त्या मजहूनि दिव्य सामर्थ्य मम पुरामाजि । यश कीर्ति स्वप्रकाश तुज आजि । देखिलें रूपप्रसादें ॥ ३४ ॥ तरि हें ऐश्वर्य सर्वज्ञता कोणें योगें । तपें दानें किंवा यागें । तीर्थाटणें पुण्यप्रसगें । कोणे ऐसें सागपा ॥ ३५ ॥ अतीत ब्रह्मकल्परचना । सर्व जाणतोसी सनातना । तें सागावें विजित मना । हें प्रार्थी शक्र जिज्ञास ॥ ३६ ॥ हास्यें प्रसन्नास्यें प्रश्नानुक्रम । निरोपी विवेकलक्षण सुधर्म । मग सहजानदें वाक्योपक्रम । माडिला तेणें ॥ ३७ ॥ सर्वाधिष्ठान ब्रह्म निर्विकार । जैसें आहे तैसें च नित्य निरतर । जेथें इच्छादि शक्ति चक्राकार । तेथें प्रत्यगात्मता प्रतिष्ठिली ॥ ३८ ॥ तया प्रत्यगात्मयाचे इच्छेस्तव । निरावेवीं विश्व सावेव । अन्यथा भास प्रादुर्भाव । तो तद्विवर्तसत्य ना मिथ्यासा ॥३९॥ असो ब्रह्मा ब्रह्माडरचिता । तया आयुष्य शताब्द नियतता । चौसहस्रा युगाचा तत्वता । दिवस एक तयाचा ॥४०॥ ते ब्रह्मदिनी मनु चतुर्दश । तेसे च दोनि सतर्के देवेश । देव हि

1 संतोषानं. २ विवर्त=नसून दिसतें तें

प्रत्यकें प्रत्यकें सुप्रकाश । तें च आतां परिसावें ॥ ४१ ॥ स्वायंभु मनु नृप भुवीं । इंद्र शचीपति दिवीं[1] । देव या साविख्यात नावीं । हें पूर्व मन्मंतर ॥ ४२ ॥ स्वारोचिष मनु भूपति । विपश्चिन्नाम इंद्र अमरावतीं । पारापताश्च क्तषिता देवस्थिति । द्वितीय मन्मंतरीं ॥ ४३ ॥ तृतीय मनूचें नाम उत्तम । इंद्र सुशांति हा नेम । देव नामाचा अनुक्रम । सुधामान सत्य शिवप्रवर्द्धन ॥ ४४ ॥ चतुर्थ मन्वाभिधान तामस । शिवी हें नाम सुरेश्वरास । आतां नामें परिसा देवास । सुरापाः हरयः सम्याः सुधीयः ॥ ४५ ॥ मनु पंचम तो रैवत । विभु नामा इंद्र विख्यात । अमिताभादि विश्रुत । देव ते मन्मंतरीं ॥ ४६ ॥ षष्ठम तो चाक्षुप मनु । मनोजव इंद्र दैदिप्यमानु । आदित्य वसुरुद्रादि देव अनु । मन्मंतरीं प्रसिद्ध ॥ ४७ ॥ वैवस्वत मनु सातवा । पुरंदर इंद्र जाणावा । अभिधान ते मन्वंतरीं देवा । आदित्य वसुरुद्रादि ॥ ४८ ॥ मनु अष्टम सूर्यसावर्णिक । सुतपादि देव सकळिक । ते काळीं बळिदेवता एक । विष्णुभक्तिप्रभावें ॥ ४९ ॥ मनु नवम दक्षसावर्णी । अद्भुत इंद्र विश्ववर्णी । पराया इहीं त्रिवर्णी । अभिधान देवाचे ॥ ५० ॥ ब्रह्मसावर्णी नाम दशम मनूचें । शांति ऐसें नाम इंद्राचें । वामनादि देवां नाम साचें । वर्णिलेसे तत्वविदीं ॥ ५१ ॥ धर्मसावर्णिक मनु एकादश । वृषनामा तैं देवेश । विहंगमादि त्रिदश । तये मन्मंतरींचे ॥ ५२ ॥ रुद्रसावर्णी मनु बारावा । ऋभुनामा इंद्र जाणावा । हरितादि अभिधानें देवां । समस्तांसी ते वेळीं ॥ ५३ ॥ त्रयोदश मनु रोचमान । दिवस्पति इंद्राभिधान । सुत्रामाणादि नामाख्यान । असें सर्वा देवांसी ॥५४॥ चतुर्दश मनु तो सौम्य । शुचि नामा इंद्र मनोरम्य । चाक्षुपादि देव गुणगम्य । ऐसीं चतुर्दश मन्मंतरें ॥ ५५ ॥ एका ब्रह्मदिवसाभीतरीं । चतुर्दश मनु देवेंद्र स्वाधिकारी । श्रीवैभव पूर्वापरि । सर्वत्र सारिखें च ॥ ५६ ॥ एव स्वस्वसंख्ये सदृश । होतसे दृश्योत्पत्ति स्थिति विनाश । हा मिथ्या भासमात्र अविनाश । आत्मा असे अविकंप ॥ ५७ ॥ जळा-

---

1 आकाशांत.

वेगळे कैंचे तरंग । तरंगीं उत्पत्ति स्थिति नाश भाग । तेणें काय लिंपेऊि जळत्वांग । तैसा विश्वत्वें आत्मा ॥ ५८ ॥ स्वर्गी मृत्युलोकीं पाताळीं । पचभूतात्मक रचना सकळी । शिव एक एर जीव भवजाळीं। देवदानवमानवादि ॥ ५९ ॥ शिव जो कां ईश्वर । हरि हर ब्रह्मा त्याचे अवतार । ते निराकार च साकार । साकार च निराकृति ॥ ६० ॥ ते त्रयरूप होत्साते एक । तन्मय हा विश्वजीवांक । त्यांचीं बहु रूपें लीळाकौतुक । परि ते रूपातीत होती ॥ ६१ ॥ तया ईश्वराचे प्रातिकारणें । एक करिती योगधारणें । एक तप दान यागाचरणें । एक भक्ति अनन्य ॥ ६२ ॥ भक्ति शरिरें चित्तें वित्तें । करूनि पावती ईश्वरातें । हें काय आश्चिर्य अवरें हि भजनाऐसें जयातें । घडे तो जोडे हरिपदीं ॥६३॥ तुवां मज पूर्वी पुसिलें । तुज हें ऐश्वर्य कोणें योगें प्राप्त जालें । तरि आइक बापा नवल वितलें । महिमान हरिभक्तीचें ॥ ६४ ॥ मी पापयोनी गीध पूर्व ससारी । वसत होतों हरिमदिरप्राकारीं । ईश्वराश्रयें च अनीश्वर पापकारी । जीव कामस्वरूप ॥ ६५ ॥ मी आपुलेंन स्वकर्मफळें । व्याधशस्त्रें पडलों अतकाळें । भिषकें मांसलुब्धें ते वेळें । मुखीं धरिलों कवळतां ॥ ६६ ॥ तो स्वयातिभयें भीत । पाहावयालागि एकांत । हरिमदिराभोंवता फिरत । मम प्राण प्रयाणकाळीं ॥ ६७ ॥ नेणों तेणे सत्सगें । कीं हरिक्षेत्रनिवासयोगें । प्रदक्षिणा घडली प्रसंगें । प्रसन्न जाला श्रीहरि ॥ ६८ ॥ तेणें मज परम पदाप्रति नेलें । तेथें कल्पकोटि शतें वास्तव्य केलें । मजदेखतां होऊनि गेले । ब्रह्मे संख्येरहित ॥ ६९ ॥ क्रमे युग कोटिशतपर्यंत । अत्र वास्तव्याचा नियत । यानतरें हरिप्रेमपूरित । पावेन असंभवता भव ॥ ७० ॥ हरिभक्त्या हरिरूप ससार । केवळ ब्रह्मोपनिषदाचें सार । हरिविमुख ऊर्ध्व वास हि अधमतर । त्रिशकुमडळासारिखा ॥ ७१ ॥ मम विकळ कळेवर कवळुनियां । दुजा देवाळयाभोंवता भोंवे खावया । ते प्रदक्षणा हाणौनि देवराया । एवढा महिमा

१ पोंवळी. २ कपोतपक्ष्यानें.

पावलों ॥ ७२ ॥ तेथें हरिप्रेमें वोल्हावलें मन । जे करिती यथाशक्त्या हरिपूजन । त्याचें सदां करितां अर्चन स्तवन । ब्रह्मादि देवादि सर्व हि ॥ ७३ ॥ अद्यापि निर्जर समस्त । भरतवर्षी कर्मभूमि अपेक्षित । जन्मोनि पूजाविधि अच्युत । सर्वदां मनोलालस ॥ ७४ ॥ ऐसें विवेकरूपें सुधर्में आपुले । संसारश्रमजाळ निरोपिलें । हरिपर होतां फळ प्राप्त जालें । तें हि स्फुरद्रूप च ॥ ७५ ॥ हें आइकोनि प्रत्यक्ष देखोनि । गुरुशिष्य सर्व संशय निरसूनि । परमानंदें निज स्थानीं । सहज सुखें राहिले ॥ ७६ ॥ ह्मणौनियां जो हरिभक्ति करी । हरिपूजन हरिनाम उच्चारी । तो च तरला अवसागरीं । विशेष आतां कलियुगीं ॥ ७७ ॥ किती बोलवेलि एक मुखें । हरिहरभक्त तरती सर्व दुखें । सुखसाधनें पावती सर्व सुखें । यालागि हरिभक्ति करावी ॥ ७८ ॥ ऐसें सज्जनमनोगत । सुखरूप तरावें बहुत । बरें भक्ति करूत अथवा न करूत । परिसा फळ श्रवणाचें ॥ ७९ ॥ हे कथा भक्तिमहिमा केवळ । जे परिसती एक वेळ । ते संपूर्ण अश्वमेधाचें फळ । पावती श्रवणपठणें ॥ ८० ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । सुधर्माख्यान वर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ५७ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो अनंता परमानंदा । नमो जगत्कारण विनोदा । नमो नमस्ते जगद्दिदा[1] । श्रीहरि चित्स्वरूपा ॥ १ ॥ नमो लीलानंतावतारा । शरणागतलोभापरा । अंबरीषुरक्षणा श्रीधरा । दशजन्म अजन्मा ॥ २ ॥ मच्छ कच्छ वराह नारसिंव्हा । वामन परशराम श्रीराम दुष्टहा । कृष्ण बौद्ध कल्कि महा । दशमूर्ति नमोनमः ॥ ३ ॥ पूर्व प्रकरणीं सुधर्म धर्मपरायण । उद्धरला अनायासें घडतां प्रदक्षिण । आतां अंबरीषुभ-

१ भिजलें. २ देव. ३ दुष्टांचे हनन करणारा.

ख्यान करा श्रवण । निर्धार श्रीहरिभक्तीचा ॥ ४ ॥ अंबरीषु अयोध्याधीश । महाराज पुण्यप्रकाश । जैसा अमरावतीसी देवेश । तैसा च तो भूमंडळीं ॥ ५ ॥ शक्र न पवे त्याची साम्यता । तो सकाम स्मरे भगवंता । भरोछेदार्थ[1] करी नियता । नृप निःकाम समदृष्टी ॥ ६ ॥ इंद्र सज्जनासी छळणा करी । महींद्र पुजी निरंतरी । वज्री वज्रतृष्णा स्वपदावरि । राजा सर्वस्वें उदार ॥७॥ इंद्रासी लागला परनारिपदर । राजा परांगनाचा सोहोदर[2] । इंद्र च्युति[3] पावे निरंतर । राजा अच्युत[4] अच्युतें[5] ॥ ८ ॥ इंद्र उपहत[6] जाला ऋषिशापें । राजा रक्षिला श्रीहरिभक्तिप्रतापें । इंद्र मयूरीमाजि[7] लपे । राजा प्रगट कीर्तिता ॥९॥ असो ऐसा महीपाळ । स्वधर्मकर्मे अति निर्मळ । विशेष हरिभक्त सुप्रेमळ । चंडांशवंशदीपक[8] ॥१०॥ सुप्रसन्न करावया श्रीहरि । साधनद्वादशी नेमस्थ करी । जैसा साधक निरंतरीं । चळेना आत्मधारणा ॥ ११ ॥ द्वादशीयोगें एकादशी । जैसें उद्यापन दृढव्रतासी । प्रतिपक्षीं करणें तयासी । उभय पक्ष समबुध्या ॥ १२ ॥ तया व्रतपुण्याचें फळ । तेणें दाटला भूमिगोळ । जैसें ब्रह्मानुभवसाटवणें सकळ । उतटोनि गेलें आकाश ॥ १३ ॥ शक्र वक्रबुद्धि सर्वदां । शंकोचे आपुलिया जीवपदा । हरिल माझी भवसंपदा । ह्मणौनि चित्तीं चरफडी[9] ॥ १४ ॥ ह्मणे मी आतां करूं काय । धारिले अहंदुर्वासयाचे पाय । ह्मणे तूं वाह्यरंगें तेथें जाय । क्षुद्रता छळे स्वभावें ॥ १५ ॥ तो अहंदुर्वास ऋषेश्वर । जैसा मूर्तिमंत रुद्र अहंकार[10] । भस्मोद्धूळन अक्षाभरण शिव निर्विकार । मिथ्या जीव कार्य कल्पना ॥ १६ ॥ अल्पत्व द्वादशीचा पाहोनि संधि । वैश्वदेवकाळीं आला अवरोधी । तवं तो हरिप्रिय महाबुद्धि । प्रणम्य केलें हरिरूपें ॥ १७ ॥ प्रार्थी ह्मणे अतिथी विष्णुरूप । स्वामि सहज भगवद्रूप । आजि कृतार्थ जालों निः-

---

१ 'परोछेदार्थ' असा दुसरा पाठ आहे व तो बरा दिसतो. २ राजा परस्त्री बहिणीसमान मानीत असे. ३ पतन. ४ परमेश्वर. ५ पावन असल्यामुळें. ६ उपहासास पात्र झाला; किंवा भ्रष्ट झाला. ७ मयुरासनांत. ८ सूर्यवंशाचा दीपक. ९ आपल्या पदाबद्दल शंकित झाला. १० गर्विष्ठ; अहंकाराचा पुतळा.

पाप । चरणवंदनें स्वामीच्या ॥ १८ ॥ आतां सीघ्र करावें स्नान । व्रतासी नाहीं वेवधान । येरु शरयुतीरीं ध्यान । धरूनियां वैसला ॥१९॥ संकल्प विकल्प ह्मणती द्विज । अहंकाररूप ऋषिराज । राजा ह्मणे हरिरूप मज । तेणें निर्भय निर्द्वंद ॥ २० ॥ हरिरूपीं कैंचें क्षुद्र । राजा स्वयें च जाला भद्र । मिथ्या जीवभावना अभद्र । ते निवारे हरिस्मरणें ॥ २१ ॥ पुरोहित ह्मणती विवेकता । व्रत टळों पाहे आतां । तीर्थपारणें केलें स्वतां । भोजन ऋषीनंतरें ॥ २२ ॥ व्रत साधिलें जाणोन । ऋषि क्रोधें कंपायमान । गरगरा फिरों लागले नयन । आला राजभुवना ॥२३॥ नगरीं भ्रमों लागला वळसा । जन ह्मणती कोपला दुर्वासा । राजतिळक वांचेलि कैसा । भयभीत कंपित पाहाती ॥ २४ ॥ राजा कृतांजळी अति विनीत । हरिरूपें चरण अवलोकित । विप्रपंक्तिमाजि दाखवित । वरासन वैसावया ॥ २५ ॥ ऋषि कृतांतरोपवोपें ह्मणे दुष्टा । पारणें करूनि करिसी चेष्टा । मज कोपलियां तुज गर्विष्टा । पाहों कैसा हरि रक्षी ॥ २६ ॥ जटा त्राँहाटी भूमंडळीं । अग्नि प्रगटला ते वेळीं । नृप निःशंक हृदयकमळीं । अग्नि भावी हरिरूप ॥ २७ ॥ हरि गोविंदा परमानदा । कृष्णा माधवा मुकुंदा । भक्तवच्छळा वरदा । मधुसूदना अच्युता ॥ २८ ॥ धाव धाव करुणाकरा । शंखचक्रगदाधरा । शरणागतवज्रपंजरा । अनाथनाथा भगवता ॥ २९ ॥ वेगीं पावें नारायणा । क्षोम जाला जी ब्राह्मणा । विष्णुधर्मसंरक्षणा । तूं सरक्षीं कृपाळा ॥३०॥ तवं तो श्रीहरि कृपाळ । बोधचक्राचा कल्लोळ । प्रेरिलें उजेळित अतराळ । आलें भक्तरक्षणा ॥३१॥ तवं तो जीवत्व अपवाद । फिरला जटाजांतवेद । दिवा दीपिकाइव मद । भासत च मिथ्या जाला ॥३२॥ द्वंद्वबुद्धि जेथें वसे । तेथें प्रमाद प्रवेशे । मिथ्या परि सा स्वप्नाऐसें । दुःख साचासारिखें ॥ ३३ ॥ बोधचक्रानळसोज्वळें । अहताजीव भयें पळे । सहित बाह्य श्रम सफळें । ऋषिता न चले चि तेथें ॥ ३४ ॥

---

१ व्रताला खड पडता उपयोगा नाहीं. २ पुण्यशील. ३ अशुभ. ४ आपटी. ५ तेजोमय चक्र. ६ जटेमधून निघालेला अग्नि.

नवचता मिथ्या लघु जीवता । मिथ्या द्विजत्व देवत्व कर्म धर्म तपता । मिथ्या वेदशास्त्रार्थ योग योग्यता । भय भवाचें चुकेना ॥ ३५ ॥ पुढें पळतसे दुर्वासा । मागें चक्रानळ लागला कैसा । सुरसमूहावरि जैसा । पिप्पलाद[1] वडवानळ ॥ ३६ ॥ जया भुवनाप्रति जाय । ते ह्मणती आह्मी यासि करणें काय । अनृतापराधी जीवत्व होय । भस्म स्वप्रकाशानळें ॥ ३७ ॥ ऐसीं सर्व हि दर्शनभुवनें । ज्याचीं प्रसिद्ध अद्वैतमहिमानें । जीवरक्षणार्थ तें तें स्थानें । फिरला परि त्या न रक्षे ॥ ३८ ॥ बहुत स्थळातरीं भ्रमला । बहुत जीव असे श्रमला । मग वैकुंठाप्रति गेला । रक्षीं ह्मणे मम जीवा ॥३९॥ तव हरि ह्मणे मळिनत्वें । मज न रक्षवें तनु ममत्वें[2] । शुद्ध साधन निसत्वें । मज रक्षणें साधूसी ॥४०॥ तेणें जालीसे निराशा । उदास पळतसे दुर्वासा । तव नारद भेटला जैसा । जळता सुधा जळधर[3] ॥ ४१ ॥ तेणें सांगितला उपाय । ह्मणे भावार्थ अंबरीषप्रति जाय । दुसरा नाहीं नाहीं उपाय । भवभयनिवारणा ॥ ४२ ॥ तत्काळ मनोवृत्ति फिरली । निश्रांतिवेळा प्रादुर्भवली । परति धरूनि उडी घातली । भाव अंबरीषप्रति ॥ ४३ ॥ तव तो सज्जनशिरोमणी । ब्राह्मण गेला नि पारणी[4] । ह्मणौनि चिंती चक्रपाणि । वाट पाहे उपवासी ॥ ४४ ॥ दुर्वासयातें देखोनि । राजा आला लोटांगणीं । चरण वदूनि आलिंगनीं । ऋषि सर्वांगीं निववीला ॥ ४५ ॥ ब्राह्मण ह्मणे दीन वदनें । रक्षिं रक्षिं अवलोकनें । तनु जाळिली सुदर्शनें । प्राण जाव पाहाती ॥ ४६ ॥ गहिंवर आला नृपवरा । नयनीं अश्रूचिया धारा । कर जोडिले दशशतारा[5] । तव ते आज्ञाधारक ॥ ४७ ॥ भाव भूपतिअंगिकारें । जीवभय हरलें साक्षात्कारें ।

---

१ पिंपळापासून उत्पन्न झालेला २ अज्ञान ज्याच्या ठिकाणी वास करित आहे किंवा देहावरचें ममत्व अथवा मीपणा ज्याच्या अंगीं कायम आहे त्याचें रक्षण मजकडून होणें नाहीं ३ आग लागली असतांना ज्याप्रमाणें मेघगर्जना होऊन पाऊस यावा ४ पारणें न सुटतां तसाच गेला ५ ' दशशतधारा ' असा दुसरा पाठ आहे, ह्मणजे ज्याला शकडों धारा किंवा आरा ह्मणजे टोकें आहेत अशा चक्रास

बोधचक्रवैश्वानरें । शमिजे सहजस्वरूपीं ॥ ४८ ॥ तेथें जाले जयजयकार । सुमनवृष्टि जाली थोर ।, प्रगटला हो सर्वेश्वर । तनुता जाली तद्रूप ॥ ४९ ॥ पाहातां उघडिये दृष्टीं । ईश्वरमय जीवसृष्टि । देवा भक्ता जाली भेटि । अच्युत पद दिधलें ॥ ५० ॥ श्रीहरि पूर्ण कारुण्येंसीं । आश्वासिलें दुर्वासासी । तुवां शापिलें भक्तासी । दश गर्भ धरी ऐसें ॥ ५१ ॥ मम भक्ताचे गर्भवास । मज भोगणें भगवंतास । तेणें गुणें अजन्म्यास । जन्म धरणें लागलें ॥ ५२ ॥ यालागि मद्भक्ताचे संसार । ब्रह्मरूप हा निर्धार । याचें अपूर्व काय थोर । विश्व च ब्रह्म तयासी ॥ ५३ ॥ हें हि आश्चिर्य नव्हे तयां । तयाचा अंगिकार होय जयां । ते हि विश्वब्रह्म अप्रमेया । पावती प्रसिद्ध च कीं ॥ ५४ ॥ असो हें वंदूनि श्रीपति । दुर्वासा गेला तपाप्रति । वैकुंठा नेला शुद्धमति । अंबरीषु सर्वेशें ॥ ५५ ॥ श्रीहरि स्वभक्तकैवारी । हें च प्रतिपदीं पुराणांतरीं । यालागि जो हरिभक्ति करी । विशेषें ये कलियुगीं ॥ ५६ ॥ तो च कृतकृत्य अति धन्य । तो च देवासी हि असे मान्य । तयाचें फिटलें भवदैन्य । नामस्मरणें हरीच्या ॥ ५७॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । अंबरीषुअख्यानवर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ५८ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो ध्रुवा अक्षरा अव्यया । नमो अद्वैता अच्युता अप्रमेया । नमो अचळा अमळा निगमगेया[1] । योगिध्येया[2] मनोहरा ॥ १ ॥ भुवन सुंदर मंदरमथना । नमो पंचाशद्वर्णस्वरकथना[3] । नमो सर्वार्थ स्वरूपा पुरातना । सनातना शाश्वता ॥ २ ॥ नमो चतुर्भुजा पंकजनयना । नमो अशेष गुणवंता शेषशयना । नमो भक्तजनकरुणावना । मनमोहना मुकुंदा ॥ ३ ॥ नमो देवभक्त अविभक्तरूपा । नमो वंद्य वंदनस्वरूपा । नमो प्रेमळ कृपाळ अर्पेआपा । नमो अभेदा अखंडा ॥ ४ ॥

---

१ वेदानीं ज्याचें वर्णन गाइलें आहे असा. २ योगिजनांचें ध्येय=ध्यान करण्याची वस्तु. ३ पंचाशत्=पंचानन.

नमो निरामया भक्तभावमया । अपक्षा भक्तपक्षा करुणालया । नमो विश्वरूपा भक्तांतरात्मया । निर्द्वंद्वा भक्तरक्षका ॥ ५ ॥ नमो भक्तभूषणा । नमो परि सक्तदूषणा । नमो अभक्तभीषणा ।. भक्तजनमनोरमा ॥ ६ ॥ वेद शास्त्र कर्म धर्म चतुर । किंचित हि असतां कातरें । तूं तयांसी अत्यंत दुरितर । बाळां भोळियां जवळिकें ॥ ७ ॥ जवं जवं भाव भोळा । तवं तवं देव जवळा । नलगे विधि विधान कळा । केवळ भावें भेटतु ॥ ८ ॥ जे जे भक्त उद्धारिले । जे भगवंतें हृदयीं धरिले । ते सकळ हि कळीं वरिले । गजइंद्रादि करूनियां ॥ ९ ॥ विद्या वय कुळ सीळादिक । भावार्थेविण निरार्थक । हरिकृपा पावे तो अधिक । इतर कळा त्या अवकळा ॥ १० ॥ यदर्थी सद्य प्रत्यय तत्काळ । असो पंडित अथवा बाळ । हरिप्राप्ति करी सुसीतळ । अप्राप्ता जेंळजळ वळकावे ॥ ११ ॥ आतां परिसावें सावधान । ध्रुव फळद ध्रुवाख्यान । श्रवणमार्गे हरिनिधान । प्रगट भेटे भावार्थें ॥ १२ ॥ हरिप्रेमाची स्पृहा पोटीं । मन भक्तिरसा लाळ घोंटी । मज कैं होइल ऐसी भेटि । ह्मणौनि परिसे आवडीं ॥ १३ ॥ श्रवणप्रशंसेची स्थिति । कथा आइकतां भेटे श्रीपति । दृढ विश्वास धरूनि चित्तीं । कथा परिसे हरिप्राप्त्यर्थ ॥ १४ ॥ ऐसा हरिप्रेमे श्रवण करितां । तो च हरिरूप होय स्वतां । तेथें सर्व प्राप्तिफळ तत्वतां । अपेंआप पातलें ॥ १५ ॥ श्रवणीं अथवा सकीर्तनीं । भाव पाहिजे भगवद्भजनीं । तो च दृढावला सज्जनीं । तरि श्रीहरि हृदिस्थ च ॥ १६ अतरींचा बाह्य प्रगटे । सबाह्य सघन कोंदाटे । विश्वीं विश्वात्मा भेटे । अनन्य भावें भगवंत ॥ १७ ॥ जयाचें हृदय प्रेमपीठ । तें च जाणावें वैकुंठ । जेथें प्रगटला वैकुंठ । तें निवासस्थान हरीचें ॥ १८ ॥ तो श्रीहरि सूक्ष्माहूनि सूक्ष्मतर । महतापरिस हि महत्तर । सर्वव्यापी सर्वेश्वर । सर्वकाळ सावद ॥ १९ ॥ असो आता राजमंडण । महिमंडळीं

---

१ भिन्ना, भ्याड. २ ज्याला हरिप्राप्ति झाली तो सुशीतळ अथवा शांत होतो, परतु ज्याला ती प्राप्त झाली नाहीं, त्याच्या मनाची जळजळ दिवसेंदिवस वाढत जाते. ३ निरर्थक. ४ इच्छा. ५ कधीं. ६ प्रेमाचें वसतिस्थान. ७ श्रीविष्णु. ८ अलङ्कार.

उत्तानचरण । यशकीर्तिपुण्यपरायण । भुवनत्रयविश्रुत ॥ २० ॥ तया असती दोनि जाया । जैस्या प्रवृत्ति निवृत्ति आत्मयां । प्रवृत्ति संसार-विषयीं प्रिया । निवृत्ति अप्रिया संसारीं ॥ २१ ॥ हें च संसारीं अति दुर्गम । प्रियाप्रियतेचा नव्हे निर्गम[1] । जारे स्वात्मताबुद्धि जाली सम । तारे वहु त्रिया वहु पुण्यदा ॥ २२ ॥ तयासी दोनि पुत्र जाले निर्माण । भव असंभव हे प्रमाण । भवप्रिय जैसा जीवप्राण । असंभव निर्गुण गुणी हि ॥ २३ ॥ भवाजीवासी वहु प्रीति । तैसी च जन्मकाळीं ग्रहस्थिति । वहुत च लाहाणें[2] सांगती । जाला संपूर्ण संभ्रम ॥ २४ ॥ भवविभव कैचें असंभवासी । विजनता वात्सल्य तयासी । वसे आपुलिये मातेपासीं । अद्वैतजनसमाजीं ॥ २५ ॥ तयाचिये प्रभवकाळीं[3] । सर्व ग्रह पडले उच्च स्थळीं । उच्च सिंव्हासनीं वैसेलि अढळीं[4] । हें वर्तिलें स्वज्योतिषी[5] ॥ २६ ॥ हें परिसोनि मुख्य माया । स्वानंदनिर्भर होऊ-नियां । अवचक पूजनें पडली पायां । भावें संतुष्ट भाव्यश ॥ २७ ॥ दैवी संपत्ति निरुपाधीमाजि । ध्रुव क्रीडे सत्संगसहजीं । अध्रुव तो राज-समाजीं । उन्माद जनीं प्रमोदें ॥ २८ ॥ तैसी च दोघा अंबर भूषणें । सविकार अविकारपणें । परि ध्रुवें आपुलेनि सुलक्षणें । ठेंगणें केलें त्रि-भुवन ॥ २९ ॥ असो ऐसी ते राजवल्लभा । पतिप्राणमोहिनी सौंदर्य-गाभा । जयेची पाहातां तनुताशोभा । कोण न भुले संसारीं ॥ ३० ॥ जैसी रति मदनकांता । विश्वमनोहरा सकामता । तैसी ते स्वपतिअंकीं पुण्य कांता । प्रगट जनीं सिंव्हासनीं ॥ ३१ ॥ तवं तये प्रवृत्तिचा पुत्र भव । सहित सर्व हि स्फुट वैभव । तयामाजि अंतरात्मा तैसा ध्रुव । अध्रुव जेणें प्रकाशे ॥ ३२ ॥ प्रवृत्तिचा आवडता कुमर । आला ऊर्ध्व करूनियां कर । तो तज्जननीनें सत्वर । उचलूनिया घेतला ॥ ३३ ॥ जैसा भव विषयस्वादें । लघु देवतांपूजनानुमोदें । पावे उच्च निच पदें । वेळवेळां तद्वत ॥ ३४ ॥ यानंतरें तत्संगास्तव । झळंवला ममताभाव ।

---

१ मार्ग, रस्ता. २ लाभणें. ३ उत्पत्तिकाळीं. ४ निष्कपट. ५ ज्योतिषी.

ऊर्ध्वे करूनि करपल्लव । औत्तानचरण अवलोकी ॥ ३५ ॥ राजा येवं पाहे वरी । तव ते सपत्नि मछरा नारी । पदें ताडूनियां धिःकारी । जैसी दैवेंकृतीं हरिपियों ॥ ३६ ॥ श्रीहरीचा शरणागत । देव तया अंतराय कारित । परि तो लक्ष्मीकांत न विसंभत । सर्वकाळ सांभाळी ॥ ३७ ॥ तैसा धृव धृवपदायोग्य । जया वमनप्राय भव भोग्य । हरिकृपाकटाक्षें वैराग्य । आरंभलें अनायासें ॥ ३८ ॥ सापत्नमाता ह्मणे मछरें । तुवां अभाग्यवंतेचा कुमरें । सिंव्हासन कैसें पाविजे ईश्वरें । दिधलियावांचूनि ॥ ३९ ॥ जीव कष्टवावा साधनें । तनु दमावी पंचाग्निधूम्रपानें । उग्र तपतां सिंव्हासनें । पावती भववैभव ॥ ४० ॥ जवं दिधलें नाहीं देवें । तवं हांव काय दुजयाचा दैवें । छळवादें बोलिलीं परि धृवें । धृवबुध्या मानिलें ॥ ४१ ॥ आपुलिया जनकादेखतां । धिःकारूनि दवडी सापत्नमाता । अति अनुतापली मनोदेवता । रुदन आलें स्फुंदनें ॥ ४२ ॥ बाळकाचें चित्त कोमळ । पारिखें वाटलें जगज्जाळ । एका भगवंतावांचूनि स्थळ । नाहीं आतां मजलागि ॥ ४३ ॥ दीनवदना मम जननी । राजाज्ञेप्रमाण वर्त्ती जे जनीं । अतःपर परमेश्वरावांचूनि । कोण आहे मजलागि ॥ ४४ ॥ कोमाइलें बाळकाचें वदन । जैसें पाडळीचें सुमन । श्रीहरिवांचूनि सर्व जन । न दिसे दृष्टीं तयाचे ॥ ४५ ॥ वसत च जनता जाली वोस । मनता विषयीं अति उदास । लागला श्रीहरीचा निजध्यास । न पाहे वास आणिकाची ॥ ४६ ॥ धाव धाव जगदीश्वरा । भक्तजनवज्रपंजरा । अनाथ दीनाच्या आधारा । तू सोयरा निर्वाणीं ॥ ४७ ॥ प्रति तनुता हे जेथवरि । तिशुकीं मावेचीं सोयरीं । तुजवांचूनियां श्रीहरि । जिवलग नाहीं दुजा ॥ ४८ ॥ हरि तू जीवाचें जीवन । जीव न जिये तुजवाचून । तूं एक नेत्रचसी सांडून । सर्वकाळ सांगाती ॥ ४९ ॥ एर विश्व मिथ्यामय । जैसा

---

१ उत्तानपाद राजा २ भीष्म किंवा कार्तिकेय. ३ लक्ष्मी. ४ कोमेजलें. ५ जगेल. ६ आत नाहीस.

यात्रेचा समुदाय । स्वकार्यतत्पर कैंचें प्रिय । तुजवांचूनि आत्मयां ॥ ५० ॥ तू व्यापक सचराचरीं । वससी सबाह्य अंतरीं । विश्वविसांवया मुरारि । हरि तूं पाव मजलागिं ॥ ५१ ॥ मायाआधार तुटला । जीव तुजलागिं फुटला । आपुलें उदरीं तूं मजला । अचळ स्थळ देई देवा ॥ ५२ ॥ ऐसा आइकोनियां धावा । देव पावलासें ध्रुवा । कायं जवळीं होता जीवा- । माजीळ तो साक्षी ॥ ५३ ॥ भक्ता वाटला परदेश । तवं प्रगटला हृषीकेश । विश्वरूप स्वप्रकाश । अढळ स्वपद दिधलें ॥ ५४ ॥ नाभी ह्मणतसे श्रीहरि । मज असतां शिरावरि । बहुत सिणलासी संसारीं । ह्मणौनि हृदयीं धरियेला ॥५५॥ तवं ते पातलीं विमानें । दशधा तुरें मंगळ स्वनें । गगन कोंदलें सघनें । सुमनवृष्टि होतसे ॥ ५६ ॥ ध्रुवें नमिली सापत्नमाता । तूं च गुरु होसी सत्वता । तुवां तोडिली ममता । तुह्येन हरि मज भेटला ॥ ५७ ॥ तूं हि बोलतीसि रसाळ । मिथ्या प्रपंच परि पाल्हाळ । तरि कां तुटतें मायाजाळ । कां भेटता भगवंत ॥ ५८ ॥ नवल सज्जनाची स्थिति । अवगुण ते हि गुणा येती । स्वानंदनिर्भर मनोवृत्ति । जन निवती सत्संगें ॥ ५९ ॥ बाप श्रीहरि कृपाळ । दासा पद दिधलें अढळ । तें प्रत्यक्ष ध्रुवमंडळ । विश्व देखतसें डोळां ॥ ६० ॥ चळती महींद्र इंद्रादें । ढळती कुळाचळ प्रमादें । स्खळती नक्षत्रें जनविदें । ध्रुव आनंदें अढळ तो ॥ ६१ ॥ सप्तऋषि ग्रह नक्षत्रें । अस्तोदयी अहोरात्रें । ध्रुव ध्रुवें जाला स्वतंत्रें । श्रीपतिचरणप्रसादें ॥ ६२ ॥ श्रीहरि गेले हो स्वस्थाना । हर्ष जाला त्रिभुवना । वंश पावला महिमाना । राया उत्तानचरणाचा ॥ ६३ ॥ धन्य सुपुत्र तो संसारीं । जेणें जोडिला श्रीहरि । येर भार भूमीवरि । श्रीहरिभजनविन्मुख ॥ ६४ ॥ ऐसें ध्रुवाचें आख्यान । ज्याचें पुराणीं व्याख्यान । श्रवण पठण करिती जन । ते पावती ध्रुव-

---

१ सगळ्या विश्वास विश्रांतिस्थान असा जो तूं. २ जणू काय. ३ बोलली असतांस. ४ स्खलन पावतात, खालीं पडतात. ५ हें सर्व जनास ठाऊक आहे. ६ चिरंजीव.

सौख्या ॥ ६५ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । ध्रुवाख्यानवर्णन । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ५९ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो नमस्ते वाळकपाळका । नमो सकळाभ्यंतरचाळका । नमो नमो कलिमळक्षाळका । नामस्मरणमात्रें ॥१॥ तूं जगज्जनकाचा हि जनक होसी । तू जगद्योनिस्त्रमात्रेंसीं । तुज चराचर बाळभावेंसीं । पाळणें च कीं परमेशा ॥ २ ॥ बाळक काय जाणे सामर्थ्य जनका । काय जाणे वक्तृत्वादिका । बोबडा बोली च परि कौतुका । करणें बापा कृपाळा ॥ ॥३॥ तैसें तुझें गुण नाम चरित स्वरूप । जाणते हि नेणती अमूप । तथापि तू भक्तजनसकृप । ओर्थी भाषां तुष्टसी ॥ ४ ॥ नामें रूपें विरहित । अर्थ च परमार्थ शाश्वत । नामरचना हे कल्पित । देशवेपासारिखी ॥ ५ ॥ नाना देशीं भाषा विचित्रा । तेथें अर्थ कल्पना स्वतंत्रा । परि परमार्थता ते पवित्रा । स्वसवेद्या सर्वत्र ॥ ६ ॥ तया शब्दाचें प्रथम स्फुरण । तो तू आत्मा कारणाचें हि कारण । कार्यसहित नारायण । स्वयें च जो स्वतसिद्ध ॥७॥ ह्मणौनि सर्व हि तुझें करणें । तुज च वेद्य सर्वज्ञपणें । तेथे एकदेशी वाह्य शाहाणें । केवीं सर्वाशय बुझे ॥८॥ नाना दर्शनें नाना जीव । परि तुज एकाचा ठायीं भाव । तत्वता तुझा जो अनुभव । तो तुझा कृपाकटाक्ष ॥ ९ ॥ नवल कृपेचा वदिवार । नर ह्मणिजे सुरकिंकर । तयांतें वदिती अमरवर । तत्रागिकारें समर्थी ॥ १० ॥ तेथें समान पंडिता वाळा । देशीं हा काय नवलाव आगळा । तुझिया नामस्मरणाचा जिव्हाळा । तो अविद्याहूनि अधिक ॥ ११ ॥ पूर्वे प्रकरणीं श्रीहरि कृपाळ । तेणें ध्रुव केला अढळ । जयासी नक्षत्रें सकळ । प्रदक्षिणा करिती ॥ १२ ॥ आतां परिसा कथा अन्य । जगत्रयासी जे मान्य । उपमन्यु अति धन्य । बाळभक्त हरीचा ॥ १३ ॥ जनक आ-

---

१ बोबड्या. २ जाणू शकेल. ३ मोठेपणा, कीर्ति. ४ तूं अंगिकार केल्यामुळें. ५ ओलावा.

ह्मण पुण्यसीळ । स्वधर्मनिष्ठ शुद्ध केवळ । पुण्य कुटुंब स्त्री बाळ । प्राणप्रिय परस्परें ॥ १४ ॥ जैसी अप्रतिग्रहता नभा । धरणें नाहीं अणूच्या लोभा । तैसा ऋषि तो अर्थदंभा । धरूं च नेणे ॥ १५ ॥ परमार्थनिष्ठासी अर्थसंग्रहो । तो च असे अनर्थविग्रहो । तथापि पूर्वार्जित प्रमाण अग्रहो । करणें च नलगे कोण्हासी ॥ १६ ॥ सर्वाशयमुक्त आत्माराम । तथापि प्राक्तनावधि धरणें आश्रम । तैसा तो जीविका करी निर्भ्रम । यत्किंचितें संतुष्ट ॥ १७ ॥ जैसें साधका अगत्य साधन । तैसें बाळका अगत्य पयप्राशन । जन्हि राहिलें सुस्तनपान । तन्हि भोजनीं पाहिजे ॥ १८ ॥ तथा स्वकीय मूल सहज थोंया । परि जनतोनास्तिक्य अंतराया । जीव प्रतिबिंब विषय माया । दाखवी साचासारिखें ॥ १९ ॥ कृत्रिमता च मानूनि साच । सेवित असतां तैसा च । यजमानसत्संगपंक्ति तत्वता च । भाग्यवळें जोडलें ॥ २० ॥ पुनः प्रत्यगावृत्ति प्रभातेस । नीचत्व धान्यरस देखतां त्यास । ह्मणे हा काय मिथ्याभास । गोड न लगे मज आतां ॥ २१ ॥ हें मज आहे च ठाउकें । सेवित च असतां होतें फिकें । सज्जनपंक्तीचें जें निकें । तें च आतां सेवीन ॥ २२ ॥ मायामोह मतें नानापरि । दाखवी मिथ्या फळश्रुति वरिवरि । ह्मणे हें च सत्य गोड संसारीं । हें च जीवा पोषक ॥२३॥ सत्यत्वीं जवं न पडे दृष्टि । तवं च मिथ्या भासतां संतुष्टि । सत्य प्रगटतां मनोपुष्टी । असत्य कैसें आवडे ॥२४ ॥ मिथ्या मृगजळाची नदी । मृगजीवांसी प्रमादी । तेथें शाश्वत गंगामृतस्वादी । नर न रंजे सर्वथा ॥२५॥ सर्व लाघवेंसी माया मुग्धा ।

---

१ अग्रहार=देवब्राह्मणास दिलेला ग्राम दिक त्याचें नांव. २ वास्तविक जीव हा शिव किंवा आत्मा आहे, परंतु प्राण्याच्या संचित क्रियमाणा प्रमाणें ह्मणजे प्राक्तनानुसार आश्रमधर्म हा सपादलाच पाहिजे. ३ चरितार्थ. ४ छद. ५ जनांचें नास्तिक्य दूर करण्याकरितां जीव, माया वगैरे वास्तविक मिथ्या, नाशवत असून खरीं किंवा शाश्वत आहेत असें प्रथम भासवावें लागतें, त्याप्रमाणें उपमन्यूचा छंद पुरा करण्याकरितां त्याला राज्या ह्मणजे आईच्या स्तनांतील दुधाऐवजीं कृत्रिम दूध देत असत. ६ मोह पाडते. ७ खरोखर गंगाजळ प्राशन करणारा.

सिणली दावितां दस्य दुग्धा । परि तो हरिभक्तिकामधेनुदोग्धा । काय सेविल तयासी ॥ २६ ॥ उपमन्यु ह्मणे मायेसी । स्तनपानें जीवविलें वाहिलें कुसी । सत्य पय का वो नेदिसी । तेणें आला गहिंवर ॥२७॥ ह्मणे बाळा गुणनिधाना । माझिया सर्व समाधाना । नि.कळंका अखंड मंडळानना । मह्मनि जाईन तुजवह्मनि ॥ २८ ॥ मी माया निमिषमात्र । तुझी जीवनकळा स्वतंत्र । माझे हातीं पय पवित्र । असतें तरि का वंचितें ॥ २९ ॥ मज इतुकें सामर्थ्य कैंचें । मिथ्या च पात्र दोषदुःखाचें । मजविण चिदंशस्थान कैंचें साचें । याचलागि मी जन्मलें ॥ ३० ॥ तरि मी मागों कोणापासीं । तेव्हा शब्द न फुटे च तयेसी । खुणा दाविता पुत्रासी । हृदयस्फोट हों पाहे ॥३१॥ तव तो अमूर्त मूर्तिमंत । लीला क्षीरोदशौयी[3] अनंत । सहज तेथें होता वसत । तयाप्रति प्रेरिला ॥३२॥ विमळ कोमळ बाळमति । उपमन्यु घाली पालखेंती । बाप उदार चक्रवर्ति लक्ष्मीपति । तयाप्रति पय मागे ॥ ३३ ॥ दुग्ध देईं रे दयाळा । दीनानाथा विश्वपाळा । सकळा जीवा तूं जिव्हाळा । तुजवीण कोण देईल ॥ ३४ ॥ सकळा मातास्तनमंडळीं । तुझेन वाहे पयउकळी । क्षीराब्धी भरला भूमंडळीं । गर्भोद्भवादि जीवना ॥ ३५ ॥ जयाचा महिमा अद्भुत । शाम तनुतानदी अहंकारवत ।'तो शिखितनु व जाला अति श्वेत । जयाचया पयपानें ॥ ३६ ॥ तेथें तू स्वप्रकाश गोविंदु । तव तेजाशें उजळला सिंधु । तदुदरस्थ अमृतकंदु इंदु । तेणें आकाश उजळिलें ॥ ३७ ॥ तवाशें शशी अमृतकळाधर । औषधी पोषी निरंतर । तेणें जीतसे हें सचराचर । ह्मणौनि तू जगज्जीवन ॥ ३८ ॥ तू अमृताचें हि अमृत । तू पयसामर्थ्य अंतरगत । तू जीवजाळ मूळ तुझेन जीत । ह्मणौनि तू जगज्जीवन ॥३९॥ तू जीवनकळेची अंतरकळा । तुझें कृपावलोकन दीनदयाळा । तेथें सर्व हि सुखसोहळा । तें क्षुधाक्रांता करीं हरि

---

१ फसविलें असतें. २ अपमान, नाश. ३ क्षीरसागरा शयन करणारा. ४ 'भक्तरूपें प्रगटला' असा दुसरा पाठ आहे. ५ पालख=पाळणा ६ गर्भातून उत्पन्न झालेल्या प्राण्यास जीवन देण्याकरिता. ७ चंद्र.

॥४०॥ श्रीहरि कृपार्क्षीरोदार्णवा। तव स्मरणपर्यें रक्षिलें जीवां। तें साक्षात्कारसुख दे माधवा। स्वतसिद्ध स्वयें च ॥४१॥ हरिभक्तजनकरुणाकरा। वांछितफळदा अति उदारा। जीव फुटला सर्वेश्वरा। धीर आतां धरेना ॥ ४२ ॥ ऐसें आइकोनि भक्तस्तवन। हरि बोळला जगज्जीवन। परमामृतमय त्रिभुवन। माधुर्यैक रसाश्रय ॥ ४३॥ तये संधीसी उठिल्या सिद्धि। विशाळ विषय पयद जनपद विधि। परि तो भगवद्भक्त कृतबुद्धि। हरिवांचूनि न पाहे ॥ ४४ ॥ ऐसा देखोनि दृढ निर्धार। क्षीरोदशाई जगदीश्वर। लक्ष्मीकांत गरुडध्वज विश्वंभर। प्रगट जाला परमेश ॥ ४५ ॥ देवासी न धरे हो कळवळा। उचलूनि हृदयीं धरिलें बाळा। चुंबन केलें वदनकमळा। स्मरणवंत ह्मणोनिया ॥ ४६ ॥ भगवंताचा स्पर्श होतां। तत्काळ तद्रूप जाली तनुता। ह्मणे उपमन्यु माग आतां। पिता जैसा पुत्रासीं ॥ ४७ ॥ उपमन्यु ह्मणे देवादिदेवा। देईं दुग्ध आणि आपुली सेवा। संतोष जाला आदिदेवा। क्षीरार्णव दिधला ॥४८॥ आपुलिया शेषशयनाजवळी। कौतुकें स्थापिला वनमाळी। देवीं पुष्पवृष्टि केली मौळीं[1]। जयजयकार प्रवर्तले ॥ ४९ ॥ लागतां श्रीहरीचें चरणकमळ। पवित्र जालें भूमंडळ। ह्मणौनि धन्य पावन तें पुण्यस्थळ। जेथें वसती हरिभक्त ॥ ५० ॥ हरिभक्ताचया संसर्गें। उद्धरिजे जीवसर्गें[2]। तेथें माता पिता उभे वर्गें। काय राहाती वेगळीं ॥ ५१ ॥ अनन्य भक्त क्षीरोदतटीं। उपमन्यु शोभे श्रीहरिनिकटीं। हे कथा परिसती कर्णपुटीं। वाखाणिती जे मुखें ॥ ५२ ॥ दुख दारिद्र दोषजाळ। निरसे तयांचे तत्काळ। सुख भोगूनियां सकळ। भावें पावे हरिपद ॥ ५३ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये। रामिरामदासकृते। विष्णुमहिमावर्णने। उपमन्युक्षीराब्धिलब्धोनाम। प्रकरणं समाप्तम् ॥ ६० ॥

---

१ मस्तकावर. २ जीवजाति.

॥ श्रीरामो जयति ॥

नमो स्वभक्तजनरजना । नमो भक्तद्विपगजना । नमो भक्तभय-
भजना । भक्तजनविश्रामा ॥ १ ॥ नमो स्वतत्र स्वाधीना । नमो भक्त-
जनाधीना । नमो नमस्तेस्तु वाश्रीना । तुझेन भक्ता कळिकाळ ॥ २ ॥
जेणें तुज जैमें भजावें । तुवा तया तैसें च व्हावें । हें तुझें वाक्य स्व-
भावें । विश्वरूढ प्रसिद्ध* ॥ ३ ॥ तुझें वचन अनृत । हा आशय च
अति दुष्कृत । तथापि भावना अतरगत । तू जाणसी न सागता ॥४॥
आता सर्वापराध क्षमा करणें । हें विरुद सजे तुजकारणें । तरि जी
माझियेन अत करणें । अनृत प्रति भावाविजे ॥ ५ ॥ तरि इद्रकेतु पा
परूप । तुझा देउळीं लावी दीप । स्थळ वस्त्रें झाडी करावया पाप ।
जारस्त्री आपणापुरतें ॥ ६ ॥ ग्रामरक्षकीं केला शिरछेद । तया का
आलें विष्णुपद । तेणें काय तू गोविंद । पूजिलासि कि यजिलासि ॥७॥
त्याची तुझा ठायीं नसता बुद्धि । तुवा दिधली स्वपदसिद्धि ।
ह्मणौनि हरि कृपानिधि । वचन सत्य कि असत्य ॥ ८ ॥
आह्मी अपराधी पतित । तू पतितपावन हें उचित । तुजऐसें आमचें
चित्त । हे साम्यता घडेना ॥ ९ ॥ अजामीळ जो द्विजाधम । धर्म-
बहिष्कृत अघधाम । लोकविख्यात ज्याचें नाम । दोषमूळ अजामीळ
॥ १० ॥ अविचालक्षण जे अजा । तिसीं समीळें विषयकाजा ।
आपुलें ब्रह्मत्व साडूनि निर्लज्जा । जिवा रुचि तेथें चि ॥ ११ ॥ काटाळा
नुपजे चाडाळा । पापरतिहव्यास आगळा । अपत्याचा पडला पोळा ।
जैसे कीटक अमगळीं ॥ १२ ॥ अजा दासी अथवा चाडाळी । ब्रह्म-
बीज अकुरलें तये स्थळीं । एथें शास्त्रार्थाची खदेळी । होऊनिया
गेली ॥ १३ ॥ शास्त्र प्रायश्चित्त व्याख्यान । परदारा गुरुतल्पगासमान ।
एकदा प्रमादात् घडलें गमन । तरि स्नायुछेद करावा ॥ १४ ॥ लिंग

---

१ स्वभक्ताचे जे द्वेष्टे आहेत त्याचा तिरस्कार करणारा. २ पापाच जणू
राय घरच ३ माया, किंवा शेळी ४ सयोग. ५ वेढा. ६ नाश, दाणादाण.
७ मानागमनाप्रमाणें. ८ चुकून * श्रीमद्भगवद्गीता अध्याय ४ श्लोक ११ पूर्वार्ध

प्रवेशल्या जालें ज्ञान । तरि वर्जावें आलिंगन चुंबन । बिंदुपात नव्हतां उठोन । पाप प्रगट करावें ॥१५॥ ऐसिये अनुतापीं देहांत–। प्रायश्चित्त बोलती महंत । रतिं बाळकोत्पत्तिपर्यंत । पुढें हि करी अँसोसीं ॥१६॥ तयाचें दुरित दुर्निवार । अजामीळ करी घराचार । नामें ठेविलीं हरीचीं सुंदर । दैवयोगें प्रमादें ॥१७॥ नेणोनियां नाममहिमा । नसतां श्रीहरीचा प्रेमा । पुत्रस्नेहासी नाहीं सीमा । ह्मणौनि आवडीं ठेविलीं ॥ १८॥ तवं तयासी आलें मरण । लघु पुत्रासी ह्मणे नारायण । तयासी पतितासी प्रयाण । हरिपदीं हें आश्चिर्य ॥१९॥ ऐसे उद्धरिले नेणों किती । ते मज केंवि वर्णवेति । ह्मणौनि दीनोद्धरण तूं श्रीपति । अनेकळित कृपाळु ॥ २० ॥ जयाचा जैसा मजवरि प्रेमा । तयासी तैसा च मी अभिरामा । उल्लंघूनि हे शब्दार्थसीमा । अवशा वश्य वरदाता ॥२१॥ दीनानाथ हा वडिवोर । यदर्थी कथा मनोहर । परिसोत मानसामृतभोक्ते चतुर । राजहंस सज्जन ॥ २२ ॥ ब्रह्म पंचक्षीर नीर निवाड । मुक्त मुक्ताफळ कैसें गोड । गतीचें गौरव अति थाड । विश्व वर्णी जयाचें ॥ २३ ॥ द्वंद्वीं निर्द्वंद्व शोभा । सुस्वर रुचितर स्वप्रभा । सचराचर पावलें लावण्याभा । अशोंकरूनि जयाच्या ॥ २४ ॥ तत्पदस्पर्द्धा बकवृत्ति । परि काय ते समान होती । क्रियारंगें तत्काळ निवडती । जन आणि सज्जन ॥ २५ ॥ नाना अविद्याकळावंत । इतुकेनि च ते हि संत । ऐसें मानिती ते असंत । गो खर तैसे ते पशु ॥ २६ ॥ ऐसिया संता प्रणिपात । कथा परिसावी सुचित्त । श्रवणमात्रें अच्युत । अच्युतपदप्रदाता ॥ २७ ॥ कातिलक्षण काति । तेथिचा मुमुक्षु चोळ भूपति । आराधी सद्गुरु श्रीपति । भक्तिभावें ॥ २८ ॥ अनंतशयन श्रीहरि । महा प्रासादाभीतरीं । चोळ राजा निज निर्धारीं । पुजा करी विधियुक्त ॥ २९ ॥ सर्व हि साधन संपत्ति साहित्य । अनाहत मंगळ तुरें लाऊनि नित्य । न्यासूनि अगभाव अनित्य । देवरूप देहो भाऊनि

---

१ न होता. २ हात धरून. ३ पातक. ४ निरुपद्रवी. ५ कीर्ति. ६ सुंदर असें कांति नगर. ७ नवीं वस्त्रें. ८ त्याग करून.

॥ ३० ॥ जाणे मंत्र तंत्र क्रिया कळाप । कर्म च स्वकीय ब्रह्मरूप । मळिनत्वातीत दिव्य चिद्रूप । मूळानुक्रम उपचार ॥ ३१ ॥ आवाहन आसन अर्घ्य पाद्य आचमनें । पंचामृतस्नान कनकगर्भ मुक्तांचळ वसनें। सुवर्ण यज्ञोपवीत रत्नखचित दैदिप्यमानें । अगप्रत्यांगीं विभूपणें ॥३२॥ दिव्याष्टगंधें विलेपनें । सुगंध सुरंग अर्पी सुमनें सुमनें । धूप दीप नेवेद्य चतुर्विधें सरस अन्नें । सकर्पूरोदक सीतळ ॥ ३३ ॥ राजयोगवाटिकेचीं मघमघित । सुवास सुस्वाद सदोदित । सदंबर सघन प्रवेष्टित । फळें विमळें अर्पित ॥ ३४ ॥ मुक्तत्व चूर्ण पक्क पर्णी । फळाशा फोड्नि पूगिफळ पूर्णी । चतुर्थ भूमिकार्थ चतुर्थ भाग गुणवर्णी । सुगध गर्भ रससुखद ॥ ३५ ॥ पूजापूर्णार्थ पूर्ण दक्षणा । विपुळां हस्तीं रत्नांजळी संपूर्णा । नित्य समर्पी नारायणा । निराजन रत्नदीप स्वप्रभा॥३६॥ सुवर्ण सुमन पुष्पांजळी । नमन स्तवन प्रार्थना मंजुळी । प्रदक्षिणा स्थिर मन पदीं वनमाळी । पूजन करी सुभक्त्या ॥ ३७ ॥ भक्ति शक्ति युक्ति भावार्थ । सर्व प्रकारीं राजा समर्थ । सामर्थें पुजी हरि परमार्थ । साधावया निःकाम ॥ ३८ ॥ तयाचेन सगें सुसीळ । सर्व जन जाले निर्मळ । हरिभजनीं अति प्रेमळ । महिमा संतसगाचा ॥ ३९ ॥ तवं विष्णुभक्त अकिंचन । ब्राह्मण दुर्बेळ अति दीन । करूनि नित्यकर्म सध्या स्नान । देवदर्शना एतसे ॥ ४० ॥ तेणें पुजा माडिली श्रीहरि । जळ घातलें मूर्तीवरि । गंगावली तुळसीमजुरी । वाहिलिया बहुता ॥ ४१ ॥ यथाशक्त्या धूप दीप नेवेद्य । प्रत्यक्ष पदार्थो भावें सद्य । कल्पूनियां स्वसवेद्य । भावें पूजिला भगवत ॥ ४२ ॥ ब्राह्मण गेलियां स्वगुफेप्रति । सायंकाळीं हरिभक्त भूपति । आला सद्भावें देवाल्याप्रति । देवदर्शनाकारणें ॥ ४३ ॥ लोपली भ्रशली देखोनि पुजा । अति विव्हळ जाला राजा । ह्मणे महापुजा युक्त गरुडध्वजा । देखोनि भक्त तोपती ॥४४॥ मंगळ आरार्तिका दीपांकुरीं । श्रीमुखशोभा पाहाता साजिरी । आनंदाश्रु

---

१ मुक्ता+ अंचळ= ज्या वस्त्राच्या पदराला मोती जडविलीं आहेत अशीं वस्त्रें. २ रुचकर.

नयनीं भक्तशरीरीं । रोमांचपुलक फरकती ॥ ४५ ॥ तरि हरिपुजेचा केला लोप । तयासी अपराधें घडलें पाप । तो समर्थे न वर्जावा तरि तद्रूप । पापार्धभाग शास्त्रता ॥ ४६ ॥ मग प्रस्तावलेंन मनें मधुसूदना । नमस्कारूनि गेला राजभुवना । द्वितीय दिनीं पुजूनि जगजीवना । रक्षित राहिला गुप्तता ॥ ४७ ॥ तवं तो श्रीहरीचा अंश नामांकित । अनन्य भावें शरणागत । स्वकाळीं आला अकस्मात । पुजा केली निलवत ॥ ४८ ॥ तें देखोनि प्रगटला राजा । ह्मणे अरे पढतमूर्खा द्विजा । तुझेन पूजनें खगध्वजा । शोभा आली कीं लोपली ॥ ४९ ॥ दिव्याळंकारीं दिव्यांबरीं । दिव्यरूप शोभला हरि । दिव्य सुगंधलिप्तांग मुरारि । तुवां निर्गंध पाला झांकिला ॥ ५० ॥ चुळकोदक चरणकमळीं । शिरीं मंजुरिका एकि दोनि कोंवळी । समर्पूनियां वनमाळीं । शोभा रक्षूनि पुजूं नये ॥ ५१ ॥ तवं तो ह्मणे हे रत्नशोभा । काय दुर्लभ आहे पद्मनाभा । भावें [१]तुष्टि श्रीवल्लभा । पदार्थरचना हे किती ॥ ५२ ॥ तवं तया मुमुक्षु भूपाळा । शुद्धाहंकार आला तया वेळा । ह्मणे अरे ब्राह्मणा वरळा । अशास्त्र बोलसी अभक्ता ॥ ५३ ॥ तूं काय जाणसी हरिभक्ति । हरि कैसा आहे पाहे शास्त्रोक्ति । हरिरूप न्हावया पाहिजे शक्ति । पुजावया हरीतें[२] ॥ ५४ ॥ तवं ब्राह्मण ह्मणे भाविक भोळा । श्रीहरि न मनी या पाल्हाळा । हरीसी पाहिजे प्रेमाचा जिव्हाळा । देव भोक्ता भावाचा ॥ ५५ ॥ करितां भगवंताची सेवा । राव रंक नाहीं हेवा । हे श्रातिसाधन च वचन जीवा । बाह्यदृष्टया सृष्टीसी ॥ ५६ ॥ श्रुति स्मृति आणि तत्पारंगत । जाणती हरि गुण कर्म नाम रूपें अनंत । पुजा हे निउन ह्मणऊनि प्रार्थित । क्षमाप्रणामें करविती ॥ ५७ ॥ भक्त जाणता अथवा नेणता । पूजोपस्कार शक्त अथवा अशक्तता । स्थूळ अथवा मूळ अहंता । तो च अंतराय प्राप्तीसी ॥ ५८ ॥ स्वदेहो देवरूप हि ध्यातां । तें हि बाधक होय तत्वता । ह्मणौनि अहंता सांडावी स्वतां । तरि च हरि स्वयें भेटे ॥५९॥ राजा ह्मणे रे[३]वाचाळा । तूं काय

---

१ छांदिष्ट, आर्त, भ्रमिष्ट. २ पुजेचीं उपकरणें, साधनें. ३ अद्दयल्ला.

जाणसी प्रेमकळा । सांगे पूजकाहूनि सर्व दुर्बळा । अधिकता घेसी स्वमुखें ॥ ६० ॥ पुजाशक्ति नाहीं तुज । दुजयाची हि लोपिसी निर्लज । सिक्षा याची करितों तुज । ब्राह्मण ह्मणऊनि रक्षिलें ॥ ६१ ॥ आतां हरिपूजा लोपावया । तुज नवचैवें देवालया । विष्णुदास विप्र ह्मणे राया । प्रतिज्ञा करूं दोघे हि ॥ ६२ ॥ ब्राह्मण ह्मणे भलें जालें। प्रत्यक्षासि प्रमाण कां लागलें । आधीं जयासी दर्शन दिधलें । तेणें पण जिंतिला ॥ ६३ ॥ धन्य दोघांचें वंशकूळ । धन्य दोवांचें जन्ममूळ । धन्य दोवांची अहंता निर्मळ । अभिमुखें जाले हरीसी ॥ ६४ ॥ मिथ्या तर्क कर्कश चावटी । बहिर्मुख विपयार्थ तोंड पिटी । आपण अधिक होऊनि दाटोदाटि । अविक अर्थ अर्चीवा ॥ ६५ ॥ तिहीं अर्थरूप अनर्थ जोडिला । प्रेमा हरीचा तत्काळ तोडिला । तरि च चित्तींचा नवचे सोडिला । मछर हरिस्वरूपें ॥ ६६ ॥ तैसे नव्हेति ते जगजेठी । दोघी हरीसी पाडिली गाठी । पैजा सारूनि वैकुंठीं । प्रवेश मांडिला सज्जनीं ॥ ६७ ॥ दोघा हि विपयो वमनवत । ब्राह्मण अपारिग्रही शरणागत । राजचूडामणी भागवत । सर्वस्व अर्पी हरीसी ॥६८॥ रायें केलें विष्णुछत्रावलवन । ब्राह्मणसंतर्पण अन्नदानादि सर्व दान । अवंचकता हरिपूजन । ध्यान स्मरण विधीं मंत्रीं, ॥ ६९ ॥ परमेश्वरप्रातिकर सुकृत। राजा करितसे सकृत। हरिसूक्तें पढती सुचित्त। हरिव्रतपरायण ॥७०॥ विष्णुदास ब्राह्मण केवळ । भववैभवें अति दुर्बळ। सर्व पदार्थ मुक्त प्रेमळ। अनन्य भक्त तनुमनें ॥७१॥ हरिस्मरणें हरीचें ध्यान। हरिपूजन हरिकीर्तन। आणिक असेचना करावया चिंतन । हरिमय चित्त सर्वदा ॥७२॥ एकादशीं निराहार । एकभुक्त सोमवार । तुळसीमजुरिका मनोहर । भावें अर्पी भगवंता ॥ ७३ ॥ तनुमनें वोळंगे देवा । टांके तितुकी करी सेवा । हरिव्रत जीवभावा । हरिप्रीत्यर्थ अर्पिलें ॥ ७४ ॥

---

१ यथाविधी व मीलितोपचारी पुजा करणारापेक्षां. २ न जावें. ३ श्रीहरीकडे मुख करून उभे राहिले. ४ वेचावा, कारणीं खर्च करावा. ५ प्राप्त करून घेतो. ६ पावतो.

नित्य निर्मम निर्मछर । अंतरीं अनुताप मानी थोर । श्रीहरिभक्त-चोळ नृपवर । त्यासी निष्ठुर बोलिलों ॥ ७५ ॥ सत्य सर्वात्मा श्रीहरि । नित्य समान सर्वांचां शिरीं । विशेष भक्तजनकाजकैवारी । हृदयीं नांदे दासाचे ॥७६॥ कैसी तयाची पुजा सद्रूप । म्यां च तयेचा केला लोप । जळों जावें हा माझा कोप । म्यां कां त्यासी दुखविलें ॥ ७७ ॥ म्यां आपुलिये कृतार्थतेसी । यथाशक्त्या पूजिलें हरीसी । परि हरिशोभालोप न साहावे त्यासी । हा काय त्याचा अन्याय ॥ ७८ ॥ मज नाहीं तुज न साजे । ऐसें च घडोन आलें सहजें । याहिवरि घाल्लनि पैजे । मी च अभिमाना प्रवर्त्तलों ॥७९॥ माझा अभिमान मज नावरतां । तयासी ह्मणे तुझा ठायीं अहंता । जरि मज च साभिमान नसता । तरि कां इतुकें लागतें ॥८०॥ पश्चात्तापें ह्मणे नारायणा । मी सर्वापराधी करी करुणा । मज सर्वार्थ-साधारणा विर्गुणा[1] । अगिकारीं मुकुंदा ॥८१॥ यानंतरें मनोर्ज्ञ[2] मुरारि । दीनानाथ हें नाम सारी । तो निर्धार पाहावया श्रीहरि । करिता जाला कौतुक ॥ ८२ ॥ ब्राह्मणें द्वादशीचा दिनीं । नैवेद्य नेला देवस्थानीं । क्षुधाक्रांत आला तेथूनि । तवं अन्न जालें अदृश्य ॥ ८३ ॥ मग तो अद्वैत च संसारीं । पुनः पाक न करी च निराहारी । हृदयीं स्मरोनियां श्रीहरि । तुळसीपुढें टेंकला ॥ ८४ ॥ ऐसें सप्ताह अन्न नेलें । मग ब्राह्मणें आश्चिर्य केलें । अळक्षता लक्षितां देखिलें । हरीसी रंकस्वरूपें ॥ ८५ ॥ अति सखोल नेत्रवाट । एक जालें पाठिपोट । पासोळिया[3] एक दाट । गुप्त हि स्पष्ट भासती ॥ ८६ ॥ हस्तें उचलूनि ब्रह्मरूप अन्न । वाह्य उदरगर्त्ता[4] केली समान । चाचेंरोनि[5] पडेलि ह्मणौनि साधन । धरीं ह्मणौनि धांविला[6] ॥ ८७ ॥ तवं ते भयेवीण च म्यालें । पतना-वांचूनियां पडलें । जीवत्व नसतां मरों लागलें । वाटारिले लोचन ॥८८॥ ब्राह्मण ह्मणे सर्वोत्तमा । धांव धांव मेघशामा । जीवत्व गेलें कीं श्रीरा-

---

१ गुणहीनास. २ 'मनोज्ञ' असा दुसरा पाठ आहे. ३ मासोळ्या तर नव्हे? ४ पोटाची खळगी. ५ भुलून. ६ 'साधन । धरीं ह्मणौनि धांविला' याऐवजीं 'ब्राह्मण । धरावया धाविनला' असा दुसरा पाठ आहे.

मा। स्वसामर्थ्यें वाचवीं ॥ ८९ ॥ अचळांचळेंछाया करून । मुखीं सिंचलें निज जीवन । करिता भगवताचें ध्यान । दीन च जाले हरि स्वयें ॥ ९० ॥ चतुर्भुज मेघशाम पीताबरधारी । पकजाक्ष शखचक्राब्जगदा करीं । दिव्य गधमाल्यें दिव्यालकारीं । शोभे उदारांग औदार्यें ॥ ९१ ॥ अवलोकितु कृपामरें । हृदयीं आलंगिला आदरें । अष्टभाव सावरीत येरें । चरणीं मिठी घातली ॥ ९२ ॥ वाप भाग्यार्थाचा कडकडाट । सर्व छिद्रता जाली घनदाट । भावें प्रगटला वैकुंठ । उघड्या दृष्टीं सृष्टीसी ॥ ९३ ॥ पाहाता हरीचें स्वरूप । स्वयें जाला हरिरूप । हरले ससारसताप । परमानदमय स्वयें ॥९४॥ मस्तक धुरवाळी कृपाळ । तव देवीं दाटलें अतराळ । पुष्पवृष्टि केली सपरिमळ । आलें विमान भूमडळा ॥९५॥ विष्णुदास विमानीं वाहिला । श्रीहरि अदृश्य जाला । मार्गे विमानें काढिला । गयेवरूनि ते काळीं ॥ ९६ ॥ पुण्य देश पुण्य काळ पुण्य पात्र । यालागि प्रतिपाद्य करूनि शास्त्र । रायें वसविलें गयाक्षेत्र । हरिप्रीत्यर्थ याग करी ॥९७॥ तव विमान आलें मस्तकावरी। प्रकाश न समाय अंवरीं । मगळ वाद्यांचा गजरीं । ध्वजातोरणीं दैदिप्य ॥ ९८ ॥ राजा पाहे तव हरिगणमडळीं । विष्णुदास जैसा अपर वनमाळी । अभिमान भगला हृदयकमळीं । अनुताप जाला तत्काळ ॥ ९९ ॥ ह्मणे व्यर्थ सर्वार्थपाल्हाळ । भावार्थे सार्थक केवळ । यथार्थ ब्रह्मवाक्य प्रेमळ । विष्णुदास च तत्वता ॥ १०० ॥ अहकारें कर्मकळाप च विलाप। अहकारें पुण्यार्चनें च पाप । निरहकारता आपेंआप । श्रीहरि भेटला ब्राह्मणा ॥ १०१ ॥ आता मी ये विधिकचाटीं । न सोसी जन्मांतरआटाआटी । श्रीहरिप्राप्ति उठाउठी । देहममता घडेन ॥ १०२ ॥ अतरीं केलें हरीचें ध्यान । हरिरूप भाविला हुताशन । पूर्णाहुति शरीरावदान । हरिस्मरणें केलेंसे ॥ १०३ ॥ तव जाला हाहाकार । दग्ध राजदेहअहकार । तत्काळ अग्नींत सर्वेश्वर । प्रगट जगीं जालासे ॥ १०४ ॥ अग्नि च सुसीतळ जाला । देवें चोळराज आल-

---

१ अचळ+अचल=कायमची अशी आपल्या पदराची छाया.

गेला । ह्मणे भक्त होसी भला भला । मग वाहिला विमानीं ॥ १०५॥ दोघां हरिरूपीं समत्व । राहिलें राजत्व आणि दीनत्व । ते पूर्वदशा तनु-ममत्व । परमाल्हादीं समरस ॥ १०६ ॥ दीनदयाळ हे विरुदावळी । साच करूनियां वनमाळी । आधीं भेटोनि भूमंडळीं । पण रक्षिला विप्राचा ॥ १०७ ॥ यालागि दीना दुर्बळा । समर्थाहूनि श्रीहरि जवळा । भावें पावतसे प्रेमळा । यज्ञ दान न करितां ॥ १०८ ॥ यज्ञ दान अर्थ-साध्य । अर्थ दुर्बळासी असाध्य । ह्मणौनि मी श्रीहरि भावार्थसाध्य । ऐसें प्रगट दाखविलें ॥१०९॥ स्वयें प्रगट बोले निधान । नलगे अंजन बळिदान । भावें स्मरेलि नामाभिधान । इतुक्यानें च मत्प्राप्ति ॥११०॥ ऐसें परिसोनि जीवा अकिंचना । तत्काळ च कां हो न यावें मना । स्मरतां श्रीरामा चिद्घना । आळस न करूं सर्वथा ॥ १११ ॥ ज्याचें पुण्य चरित गातां आइकतां । पाविजे सर्व सुखें पदा अच्युता । त्याचें अग्र आख्यान परिसावें आतां । मनोरम निरोपमें[1] ॥ ११२ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । चोळोपाख्यानं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ६१ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो नारायणा नरहरी । नमो जगदीश्वरा नृकेसरी । नमो सिंव्हानना श्रीहरि । नमो प्रल्हादवरदा ॥१॥ नमो भक्तापत्तिउद्धारणा[2] । नमो दैत्यवीरणविदारणा[3] । नमो भूमिभारहरणा । आनंदकंदा मुकुंदा ॥ २ ॥ मछरूपा शंखांतका । वेदांतवेद्या वेदोद्धारका । भुवनत्रय कल्याणकारका । विश्वंभरा विश्वधरा ॥ ३ ॥ कूर्मरूपा मंदरधरा । पृष्ठिभागीं धरिली धरा । श्वेत वाराहा हिरण्याख्य वीरा । उधद्भूनि जीवें च मारिलें ॥४॥ जीवें मारावयाची हातवटी[4] । तुज साजे जी जगजेठी ।

---

१ ज्याला उपमा नाहीं असें. २ तुझा भक्त जो प्रल्हाद त्याजवर आलेल्या संकटाचें निरसन करणारा. ३ हस्तीरूपी दैत्य जो हिरण्यकश्यपु त्याचें विदारण करणारा नृसिंव्ह. ४ धाटणी.

मा । स्वसामर्थ्यें वाचवीं ॥ ८९ ॥ अचळांचळेंछाया करून । मुखीं सिंचलें निज जीवन । करितां भगवंताचें ध्यान । दीन च जाले हरि स्वयें ॥ ९० ॥ चतुर्भुज मेघशाम पीतांबरधारी । पंकजाक्ष शंखचक्राब्जगदा करीं । दिव्य गंधमाल्यें दिव्याळकारीं । शोभे उदारांग औदार्यें ॥ ९१ ॥ अवलोकितु कृपामरें । हृदयीं आलंगिला आदरें । अष्टभाव सावरीत येरें । चरणीं मिठी घातली ॥ ९२ ॥ बाप भावार्थाचा कडकडाट । सर्व छिद्रता जाली घनदाट । भावें प्रगटला वैकुंठ । उघड्या दृष्टीं सृष्टीसी ॥ ९३ ॥ पाहातां हरीचें स्वरूप । स्वयें जाला हरिरूप । हरले संसारसंताप । परमानंदमय स्वयें ॥९४॥ मस्तक कुरवाळी कृपाळ । तवं देवीं दाटलें अंतराळ । पुष्पवृष्टि केली सपरिमळ । आलें विमान भूमंडळा ॥९५॥ विष्णुदास विमानीं वाहिला । श्रीहरि अदृश्य जाला । मार्ग विमानें काढिला । गयेवरूनि ते काळीं ॥ ९६ ॥ पुण्य देश पुण्य काळ पुण्य पात्र । यालागि प्रतिपाद्य करूनि शास्त्र । रायें वसविलें गयाक्षेत्र । हरिप्रीत्यर्थ याग करी ॥९७॥ तव विमान आलें मस्तकावरी। प्रकाश न समाय अंबरीं । मंगळ वाद्याचां गजरीं । ध्वजातोरणीं दैदिप्य ॥ ९८ ॥ राजा पाहे तवं हरिगणमंडळीं । विष्णुदास जैसा अपर वनमाळी । अभिमान भंगला हृदयकमळीं । अनुताप जाला तत्काळ ॥ ९९ ॥ ह्मणे व्यर्थ सत्रोंर्थपाल्हाळ । भावार्थे सार्थक केवळ । यथार्थ ब्रह्मवाक्य प्रेमळ । विष्णुदास च तत्वता ॥ १०० ॥ अहंकारें कर्मकळाप च विलाप । अहंकारें पुण्याचेंनें च पाप । निरहकारतां आपेंआप । श्रीहरि भेटला ब्राह्मणा ॥ १०१ ॥ आतां मी ये विधिकचाटीं । न सोसी जन्मांतरआटाआटी । श्रीहरिप्राप्ति उठाउठी । देहममता घडेन ॥ १०२ ॥ अंतरीं केलें हरीचें ध्यान । हरिरूप भाविला हुताशन । ¹हुति शरीरावदान । हरिस्मरणें केलेंसे ॥ १०३ ॥ तवं जाला हाहाकार । दग्ध राजदेहअहंकार । तत्काळ अग्नींत सर्वेश्वर । प्रगट जगीं जालासे ॥ १०४ ॥ अग्नि च सुसीतळ जाला । देवें चोळराज आलं-

---

१ अचल+अचल=कायमची अशी आपल्या पदराची छाया.

गिळा । ह्मणे भक्त होसी भला भला । मग वाहिला विमानीं ॥ १०५॥ दोघां हरिरूपीं समत्व । राहिलें राजत्व आणि दीनत्व । ते पूर्वदशा तनुममत्व । परमाल्हादीं समरस ॥ १०६ ॥ दीनदयाळ हे विरुदावळी । साच करूनियां वनमाळी । आधीं भेटोनि भूमंडळीं । पण रक्षिला विप्राचा ॥ १०७ ॥ यालागि दीना दुर्बळा । समर्थाहूनि श्रीहरि जवळा । भावें पावतसे प्रेमळा । यज्ञ दान न करितां ॥ १०८ ॥ यज्ञ दान अर्थसाध्य । अर्थ दुर्बळासी असाध्य । ह्मणौनि मी श्रीहरि भावार्थसाध्य । ऐसें प्रगट दाखविलें ॥१०९॥ स्वयें प्रगट बोले निधान । नलगे अंजन बळिदान । भावें स्मरोलि नामाभिधान । इतुक्यानें च मत्प्राप्ति ॥११०॥ ऐसें परिसोनि जीवा अकिंचना । तत्काळ च कां हो न यावें मना । स्मरतां श्रीरामा चिद्घना । आळस न करूं सर्वथा ॥ १११ ॥ ज्याचें पुण्य चरित गातां आइकतां । पाविजे सर्व सुखें पदा अच्युता । त्याचें अग्र आख्यान परिसावें आतां । मनोरम निरोपमे[1] ॥ ११२ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । चोळोपाख्यानं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ६१ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो नारायणा नरहरीं । नमो जगदीश्वरा नृकेसरी । नमो सिंव्हानना श्रीहरि । नमो प्रल्हादवरदा ॥१॥ नमो भक्तापत्तिउद्धारणा[2] । नमो दैत्यवारणविदारणा[3] । नमो भूमिभारहरणा । आनंदकंदा मुकुंदा ॥ २ ॥ मत्स्यरूपा शंखांतका । वेदांतवेद्या वेदोद्धारका । भुवनत्रय कल्याणकारका । विश्वंभरा विश्वधरा ॥ ३ ॥ कूर्मरूपा मंदरधरा । पृष्टिमार्गीं धरिली धरा । श्वेत वाराहा हिरण्याख्य वीरा । उघडूनि जीवें च मारिलें ॥४॥ जीवें मारावयाची हातवटी[4] । तुज साजे जी जगजेठी ।

---

१ ज्याला उपमा नाहीं असें. २ तुझा भक्त जो प्रल्हाद त्याजवर आलेल्या संकटाचें निरसन करणारा. ३ हत्तीरूपी दैत्य जो हिरण्यकश्यपु त्याचें विदारण करणारा नृसिंव्ह. ४ धाटणी.

परतोनि मागुतें जीवत्व नुठी । तो एक एकांग वीर तूं ॥ ५ ॥ हिरणाक्ष हिरण्यकशिपु सोहोदर । दोघे दुर्धर महावीर । हिरणाक्षाचा केला संव्हार । घाराहवेषें ॥ ६ ॥ त्यानंतरें दंशनसिखरीं । धरणी धरूनि राहिला हरि । एकट उरला संसारदुस्तरीं । हेमैकसिपु महादैत्य ॥ ७ ॥ तो देवांचा मूळ वैरी । श्रीहरि देवांचा कैवारी । हरिसहित अभ्यंतरीं । द्वेषी सर्वां सुरांसी ॥ ८ ॥ पूर्वे प्रकरणीं श्रीपति । चोळ द्विज नेले स्वपदाप्रति । आतां परिसा प्रल्हादाची ख्याति । जे लोकत्रयविश्रुत ॥ ९ ॥ प्रल्हादाचें प्रेम अद्भुत । स्मरणनिर्धार सदोदित । वर्णावया वाणी कुंठित । अतुळ निष्ठा जयाची ॥ १० ॥ ज्याचें चरित ग्रंथांतरीं । विस्तारें वर्णिलें ऋपेश्वरीं । तें भक्तिरहस्य सक्षेपेंकरी । परिसा आतां सज्जन ॥ ११ ॥ हरिभक्तीचा महिमा विस्तरें । वर्णावियासीं कोण पुरे । बहुत बोलोनि हि न पुरे । मति ऐसें च बोलती ॥ १२ ॥ आतां असो कांचनकसिपु । जगजेयाचा धरूनि संकल्पु । महत्तप तपतसे वपु । मन इंद्रियें नेमिलीं[6] ॥ १३ ॥ उग्र तप माडिलें अतुळ । पानावया विषयो विशाळ । मूर्धिपासाव प्रगटला अनळ । तपोतेज अद्भुत ॥ १४ ॥ तेणें तापों लागला नक्षत्रलोक । देव जाले अति साशंक । आसनें डळमळूनि इंद्रादिक । शरण गेले ब्रह्मया ॥१५॥ हें जाणोनि हेमकसिपुप्रति । ब्रह्मा आला पावोनि प्रीति । वर त्रय माग ह्मणे स्वयजोति । स्वयंभु चतुरानन ॥ १६ ॥ येरें केलें साष्टांग प्रणम्य । वर मागता जाला अनुपम्य । त्रैलोक्याधिपत्य रम्य । अद्वैत प्रभुता मज धावी ॥ १७ ॥ अशेष विजयो देई आतां । तथास्तु ह्मणे तो विधाता । मज मृत्यु नसावा तत्वता । ब्रह्मा ह्मणे हें न घडे ॥ १८ ॥ मृत्यु निरसावा जेणें योगें । तया योग्य नाहींसि तूं निजांगें । देहममतेसारिखें मार्गें । त्यासी वैराग्य पाहिजे

---

१ वराहावतारात विष्णूनें पृथ्वीस आपल्या दाताच्या टोंकावर धरिलें होतें. २ हिरण्यकश्यपु. ३ हा भक्तिरहस्य ग्रंथ. ४ हिरण्यकश्यपु. ५ सर्व जग जिंकण्याचा. ६ नियमन केलें. ७ अग्नि.

॥ १९ ॥ जितुका जन्मला प्राणी । तितुका नाशेलि हे वेदवाणी । स्वकाळें सर्व शमती हें पुराणीं । प्रसिद्ध च आहे ॥ २० ॥ दैत्यपति ह्मणे सत्यलोकपति । मज मृत्यु नसो दिवसा निशीप्रति । स्वर्गी पाताळीं अथवा क्षितीं । नसो सचेतनें अचेतनें ॥ २१ ॥ जळें अनळें न हो विपें । शस्त्रें शापें येणें मिसें । मानव दानव सुरवेषें । सजीव अजीवें नसावा ॥ २२ ॥ ब्रह्मा ह्मणे दैत्यनाथा । इच्छिलें पावसी नान्यथा । हरिभक्त न द्वेषीं सर्वथा । तन्मुळें मृत्यु तुजलागि ॥ २३ ॥ करितां हरिभक्ताचा द्वेष । घडोन येती सर्व हि दोष । तयासी कैंचा गा संतोष । अविनाश नाशे तत्वतां ॥ २४ ॥ ऐसें सांगोनि दैत्य राष्ट्रा । स्वस्थानासी गेला त्वष्टा । यानंतरें सामर्थ्या उत्कृष्टा । प्रकाशी रविकिरणेव ॥ २५ ॥ दिनकरोदयीं गगनभरीं । तारा तारापति लोपती अंबरीं । तैसा देवांसहित देवेश अमरपुरीं । हतप्रभ जालासे ॥ २६ ॥ जैसी निराभासीं साभासता । अपार प्रकाशिली स्वतां । तैसी हिरण्यकसिपूची सत्ता । ब्रह्मयरें सर्वत्र ॥ २७ ॥ यानंतरें सुर शरणागत । कर जोडूनि बोळगती दूतवत । आज्ञाधारक सेवकभूत । राज्य दैत्यनाथाचें ॥ २८ ॥ तयाचे आज्ञेप्रमाणें । चालविती ब्रह्मांडकारणें । दंड नीति मुद्रा धरणें । शास्ता दैत्याधीश तो ॥ २९ ॥ कुबेर तयाचा भांडारी । दिग्पाळ ज्याचे भेटेकरी । एवढेन ऐश्वर्ये राज्य करी । राजा हिरण्यकश्यपु ॥ ३० ॥ तयाची जे कां पुण्यवधू । परम पतिव्रता कयाधु । तयेचे उदरीं गुणसिंधु । गर्भ असतां प्रल्हाद ॥ ३१ ॥ ते पुरंदर[2] बंदीं होती । जैसी विपर्यी वेष्टिली मति । शोकरूप असतां तयेप्रति । सद्गुरु नारद प्रबोधी ॥ ३२ ॥ तेणें[3] शुद्ध शास्त्रबोधें । प्रल्हाद गर्भामाजि बोधे[4] । दैत्येशें देव जिंतोनियां युद्धें । निजांगना आणिली उत्साहें ॥ ३३ ॥ नगरीं लागलें वाधावणें । घरोघरीं गुढिया तोरणें । मंगळ वाद्यें वाजती निशाणें । प्रताप वर्णिती प्रभूचा ॥ ३४ ॥ भुवनत्रयाचेनि ऐश्वर्ये ।

१ ब्रह्मदेव. २ महात, किंवा हत्ती राखणारा. ३ त्या नारदानें केलेल्या. ४ बोध घेई. ५ मूळ भाऊणें.

राजा शोभे सर्व कार्यें । महर्षी स्तविती परमाश्चिर्यें । तपसामर्थ्य तयाचें ॥ ३५ ॥ नवविधा भक्ति नव मास । पूर्ण प्राप्ति अष्ट भाव पूर्ण दिवस । स्वप्रकाश बोधपुत्र जाला तीस । भक्तराज प्रल्हाद ॥ ३६ ॥ रायें केला परम सोहळा । पुत्रमुख अवलोकिलें लीळा । तेणें पुण्यें हरि घन-नीळा । प्रत्यक्ष दृष्टीं देखेलि ॥ ३७ ॥ बहुत केलें दानपुण्य । केलें स्वस्ति पुण्याहवाचन । त्याचें फळ हरि जगज्जीवन । साक्षात्कारें भेटेलि ॥ ३८ ॥ हो कां भक्ति अथवा वैर । पावलिया परमेश्वर । सांसारिक पूर्व शरीर । सांडावें चि लागे ॥ ३९ ॥ विष्णु आत्मा निर्विशेष । तयाचे स्वरूपीं होय प्रवेश । तो च जाणा प्राप्तिपुरुष । वैरें अथवा भक्तितां ॥ ४० ॥ आतां असो हें राजपुत्र । वाढों लागला लीळां स्वतंत्र । तेणें चरितें अति विचित्र । विरुद्ध मानी भूपाळ ॥ ४१ ॥ बोलों सिकतां च प्रल्हाद । ह्मणे हरि नारायण गोविंद । दैत्य ह्मणती हा प्रमाद । जीवनाश होईल ॥ ४२ ॥ तूं जयाचा आत्मज । विरुद्ध बुद्धि तयासी तुज । हें तरि मांडलें परम चोज । निर्द्वंद्वीं मिथ्या द्वंद्वता ॥ ४३ ॥ आइक बापा आमचा मंत्रु । तुझा पिता ह्मणे मी हरीचा शत्रु । तूं हरिभक्ति करितां पुत्रु । हरिरूप च किं जालासी ॥ ४४ ॥ तरि सांडी हें जनविरुद्ध । आह्मी प्रवृत्तीचे पंडित प्रसिद्ध । पूर्वमीमांसक अनुभवसिद्ध । प्रत्यक्ष प्रत्ययकारक ॥ ४५ ॥ प्रत्यक्ष देखिजे हें च सत्य । दृष्टीं न दिसतें असत्य । कर्मफळ तें च नित्य । पाविजे यथा कर्तृत्वें ॥ ४६ ॥ तुझा पिता परम तपें । भुवनैक भूप जाला प्रतापें । तैसा च तू हि पुत्र तद्रूपें । पावसी भववैभवा ॥ ४७ ॥ राजा कृपा करिल तुज । जना आवडेलि हें सहज । देवा प्रियकर हें काज । विषयानंदें नांदावें ॥ ४८ ॥ येथें काय करावा हरि । कर्मप्रधान चराचरीं । येणें सिद्धांतें अंतरीं । सांडी छंद हरीचा ॥ ४९ ॥ नाना दुर्बोध करिती जनीं । परि तो प्रल्हाद उत्पन्नज्ञानी । तो न भ्रशे हरिभजनीं । त्यांसी हि ह्मणे हरि ह्मणा ॥ ५० ॥ जो हरि कर्माचा भोक्ता । जो हरि कर्मफळाचा दाता । जो हा भोगा योग्य होय स्वतां । तो यत्न करूनि करीं दे[1] ॥ ५१ ॥

---

१ 'करीं दे' याऐवजीं 'स्मरावा' असा दुसरा पाठ आहे.

हरिनामस्मरणें कर्म । निउनां तें संपूर्ण होय हें शास्त्रवर्म । हरिभक्तियोगें सर्व धर्म । सिद्धीतें पावती हरिकृपां ॥ ५२ ॥ देखोनि प्रल्हादाचा निर्धार । पुरोहित जाले भयातुर । तयाचा सर्व समाचार । निवेदिला रायासी ॥ ५३ ॥ रायें पाचारिला प्रल्हाद । तवं तो देखिला अद्वयानंद । राम कृष्ण विष्णु गोविंद । ह्मणत च आला निःशंक ॥ ५४ ॥ नृपनाथ ह्मणे नंदना । कैसा स्मरसी दैत्यकंदना । मजदेखतां करिसी वंदना । नामें स्मरसी आवडीं ॥ ५५ ॥ माझिये उदरीं जन्मोनि । मज चि जालासी शत्रुस्थानीं । माझा वैरी ध्यानीं मनीं । वदनीं सदनीं स्मरतोसि ॥ ५६ ॥ ऐसा शास्त्रीचा निर्धारु । पिता तो च होय गुरु । पुत्र केवळ आज्ञाधरु । मम अवज्ञा करितोसि ॥ ५७ ॥ प्रल्हाद ह्मणे जी देहजनका । देह दयाळा प्रतिपाळका । तरि या देहांतरा अनेका । नेणवे जगदेक भूपति ॥ ५८ ॥ तुज मज सहित सर्व हि लोक । यांचिये जीवनकळेचा जनक । सर्व भूत सुहृद जगन्नायक । पाळक चाळक विश्वाचा ॥ ५९ ॥ तूं हि शरण जाईं तया हरि । तो आत्मा सर्व चराचरीं । तूं तयातें ह्मणसी वैरी । हा साडी मिथ्या अहंकार ॥ ६० ॥ दैत्य मरती देव तरती । हें आपुलिया सुष्ट दुष्ट कर्माची गति । आत्मा समान सर्व भूतीं । नारायण अनामय ॥ ६१ ॥ प्रल्हाद ह्मणे आइक ताता । जवं न कळे पितामहाचा पिता । तवं च पिता पुत्र देहममता । सत्य वाटे संसार ॥ ६२ ॥ प्रत्यक्ष हरिरूप चराचर । हरिमय तुझें शरीर । सर्व शरीरीं शौरि[1] अक्षर[2] । सांडीं नॊथिली[3] शत्रुता ॥ ६३ ॥ ऐसें बोलता प्रल्हाद । राजा पावला परम खेद । शुद्ध बोधें पावे प्रमाद । पाखंडी[5] जैसा ॥ ६४ ॥ सृष्टिक्रम कल्पिता ईश्वरें । भेद प्रतिष्ठिजे आदरें । तेणें[6] अभेदबोध लोपूनि शवळाकारें[7] । व्यापिलें विश्व भवजाळें ॥ ६५ ॥ तैसा विधिवरें कीळकर्यपु । भुवनत्रयीं कृत प्रतापु । ते देहतेचा ठायीं ज्ञानदीपु । पुत्र जाला प्रल्हाद ॥ ६६ ॥ तो मूर्तिमंत अ-

---

१ दैत्यांचे हनन करणारास २ आत्मा ३ ज्याचा नाश नाहीं असा. ४ लटकी. ५ नास्तिक. ६ भेदानें. द्वैतानें. ७ उपाधींच्या योगानें. ८ कीळ=प्रभा;

द्वैतबोध । त्याचा द्वैतपितया परम क्रोध । तन्मुळें आपणा माडला वध। न पाहे ह्मणौनि मुख त्याचें ॥ ६७ ॥ धरा धरा मारा मारा । मजपासूनि न्या दुराचारा । क्रोधें कापतसे थरथरा । दृष्टि गरगरा फिरतसे ॥ ६८ ॥ द्वैतशास्त्रशस्त्रीं छेदा । विषयबाणजाळें भेदा । सर्वेळगदाघातें चेंदा । करा मस्तक याचा ॥ ६९ ॥ तव प्रल्हाद परमानदीं । पुढें चाले राजबिदीं । भोंवतीं नागरिकाची मांदि । येरु हरिपदीं गर्जतसे ॥७०॥ रामा कृष्णा मधुमर्दना । सेवकपाळा सुखवर्द्धना । हरि माधवा जनार्दना । विश्वभरा हृषीकेशा ॥ ७१ ॥ गुज सज्जन बोलती । मिथ्या द्रोही हा भूपति । स्वप्रकाश आत्मजघाती । पापरूप तो हा च ॥ ७२ ॥ व्यर्थ याचा हा आवेश । हरि सर्वत्र स्वप्रकाश । मेघपटळे आकाश । काय लोपे पसरल्यां ॥ ७३ ॥ केसें बाळ हें वेल्हाळ । करी हरिनामें गदारोळ । विश्व जालेंसे प्रेमळ । ह्मणती देवा तू पावे ॥ ७४ ॥ ऐसा आला महाद्वारा । नगरीं होतसे हाकारा । दूत धावत सैरावैरा । प्रल्हादासी दंडिती ॥ ७५ ॥ नवल भक्तीचा निर्धार । करितु नामाचा गजर। वीर करिती शस्त्रमार । ते सकुमारा न लगती ॥ ७६ ॥ प्रल्हादासी लागती घात । ह्मणौनि पूर्ण च भगवत । विश्वरूपें सदोदित । होऊनियां राहिला ॥ ७७॥ मद मैंद गज प्रेरिले वरी । एए स्मरे नरकेसरी । भेणें पळती दुरीच्या दुरी । नृत्य करी हरिनामें ॥७८॥ दर्परूप कर्कोटर्क । पुछ पिळूनि क्षोभात्मक । वर्मागीं लाविले अनेक । विषम बुद्धीं उलथिले ॥ ७९ ॥ बाळ स्मरे गरुडध्वजा । विष निर्विष जालें सहजा। गळोनि पडले प्राणकाजा । पृथ्वीमाजि प्रवेशले ॥ ८० ॥ यत्रपात पर्वतपात । प्रल्हादासी न करी घात । प्रळयानळ सीतळ जळ होत । स्थळरूप तें हरिनामें ॥ ८१ ॥ नें तुटे न बुडे न उडे न जळे । हरिस्वरूप न सरे न चळे । तें प्रल्हादें प्रेममेळें । अतर्बाह्य स्मरिजेतें॥८२॥ नित्यस्मरणें तन्मयता । तो पावलासे तत्वता । सघन जाली सबाह्यता ।

---

१ उपाधी, माया. २ पांडित्य, निरूपण ३ उन्मत्त ४ मोठे सर्प. ५ श्रीमद्भगवद्गीता अ. २ श्लोक २३ पहा.

कैंचा नाश अविनाशा ॥ ८३ ॥ निकल्पदीप हि जननीहातीं । देवनिलें पुत्राप्रति । परि तो निर्विकल्प स्थिति । नामामृतें निर्भय ॥ ८४ ॥ सेवक सांगती भूपाळा । अभिनव प्रल्हादाची कळा । जाच नलगे एकि हेळों । नामें हरीची स्मरतसे ॥ ८५ ॥ राजा बैसे सिंव्हासनीं । प्रल्हाद आणिला धांहोनि । तुझा हरि तो कवणे स्थानीं । सांग आधीं वधीन ॥ ८६ ॥ बोले प्रल्हाद निर्भय । हरि सर्वात्मा अज अव्यय । आत्माघात तो स्वकीय । जीव पावे तद्देपें ॥ ८७ ॥ खड्ग कवळूनि रोषें पाहे । हरि या स्तंभामाजि आहे । होय क्षणता क्षणतांहे । धांयें स्तंभ उतटला ॥ ८८ ॥ फुटली करशातआरोळी । धाकें वसुधा हे डळमळी । तडक फुटला अंतराळीं । दश हि दिशा दुमदुमिल्या ॥ ८९ ॥ दाढा विकराळा व्यंकटा । नखाग्रिका अति तिखटा । ज्वाळा निघती नेत्रवाटां । आगी छटा तरकती ॥ ९० ॥ तेज अद्भुत प्रगट जालें । तेणें चराचर लोपलें । गगन सवनतां कोंदलें । सदोदित स्वयें च ॥ ९१ ॥ कैंचे जीव कैंचा भव । अपरांपर तेजार्णव । तेजें तन्मय जाले देव । देहस्मरण राहिलें ॥ ९२ ॥ हिरण्यकश्यपु देता हाक । भुवनत्रयीं पडला धाक । शमलें स्वंपद शबळकेटक । शुद्ध युद्धा मिसळले ॥ ९३ ॥ द्वंद्वयुद्ध अति तुबळ । होतां क्रमले बहुत काळ । भेदशत्रू हि प्रबळ । एकमेका आक्रमती ॥ ९४ ॥ कौतुक पाहाती सुर असुर । असुरा भेदाल्य नृपवर । सुरांसी अभेद नरहरि वीर । जयकल्पना करिताती ॥ ९५ ॥ तव पातली पूर्णवेळ । भेदित असतां तो भूपाळ । तें गवसिलें तनुतोमूळ । कंठनाळ फोडिलें ॥ ९६ ॥ शत्रु सव्हारिला भेदु । हरला त्रैलोक्याचा खेदु । प्रगट जाला परमानदु । जयजयकार निज विजयें ॥ ९७ ॥ स्वता शोधूनिया अशुद्ध । नरहरि-

१ क्षण. २ या चरणात जीं अक्षरें आहेत त्याऐवजीं 'हरिनामस्मरणसत्तें' असा दुसरा पाठ आहे. ३ हाका मारून, बोलावून. ४ 'हाणताहे' असा दुसरा पाठ आहे. ५ उलला. ६ पृथ्वी. ७ किरण. ८ अपरपार=अगणित. ९ उपाधीरूपी सैन्य. १० आपल्या कचाटींत आणण्याचा प्रयत्न करीत. ११ शरिराच्या सर्व अवयवापैकीं मूळ किंवा मुख्य स्थान जें शिर तें.

रूपें तनुता शुद्ध । अंतरमाळा ले' प्रसिद्ध । स्वकीयाळंकारबुद्धीं ॥९८॥ सूक्ष्म समरसें स्वलीळा। सामरस्यीं भीति स्थुळा। ह्मणऊनियां अंतरमाळा। हरि स्वरूपीं मिरवितु ॥ ९९ ॥ अभेद हरि रूपीं केवळ । भासतां हि सूक्ष्म स्थूळ । स्वकीयावेषें अंतरजाळ । स्वस्वरूपीं मिरवितु ॥ १०० ॥ ज्याचा देह भक्तजनक । तो न ह्मणावा निरर्थक । ह्मणौनि केलेंसे सार्थक । अंतरमाळा लेऊनि ॥ १०१ ॥ भेदशत्रु वधूनि अभेद । जय पावलासे गोविंद । तो हि प्रताप करितां खेद । बोधप्रल्हाद सांवरी ॥ १०२ ॥ हरिपदद्वयें मेळऊनि । प्रल्हाद लीन जाला नमनीं । परमानंद प्रगट जनीं- । जनार्दनीं निज भेटि ॥ १०३ ॥ लक्ष्मीसंमिळित वामांकीं । नमन स्तवन केलें लोकीं । दास स्थापिला अभिषेकीं । आत्मभद्रीं निज भद्रें ॥ १०४ ॥ भक्ता स्वानददायक । कैंचा क्रोध वैरादिक। लीळा वैकुंठनायक । स्वकीय भावें तनुधारी ॥ १०५॥ करूनि दुष्टाचा संव्हार । श्रीहरि भक्तलोभापर । अदृश्य जाला सर्वेश्वर । देव गेले स्वस्थाना ॥ १०६ ॥ जे हें हरिचरित स्वभावें । गाती आइकती गौरवें । ते हरिरूप होती भावें । भवेंसहित प्रेमळ ॥ १०७ ॥ सर्व पुण्यश्रव सफळ । चरित श्रीहरीचें मंगळ । पुढें परिसोत प्रेमळ । परमानंददायक ॥ १०८ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । प्रल्हादोपाख्यान । नाम प्रकरण समाप्तम् ॥ ६२ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो अनंता ऐसें पद । नित्यत्वें स्तविती वेद । ब्राह्मण जो वेदविद । दिवसदिवसा वंदावा ॥ १ ॥ वेद ह्मणिजे वेदार्थ । वेदार्थी हि बहु पदार्थ । पूर्वपक्ष लक्षतें व्यर्थ । समर्थ एक सिद्धांत ॥ २ ॥ सिद्धांत ते हि परोपरी । षड्दर्शनें जाळीं जिहीं करी । वेदांत सिद्धांत निर्द्धारी । सय प्रत्ययकारक ॥ ३ ॥ तो हि सद्गुरुमुखें प्रबोध । प्रौढ

१ 'लेइला' असा दुसरा पाठ. २ परब्रह्मस्वरूपी सिंव्हासनावर. ३ शुद्धिवान.

शिष्या अनुभवसिद्ध । तो हि समाधिव्युत्थानप्रकार प्रसिद्ध । आखडैक सामरस्यें ॥ ४ ॥ अलक्ष लक्षणवत विचक्षण । तो च जाणा वेदविद ब्राह्मण । केवळ बहिर्मुख जें पठण । तें मनवहनैमात्र च ॥ ५ ॥ केवळ भारवाहक अविद । कळौ अनाचाराचा प्रमाद । अनाचारी न तारी वेद । अतीं जाय तजूनियां ॥ ६ ॥ ह्मणौनि वेदविद ब्रह्मनिष्ट । इतुका अर्थ जाला स्पष्ट । तो अभिवदितां वरिष्ट । ब्रह्मांडदेवतें वंदिलीं ॥ ७ ॥ ऐसिया ब्रह्मांडासी नाहीं अत । लीला प्रकाशी आकर्षी अनत । तो परब्रह्म शाश्वत सदोदित । साकार निराकार निर्द्वंद्व ॥ ८ ॥ तयासी अनन्य भावें प्रणम्य । कर्ता सहज तन्मय अनुपम्य । तयाचें भक्तिरहस्य रम्य । लीलाविलास चिद्रूप ॥ ९ ॥ तो कर्ता अकर्तृत्वाचा । तो तो हा ऐसा नव्हे साचा । तो सद्य स्वसवेद्याचा । प्रकाश आणि प्रकाशक ॥ १० ॥ याकारणें हरिप्रणामकैरिते । ते प्रणमितों अनन्य श्रोते । प्रल्हादाख्यानें पूर्व प्रकरणातें । निष्पत्ति जाली ॥ ११ ॥ आतां तया प्रल्हादाचा पौत्रे । वंश जयाचा पवित्र । तया बळीचें चारितचित्र । परिसा आल्हादकारक ॥ १२ ॥ तयासी बळि हें नामगौरव । यथार्थ जैसा सज्जनानुभव । जैसें प्रपंचार्चे नाम भव । भव सदा शिव सर्वत्र ॥ १३ ॥ विश्व ब्रह्म ऐसिया श्रुति । ऐसी च असे रुद्रपद्धति । ऐसी च ब्रह्मविदांची मति । अति यथार्थ तत्वार्थ ॥ १४ ॥ असो नामें रूपें अद्वैतबळि । त्यासी दुसरें नाहीं माडावया फळी । वृत्तियोगें सहज कैळी । माडली सुरासुरासी ॥ १५ ॥ आत्मता विश्व च निर्द्वंद्व । विश्वता विपर्यासयें द्वंद्व । स्वस्वरूप द्वंद्व ना निर्द्वंद्व । ज्ञानाज्ञान जीवाभा ॥ १६ ॥ प्रपचता ईश्वरलीळारोळ । ईश्वरलीळा जीवता अकळ । जीवेश्वर सामरस्यें सकळ । आहे तैसें च आहे ॥ १७ ॥ असो बळीची बळवत सेना । वेढा घातला अमरभुवना । दुदुभिडिंडिमिशखादि घोषें जना । बधिरता बाधक ॥ १८ ॥ सुर सिंव्हनादें गर्जत । चतुरंग सेना मदो-

१ समाधिसुख पूर्णपणें अनुभवास येणें २ केवळ मनाला नेणारें, वागविणारें. ३ करणारे. ४ समाप्ति. ५ नातु. ६ खेळ, कलह अथवा युद्ध. ७ कलह. ८ आभ=प्रतिबिंब.

न्मत्त । युद्ध मांडलें अद्भुत । कोलाहळ होतसे ॥ १९ ॥ मंत्रतंत्रवंत नाना शस्त्रें । शक्तिसामर्थ्यें चित्रविचित्रें । हाणती रुधिरांग भग्न गात्रें । वीर पडती रणभूमीं ॥ २० ॥ दैत्य पावती मरण । तेणें निरशे युद्धसीण । अमरां मरणांत वेथा प्राण । [१]ते हि नवजाती रणीं ॥ २१ ॥ कल्पांत युद्ध होतां ते काळीं । भये फुटली देवांची फळी । अमरावती साडूनि केली पळापळी । प्राण घेऊनि निवाले ॥ २२ ॥ बळि जाला जयवंत । त्रिभुवनींचें राज्य करित । सुर मेरूचे गुहेमाजि दैव[२]हत । काळ बहुत क्रमिती ते ॥ २३ ॥ ऐसें देखोनि देवमाता । अदितीं जे कश्यपकांता । तिनें महत्तप मांडिलें भगवंता । सुप्रसन्न करावया ॥ २४ ॥ पुण्य देशीं महा वनीं । इंद्रियें नेमूनि[३] अनेशनीं[४] । अचळ भगवंताचिये ध्यानीं । नाना तपें तपतसे ॥ २५ ॥ हें जाणवलें दैत्यनाथा । तिसी करावया वेथा । दैत्य पाठविले सर्वथा । रूपें धरूनि देवांचीं ॥ २६ ॥ मिथ्या वेषी ते कृत्रिम । भजनभाव दाविती परम । वंदन करूनि सप्रेम । प्रार्थिते जाले विनीत ॥ २७ ॥ माते तूं आह्मांकारणें । बहु कष्टली जीवें प्राणें । धिगि आह्मा पुत्रांचें जिणें । कष्ट तुझे न चुकवसी ॥ २८ ॥ मिथ्या वैराग्य बोलती । ज्ञानगोष्टी प्रतिष्ठिती । आह्मा नलगे अमरावती । सुखी आहों विवेकें ॥ २९ ॥ आतां सिणो नको माय । चाल ह्मणोनि वंदिती पाय । परि ते हरिपरायणा काय । पाषांडानें चळेलि ॥ ३० ॥ न चळे तयेचा निर्धार । मग ते दैत्य देही भयंकर । दंष्ट्राग्रपीडणें वैश्वानर । पाडूनि वन्हि लाविला ॥ ३१ ॥ कित्येक योजनें तें वन । शुष्क तृण काष्ट निबिड गहन । वन्हि न करी च तपस्विनीदहन । आज्ञा प्रमाण हरीची ॥ ३२ ॥ तिसी सुदर्शनाची घरटी । काय करिती बापुडे कपटी । त्याचें कपट त्याचे पाठीं । जळोनि गेले पतंगवत ॥ ३३ ॥ वन विझोनि गेलियापरि । तेथें प्रगटला श्रीहरि । जैसें भ्रमपटळ भस्मल्या निर्धारीं । आत्मा प्रगट तुरियेसी[५] ॥ ३४ ॥ प्रत्यक्ष परमात्मदर्शनीं । तुरिया च होय

१ प्राण. २ दैवानें सोडल्यामुळें. ३ नियमन करून. ४ निराहार करून. ५ तुर्यावस्थेमध्यें.

उन्मनी । तैसी ते आत्मानुभव स्पर्शनीं । आनंदमया सुरमाया ॥ ३५॥ अष्टौभाव दाटले तन्मयें । पदद्वंद्व अभेद वंदी स्वयें । निराकार च साकार अव्ययें । दृष्टीं देखे भगवंत ॥ ३६ ॥ भगवद्दर्शनें तन्मय दृष्टि । परमानंदमय सृष्टि । ऐसिये चिन्मय पुष्टीं । पाहे परमेश्वरासी ॥ ३७ ॥ चतुर्भुज अंबुजनेयन मेघशाम । पितांबरधर सुंदर मनोनयनाभिराम । दिव्यालंकार दिव्य गंधमाल्यें मनोरम । शंखचक्राब्जगदाधर ॥ ३८ ॥ वरद उदार दीनबंधु । आर्त्तहर्पद कारुण्यसिंधु । अनन्य भावें स्तविद्विधु । जैसी परा प्रवर्त्तका ॥३९॥ जय अनंता अच्युता अपारा । जय अप्रमेया अव्यया अनाधारा । जय सगुणा सुंदरा विश्वाधारा । विशेष आश्रिताश्रया ॥४०॥ जय जय व्याप्य व्यापका । जय जय भक्तसंस्थापका । जय जय वैकुंठनायका । जय जगज्जीवना ॥ ४१ ॥ तपस्तवनें तुष्टमान । माग माग ह्मणे मधुसूदन । अदिती देवमाता वंदन । करूनि विनवी हरीसी ॥ ४२ ॥ देव निर्दैव बहुत काळ । त्यांचा तुज च करणें सांभाळ । तरि स्वर्गीं स्थापी अविचळ । निःकंटक निर्द्वंद्व ॥ ४३ ॥ तयेसी ह्मणे कैठभारि । मी येईन तुझिये उदरीं । कर जोडूनियां सुंदरी । विनवी-तसे विनीता ॥ ४४ ॥ जी जी विश्वरूपा विराटा । तुज कोण वाहों शके वैकुंठा । धराधारका कोमळ कमठा । नारांश्रया निरंजना ॥४५॥ तू आपुलेन सामर्थें वोजें । वाहासी विचित्र विश्ववोझें । तुज वाहावया श्रीहरि माझें । सामर्थें किती श्रीपति ॥४६॥ विष्णु ह्मणे नाभि नाभि । जे हृदयीं मी पद्मनाभि । जयाचे वदनजळदाभीं । नाम माझें सर्वदा ॥ ४७ ॥ तयाचा भार वसुंधरे । कीं त्याचेन योगें वोझें हरे । तरि मी श्रीहरि उदरीं वसता सुंदरे । भयद कीं भयप्रहारी ॥ ४८ ॥ मी संतुष्ट तुझेन भावें । ह्मणौनि वाटे उदरा यावें । तुझिया पुत्रा स्वर्ग द्यावें ।

---

१ वळानें. २ कमलनयन. ३ दुःखी जनांस आनंदविणारा. ४ मुळांत अशीं च अक्षरें आहेत. 'स्तवी मुनिवधु' असा दुसरा पाठ आहे. ५ परावाणी. ६ कांसव. ७ पाण्याला मूळ आश्रयभूत असा तू. ८ उत्तम, शुद्ध. ९ नकार. १० स्वर्गांतील आपआपलें स्थान.

करावे तुज कृतार्थ ॥ ४९ ॥ दंडवत वदी अदिती । अदृश्य जाला लक्ष्मीपति । एरि एऊनि पुत्रांप्रति । आश्वासिलें तयासी ॥ ५० ॥ मग स्वपतिप्रति प्रीतीं । येऊनि प्रणम्य करी युवति । ह्मणे जी तपस्तवनें सुनीळाकृति । प्रसन्न जाला पुत्रत्वें ॥ ५१ ॥ हें परिसोनियां कश्यपें । श्रीहरि आराधिला महत्तपें । तया दंपतिपासाव स्वरूपें । प्रगटला परमेश्वर ॥ ५२ ॥ तो अयोनिसंभव सर्वेश्वर । तेजोमय वामनाकार । प्रगटला शार्ङ्गधर । तपोफळ ऋषीचें ॥ ५३ ॥ योगेश्वराचें ध्येय । कीं सर्वोपनिषदाचें गेय । कीं अरूप अप्रमेय । वामनाकार साकारलें ॥ ५४ ॥ तो कश्यपअदितीचा सद्भाव । वाढों लागला स्वयमेव । ब्रह्म मूर्तिमत प्रादुर्भाव । लीळा ब्रह्मचर्याचा ॥ ५५ ॥ वेदविद्येचें अधिष्ठान । लीला संपूर्ण कृताध्ययन । स्वरवर्णोच्चार छंद मंळिन । तदुद्धारार्थ च काय ॥ ५६ ॥ जेणें स्थापिलें स्तंभेंविण ब्रह्मांड । तया कल्पिला पालाशदंड[१] । जो अनंत अद्वय अखंड । तया मुंजमेखळा[२] ॥ ५७ ॥ ब्रह्मसूचना ब्रह्मसूत्र । असत्याची सत्या विचित्र । त्रिवार त्रिगुणित स्वतंत्र । ब्रह्म ग्रथीं एकत्वें ॥ ५८ ॥ केला कश्यपाचा अंगिकार । मूळ उत्तरी पीतांबर । कमळनयन अति सुंदर । छत्री जगदैक भूपत्वें ॥ ५९ ॥ मणिकुंडलें श्रवणीं स्वप्रकाशता । अभरणाभा शोभवी स्वता । कुमंडल पूर्ण जगज्जीवनता । सर्वसंगमुक्त स्वभावें ॥ ६० ॥ अतुळ ऐश्वर्यें देवादिदेव । सर्वथा न वर्णवे गुणार्णव । अवलंबूनि याचकभाव । बळीच्या यज्ञा चालिला ॥ ६१ ॥ तो बळि राजाधिराज । सर्व संपूर्णता उभारूनि ध्वज । अध्वर[४] मांडिला सबीज । अवदानें दानें परिपूर्ण ॥ ६२ ॥ बळिराजराजधानीमाजि । वटु प्रवेशला सुरकाजीं । भोंवतीं जनपदाची रुंजी[६] । कमळा करी भ्रमरेंव ॥ ६३ ॥ सज्जन ह्मणती हा चिद्घन । याचे न कळे हो महिमान । मूर्तिमंत निरंजन । गुणीं त्रिभुवन ठेंगणें ॥ ६४ ॥ नारी

---

१ अशुद्ध. २ पळसाची काठी. ३ मुंजाच्या वेळीं बांधलेलें कटिसूत्र. ४ यज्ञ. ५ गर. ६ गुंजारव.

वोवाळिती जीवें प्राणें । कवणें सदेवेचें कोडिसे बोणें । मनोनयन निवती येणें । धन्य कुसी याचेन ॥ ६५ ॥ समानसीळ मिळाले वटु । ह्मणती हा आह्मां सर्वांचा प्राण पटु । क्षणयेक राहो आह्मा निकटु । त्याचेन छंदें चाळती ॥ ६६ ॥ ऐसा तो विश्वमनोहर. । वेगीं पावला राजद्वार । भीतरीं प्रवेशला सत्वर । जैसा रवि नभमंडपीं ॥ ६७ ॥ देखोनि तयाचें स्वरूप । तन्मय जाले ऋषि भूप । प्रणम्य करूनि विश्वदीप । पूजिला वळीनें अनन्य ॥६८॥ वळीनें देखतक्षणीं तत्काळ । चित्तीं कवळिलें चरणकमळ । हें न विसंभावें सर्वकाळ । जीवें सर्वस्वें सर्वदा ॥ ६९ ॥ विनीतांग कृतांजळी । स्वानंदें स्तवी राजा वळि । स्वामीच्या आगमनें तत्काळीं । धन्य जालों कृतार्थ ॥ ७० ॥ स्वामीचा घडला योग । आतां सफळ जाला याग । आजि सर्व कर्म धर्म प्रसंग । फळलीं व्रतें तपदानें ॥ ७१ ॥ पुनःपुना प्रणम्य करी । परमानंद वाह्य-अंतरीं । शरीरसंपदा ते अर्थ्वेरीं । सक्त केली निजलाभें ॥ ७२ ॥ प्रथमारंभीं एतक्षणीं । स्वस्ति बोलिला चक्रपाणी । उभय पक्ष रक्षूनि मुळीची वाणी । वदली वेद जननी जे ॥ ७३ ॥ ब्रह्मघ्न ब्राह्मण निर्धारीं । अवंदनाशीर्षे संपदा हरी । मृत्युलोकीची नश्वर हरी । हरूनि सांडी तत्काळ ॥ ७४ ॥ स्वस्ति कल्याण हे विष्णुवैखरी । विपरीत नव्हे काळांतरीं । अविनाश करावया श्रीहरि । उभय सार्थकता योजी ॥७५॥ वामन ह्मणे राया तूं दीक्षित । तुज मौन असे उचित । तथापि स्तवन करिसी बहुत । ऐसा नव्हे कर्मविधि ॥७६॥ वळि ह्मणे जी गुणनिधि । तवंचवरि विधानविधि । तव दर्शनें कार्यसिद्धि । जर्व नव्हे तत्वता ॥ ७७ ॥ वळि ह्मणे जी स्वामी नाथा । आज्ञा करावी धरावया माथां । स्वामी सर्वार्थ संपूर्ण सर्वथा । दीनोद्धारार्थ प्रार्थना ॥ ७८ ॥ वामन ह्मणे महाराज । तत्वता माया नाहीं मज । लीलावलंब तनुता सहज ।

---

१ कोड=कौतुक, इच्छा. २ बाण=टसा ३ समर्थ, कुशल, ४ अवसरीं. ५ ब्रह्मघ्न=ब्रह्महत्या करणारा. ६ ज्याला वदन करूं नये असें सांगितलें आहे त्याच्यापुढें शिर नमविलें तर. ७ नश्वरता.

तदर्थ गुंफा करावी ॥ ७९ ॥ माझीं त्रीणि पदें मेदिनी । भावें अर्पी मजलागूनि । भूमिदानाचा महिमा जनीं । अच्युत पद पाववी ॥ ८० ॥ राजा ह्मणे इतुकें च पुरे । वामन ह्मणे नलगे दुसरें । दिधलें ऐसें दृढ निर्धारें । बळि बोले आत्मता ॥ ८१ ॥ यानंतरें दैत्यगुरु । करिता जाला हाहाकारु । हा विप्र नव्हे चक्रधरु । दैत्यकुळदावानळ ॥ ८२ ॥ भूमिदान यासी न करी । इतुकी माझी आज्ञा करीं । बळि ह्मणे जी अवधारीं । हा हरि तरि विन्मुख हों नये ॥ ८३ ॥ यज्ञ दान व्रत तप । हरिप्रीत्यर्थ करिती पुण्यरूप । तो हरि गृहासी आला अर्पेआप । यज्ञभोक्ता सुभाग्यें ॥ ८४ ॥ आतां हे नश्वर शरीरसंपत्ति । वंचूनि विमुख होवें श्रीपति । कीं सर्व समर्पूनि करूं ख्याति । उत्तम काय विचारा ॥ ८५ ॥ हा मम पूर्वजांचा घातक । तो माझां द्वारीं आला याचक । याहूनि यश कीर्ति पुण्य अधिक । काय आहे याहूनि ॥ ८६ ॥ वामन ह्मणे संकल्प करीं । बळीनें घेतली कनकझारी । शुक्र प्रवेशला भीतरीं । जळ बाहेरि निघेना ॥ ८७ ॥ मग विप्रेवेंपें घेतला कुश । अविनाशता न करी नाश । द्वैतनेत्र भंगी सावकाश । जाला संपूर्ण संकल्प ॥ ८८ ॥ तो अद्यापि अद्वैतनयन । शुक्र जालासे तेथून । असो विश्वादेखतां वामन । वाढला मर्यादेवेगळा ॥ ८९ ॥ एक पद भरलें भूमंडळ । द्वितीयें उंविलें अंतराळ । ब्रह्मांड भेदूनि प्रगटलें जळ । शुभ्र निर्मळ पदधौत ॥ ९० ॥ अन्य कथा गिरिजाविवाहीं विधाता । रेतपातें अपवित्र ते विश्वमाता । शुद्ध करावया अभिषेकता । भुवनत्रयतीर्थें आणिलीं ॥९१॥ अवशेष जवळीं होतें जळ । तेणें प्रक्षाळिलें हरिचरणकमळ । ते हे त्रिपथगा केवळ । मंदाकिनी गंगा भोगवती ॥ ९२ ॥ हे हरिहरब्रह्मस्वरूप । विधि वर्णूं न शके महिमा अमूप । सेवनें स्मरणें ईश्वरस्वरूप । जीव पावती सर्व्वज ॥ ९३ ॥ कलियुगीं निरपाय साधन । केवळ भावें गंगास्नान । भाग्यवत करिती सज्जन । ते विमुक्त होती कुळेंसीं

---

१ पर्णकुटिका. २ शुक्राचार्य. ३ नश्वर. ४ वामनानें. ५ सोपे.

॥ ९४ ॥ असो त्रिपदात्मा त्रिविक्रम । त्रितीय पदयोगें योगाभिराम । संपूर्ण सिद्धिद निरोपम । वळि अर्ची स्वनिवेदनें ॥ ९५ ॥ यरि दडवत पडला जळा । ह्मणे हरि पद ठेवीं हृदयकमळा । तत्काळ च नेला पाताळा । राजा केला सुतळींचा ॥ ९६ ॥ सहपरिवारें श्रीहरि । इंद्रोपम करी पाताळांतरीं । विशेष आपण राहिला द्वारीं । द्वारपाळ होऊनि ॥ ९७ ॥ सर्व ऐश्वर्येसीं सर्वेश्वर । होऊनि राहिला जयाचा किंकर । तयाहूनि दुसरा थोर । कवण आहे त्रिभुवनीं ॥ ९८ ॥ धन्य बळीची पुण्य कीर्ति । भक्तया आराधिला विश्वमूर्ति । होतां जयाची नामस्फूर्ति । महा पातकें नाशती ॥ ९९ ॥ सर्व भावें बळि बळी । कथाश्रवणपठणपुण्य हि बळि । जो प्रेमें करिल भाग्यबळी । तो हरिपद पावे सज्जन ॥ १०० ॥ स्वस्ति श्री ते बळीची च । हरि-हरपरायण ज्याचा वंश च । जयाचा पुत्र हि बाणासुर साच । गण होय सदाशिवाचा ॥ १०१ ॥ संक्षेपें बळिआख्यान । यथामति केलें स्तवन । अम्र हरिकथा ते सुमन । परिसोत कां सादर ॥ १०२ ॥ स्वस्ति श्री-मद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । बळिपातळप्रवेशो सुरसंकटहरणं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ६३ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो कळत च अकळा । नमो सकळत्वेंविण सकळा । नमो समळेंविण निर्मळा । शोकरहिता स्वानंदा ॥ १ ॥ नसोनि भासे भासोन नसे । ऐसें अविश्वीं विश्व प्रकाशे । द्वैतत्वाभा तेथिंची असे । ते तद्रूप च कीं स्वभावें ॥ २ ॥ तेथिच्या समळत्व सापेक्षा निर्मळता । हें केवीं घडे अधिष्ठाना अद्वया सदोदिता । ह्मणौनि पदार्थपारगतत्व कुशळता । नचले स्वात्मस्वरूपीं ॥ ३ ॥ ऐंयिची ज्ञातुत्व श्लाघ्यता वेगळी उरे । तरि

---

१ सप्त पाताळापैकीं तिसरें तळ. २ ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणचो. ३ या मायिक कर्मभूमींतील.

ते महा मूर्खता अति धिःकारे । हा हि उल्लेख ज्ञप्तिमात्रत्वें मुरे । ते स्वसंवेद्य स्वस्थिति ॥ ४ ॥ आतां अधिष्ठान विवर्त्तरूप । स्वयें स्वसंवेद्यस्वरूप । परत्वाभासें हि अर्पेआप । भिन्नाभिन्नाभा अभिन्न ॥ ५ ॥ जें साकार ना निराकार । तें च साकार निराकार। अविकार ना सविकार। सर्वात्मा अनत स्वतां ॥ ६ ॥ अनन्य प्रणम्य तया अनंता । तत्पुण्यफळें पारुपली अन्यता । स्वतसिद्ध भज्यभजकता । सर्व प्रकारें अनंत ॥ ७ ॥ पूर्व प्रकरणीं आत्मनिवेदनें बळि । अचळ राहिला हरिपद संमेळीं । सहज स्वर्गता जाली मोकळी । देव वृत्तीवरी आले ॥ ८ ॥ सकळां समसमाधान । भुवनत्रय आनंदवन । देव ऋषि करिती स्तवन। जयजयकार हरीचा ॥ ९ ॥ भक्तिरसामृत भूमंडळीं । सुसेव्य सर्वदां असतां जवळीं । पाप संताप दुःख दारिद्र कैंळीं । काय करिती बापुडीं ॥ १० ॥ भगवद्भक्तिरसामृतपानें । नित्यतृप्ति श्रवणाननें । परमानंद पाविजे तनुमनें । श्रीहरि रक्षी सर्वदां ॥ ११ ॥ ते भगवद्भक्तिरहस्य कथा– । श्रवणें, सर्वसुख पाविजे सर्वथा । तरि परिसावी भावें सज्जनीं यथा- । मति आतां बोलिजेलि जे ॥ १२ ॥ परशुराम एकांग वीर । नाहीं द्वैतसेनासभार । स्वसवेद्य सर्वेश्वर । अवतरला निःप्रपंच ॥ १३ ॥ प्रबोधजमदग्नि जनक । मूळमाया जे अलोकिक । ते च रेणुका तुरियात्मक । जननी होय तयाची ॥ १४ ॥ तत्वता तो स्वतसिद्ध सहज । तयासी जनक जननी हें चोजें । तथापि करावया भक्तकाज । विचित्र लीळा अवलंबिली ॥ १५ ॥ षड्दर्शनें साही बंधु । आपण श्रेष्ट आत्मा अगाधु । विद्याअभ्यासीं गुणसिंधु । शिवपदीं प्रसिद्ध ॥ १६ ॥ आत्मसंपदेसीं सदोदित । निर्द्वंद्व सिद्धाश्रमीं नादत । तवं अन्यथाभास अकस्मात । सहस्रार्जुन पातला ॥ १७ ॥ तयाची जळक्रीडा मृगजळाकार । ज्ञानगंगावोघ सत्य साचार । तेणें विपरीत ज्ञान जोडूनि कर । विपरीत वोघ वळिलासे ॥ १८ ॥ ते रचना अवलोकूनि माया । विस-

---

१ केवळ ज्ञानस्वरूपामुळें २ जिरतो, पक्व होतो. ३ भोंग्रा, नमून दिसतें ते. ४ कलियुगामध्यें. ५ नवल.

रली पूर्णकाम स्वकीयालया । तें विपरीत देखोनि स्वामिया । पूर्णता क्रोध पातला ॥ १९ ॥ मग सर्वदर्शनें कुमरां । ह्मणे स्वमायेचा संव्हार करा । तयांसी करितां शद्वविधि विचारा । निपेधें निपेध पावले ॥२०॥ मग स्मरिला आत्मो आत्मज । सद्य समीप पातला सहज । स्वानुभव-सामर्थ्य तेजपुंज । अनन्यतां केलें प्रणम्य ॥ २१ ॥ बोधजनकें निर्धारीं । ताही संहारिलेसे कोपें करीं । आत्मा परशुराम आज्ञाधारी । स्वकार्यी अति तत्पर ॥ २२ ॥ छेदी ह्मणतां च स्वमाया । लागों नेदी च दुजया घाया । जीवता नव्हतां च ऐसया । स्वसामर्थ्यें निराशिली ॥ २३ ॥ स्वबोध संतुष्ट जाला थोर । माग माग ह्मणे वर । पुत्र ह्मणे मम माया सोहोदर । उठवीं आत्मसामर्थ्यें ॥ २४ ॥ मग ते हरूनि जड पूर्वदशा । अपूर्व प्रेरिलें स्वप्रकाशा । पावलीं तत्वता निजात्मवेशा । नामें रूपें प्रसिद्ध ॥ २५ ॥ मरण निरसूनि जिवें मारणें । जिवें मारूनि स्वयें जीववणें । क्रोधाहंकार टाकविला तेणें । बोध बोधल्या मुकला ॥ २६ ॥ मग तो स्वात्माध्यास देदिप्यमान । परशुरामें केला प्राशन । तो सहज च सर्वाधिष्ठान । शिवपदावलंबन अखंड ॥ २७ ॥ पुढें स्वकाळें कार्तिकवीर्यार्जुना । स्वदळें येणें जालें तया स्थाना । रेणुका अवलंबूनि कार्य सूचना । ह्मणे यासी अतिथ्य करावें ॥ २८ ॥ मुनि ह्मणे गा महीपति । तूं आजि आमुचा अतिथि । येऊनि आमच्या आश्रमाप्रति । आरोगेणा करावी ॥ २९ ॥ रायासी देऊनि आमत्रण । स्वाश्रमा आला ब्राह्मण । तव तो पूर्णकाम स्वयें आपण । अन्न प्रसवे कामगौ ॥ ३० ॥ मग आणूनियां मध्यानकाळीं । आरोगणा सारिल्या सकळीं । तवं एरु ह्मणे शुद्धबुद्ध निरंजनीं निर्मळीं । हे संपदा कोठूनि ॥ ३१ ॥ पाहे तवं संपदेचा घनु । स्वकळा प्रसवे कामधेनु । राजा ह्मणे तूं माझा यजमानु । गोदान हें दे मज ॥ ३२ ॥ पार्थिव तो विपरीतबुद्धि कृतघ्न । अधिष्ठानीं च योजिलें विघ्न । पारे तो

१ जमदग्नि. २ परशुराम. ३ भोजन करावें. ४ तृप्ति पावलेला. ५ कामधेनु. ६ कार्तिवीर्यार्जुन. ७ घन, मेघ. ८ राजा.

आत्मा परशुराम शबळेंन्न । वधील शुद्ध सामर्थे ॥ ३३ ॥ बोधऋषि ह्मणे राया । तुज तों उदंड आहे माया । आह्मां निर्ममाचेया ठायां । कामधेनु पाहिजे ॥ ३४ ॥ तें न मनी च तो दर्दैयविद । तनुतावळें करी बोधमुनिर्देछेद । मूळमाया स्वजाया पावली खेद । स्वर्गतीसंख्या-क्षतीं करी ॥ ३५ ॥ बोधमुनि सांडी देहावलंबन । दिव्यरूपें कवळिलें अधिष्ठान । मूळमायां मांडिलें ध्यान । आत्मया आत्मजाचें ॥ ३६ ॥ तो सद्य प्रगट परशुराम ॥ तवं मूळमायेसी जाला विराम । मग स्वसंवेद्य स्वानंदाभिराम । कार्यकारणता स्वयें ॥ ३७ ॥ मूळमाया आपण मुको-नियां । ह्मणे आइक अविनाशा आत्मजा आत्मयां । जितुकीं स्वर्गक्षतें शरिरा माझिया । पाँर्थिवाकारें देखसी ॥३८॥ तरिसर्व क्षेत्रीं क्षेत्राहंकार । तितुकियांचा करीं संव्हार । तें सर्तकंचुकें त्रिसप्तवार । महि करीं निः-कंटक ॥३९॥ मग ते सांडूनियां तनुता । सैंहाद्रीसी प्रगटे रेणुका माता । सर्व तीर्थी सर्वात्मता । ब्रह्मकर्म प्रकाशिलें ॥४०॥ यानंतरें तो अविनाश । करावया शत्रुचक्राचा नाश । एकांग वीर स्वप्रकाश । स्वसामर्थे चालिला ॥ ४१ ॥ सहस्त्रार्जुनाचया शृंगारवना । एऊनि लक्षिली सर्व रचना । राजवनकर आले सुमना । तयां सांगता जाला ॥ ४२ ॥ परशुराम ह्मणे वनकरां । जाऊनि सांगा नगरेश्वरा । झुंझावया एकांग वीरा । वेगीं निघें वाहिर ॥४३॥ क्रियारहित वचनवोळि । गौण मानिती सर्व हि माळी । तूं अलक्ष ब्रह्मवेष बहुत वळी । सहस्त्रकर तनु त्याची ॥ ४४ ॥ काम क्रोध मद मछर अभंग । सेना दुर्धर चतुरंग । तूतें तत्वता पाहातां आंग । निमिल्यमात्र दिसतसे ॥ ४५ ॥ रायासी जाणे भुवनत्रय । तुझें रूप दृश्य तन्हीं होय । तूं निर्द्वंद्व निःसंग झुंझसी काय । जाय आह्मीं मुक्त केलें ॥ ४६ ॥ भार्गव ह्मणे हें तत्वता । क्रियाहीन बोल ते

फोलतां । लक्षांशबाणें छेदिलें स्वतां । कर स्थूळ तयांचे ॥ ४७ ॥ अशुद्ध सबाह्य वाहे भडभडां । हाका देत धांवती दडदडां । बहुत पातले ध्यावया सुडा । तिहीं झगडा हारविला ॥ ४८ ॥ द्वंद्वयुद्धाचें कारण । करद्वय हें प्रमाण । अद्वैतशरें त्याचें खंडण । त्यांचें युद्ध निरशलें ॥ ४९ ॥ गतयुद्ध योद्धे अपार । करिती निरहंकार हाहाकार । ह्मणती सामर्थ्य अविनाशाचें थोर । एकांग वीर तत्वता ॥ ५० ॥ आइकोनि कार्तिवीर्य वीर्यवंत । रणभूमि पावला सेनेसहित । सर्व शब्द सेना गर्जत । नाना पदार्थप्रकारें ॥ ५१ ॥ नाना पदार्थ कल्पनार्थ व्यर्थ । तयामाजि परमार्थ एक समर्थ । तैसा परशुराम स्वतां कृतार्थ । मूळाहंकारें गर्जतु ॥ ५२ ॥ मूळाहंकार गंभीर घोषें । विश्व दुमदुमिलें परमावेषें । तेथें बहु गर्जना जीव रोषें । गळोनि गेलिया लघुत्वें ॥५३॥ एकांग वीर लक्षी मिथ्या अनेक । अनेकांसी तत्वता अविनाश एक । द्दष्टादृष्टि जाली निःशंक । महायुद्धा प्रवर्तले ॥५४॥ दृश्य कोपलें कटक सकळ । मोकलिले पंचबाण बाणजाळ । जैसें मेघपटळीं सूर्यमंडळ । आच्छादिलें निविड ॥५५॥ तवं तो निरींद्रिय निर्विनाश । तेणें निवारिले ते कर्कश । करावया विजातीयत्व सेनानाश । विवेकशर प्रेरिला ॥५६॥ आद्यंतवंत निर्धारधारीं । सेना संव्हारली अनिवारी । सहस्रार्जुन तो याउपरी । स्वयें विषम झुंझतु ॥ ५७ ॥ सहस्राकरीं सहस्रायुधें । नानाप्रकार विकार विविधें । अविनाश नाशूं पाहे कुबोधें । मोहनास्त्रादि प्रेरितु ॥ ५८ ॥ शस्त्रशस्त्रास्त्रें नानापरि । मंत्रतंत्रादि डोंबरी । जीवत्वारोपें भयंकरी । आकृति विकृति वेष्टितसे ॥ ५९ ॥ परि जो स्पर्शासी च नातुडे । तया आघात केवीं घडे । अविनाश ऐसीं बिरुदें पढे । वेदपुरुष जयाचीं ॥ ६० ॥ आतां विस्तार हा असो परता । जीवा ईश्वरा कैंचि समता । सर्व विषमाघात निवारिले स्वतां । स्वकीय सम सामर्थ्यें ॥ ६१ ॥ मग अलक्ष लक्ष निर्वाण शर । तेणें भेदिलें भेदजिन्हार ।

१ रक्त. २ सोडले. ३ गारुडविद्या. ४ औद.

जाला अन्यथाभास शत्रुसंव्हार । तेथें अपूर्व वर्त्तलें ॥ ६२ ॥ त्याचें जें कां हृदयांबुज । तेथें प्रगटलें चतुर्भुज स्वतेज । तें अधिष्टानीं प्रवेशलें सहज । द्वंद्व जालें निर्द्वंद्व ॥ ६३ ॥ कळेवर पृथक पृथ्वीवरि । तें हि अपृथकता[1] धरी स्वशरीरीं । छेदूनि नानाकारत्व कर कांडोरीं[2] । तंत्रिवाद्य[3] कृत चौंडका[4] ॥ ६४ ॥ मग स्वकीयानदें गदारोळ । स्वात्म उदकारें घाली गोंधळ । आनंदमय माया केवळ । स्वप्रकाशादिवीं उजळिली ॥६५॥ प्रतिक्षेत्रीं क्षेत्री[5] पृथकता दुर्मद । त्याचा केला समळोछिद । प्रत्यगावृत्ति त्रिसप्तवार स्वानंद । सदृढ केला तत्वता ॥ ६६ ॥ मी ब्रह्ममूर्त्ति मुकुंद । मम भक्त ब्राह्मण ब्रह्मविद । ब्रह्मरूप मम नामपद । संध्यारंभीं उच्चारिती ॥ ६७ ॥ केशव नारायण माधव । गोविंद विष्णु मधुसूदन वामनेव । निल्य स्मरती जे सदैव । ते पावती मद्रतीतें ॥ ६८ ॥ मी असतां तयांच्या मस्तकावरि । केवीं गांजू शकती दुराचारी । ह्मणौनि जितुका दुष्ट शस्त्रधारी । तितुका स्वकरें संव्हारिला ॥ ६९ ॥ निःकंटक राज्य हे माझी स्थिति । ते म्यां दिधली भक्तां ब्राह्मणाप्रति । बाप भक्तजनवछळ भृगुपति । स्वपदीं स्थापी सेवकां ॥ ७० ॥ शिवचाप ठेऊनि विदेहागारीं । शिवपद अवलंबी ब्रह्मचारी । तंव श्रीराम संपूर्ण कामावतारी । चेतुर्व्यूह अवतरला ॥ ७१ ॥ तेणें वरावया सीता चित्शक्ति । भंगिली भवकोदंडाची व्यक्ति । तें परिसोनियां अंगशक्ति । उडी घातली भार्गवें ॥ ७२ ॥ अयोध्येसी जातां वधुवरें । मार्ग रोधिला एकाग वीरें । कदरें मंडित वज्रकुठारें । करीं धनुष्यबाण कुमंडलु ॥ ७३ ॥ मस्तकीं मिरवती पिंगट जटा । शोभे कौपीन दिव्य कांसोटा । विशाळ नेत्र भाळ वक्ष दक्ष गोमटा । नीळतेज सुरंग ॥ ७४ ॥ वीरदृष्टीं भयदता वी[12] । छळवादें रामासी

---

१ एकात्मता. २ फाडें, तुकडे. ३ ततुवाद्य. ४ चवडकें=गोंधळी लोक वापरतात तें एकतारी वाद्य. ५ पाडिलं. ६ क्षत्रिय. ७ परशुराम. ८ विदेही जो जनक राजा त्याच्या शयागारात. ९ चतुर्व्यूह=वासुदेव, संकर्षण, अनिरुद्ध आणि प्रद्युम्न असे पृथ्वीस आधारभूत चार व्यूह आहेत त्यांच्या समुच्चयाचें नाव. १० या दोन चरणात जीं अक्षरें आहेत त्या ऐवजीं 'कर मंडित वज्रकुठारें। धनुष्य बाण कमंडलु ॥' असा दुसरा पाठ आहे. कदर=गुहा. ११ सर्वत्र सावधान. १२ अगकाति. १३ उत्पन्न झाली.

दटाधी । धनुप भंगिलें वीरवैभवीं । आतां मजसीं युद्ध करीं ॥ ७५ ॥ राम ह्मणे तू ब्राह्मण । मग केला धनुपाचा पण । रामें लाऊनि निर्वाण बाण । स्वर्गमार्ग रोधिला ॥ ७६ ॥ अन्य कथा लोकोत्तर । लोकमय दैत्य दुर्धर । तेणें तपता पावोनि वर । विष्णुदेहीं प्रवेशला ॥७७ ॥ तो परशुरामावतारीं । गुप्तरूप असे शरीरीं । तो श्रीरामें अलक्ष सामर्थ्ये शरधारीं । भेदूनि पाडिला कृतपणें ॥ ७८ ॥ ब्रह्मस्वरूपीं मिथ्या भेदु भासे । तो ब्रह्मसाक्षात्कारें निरसे । तैसा रामशरें परशुराम-देहींचा नाशे । लोकमय अलोकता ॥ ७९ ॥ तत्वता आत्मसामर्थ्य देखिलें । परशुरामें रामासी आलंगिलें । अंतरबाह्य समरसलें । भिन्न जालें अभिन्नत्वें ॥ ८० ॥ अविनाश ह्मणे रघुवीरा । आतां समाधान जालें अंतरा । एथूनि साभाळीं धर्म धैरा । आणि भक्त आपुले ॥८१॥ एकाकार ते दोघेजण । एक शरीर एक प्राण । एक आत्मा अवतार-कारण । गुण कीर्ति महिमा योग एक ॥ ८२ ॥ एकें अवलंबिलें मूळ कारणा । एकें माडिली धर्मधारणा । तयां उभयां नामरूपैक्य नारायणा । अनन्य भावें प्रणम्य ॥ ८३ ॥ अनन्य भावें अविनाश—। महिमा गाती आइकती अविनाश । ते पद पावती अविनाश । हा अविनाशशब्दार्थ ॥८४॥ आता देवभक्त लीळारोळ । कथा परमामृत कल्लोळ । परिसा हनुमंत-चरित रसाळ । भक्तिप्रेम रामाचें ॥ ८५ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । भार्गवअवतारवर्णन । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ६४ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो रामा सच्चिदानंदरूपा । नमो रामा भुवनैक भूपा । नमो रामा स्वसंवेद्या स्वस्वरूपा । नमो रामा चिन्मया ॥ १ ॥ नमो रामा सपूर्णकामा । नमो रामा भजकाभिरामा । नमो रामा मुनिविश्रामा । नमो

---

१ ह्मणून मी तुझ्याशीं युद्ध करित नाहीं, हें पुढें अध्याहृत आहे. २ पृथ्वी.

रामा रमेशा ॥ २ ॥ नमो रामा निगमबीजा । नमो रामा खगध्वजा । नमो रामा सर्वगुणसहजा । नमो रामा रघूत्तमा ॥ ३ ॥ नमो रामा तारकब्रह्मनामा । नमो रामा जगत्कारणधामा । नमो रामा सार्वभोमा सर्वोत्तमा । नमो रामा रमणीया ॥ ४ ॥ नमो रामेति वर्णद्वयें । सहस्त्रनामफळद स्वयें । चतुर्वेदाध्ययनान्वयें । परमार्थप्रदायका ॥ ५ ॥ नमो रामा निर्मळ गुणाकारा । नमो रामा परम धर्माधारा । नमो रामा परनारिसोहोदरा । नमो सीतापति रामा ॥६॥ नमो रामा सत्यपराक्रमा । नमो रामा अनंत विक्रमा । नमो रामा सत्यवाक्यविश्रामा । नमो रामा सत्यसंधाना ॥ ७ ॥ नमो रामा राजेश्वरा । नमो रामा देवेश्वरेश्वरा । नमो रामा योगेश्वरवरदवरा । नमो रामा आत्मया ॥ ८ ॥ नमो रामा श्रुतिकीर्त्तना । नमो रामा शतकोटिस्तवना । नमो रामा जगदेकवर्णना । नमो रामा अतुळेशा ॥ ९ ॥ नमो रामा निराकारसाकारा । नमो रामा अचिंत्या भुवनसुंदरा । नमो रामा अंबरावरा पीतांबरधरा । नमो भूषणभूषणा स्वप्रभा ॥ १० ॥ नमो वाचा वाचका वाचात्मका । नमो अर्थकल्पका अर्थात्मका । नमो परमार्थस्वरूपा अनंता एका । नमो अखंडानंदा अद्वया ॥ ११ ॥ प्रणमूनि राम अनन्य । श्रोते प्रार्थितसे जे धन्य । भक्तिरहस्य भुवनत्रय मान्य । परिसा कथा रामाची ॥१२॥ पूर्वप्रकरणीं परमात्मया रघुनंदना । प्रत्यगात्मा भार्गव भेटोनि गेला विजना । धर्मे धरा स्वभक्तजन सज्जना । अधिष्ठानीं निरऊनि ॥ १३ ॥ तो श्रीराम योगेश्वरविश्राम । सहजकृपाळु सर्वभूतीं सम । जनरंजन निरंजन मेघशाम । सेवकपाळ भूपाळ ॥१४॥ ईश्वरइच्छाअवलंबें । तत्काळ प्रगटती ऐश्वर्यबिंबें । तैसे भक्त पातले अविलंबें । श्रीरामचरणानुचर ॥ १५ ॥ तया सर्कळाचा मस्तकमणी । हनुमंत जो दास अग्रणी । जो एकादशानंतर शूळपाणी । भुवनत्रयीं प्रसिद्ध ॥ १६ ॥

---

१ योगिजनास वर देणारामध्यें श्रेष्ठ २ वाल्मिकी रामायण शतकोटि आहे, सात ज्याचें स्तवन केलें आहे असा ३ केशरी रंगाचें वस्त्र परिधान केलें आहे, असा. ४ सर्व भगाचा.

ते एकरूप शिवकेशव । तयांसी कैंचा भिन्नभाव । तथापि स्वामीसेवक हें लाघव । नरवानरसुवेषें ॥ १७ ॥ ते निरवयव निराकार । नित्य सत्य निर्विकार । निर्मळ निश्चळ प्रपंचात्पर । अभेद भेद विनोदें ॥ १८ ॥ जैसें स्वसंवेद्यीं वेद्य वेदन । तें अउभयतां उभयानुमोदन । तैसे हनुमंत रघुनंदन । स्वामी सेवक स्वात्मता ॥ १९ ॥ जयाची अखंड स्वरूपसत्ता । भासतां लीला विचित्र विश्वता । साभासनिराभासत्व स्वतां । अवलंबुनियां अलिप्त ॥ २० ॥ अन्यथाभास मिथ्या हें प्रसिद्ध । परि मिथ्या स्वयें भासेलि हें अबद्ध । तद्भासें अधिष्ठान जें शुद्ध । तें च ऐसें च कीं स्वयें ॥ २१ ॥ ऐसें जे कां अद्वयानंद । त्यांची स्वामीसेवकता अभेद । जयातें ऐक्यरूप वेदांतविद । स्तविती वेद हरिहरां ॥ २२ ॥ ऐसे जे कां शिव नारायण । ज्यांचें चरित श्रुतिपरायण । ते स्वामीसेवक व्हावया कारण । कारण कारणीं काय कळे ॥ २३ ॥ तथापि हि ऐसें गमें । पुराणाचेनि अंतर्यामें । शिवभक्ति कीजे विष्णुसर्वोत्तमें । सर्वदां मुख्य स्वरूपें ॥ २४ ॥ तरि तेणें च काय प्रतिकारें । शिवें हि एकादशावतारें । दास्य अवलंबिलें आदरें । अनन्य भावें रामाचें ॥२५॥ कीं रावणविद्रावणकामेण । क्षीरसागरा गेले सुरगण । महाविष्णूसि जाले शरण । वधावया तयासी ॥ २६ ॥ तयांसी वर दे शरणसखा । मी राम होऊनि वधीन देखा । परि तया शिवभक्ता बहिर्मुखा । शिवावांचूनि वधवेना ॥ २७ ॥ आणि मी नारायण होईन नर । तुह्मीं सुरवरीं व्हावें वानर । आतां जाऊनि प्रार्थावा हर । हरावया प्राण तयाचे ॥ २८ ॥ तवं शैलोधि नंदी शिवपार्श्वगेण । जैसा दुसरा त्रिपुरप्राणहरण । करितां शंकरार्धांगीं आरोहण । पार्वती शंके तद्रूपें ॥२९॥ तवं तो दुखी जाला अंतरीं । ह्मणे मज नलगे हे समसरी । जेणें विश्वमायाभेदजिन्हारीं । उ-

---

१ उभयता नसतांना, एकरूप असतांना २ त्या भक्तीची उलट फेड करण्याकारितां. ३ रावण आपला पराभव करील, आपणांस हाकून देईल या भीतीनें. ४ शैलादि=नंदीचें नांव. ५ शिवगण, सेवक. ६ शंकर. ७ प्रत्यक्ष दुसरा शंकरच आहे कीं काय. ८ नंदी. ९ समरसता, देवाभक्ताची एकात्मता.

रतां साम्यता विटंबे ॥ ३० ॥ जरि कृपाळु सदाशिव । निरसूनि ठेला भेदभाव । तरि मज भक्तिप्रेम आत्मगौरव । न मोडतां वरि भक्तता ॥ ३१ ॥ जरि मज सदाशिवस्वरूपीं समरसता । तरि काय भेदूं शकेलि अवलंबता । आणि भक्ति जनित्री हि होय स्वतां । शिवसायोज्यतेकारणें ॥ ३२ ॥ सुलक्षणीं विलक्षणाभास । तो तद्रूप च कीं सावकाश । तथापि स्वामिसेवकत्वावकाश । तेथें निउनाकृति वरिष्ठ ॥ ३३ ॥ ऐसें स्फुरतां भक्तांतःकरणीं । बाप स्फुरणकारण शूळपाणी । सर्वांतरसाक्षी ते च क्षणीं । अवलंविलें तें कार्य ॥३४॥ शंकरवरें बहिर्मुख जीव । मदोन्मत्त दशग्रीव । आला कैळासा अहंभाव । करी शैळाधि नंदीसी ॥ ३५ ॥ बहु गर्व करी अल्प । न विचारी आपुलें तप । शैळाधि नंदीस दिधला शाप । मर्कटमुख होय हा ॥३६॥ तवं तो ह्मणे रे मर्कटकरें । तुझा निपात होईल निर्धारें । दुर्मदोछेद कल्पूनि साक्षात्कारें । आत्मकार्यें निवाला ॥ ३७ ॥ तव ते च काळीं सुरभार । शरण आले स्तविती शकर । स्वामी रावणें गांजिलें थोर । तुज असतां शिरावरी ॥३८॥ ऐसें परिसोनि त्रिपुरारि । शैळाधि नंदीसी आज्ञा करी । तूं वानरवेषावतार धरीं । सन्हार करीं रावणा ॥३९॥ शैळाधि नदी आणि सदाशिव । यांसी तत्वता नाहीं भिन्न भाव । ह्मणौनि एकादशरुद्र महादेव । हनुमंत वानरवेषें ॥४०॥ स्वामीसेवकपणें दोघां जणां । निपात करणें रावणा । अन्य पारसावें कारणा । हनुमंतावताराचया ॥४१॥ महा योगेश्वरेश्वर चंद्रमौळी । इंद्रियें नेमूनियां सकळीं । दक्षिणामूर्ति महेश लाऊनि टाळी । योगारूढ एकांतीं ॥ ४२ ॥ हें जाणोनिया पार्वती । तेथें पातली सीघ्रगतीं । वक्षस्थळावरि घालूनि पोलख ती । योगारूढ बैसली ॥ ४३ ॥ तें बैसलें शंकराचे मनीं । कीं जैसा शिव तैसी च भवानी । तेणें हनुमंतावतार नटोनि । निःसंगता दाखविली ॥ ४४ ॥ आपुलेन स्वकीय सामर्थें ।

---

१ अपमान, नाश. २ शिवाय. ३ माता. ४ दशमुखी रावण ५ ‘करी’ या क्रियापदाचें कर्म ‘अहंभाव’. ६ याचा कर्ता ‘नदी’. ७ अहंकारयुक्त जिवाचा नाश. ८ अज्ञानदां लावून टाळी. ९ पाळणा.

शक्तीसी अलिप्त सर्व पदार्थे । यदर्थी मुळींचेन अर्थे । ऐसें च आहे ॥ ४५ ॥ कित्येक ह्मणती साकार निराकार । हा मूळमायेचा विस्तार । हरिहरब्रह्मादिक सुरवर । ईश्वरत्व मायाकृत आहे ॥ ४६ ॥ जेवढें ब्रह्म तेवढी च माया । तरि मुमुक्षु जो शुद्ध साधक तया । हे हि योग्य कां नव्हे भजावया । आत्मप्राप्तिकारणें ॥४७॥ यदर्थी ब्रह्मशास्त्र वेदांत । तयाचा परिसा शुद्ध सिद्धांत । ब्रह्म अविकार अद्वय अनंत । तद्विवर्त्त[1] ते माया ॥ ४८ ॥ विवर्त्त ह्मणिजे जैसें भासे । तैसें तत्वता हि नसे । सर्वथा नसोनि हि परि भासे । ह्मणिजे मिथ्या पोंथक्य[2] ॥ ४९ ॥ आतां विवर्त्त अद्वयब्रह्मींचा । तो ब्रह्मरूप च कीं साचा । ब्रह्मापासाव प्रादुर्भाव याचा । यापासाव ब्रह्म हें घडेना ॥ ५० ॥ ह्मणौनि समस्त खल्वि द ब्रह्म । ऐसें श्रुतितात्पर्याचें वर्म । तेथें मायेच्या भिन्नत्वाचा निर्गम । जाला च कीं सहज ॥ ५१ ॥ यालागि शिव तो च स्वयंभ । शक्ति मिथ्याभास लीलावलंब । तयेसी सदाशिव स्वप्रभ । दुसरें न सरे शिवतत्वीं ॥ ५२ ॥ तया शिवाचे शिवरूप भक्त । तन्मयत्वें होती शिवभजनासक्त । पृथकत्वें शक्तिता ते रिक्त । भ्रमभूत जीव सेऊंत[3] ॥ ५३ ॥ आतां असो शिव स्वतंत्र । तो च हनुमंतावतार विचित्र । आणिक परिसावें पवित्र । कारण रामदास्याचें ॥ ५४ ॥ शिवस्वरूपापासूनि पृथकता । ह्मणिजे अशिव अकल्याण जीवता । घर्मभस्ममय तनुता । भस्मासुर प्रगटला ॥ ५५ ॥ तो शिवाश्रयें अशिव । शिववरें वाढला जीव । तेणें कल्पूनि भव विभव । शिवत्वलोप माडिला ॥ ५६ ॥ जीवभस्मासुराचा शिरीं कर । तेणें भस्म व्हावें हा सहज वर । तरि याच्या सामर्थे हा ईश्वर । जिंतोनि याचें सुख भोगु ॥ ५७ ॥ परतला ऐसें चिंतूनि । तवं अदृश्य जाली भवानी । शिव अचळ परि पळायनीं । जैसे गगन दिसे घनें[4] ॥ ५८ ॥ जैसी मूळमाया चिंती आत्मया । तैसी

१ विवर्त=नसून दिसतें तें. २ अन्यत्व, पृथकता. ३ सेवन करोत. ४ आकाशात मेघ इकडून तिकडे धावत असतात व आकाश निश्चल असतें, परंतु वरवर पाहणाराला आकाशच धावत आहे असें वाटतें.

विष्णु स्मरे स्मरारिजाया। तेणें स्वस्वरूपें प्रगटोनियां। आश्वासिली शांभवा ॥ ५९ ॥ आदिमायेचें अधिष्ठिलें रूप। आरोपिला द्दश्य निग्रोधपादप। मायातीत तो अपेंआप। देवी लटिकी च दूसरी ॥ ६० ॥ तेथें देव देवता कांहीं च नसे। स्वयें आपण च अद्वैत असे। लीला विषमाभा भस्मासुर भासे। विषयभ्रमें भुलला ॥ ६१ ॥ तेणें विश्वमाया ह्मणौनि धरिला पदर। तव तो अधिष्ठानीं च मिथ्याकार। तद्वेषा वेधलें अंतर। आपपर विसरला ॥ ६२ ॥ तेणें छंदें नृत्य करी। स्वहस्त वैसता स्वशिरीं। भस्म जाला बाह्याकारीं। अंतरीं शिव स्वयंभ ॥ ६३ ॥ शांभवा सोडविली चक्रधरें। तें उत्तीर्ण व्हावया कर्पूरगौरें। रामावतारीं हनुमंतावतारें। सीता सोडेंऊ पातला ॥ ६४ ॥ ब्रह्मपुरोडाशीचे पिंड तीनि। एक एक पावल्या कौशल्या सुमित्रा तुरिया उन्मनी। एक अविद्याकैके करीं धरूनि। देहाभिमानें असंतुष्ट ॥ ६५ ॥ तो न लभे च बाह्यशोभे करीं। झडपूनि नेला विद्यालक्षणधारीं। स्पर्शें च कृतार्थ जाली परि। तयेसी हि तो नाकळे ॥ ६६ ॥ विद्या हि राहिली स्वस्थानीं। पिंड आला निरंजनीं वनीं। तेथें स्वानुभूती अंजनी। तिनें संपूर्ण सेविला ॥ ६७ ॥ तो हा देहाकारें हि अविनाश। हनुमंत अखंड अभंग स्वप्रकाश। करावया अन्यथाभासशत्रूचा नाश। एकांग वीर एकत्वें ॥ ६८ ॥ एरीकडे राम विश्वात्मा जनीं। अजन्मा प्रगटी कौशल्या उन्मनी। प्रत्यगात्मया सौमित्रालागुनी। तन्मयें तुरीयासुमित्रा ॥ ६९ ॥ मिथ्या अविद्याकैके रीतीं। चरफडी पडे रडे जीवभ्रांति। तये आश्वासूनि आत्मस्थिति। भाग आपुले अर्पिले ॥ ७० ॥ तुझा आमचा संतोष एक। तू कां दाविसी मिथ्या वेगळिक। तुह्मी आह्मी एकात्मक। मूळ भाग विभागिले ॥ ७१ ॥ वेगळिक सोडितां नांथिली। जीवीं च शिवता आथिली। विद्याअविद्या गांथिली। होऊनि ठेल्या समरस ॥७२॥ ब्रह्मभाग सेवितां तत्काळ। सबाह्य जालिया सम तेजाळ। प्रगटले

१ मदनांतक जो शंकर त्याची स्त्री, पार्वती. २ न्यग्रोध=वड आणि पादप=झाड. ३ सोडविण्याकरितां. ४ लटकी. ५ गांठिली, एक झाली.

ब्रह्म मूर्तिमंत केवळ । सर्व संपूर्णतायोगें ॥७३॥ तो चतुर्व्यूह सावेव । आत्माराम स्वयमेव । निर्गुण होत्साता गुणार्णव । अरूप रूपें सुंदर ॥ ७४ ॥ हनुमंत अंजनीतनयो । तयाचा परिसा अन्य कथान्वयो । प्राणाधिपति पवमान तत्तनयो । जो कां जगप्रसिद्ध ॥ ७५ ॥ वायु वसवी जगद्प्राण । तो प्रसिद्ध ईश्वराचा प्राण । तयाचें वीर्य उचंब-ळोनि जाण । पडलें नव पर्णावरि ॥ ७६ ॥ सहज अंजनी पर्णाशनीं । वीर्य प्रवेशलें जठरस्थानीं । तो हनुमत शिवावतार जनीं । स्तविती जया मुनिजन ॥ ७७ ॥ तो परम तेजपुंज बाळ । अंजनी निजवी सरसाऊनि जावळ । तंव देखिलें उदयभानुमंडळ । उडोनि गिळिलें फळभावें ॥ ७८ ॥ तें ऊष्ण लागलें कंठनाळीं । ह्मणौनि तत्काळ च उंगळी । सूर्यें आयुधाघातें ते वेळीं । हनुवटीवरि ताडिला ॥ ७९ ॥ तो लीळा विकळ जाला । देखोनि प्राणाधिपति कोपला । तेणें सकळासी निरोधें जाला । मग मिळाले सर्व हि ॥ ८० ॥ तेथें येऊनियां सुरवर । खजेंज केला अजरामर । वज्रशरीरी जगदैक वीर । सकळीं केला सकळात्मता ॥ ८१ ॥ शिवावतार तो स्वप्रकाश । विश्व सर्व तयाचें अश । तो हि विश्वमय हा विलास । अन्वयव्यति-रेकता ॥ ८२ ॥ हनुमटीवरि ताडिलें । ह्मणौनि हनुमंत नाम ठेविलें । भुवनत्रें विस्तारलें । सामर्थ्य तयाचें अद्वैत ॥ ८३ ॥ वानर पारी भुवन-सुंदररूप । स्वयंभ स्वप्रकाश हेमकछप । अंजनी ह्मणे तुजहूनि सबळ समर्थ लावण्यैक दीप । सर्वज्ञ अतरसाक्षी जो ॥ ८४ ॥ सर्व प्रकारें अधिक । तयाचा होई सेवक । तो राम सर्व तादात्मक । जगीं नाहीं दूसरा ॥ ८५ ॥ असो ऐसे देवभक्त । अव्यक्तता न मोडतां जाले व्यक्त । सहज स्वतां शक्ति व्यतिरिक्त । देखिले लीला किष्किंदे ॥८६॥ शेषाकावलंब स्वभावें । अमुतगयन केलें रावणें । देखतां च हनुमानें

१ पानें खात असताना. २ ओकून टाकलें. ३ सकळाचा प्राणवायु कोंडला. ४ ख=आकाश, त्यापासून जन्मलेला तो वायु, व त्या वायूपासून जन्मलेला तो हनुमान. ५ व्याप्ति व अव्याप्ति या दृष्टीनें. ६ शेषावतार जो लक्ष्मण त्याच्या मांडीवर डोकें ठेऊन.

सर्वभावें । मनीं मिठी घातली ॥ ८७ ॥ ते अंतरींची स्थितिपरीक्षा बाह्य प्रगटावया प्रत्यक्षा । साक्षि यावया स्वदक्षा । द्वंद्वचेष्टा मांडिल्या॥८८॥ बहु शाखाभेद टाकिले वरी । परि तो अवलीला निवारी । स्थूळ सूक्ष्म अपायोपाय केले परी । सहजें निरशी अविकप ॥ ८९ ॥ सापराधा करुणाकर । अनुजासी बोले कौतुकोत्तर । पाहे लक्ष्मणा अनुपम्य वानर । हेमकछेंप स्वयंभ ॥ ९० ॥ यासी देखोनि हर्ष वाटे । याचेन योगें वेळ कठे । याचें स्वरूप कैसें गोमटें । हा सदा जवळी असावा ॥ ९१ ॥ हा जीवा हि परिस आवडे । यावेगळें काहीं नावडे । हा सेवकशिरोमणी जोडे । तरि पात्र पूर्णकृपेचें ॥९२॥ ऐसें श्रीरामस्वामीनें बोलिलें । सबाह्य साक्षित्व पूर्ण बाणलें । हनुमतें लोटांगण घातलें । अनन्य केले दंडवत ॥ ९३ ॥ रामें सन्मुख बैसविला जवळीं । कृपामृतकरें स्पर्शिला मौळी । ह्मणे सुखी असावें सर्वकाळीं । मम प्रेमें पूरित ॥ ९४ ॥ देवा भक्ता जाली भेटि । अद्वयानद द्वयाचा पोटीं । कथा परिसती पढती श्रोत्रवक्त्रपुटीं । ते पावती प्रेमें हरिपद ॥ ९५ ॥ वर्णवे हनुमताचें दास्य । एवढें समर्थ कैंचें आस्य । स्वयें निःप्रपचता औदास्य । सेवा करी अनन्य ॥ ९६ ॥ सेवका अखंड निःप्रपंचता । स्वामी निःप्रपच प्रपंच स्वतां । सर्व स्वरूपें सर्वस्वें सेविता । अवचकता अखंड ॥ ९७ ॥ सेवकें तजिला काम क्रोध । स्वामिकामार्थ करी शुद्ध । स्वामीचा ससार तो च शुद्ध । ब्रह्मरूप सेवका ॥ ९८ ॥ अचळ सर्व सामर्थ्यकळा । परि निराभिमानता तया निर्मळा । महत्कृत्य करी परि निराळा । कर्त्ता कार्यतां तो राम ॥ ९९ ॥ माझया देहप्राणाचा चाळक । सर्व इंद्रियप्रतिपाळक । तयाचें कार्य कर्ता मी सेवक । ऐसें केवीं घडों शके ॥१००॥ बाह्य स्वामीसी वाहे स्कदीं । अतरीं बैसविला हृदयारविंदीं । मुखें स्मरतसे नामपदी । राम राम सप्रेम ॥ १ ॥ जैसें आत्मसरक्षण विश्व करी । तैसा स्वामीसी रक्षी निरतरी । अभिनव सेवेची थोरी ।

---

१ लक्ष्मणास. २ कच्छप=कासोटा, पदर. ३ पूर्ण. ४ मुख.

सर्वभावें तन्मय ॥ २ ॥ प्रथम जीवशिवा जैसें ऐक्य । तैसें सुग्रीवा रामा केलें सख्य । सबळ वाळी छेदला अलेल्य । सप्तभूमिताळ भेदूनि ॥ ३ ॥ ऋषिमुखपर्वतीं प्रसिद्धि । रामआत्मा वसे त्रिशुद्धि । हनुमतें तेथूनि सीताशुद्धि । केली भवाब्धि लंघूनि ॥ ४ ॥ जीवत्वा अक्षया केला क्षयो । हिरण्यगर्भलंका जाळूनि पावला जयो । सीताशोक अशोक विदारूनि तनयो । वायूचा भेटला स्वामीसी ॥ ५ ॥ द्वंद्वयुद्धीं एकांग वीर । अद्वैतविजयीं रणरंगधीर । असुरी सेनेचा संव्हार। केला हेळा अवलीळां ॥ ६ ॥ महा विशाळ द्रोणाचळ । रात्रीं नेला आणिला दोनि वेळ । ग्रह गंधर्व काळनेमी भ्रमपटळ । जैसा विवेक विदारी ॥ ७ ॥ अहि महि महा निशाचर । जैसे मद देहाहंकार । तिहीं चोरूनि आत्मा रघुवीर । आपुली प्रौढी वाढविली ॥ ८ ॥ तेथें विवेकसेवक मारुति । प्रवेशला सूक्ष्म स्वरूपगति । आत्मा श्रीराम प्रगट केला ख्याति । विश्व वर्णी जयाची ॥ ९ ॥ शत्रु सव्हारूनि विजयी जाला । राम विश्वात्मा विश्वीं शोभला । ते काळीं वशिष्टें निरोपिला । अद्भुत महिमा रुद्राचा ॥ ११० ॥ जैसा ब्रह्मानुभव अविनाश । तैसें ब्रह्मास्त्र योजिलें स्वप्रकाश । दशेंद्रिय दशमुखजीवनाश । करावया केलें वशिष्टें ॥ ११ ॥ तें पूर्णत्व नारदद्वारा । जाणवलें अहं दशशिरा । तेणें बळकाविलें निशिभरा । चोरूनि वशिष्टविशिष्टा ॥ १२ ॥ तेणें होतसे कासाविस । आत्मकार्य बाधलें आपणास । मग ध्याय स्वात्मया हनुमतास । तत्काळ च प्रगटला ॥१३॥ वशिष्ट ह्मणे सदाशिवा । ब्रह्मानुभव ब्रह्मास्त्र दशग्रीवा । जीवें भावें जोडलें आत्मया राघवा । विपरीतें आच्छादील तो ॥ १४ ॥ सदाशिव ह्मणे नाभि । कार्यता कारणीं स्वप्रभीं । कदा बाधू न शके स्वयभीं । अभेदा काय भेदील ॥ १५ ॥ महारुद्र आला स्वामीजवळी । तव दशकंठ पातला रणमंडळीं । युद्ध

---

१ ऋष्यमूक पर्वतावर. २ अशोकवनाचा नाश करून. ३ क्षणमात्रांत, सत्वर. ४ रावणाचा नाश. ५ ब्रह्मास्त्र तयार करून ठेविलें. ६ अहंकाररूपी रावणाला. ७ एका रात्रींत. ८ वसिष्ठानें मुद्दाम तयार करून ठेवलेलें ब्रह्मास्त्र.

माडले समफळीं । ब्रह्मास्त्र ब्रह्मीं योजिलें ॥ १६ ॥ तो अहतानळ ब्रह्मीं अद्वैतीं । न साहे ह्मणौन स्वयें मारुती । संपूर्णतापुढें अछिद्राकृति । गिळूनि ठेला रणरंगीं ॥ १७ ॥ जैस्या वज्रपंजरांतरस्था ज्वाळा । छिद्रता बाह्य सरकती कराळा । तो भडका निज्ञानावया मूळा । आला वशिष्ठाप्रति ॥१८॥ तेणें स्वात्माभिषेक केला । अखंडत्वें अहतानळ निवाला । स्वसंवेद्यता सुखी जाला । स्वानंदें भेटला रामासी ॥ १९ ॥ परमाश्चिर्य स्वानंदता । श्रीरामें मानिलें स्वता । एवं हनुमंताची सेवकता । रामा आत्मया अनन्य ॥ १२० ॥ एवं रुचिर चरित करूनि पूर्णता । प्रसंगावृत्ति सहज शाश्वता । कल्पिजे तैसी विमानारोहणता । अनंतेसी सेविता निजधाम ॥२१॥ हनुमंत ह्मणे जी स्वामी । तत्वता स्वामीवेगळा नव्हे मी। राम ह्मणे तथास्तु मद्रूपें भूमीं । तुवां राहावें मद्भावें ॥२२॥ मज तुज वेगळिक घडे । ऐसें कल्पांतीं हि परि न घडे । तुज मज अंतर पडे । कैसें निरंतरासी ॥ २३ ॥ मग मस्तकीं ठेविला अभय कर । ध्यानें वसविलें अभ्यंतर । मग होऊनि स्वानंदनिर्भर । वर मागता जाला ॥ २४ ॥ मध्यान्हपर्यंत मानसपूजा । जव मी करीं त्रैलोक्यराजा । तंव रामकथा गरुडध्वजा । कोण्हीं न करावी पूर्वान्हीं ॥२५॥ रामकथा होईल तये स्थानीं । मी उभा राहेन कर जोडूनि । राम ह्मणे तथास्तु ममाज्ञा भंगील जनीं । तो कळहा वरपेंडा होईल ॥ २६ ॥ आत्मा प्रत्यगात्मा दृश्यादृश्यता । एक परब्रह्म च असे तत्वता । तेसें दासरक्षणार्थ ठेऊनि हनुमंता । राम गेला स्वस्थाना ॥२७॥ तो अद्यापि किंपुरुषें वर्षीं सिंव्हासनीं । हनुमान रामभक्त असे *त्रिभुवनीं । सुरवर येऊनिया अनुदिनीं । पूजा करिती जयाची ॥ २८ ॥* शतकोटि रामायण । हनुमंतचरित्रें परिपूर्ण । जयाचें करितां श्रवण । महा पातकें नाशती ॥ २९ ॥ तें जरि वर्णावें यथोक्त । तरि अपार आणि पुनरुक्त । आणि भुवनत्रईं व्यक्त । प्रसिद्ध च आहे ॥ १३० ॥

---

फटी–कऱ्हाड, सुदं २ मूळ ब्रह्मस्वरूप जो श्रीराम त्याजवर च ब्रह्मास्त्राची योजना केली. ३ दिवसाच्या पूर्वभागात, दुपारच बारा वाजपर्यंत ४ गुंतलेला. ५ मानवजातिवान. ६ या भरतखंडात,

रामायण आणि हनुमंतप्रेम । अतुळ आणि निःसीम । विश्वतारक रामनाम । तारक ब्रह्म प्रसिद्ध ॥ ३१ ॥ तैसे च अपार रामदास । संख्या आकळे कवणास । कांहीं यथामति सदश । वर्णू ह्मणावें न वर्णवे ॥ ३२ ॥ आतां परिसा भावार्थ बिभीषण । तत्प्राप्ति वर्णू शके कोण । साधनश्रम केल्याविण । शरण मात्र निवाला ॥ ३३ ॥ तया श्रीरामप्राप्ति एकाएकीं । प्रगट निकट सुखरूप लोकीं । जयाची सरि अमरादिकीं । न पाविजे सर्वथा ॥ ३४ ॥ मृत्युलोकीं आणि तत्वता अमर । हिरण्यगर्भ नेंगरीचा राज्येधर । अद्वितीय राणीव अतःपर । तुळना कैंची तयासी ॥ ३५ ॥ अनन्यभक्त आणि भूप । सर्व भोगेंसीं रामरूप । प्रगट परमानंद आपेंआप । अखंड न खंडे कदां ॥ ३६ ॥ शबरीचीं अवेशेष फळेंता । राम आत्मा सेवी स्वतां । तया स्वरूपसायोज्यतां । राम भावें भेटला ॥ ३७ ॥ गुह्यकाचा अखंड प्रेमा । राम साक्षी अंतर्यामा । जया सुखासी नाहीं सीमा । तें पावला श्रीरामें ॥३८॥ जटायूपें रामकाजीं । प्राण लाविले विश्वामाजि । तो सबाह्य रामरूपीं सहजीं । समरसोनियां गेला ॥ ३९ ॥ जयाच्या स्मरणें सांडितां प्राण । श्रीरामीं होय संक्रमण । ते तनुता प्रत्यक्ष रामार्पण । जटायू रामीं समरस ॥१४०॥ अग जग उरग खग मृग । सुर असुर नर खेचर भूचर अनुग । वाल्मिकादि मुनि महाभाग । वृक्षपाषाणादि सर्व ही ॥ ४१ ॥ रामरूप जाले भावें । अभावें जड जे ते हि स्वभावें । रामरूप प्रादुर्भावें । विश्व च अवघें अशेष ॥४२॥ रामें रामरूप केलें नाहीं । ऐसें दुसरें न दिसे पाहीं । तो रामदास्यें होऊनि राहीं । मनाजनासहित ॥४३॥ आतां अग्र कथा देवाभक्ताची । जयेसी रोचिपेंपारिस हि रुचि । जयेसी लालस मुख्य विरंचि । पंचपुत्रांसहित ॥४४॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । हनुमंतादि रामदासवर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥६५॥

---

१ सुवर्णलंकेचा. २ विभीषण. ३ राज्यसुख. ४ खाऊन राहिलेलीं, उष्टीं ५ फळें. ६ समरसता. ७ पर्वत, वृक्ष. ८ जंगम सृष्टि. ९ सर्प. १० गगनांत संचार करणारे प्राणी. ११ भूमीवर फिरणारे प्राणी. १२ चाकर. १३ रोचक=ज्यामुळें भूक लागते असें औषध.

॥ श्रीरामो जयति ॥

नमो अप्रांता अनंगा । नमो अद्वैता आलिंगा । नमो अखंडा अभंगा । नमो सघन सचेतना ॥१॥ नमो कार्यप्रकाशका । नमो कारणमया निःकळंका । नमो कार्यकारणरूपें एका । अकळा सकळा करणासी ॥ २ ॥ नमो श्वेत रक्त पीत कृष्णों । नमो केवळ स्वरूपें कृष्णा । नमो मायाप्रसारण आकर्षणें कृष्णा । स्वसंवेद्यस्वरूपा ॥ ३ ॥ नमो साकारनिराकारीं निजाकारा । नमो विकारअविकारीं शुद्धांतरा । नमो घनगगनव्यापका निरंतरा । सघन शुद्धस्वरूपा ॥ ४ ॥ कार्यावरूनि जाणता कारण । तो अनुभवी आहे कोण । जो स्वयें च आपआपण । देवभक्तस्वरूपें ॥ ५ ॥ ज्ञाता ज्ञेय जाणों जातां । स्वयें च पातली ज्ञेयता । तेथें ज्ञेय ज्ञान ज्ञातृत्वता । तन्मय च कीं स्वभावें ॥ ६ ॥ याकारणें विश्वकारणें । साकारता अवलंबिली भक्ताकारणें । जेणें दृष्टीचें फिटे पारणें । तया कृष्णा नमोनमः ॥ ७ ॥ प्रत्यगात्मत्वास्तव प्रकाशे आत्मता । तैसी वसुदेवास्तव वासुदेवता । उन्मनी तुरिया तैसिया माता । देवकी आणि यशोदा ॥ ८ ॥ स्वानंदनदाचिया दोनी । प्रवृत्ति निवृत्ति ऐक्यस्थानीं । रोहिणी यशोदा मानिनी । सामरस्यें पतीसी ॥९॥ मूळमायादेवकीचे च उदरीचा । आकर्षून प्रवृत्तिरोहिणीचा ठाईं साचा । घातला तो बळभद्र नंदाचा । जेष्ठ पुत्र जो कृष्णाग्रज ॥ १० ॥ तत्वता श्रीकृष्ण जो अज । जो महाविष्णु गरुडध्वज । तो च गदाग्रज वळानुज । सुरसंकटहरणार्थ ॥ ११ ॥ आतां असो हें सुरसमाजें । परमेश्वर अवतरला भक्तकाजें । फेडावया वसुधेचें वोझें । साधुसंरक्षणालागि ॥ १२ ॥ कित्येक संस्कृती प्राकृती नर । ह्मणती बळभद्र आठवा अवतार । कृष्ण परमात्मा परात्पर । अवताराहूनि वेगळा ॥ १३ ॥ वेगळें आगळें सत्यत्वें जया । ब्रह्मानुभव हा नवीन तया । ब्रह्म अद्वैता अप्रमेया । ध्याता नुरे वेगळा ॥ १४ ॥ ब्रह्म अमूर्त तें च मूर्तिमत ।

---

१ ज्यास प्रांत नाहीं तो. २ काळावर्ण. ३ बळिराम.

तत्वता महाविष्णु हें श्रुतिप्रणित । त्याचे अवतार त्याहूनि विपरीत । ऐसें कैसें घडों शके ॥ १५ ॥ हें विश्व च अवघें सगळें । महाविष्णुहूनि नाहीं वेगळें । तद्रूप कृष्णत्व त्याहूनि आगळें । हा भेद अभेदीं सरेना ॥ १६ ॥ आगळिक वेगळिक हे कुसरी । ब्रह्म अतःपर तो नाहीं दुसरी । तो आत्मा महाविष्णु लीलाकारी । श्रुतीं स्मृतीं पुराणीं ॥ १७ ॥ तद्रूप च जो नामें रूपें । आयुधाळंकारीं स्वस्वरूपें । तो श्रीकृष्ण सच्चिदानंद आपें । अष्टमावतार श्रीविष्णु ॥ १८ ॥ बळभद्र तो शेषावतार । प्रसिद्ध जाणे चराचर । तो हि तन्मयत्वें तदाकार । सर्व सर्वात्मा श्रीकृष्ण ॥ १९ ॥ तो लीलाविग्रही भगवंत । तयाचें चरित असंख्यात । महदाख्यान भागवत । सार नाना ग्रंथांचें ॥ २० ॥ तें स्वतसिद्ध प्रसिद्ध अपार । कवणा वर्णवे सविस्तर । तया साराचें हि सार सुंदर । भक्तिरहस्य बोलिजे संक्षेपें ॥ २१ ॥ तया भगवंताचें केवळ नाम । भावें स्मरे जो सप्रेम । अनन्य भक्ति दृढ नेम । यथा मीळितोपचारीं ॥ २२ ॥ तो सारग्राही कृतार्थ जाला । कळिकाळ अभिवंदी तयाला । वर्त्तमान[1] असतां च मिळोनि गेला । सर्वेश्वरस्वरूपीं ॥ २३ ॥ तयाचिये पदयुग्मभेळीं[2] । अखंड भावें असो मौळी[3] । तो श्रोता जोडता सर्व काळीं । ग्रंथदशा ऐं गौरवा ॥ २४ ॥ दुर्जन जो कां देहाभिमानी । कामी कळावंत पंडज्ञानी । जिगीषे[4] द्रोही दोषद्रष्टा जनीं । जड गौरवी गौरवी[5] ॥ २५ ॥ तयाची विर्त्पत्ति[6] ते क्षुद्रदृष्टि । क्षुद्रज्ञासी क्षुद्रमय सर्व सृष्टि । हरिहर सुरवर परमेष्ठी[7] । महतां आरोपी क्षुद्रता ॥ २६ ॥ पाहों जातां परछिद्र । पाहाता च होय *अति क्षुद्र । निरोपण श्रवण जें सुभद्र । तें च तया अभद्रद ॥ २७ ॥* न पुसतां करी उठाठेवी । निरोपणा मिथ्या दोष ठेवी । पूर्वजांसहित तयाची ठेवि । तैसी च काय करील ॥ २८ ॥ तयाचा मानावा उपकार । तरि हा हि तैसा च प्रकार । परोपकारें तरती नर । निंदक बुडे

---

१ चातुर्य. २ हयात, जिवंत. ३ येते. ४ दुसऱ्याचा पाडाव करण्याची इच्छा धरणारा. ५ या ठिकाणीं 'रौरवी' असा दुसरा पाठ आहे. ६ व्युत्पत्ति. ७ ब्रह्माचें नाव.

अधडोहीं ॥२९॥ निरोपणें सद्बुद्धि उपजे जना । विकल्प आरोपितां त्या अल्प मना । तया तृणाची रविकुळोद्भव यातना । रविकुळोद्भवेंविण हरेना ॥ ३० ॥ आपुली व्हावया प्रशंसा । राहु रवि लोपु पाहे जैसा । परि अपार प्रकाश आवरे कैसा । स्वयें च जाय निरशोनि ॥ ३१ ॥ आतां निंदक जनीं हि सर्वथा । वंद्यासी निंदूं नये वृथा । चळण आहे सर्व पदार्था । दुर्बुद्धि काय चळों नये ॥ ३२ ॥ यदर्थी इतुकें च साधन करावें । सत्संगासी च दृढ धरावें । तत्फळें तत्काळ च फिरावें । दुर्बुद्धि च होय सुबुद्धि ॥ ३३ ॥ सत्संगें दुर्जन असंख्यात । बहु तरले लोकविख्यात । करूं जातां हि विपरीत । कैवल्यपद पावले ॥ ३४ ॥ जैसा परिस स्वलीळां । सुवर्ण करी लोहमूळा । हा सहजगुण तया निर्मळा । आदरें अनादरें हि ॥ ३५ ॥ ह्मणौनि संतसगें असंत जन । संत च होती पालटोन । स्वभाविक जे भाविक सुमन । ते तन्मय तों अनयासें ॥ ३६ ॥ आतां सज्जन दुर्जन आणि जन । श्रीकृष्णस्वरूपें चैतन्यघन । तया तन्मयत्वें अभिवंदन । परिसा महिमा भक्तीचा ॥ ३७ ॥ जन्मोजन्मीं देवकीवसुदेवें । श्रीकृष्णभक्ति केली भावें । त्यास्तव जगज्जनकजनकें माधवें । एणें केलें उदरासी ॥ ३८ ॥ तवं अंतरायकंसासुर । शाळक बोळवितां वधुवर । आकाशवाणी जाली घोर । याचा बाळ तो काळ तुझा ॥ ३९ ॥ तेणें अतरायकसा अति क्रोधु । जैसें हळाहळ प्रगटलें मथितां सिंधु । केवळ वधुवराचा करावया वधु । विकल्पखड्ग काढिलें ॥ ४० ॥ देवकी ह्मणे सोहोदरा । आज्ञापासूनि तरि भय नाहीं तव शरीरा । बाळकें जालियावरि विचारा । येईल तें करी तयांसी ॥ ४१ ॥ तें मानलें अंतरायकंसासुरातें । स्वस्थानीहूनि फिरविलें वधुवरातें । निर्धार

१ पातकांच्या डोहात. २ या चंचल मनास वाईट बुद्धि शिकविली तर त्याची स्थिति विस्तवाजवळ असलेल्या गवताप्रमाणें होते; त्या वेळच्या त्याच्या यातनाचें निवरण एका रामावाचून कोणीही करू शकणार नाहीं. ३ स्वभावतः. ४ विन. ५ वसुदेवाचा मेहुणा.

वसुदेवदेवकी सुंदरातें । शुद्ध श्रद्धा च केवळ ॥ ४२ ॥ मग वसुदेवदेवकी बाळे । घातलें भववधशाळे । जोडूनियां संकल्पशृंखळे । विकल्पलक्षण रक्षणें ॥ ४३ ॥ तेथें वसतां चिरकाळ । देवकीसी जाला प्रथम बाळ । विवेकलक्षण तेजाळ । अंतरायकंसें आच्छादिला ॥ ४४ ॥ ऐसीं अनुक्रमें सप्त बाळकें । वधिलीं मिथ्याकंसें कटकें । मातापिता झुरती शोकें । दुखें ह्मणती हरि हरि ॥ ४५ ॥ द्वैतेंसहित पंचकोश । लंघिलियां लाभे स्वप्रकाश । तैसा सप्तबाळकांनंतरें हृषीकेश । प्रगट जाला अयोनिज ॥ ४६ ॥ लीला देवकीचें गरोदर । तें समान जालें शुचि रुचिर । कैंची वेदना सुईणि श्रीधर । स्वप्रभ स्वयें प्रगटला ॥ ४७ ॥ हरि चतुर्भुज चैतन्यगाभा । दीपिका दीपल्या स्वप्रभा । आयुधाभरणांवर शोभा । अनुपम्य ते अखंड ॥ ४८ ॥ देखोनि पातले सात्विक भाव । तन्मय देवकी आणि वसुदेव । अंबरें आच्छादूनि माधव । आणिला अनंत गोकुळा ॥ ४९ ॥ तो यशकीर्तिगुणानंत । यशोदेउत्संगीं घातला अच्युत । तयेची मूळमाया मूर्तिमंत । आणिली कंसासुराप्रति ॥ ५० ॥ जैसा आत्मसत्ता प्रवर्ते निवर्ते इंद्रियमेळ । तैसें स्वइच्छा चेवविलें दैत्यकुळ । श्रवणें पातला कंसकाळ । चरणीं धरिली उपटावया ॥ ५१ ॥ जैसी पातली लोहसिळा । उचलितां पोळला आवटला कर त्या वेळा । कडकडित उपमली अंतराळा । विद्युद्वर्ण बोलतसे ॥ ५२ ॥ ह्मणे मर मर कंसा पापकंदा । व्यर्थ च बाळकें केली चेंदा । आतां काय करिसी गोविंदा । गोकुळीं वाढे तवांतक ॥ ५३ ॥ तें वाक्यलक्षण वज्रसुरी । प्रवेशली कंसाचे उदरीं । अभ्यतरीं अंतर चिरी । बोसावला सर्वांगें ॥ ५४ ॥ कृष्ण जीव घेईल सर्वथा । मज भृणहत्या घडल्या वृथा । वहिणी देवकी पावली वेथा । ह्मणौनि उँमंडें रडतसे ॥५५॥ तेणें गहिंवर आला देवकीसी । वेगीं पातली वं-

१ अन्नमय वगैरे या शरिरात एकात एक असे पाच कोश आहेत, ते. २ वस्त्रानें. ३ यशोदेच्या मांडीवर. ४ उठली. ५ तुझा घात करणारा. ६ बालहत्या. ७ उमट=उमाळा, गहिंवर.

भूपासी । उभय संदेहाचें स्थान तिसी । दोन्ही पक्षलक्षणें ॥ ५६ ॥ पूर्वपक्षें बंधूचा मोहो । सिद्धांतें आत्मया आत्मजाचा स्नेहो । सामरस्यें निःसंदेहो । अपक्षिता आश्वासिला ॥ ५७ ॥ उग्रसेन तो अविकार । तयासी पुत्र कां कंसासुर । तरि हा दुर्मलदैत्यवीर्यविकार । आसुरीमात्र पातला ॥ ५८ ॥ रजोस्नात असता युवति । दुर्मलें धरूनि उग्रसेनाकृति । राजांगनेसी देऊनि रति । कंस पूतना उपजविली ॥ ५९ ॥ तेणें गुणें तें दोघेंजणें । आसुरता पावलीं शरीरें प्राणें । आसुरी सेना संग्रहणें । कंसा येणें स्वभावें ॥ ६० ॥ सत्क्षेत्रीं गोकुळीं प्रगटला हरि । आतां अंतरायकंसा कैंची उरी । ऐसा बंधु चिंता करितां वारी । भ्रांतिभगिनी पूतना ॥६१॥ तुझी सेना विचित्राकारी । कृष्ण केवळ निर्विकारी । कृष्ण अद्वैत तू परिवारी । दोहींपुरी चिंता न लागे ॥६२॥ कृष्णासी नाहीं कुविद्या । तुझें सामर्थ्य ते अविद्या । नाना वेषाकार कां सद्या । कृष्णा कैंची अनेकता ॥ ६३ ॥ कृष्णासी नलगे शस्त्र । कृष्णासी नलगे मंत्रशास्त्र । कृष्ण अलक्ष ज्ञप्तिमात्र । कृष्ण सगळा साधावा ॥६४॥ आसुरी संपत्तिचा विचारु । प्रयत्नें होणार विपरीत करूं । ह्मणौनि आरंभिला पापभरु । उत्पात गोकुळावरि ॥ ६५ ॥ कृष्ण आत्मा श्रुतिप्रमाण । आत्मा ह्मणिजे स्वयें आपण । तयासी जें जें कल्पिजे विंदाण । तें स्वयें च पाविजे ॥ ६६ ॥ विषें भरूनियां स्तना । कृष्ण संव्हारूं आली पूतना । तवं ते चि पावली निदाना । जीवें सर्वस्वें शोषिली ॥ ६७ ॥ फोडावया कृष्णकंठा । गांठीमाजि दैत्यरिठा । तवं तो च फुटला खोटा । *कृष्णमुखें तत्वता ॥ ६८ ॥ करावया कृष्णाचें कूट । दैत्य पातला हो-*ऊनि शकट । तवं तो च जाला शतकुट । अकळ लीळा कृष्णाची ॥ ६९ ॥ कृष्णासी चिंतूनि अरिष्ट । दैत्य पातला वांतारिष्ट । तवं तो च पावला अनिष्ट । संव्हारिला श्रीकृष्णें ॥ ७० ॥ अंतरायकंसाचा परिवार । काम क्रोध लोभ मोह मछर । आदिकरूनि बहुत खवळले

१ मुलाचा २ 'कृष्णीं' असा दुसरा पाठ आहे. ३ केवळ ज्ञानस्वरूप. ४ वर्मी लक्ष्य, लक्षण. ५ स्तनाच्या गाठींत. ६ गाडा. ७ वायुरूपानें.

असुरभार । विकटवेष अबेप ॥ ७१ ॥ कागासुर बगासुर अघासुर । धेनुकासुर वछासुर वृषभाकार । अश्वरूप वैश्वानर । आदिकरूनि अनेक ॥ ७२ ॥ ते सर्व हि संव्हारी सर्वेश्वर । यथाकाळेंकरूनि शार्ङ्गधर । वृंदावनीं विचरतां गोवर्धनोद्धार । केला वृष्टिनिवारणा ॥ ७३ ॥ कालिया नाथिला कालिंदीजळीं । नृग कल्कपाश तारिला खेळतां चेंडुफळी । अपूर्व केली कामिनीकेळी । रासक्रीडा सुरंग ॥ ७४ ॥ गाई गोपाळ तरु तृण । आदिकरूनि केलें उद्धारण । विचित्र विपरीत विंदार्णे । अंगसंगें स्त्रिया उद्धरिल्या ॥ ७५ ॥ कृष्णस्मरणें उद्धार पतिता । त्याच्या अंगसंगें तरल्या वनिता । हें आश्चिर्य नव्हे तो स्वतां । भर्त्ता भोक्ता प्रतिक्षेत्रीं ॥ ७६ ॥ परि हें कृष्णचरित अति नाटक । तो स्वयें वैकुंठनायक । त्याचें कर्म अलोलिक । लोकां न ये आचरों ॥७७॥ कृष्णाचेन अंगसंगें । नारी तरल्या हें क्रमलें मार्गे । पुढें ऐसिया सत्संगप्रसंगें । वर्तों न ये सर्वथा ॥ ७८ ॥ आतां कलियुगीं यथेष्टाचार । रुचिधर्म आचरती नारी नर । पांपंड बंड लंड मतांतर । ते तत्वता नारकी ॥ ७९ ॥ तथा गुरुतल्पगाचें फळ । त्याच्या मोहज्ञानगोष्टी निर्फळ । ज्ञानगोष्टी क्रिया अमंगळ । तेथें मंगळ तें कैंचें ॥ ८० ॥ श्रीकृष्ण सच्चिदानंदघन । गोकुळजनमनोरंजन । नाना क्रीडारसें जगजीवन । संगें रंजवी सकळांसी ॥ ८१ ॥ तंव कंसें अक्रूर पाठविला । कृष्णवंदनप्रेमें धाला । मनोरथारूढ घेऊनि चालिला । परिवारेंसीं गोविंद ॥ ८२ ॥ प्रत्यगावृत्ति गोकुळीहूनि । मूळ मथुरेसी चालिला देखोनि । प्राणस्फोट सर्वजनीं । कैसेनि ऐसा देखिजे ॥ ८३ ॥ जीव समरस कृष्णरूपीं । कृष्णमय गोप गोपी । तनुता कृष्णमय अखंड अंपि । कृष्णप्रेमें पूरित ॥ ८४ ॥ कृष्णमूर्ति हृदयमेळीं । कृष्णनाम मुखकमळीं । तनुता असतां हि गोकुळीं । कृष्णमय मानसें ॥ ८५ ॥

---

१ वैवस्वत मनूचा पुत्र; यास सरडा हो असा ब्राह्मणानें शाप दिला होता. २ चिखलांत नाचणारा; उड्या मारणारा. ३ क्रीडा. ४ लक्षण. ५ पाखंडी ६ उन्मत्त. ७ देखील, शिवाय.

सर्वस्वें कृष्ण पाहाती सुंदरा । नंदा येशोदे न विसरवे कुमरा । कृष्ण- मयता चराचरा । जीर फुटती तयांचे ॥ ८६ ॥ गोमती उतरोनि परतीरा गेले । रजक कुवळया मारूनि वस्त्रें ल्याले । गोपाळ आवडीं शृंगारिले । घेतलें उसणें निंदेचें ॥८७॥ नीचवृत्ति कुविजा राजदासी । प्रेमें चंदनें चर्ची कृष्णासी । ते दिव्यरूपें करी हृषीकेशी । पावली भावें अनन्यें ॥८८॥ मथुरा प्रवेशला मुरारि । कृष्ण पाहातां च तुरिया नारी । कृष्णमय अभ्यंतरीं । देहभाव विसरल्या ॥ ८९ ॥ उन्मनी सुमनीं करिती वृष्टि । कृष्ण पाहाती उघडिया दृष्टीं । कृष्णमय सर्व सृष्टि । कंसाभा हि नाठवे ॥९०॥ मद गज मारिला मुष्टिघातें । संव्हारिलें मुष्टिका चाणौरातें । मल्लादि मर्दूनि धनु- र्यागातें । भगूनि विजयी वंळ कृष्ण ॥ ९१ ॥ कृष्णसामर्थ्य स्वसंवेद्य । प्रगट निकट पातले सद्य । अंतरायकंस फेंचा आद्य । आपेंआप निमाला ॥ ९२ ॥ कार्य संव्हारें कारणता । सहजीं शमोनि जाय स्वतां । तैसी द्वयदळनाशें कंसजीविता । घातेंवीण निवातली ॥ ९३ ॥ कंसासी प्राप्तपद निर्वाण । विजयी वळभद्र नारायण । नगरीं त्राहाटूनि दुंदुभि निशान । उग्रसेन राज्यीं स्थापिला ॥९४॥ मुक्त करावया निज माया । धीर न धरे यदुराया । प्रवेशोन तया ठायां । वंदशाळा फोडिली ॥ ९५ ॥ तोडिली पदद्वयाची वेडी । आत्माकृष्ण आलंगिला आवडीं । द्वद्वनिर्द्वंद्व जाले जोडी । सकळा निखैळा सुखाची ॥ ९६ ॥ हर्ष जाला असो आतां । कंसासुराची कांता । जाऊनिया आक्रंदता । सांगे पितया जरासंधा ॥ ९७ ॥ तेणें सतरा वेळ घातली धाडी । वेळ- वेळां नगर विभाडी । काळयवनाची करूनि जोडी । साह्य आणी तयासी ॥ ९८ ॥ तया गर्गाचा असे वर । तुजपुढें न राहती यदुवीर । ह्मणौनियां शार्ङ्गधर । तया भेणें पळतसे ॥ ९९ ॥ लोक निंदूं लागले गोविंदा । येणें बुडविलें राजपदा । याच्यायोगें ससारीं आपदा । प्राप्त होती जनासी ॥ १०० ॥ मग सुरकार्य सुचून अकर्मी । श्रीकृष्ण पाचारी विश्वकर्मा । सागरामाजि रचिलें हर्मी । वैकुंठोपम द्वारका ॥१॥

---

१ कमळ, भूमंडळ. २ बळिराम. ३ शुद्धता. ४ हर्म्य=राजमंदिर.

मग चतुर्भुज शंखचक्रगदाब्जधारी । श्रीवत्सलांछन पीतांबराभरणभूषित हरि । गरुड पाचारूनि वाहिली नगरी । स्वप्नवत वसविली द्वारका ॥२॥ काळयवनाचेन लागें । आपण राहिला नाटकरंगें । ठकूनि मारावया श्रीरंगें । कार्य रचिलें अतर्क्य ॥ ३ ॥ कृष्ण जवळी ना दुरी तिष्ठे ना पळे । जैसा अभ्रयोगें दिसे चंद्र चळे । काळयवन पाठीं लागला बळें । नेला मुचुकुंदाप्रति ॥४॥ तवं तो सुराचा साह्यकर । केला असुराचा संव्हार । देव ह्मणती माग वर । तेणें मोक्ष इछिला ॥५॥ सुर ह्मणती हें आमचें नव्हे काज । परि तुज दर्शन देईल गरुडध्वज । उठवितां भस्मेलि हें मागोनि सहज । श्रमनिवारणा निजेला ॥ ६॥ तवं ते बिळीं प्रवेशला हरि । पीतांबर पांघरविला तयावरी । आपण राहिला अंतरीं । दूरि ना समीप ऐसा ॥ ७ ॥ काळयवन ह्मणे मीपवंता । तूं जागत च निजलासी अनंता । प्रहरें मुचुकुंद प्रबोधता । नेत्रानळें भस्मला ॥ ८ ॥ यानंतरें निर्द्वंद्व । स्वयें प्रगटला गोविंद । मुचुकुंदा दिधला परमानद । ज्ञानद्वारा निज मोक्ष ॥ ९ ॥ असो संव्हारूनि बहु असुर । द्वारकेसी आले बळराम चक्रधर । रेवति रुक्मिणी कृत स्वयंवर । परिणिल्या दोघीं[१] दोघीजणी ॥ ११० ॥ चित्शक्तिरुक्मिणी वरूनियां । कृष्णें वरिल्या अष्टधा अष्ट पट्टमहीषिया । भोमासुरें अनंत शक्तीं नृपतनया । वरावया रक्षिल्या ॥ ११ ॥ तयाचा ऐसा मनोनेम । सोळा सहस्रीं सुविश्राम । तयाच्या जिवासी कैंचा[२] पूर्ण काम । निउन तें नव्हे संपूर्ण ॥ १२ ॥ त्या सहस्रांकसोळाअमृतैकळा[३] । तयासी प्राप्त कुहुवेंदशाळा[४] । स्मरती कृष्णसंपूर्णचंद्रमंडळा । प्राग्जन्मतपफळ पौर्णिमे ॥ १३ ॥ हें परिसोनि पातला परमानंद । भौम संव्हारिला दुर्मद । त्याचा तोडूनि भवबंद । स्वशक्तीं स्वयें परिणिल्या ॥ १४ ॥ ऐसा विश्वकुटुंबी वासुदेव । पुत्रपौत्रीं नांदे स्वयमेव । अवनीसंख्या यादव । माधवमहिमा न वर्णवे ॥ १५ ॥ भक्तजनकाजकैवारी । पांडव रक्षिले लाक्षागारीं । रक्षिली द्रौपदी सुंदरी ।

---

१ डोंग्या. २ दोघानीं ३ राण्या. ४ जणू काय त्या चंद्राच्या सोळा कलाच. ५ कुहु=अमावास्या; ह्मणून अधार कोठड्या.

वस्त्रें हरितां कौरवीं ॥ १६ ॥ अद्वैतवनीं ऋपिभोजनीं । कृष्णें रक्षिले अन्नदानीं । युद्धादि समयीं निउन स्थानीं । प्रगट केलें दूर्णत्व ॥ १७ ॥ अर्जुनाचा सारथी स्वयें हरि । युद्धीं शुद्धात्मउपदेश करी । चतुराश्वदेह प्रक्षाळिले स्वकरीं । नृपादेवांदेखतां ॥ १८ ॥ भीष्मकर्णद्रोणाप्रति । नीति प्रतिज्ञा सांडी श्रीपति । निःशस्त्री चक्र चाळित हातीं । रणीं उडी घातली ॥ १९ ॥ हासें आलें भीष्मदेवा । ह्मणे भक्तीं जिंतिलासी माधवा । धनुष टाकूनि योगभावा- । आश्रित भेदवी अर्जुनकरें ॥ १२० ॥ अश्वत्थामाधाडीप्रति । पांडव रक्षिले एकांतीं । ब्रह्मास्त्रापासूनि परीक्षिती । उत्तरागर्भी रक्षिला ॥ २१ ॥ आतां असो हे भारती कथा । अपार च असे हो सर्वथा । धर्म भद्रीं बैसविला यथा । वेदोक्त विधिविधान ॥ २२ ॥ ब्रह्महत्येस्तव भक्तपिता । पंडु यमावतीसी होता । तदुद्धारार्थ त्वरता । राजसु याग करविला ॥ २३ ॥ तन्मुळें जिंतोनि वसुधरा । केलें अशेप दुष्टसंव्हारा । अग्रपूजाविरोधें शिशुपाळशिरा । छेदिलें तत्पुत्र स्थापिला ॥ २४ ॥ सुदाम दारिद्रभंजन । गुरुपुत्र प्रदानीं मृतसंजीवन । सर्व सपादूनि असंख्याख्यान । स्वकुळैंध्वश माडिला ॥ २५ ॥ स्वयें प्रसार करी अकर्पी । ह्मणौनि कृष्णनाम स्तविती देवर्पि । कुळक्षयशाप दे विर्भर्पी । गाधारी आणि गर्ग तो ॥ २६ ॥ कृष्णासी फेंचें आपपर । फेडणें केवळ धराभार । यादवांचा मांडिला सव्हार । अवतारसंल्या पुरेंली ॥ २७ ॥ उद्धवादिकां केला बोध । भक्त उद्धरिले विविध । कुळक्षयांतीं जराव्याध । उद्धरूनि जाणें स्वपदासी ॥ २८ ॥ द्वारकेसी उठिले महा उत्पात । नाना केतु प्रगटले गगनांत । नक्षत्रपात महावात । भूमिस्फोट प्रकंप ॥ २९ ॥ अरिष्ट निरसावयाकारणें । प्रभासें पाठविलें नारायणें । होणार विपरीत करावें कोणें । शांतीनें शाति

---

१ अर्जुनाच्या रथाचे चार घोडे श्रीकृष्ण स्वतः आपल्या हातानीं धूत असे. २ अठरा अध्याय गीता सांगून. ३ महाभारतांतील. ४ सिंव्हासनावर. ५ सुदामाचें दारिद्र दूर केलें. ६ गुरुदक्षणा ह्मणून सदोपन गुरुचा मृत पुत्र त्यास परत आणून दिला. ७ यादव कुळाचा नाश. ८ नाखुप, दुःखी झालेली, रागावलेली. ९ अवतार समाप्त करण्याची वेळ आली. १० भूकंप.

मांडिली ॥ ३० ॥ कृष्णमाया मोहिले वीर । स्वभाव चर्चेचा जाला निकर । युद्ध आरंभलें घोरतर । एकमेकां संव्हारिती ॥ ३१ ॥ किंचित प्रवेशला असतां काळी । मिथ्या मांडली वांय कळी । धडधडा पडले महाबळी । हाक आली द्वारके ॥ ३२ ॥ कृष्ण बळभद्र आले धांवणें । तयावरि लोटले सत्राणें । मग ते बळभद्रें नारायणें । स्वहस्तें च संव्हारिले ॥ ३३ ॥ यानंतरें तो बळराम । द्स्याकारीं देखोनि विराम । योगाभ्यासें निजधाम । प्रवेशला तटीं सिंधूचे ॥ ३४ ॥ यानंतरें अद्वैत वनमाळी । टेकोनि बैसला पिंपळातळीं । वीरासनें चरणकमळीं । पद्म झळके आरक्त ॥ ३५ ॥ तें देखोनि जराव्याधें । वळें विंधिलें मृगवेधें । उसिणें फेडिले जें कौळिवधें । मुपळविशेष ते भोंळीं ॥ ३६ ॥ व्याध येऊन पाहे तवं तो हरि । मग परम शोक करी । आश्वासूनि वाहिला विमानावरी । वैकुंठासी पाठविला ॥ ३७ ॥ दारुक रथेंसीं जवळी आला । तो द्वारकेसी सांगों पाठविला । तेथें परम प्रळय जाला । वाहेरी काढिलीं आक्रंदत ॥ ३८ ॥ एरीकडे रथ आणिला आयुधें । स्वस्थाना पाठविलीं गोविंदें । कृष्णदर्शना सुरवृंदें । ब्रह्मादिक पातले ॥ ३९ ॥ देव देखती हरिप्रकाशा । निजतेजें उजळिल्या दिशा । नेत्रोन्मीळनें हृषीकेशा । प्रवेश जाला स्वरूपीं ॥ १४० ॥ विजुपुंज मेघींहूनि । प्रगटोनि प्रवेशे स्वस्थानीं । देवीं देखोनियां विमानीं । केला जयजयकार पुष्पवृष्टि ॥ ४१ ॥ कृष्णें सांडिला तनुतावलंब । केला केवळ स्वरूपावलंब । सुर स्तवन करित अवलंब । स्वस्वस्थानाप्रति गेले ॥ ४२ ॥ इकडे शोक करित कल्लोळें । रण पावलीं जनपदेंसीं सकळें । वसुदेवदेवकीआदि तत्काळें । प्राण सांडिले हरिविण ॥ ४३ ॥ रुक्मिणी कृष्णशक्ति कृष्णासरिसी । वेगळें होणें नाहीं तयेसी । येरी प्रवेशल्या चितेसीं । स्वपतिवपुसहित ॥ ४४ ॥ अर्जुनें दिधली तिळांजुळी ।

१ व्यर्थ. २ कलह. ३ रक्षण करण्यास. ४ बलानें, वेगानें. ५ समुद्राचे. ६ हरणाची शिकार करावी म्हणून बाण मारला. ७ 'वाळीवधें' असा दुसरा पाठ आहे. ८ मुसळाचे टोंक. ९ कपाळावर. १० सारथी.

द्वारका बुडाली सिंधुजळीं । चोराकुळ पृथ्वी शेप सकळी । शंखोद्वार प्रवेशली ॥ ४५ ॥ घट्टनि मोडिला सर्व हि खेळ । आत्माकृष्ण अविनाश अचळ । सच्चिदानंद नित्य निर्मळ । सदोदित स्वभक्तां ॥ १४६ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । विष्णुमहिमावर्णने । श्रीकृष्णभक्तप्रतिपाळनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ६६ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो निराकारत्वें साकारा । नमो साकारत्वें निराकारा । नमो साकारनिराकारपरा । परमेशा अविनाशा ॥ १ ॥ नमो अकळ सकळातीता । नमो अचिंत्या अखिळा कळावंता । नमो आद्यंतरहिता अच्युता । आदिमध्यांतव्यापका ॥ २ ॥ नमो अद्वैता द्वैतकारणा । नमो धर्माधर्मरहिता धर्मधारणा । नमो लक्षालक्षविलक्षणा । सच्चिदानंदस्वरूपा ॥ ३ ॥ नमो निरंजना जनरंजना । नमो सर्वत्र समसमाना । नमो अछिद्रा चिद्घना । नमो नित्या निरंतरा ॥ ४ ॥ अशेष दिकुंज[1] सभराभरिता । स्वसंवेद्या सदा स्वप्रकाशवंता । शुद्धा सचेतना अनंता । आकाशावकाशसंपूर्णा[2] ॥ ५ ॥ निस्तरंगा विश्वतरंगजीवना अपारा । तरंगाकारी च अलिप्त तद्विकारा । आपेंआप आपोनारायणा निरंतरा । स्वसंवेद्या नमोनमः ॥ ६ ॥ उदय अस्त वर्तमान विद्यमान सूर्यासी । अध ऊर्ध्व मध्यत्व अखंडावकाशासी । तैसी अवतारता चरितता पूर्णता आत्मया विष्णूसी । बोलिजे लीळालाघवें ॥ ७ ॥ पूर्व प्रकरणीं विश्वीं विश्वंभर । सदोदित नित्य निरंतर । पूर्णत्वें पूर्ण जाला कृष्णावतार । भक्तकाज करूनियां ॥ ८ ॥ आतां हरिकथा भक्तजननी । परिसा विश्वसंजीवनी । श्रवणपठणें त्रिभुवनीं । स्तवनभद्रीं वैसिजे ॥ ९ ॥ सर्वशक्ति करूनि कृष्णार्पण । महामुक्त शांतांतःकरण । प्रारब्धावधि देहधारण । तैसा अर्जुन आला स्वस्थाना ॥ १० ॥ श्रीकृष्णकथाश्रवणमात्रें तत्काळ । कुंती कृष्णमय

---

१ संपूर्ण. २ कुंज=वृक्षवेलादिकांनीं भूषित जमीन.

जाली केवळ । धर्म दिसे अनाथ दुर्बळ । कृष्णाआत्मयावांचूनि ॥११॥ सर्वेश्वर सांडी प्रपंचाध्यास । मग स्थिति कैंची प्रपंचास । तैसा धर्म चालिला वनास । क्षितीं परीक्षिती स्थापूनि ॥ १२ ॥ होऊनि तनुतेसी उदासीन । घेतलें विदेही त्याचें दर्शन । तो हि न राहे च अधिष्ठान । सामरस्य पावले ॥ १३ ॥ मागें क्षितिपति परीक्षिती । सर्पशापें प्रपंचउपरति । हरिकथाश्रवणीं प्रीति । कृतार्थतेकारणें ॥ १४ ॥ भवविभव दिसतां हि अविकळ । तत्वता मृत्यु कळला केवळ । प्रपंचापरिस करी तळमळ हरिप्राप्तिकारणें ॥१५॥ तवं हरि अंतरसाक्षी । शरणाशया कदां नुपेक्षी । वक्ता प्रेरिला कृपाकटाक्षीं । शुकयोगि हरिभक्त ॥१६॥ एक हरिभक्त एकु शरणागत । दोवांचें ऐक्या आलें मनोगत । शुकें वर्णिलें कृष्णचरित । तन्मयें परिसे परीक्षिती ॥ १७ ॥ शुकदेव तो सहजगुरु । धन्य निरोपणचमत्कारु । परीक्षितीसी जिण्याचा च जाला विसरु । मरणदुःख तें कैंचें ॥ १८ ॥ नवल त्याचें भक्तिरहस्य । स्वस्वरूपीं सामरस्य । स्थिति वाणली वैरस्यं[1] । तनुता ते हि गळाली ॥१९॥ श्रवणकीर्तनें शुकपरीक्षिती । कैवल्य पावले हे प्रसिद्ध ख्याति । ह्मणौनि धन्य हरिभक्ति क्षितीं । सद्य प्रत्ययकारिणी ॥ २० ॥ ते हरिभक्ति हि दशप्रकारी । दशैमा[2] धन्य जे निरंतरी । जेथें देवभक्ता विभक्त उरी । नुरे सद्य सामरस्यें ॥ २१ ॥ देवा भक्ता प्रीतिवाद । भक्त पावले हरिपद । भवबंध तुटे परि खेद । भेदमानें तुटेना ॥२२॥ गरुड विष्णूचा अंतरंग । तेणें तक्षक आणिला उरगं[3] । शिवें नंदी पाठविला सवेग । सोडवावया तयासी ॥ २३ ॥ विष्णु ह्मणे सुपर्णासी । तक्षक देईं नंदीपासी । गरुड ह्मणे चारयासी[4] । घेऊनि आलों मी स्वामी ॥ २४ ॥ मज तुह्मीं आपुलें द्यावें देवा । तैं ᵗघे[6] सिद्ध माझें हि देववा । तुझें वांझें[5] वाहें माधवा । तक्षकातें नेंदवीं[7] ॥ २५ ॥ विष्णु ह्मणे वाहासी मज । कनिष्ठिका वरी ठेविली सहज । तेणें हृदय फुटोनि अंडर्ज[8] । पृथ्वीवरी

१ विरक्तीची. २ दाहावी. ३ सर्प. ४ गरुडास. ५ चाऱ्यासी, खाण्याकरितां. ६ 'तै घे ' ऐवजी ' तेथें ' असा दुसरा पाठ आहे. ७ देण्यास सांगूं नकोस. ८ पक्षी.

पडला तो ॥ २६ ॥ चंचु पसरी वेळवेळां । प्राणां प्रयाणासी जाले गोळा । करकमळ जोडूनि कमळा । प्रार्थितसे सगद्गदा ॥२७॥ स्वामी सेवककरुणाकरा । अवलोकीं सापराधा किंकरा । मग वाचविलें खगेश्वरा । ब्रह्मपुराणीं हे कथा ॥ २८ ॥ जय विजय महाद्वारपाळ । विष्णुपदनिवासी अविचळ । ते परस्परें कळहकल्लोळ । करूनि पावले खेदातें ॥ २९ ॥ आतां असो हें वेगळेपणें । खेद भेद अधिक उणें । विष्णुस्वस्वरूप सामरस्यपणें । परमानंद अखंड ॥ ३० ॥ विष्णु आत्मा सदोदित । सच सबाह्य सभराभरित । तये स्वरूपीं समरसत । मिथ्या भेद निरसूनि ॥ ३१ ॥ ऐसा जो कां अभेद भक्त । तो हो व्यक्त अथवा अव्यक्त । स्वर्ग मृत्यु पाताळीं नित्यमुक्त । पदांतर कैंचें तयासी ॥ ३२ ॥ जयाच्या स्वरूपासी नाहीं अंत । तयाविण रिक्त कैंचें उर्वरित । जें अचळ अद्वैत शाश्वत । तन्मय सर्व तद्बोधें ॥३३॥ तो अखेद अभेदत्वा आला । तयासी संसारपथि चुकला । एणें जाणें कैंचें त्याला । आत्मा स्वयें तो च तो ॥३४॥ घटा सबाह्य अवकाश । खर्परता कोंडू न शके त्यास । तें घटाकाश आकाशीं मिळायास । पदांतर कां लागलें ॥ ३५ ॥ घटत्व असता हि सगळें । घटाकाश नाहीं वेगळें । घटभंगीं अभंगीं नातळे । तैसा आत्मा अखंड ॥ ३६ ॥ विमुक्त च मुक्त ऐसिया श्रुति । तयाची ऐसी अर्थनिष्पत्ति । जीवात्मत्व अन्यथाभास मिथ्याकृति । आत्मा केवळ स्वरूपें ॥ ३७ ॥ तद्ज्ञानें च निरसे अन्यथाभास । जीवात्मा परमात्मा सहज समरस । अन्यथाभास हि तद्विलास । ह्मणौनि विमुक्त च मुक्त ॥ ३८ ॥ ऐसा परमात्मस्वरूपीं समरस । तो उत्तमोत्तम निज दास । वर्ततां वर्तणें निवर्तता निवर्तणें कैंचें त्यास । ब्रह्मस्वरूप सदोदित ॥ ३९ ॥ एवढिये प्राप्तीचें मूळ । रामनामोच्चारें केवळ । हा महिमा जाणती प्रेमळ । जिहीं रामआत्मा आलंगिला ॥ ४० ॥ यदर्थी वाहावी नलगे आण । प्रत्यक्षा कां लागलें प्रमाण । केवळ

---

१ 'प्राणापानासी.' असा दुसरा पाठ आहे. २ सद्गदित अंतःकरणानें. ३ खर्पर=लबाड मनुष्य, चोर; किंवा कटोरा, वाटी. घटाच्या बाहेरील जें आकाश आहे, तें वाटीनें त्या घटात भरू ह्मटलें तर तें शक्य नाहीं.

करितां रामनामोच्चारण । तरले विख्यात असंख्यात ॥ ४१ ॥ राम ऐसें नामपद । रम्य सोपें सर्वसुखद । केवळोच्चारें परमानंद । राम तो च आत्मारामता ॥ ४२ ॥ रामनाम तारक एवढी प्रौढी । विश्वेश्वरें उभारिली गुढी । त्या समर्थाचें आइकावें येवढी । प्रार्थना मना आमची ॥ ४३ ॥ हें आइकोनि वक्तयाचें वचन । श्रोते सप्रेम बोलती हांसोन । रामनाम सर्वजीवसंजीवन । कैसें आह्मां विसरवें ॥ ४४ ॥ विशेष तुझी प्रार्थना । तरि कां नये आमचिया मना । पावोनि सज्जनानुमोदना । वक्ता संतुष्ट स्वानंदें ॥ ४५ ॥ दश लक्षणांतूनि एकें प्रकारें । जो विनटोनि गेला निज निर्धारें । तो धन्य धन्य साक्षात्कारें । भगवद्भजनें कृतार्थ ॥४६॥ ऐसे भगवद्भक्त अपार । कवण जाणों शके पार । कांहीं-एक संक्षेपाकार । महिमा वर्णिला तयाचा ॥४७॥ परमात्मा विष्णु निरंतर । व्यापूनि सर्व सचराचर । सभराभरित विश्वंभर । असत च आहे अखंड ॥४८॥ तथापि कृष्णावतार पूर्ण होता । देवें अवलंबिली बौद्धता । सुरकार्यार्थ हरि स्वतां । यज्ञविधि निंदितसे ॥ ४९॥ युद्धें नाटोपे महादैत्य । विशेष आरंभिलें यज्ञ[1]चैत्य । ह्मणौनि स्वाश्रिता द्यावया जैत्यं[2] । प्रतिष्टिलें पाखंड ॥ ५० ॥ वैराग्य प्रतिष्टिलें स्वयें । जीवहिंसा करूं नये । शून्य आत्मा मतान्वयें । बौद्धशास्त्रसिद्धांत ॥ ५१ ॥ काशायांबरधारण । नग्न निस्पृह केशोत्पाटण । करीं कुंचे कुमंडल गणगण । निवारूं नये मक्षिका ॥५२॥ राहिला राज्याचा अभिलाष । शस्त्रें साडूनि धरिले वेष । जाला सुरवरा संतोष । स्वपदीं सुखें राहिले ॥ ५३ ॥ बौद्धावतार तो पाताळीं । मृत्युलोका आला कळी । यवनराज्य जालें बळी । सर्व धर्म लोपले ॥५४॥ कल्की[3] होईल कळीचे[4] प्रांतीं । अधर्मासी लावील ख्याति । भक्त स्वधर्म क्षितीं । प्रतिष्टील तत्वता ॥५५॥ पुढें जें जें आहे होणार । तें युगधर्मी परिसा सविस्तर । प्रस्तुत वर्णाश्रमधर्माचार । बोलिजेत असे ॥ ५६ ॥ हरिभक्ति कर्मपूर्वक । आणि स्वकर्म भक्तिप्रेमात्मक । करावें अगत्य ऐसा विवेक । नारदादिकीं केलासे ॥५७॥ तरि तें कर्मविधान कैसें । तें च

१ यज्ञमंडप. २ जय. ३ कलकी. ४ कलहाचे.

परिसावें सावकाशें । आणि हें अगत्य ठेहावें ऐसें । प्राप्त जालें ९ काळीं ॥ ५८ ॥ कळीमाजि मांडलें पाषंड । नाना वेंडें धरिती लंड । अशास्त्रवक्तयाचें तोंड । सज्जना तों धरवेना ॥ ५९ ॥ क्रियाहीन ज्ञानगोष्टि । स्वकर्म हरिभक्ति नाणिती दृष्टीं । यथेष्टाचारें तनुपुष्टि । अंत्यजाहूनि हीन ते ॥ ६० ॥ तें च आवडे जया जना । ते कां मानिती सज्जना । मन मिळोनि जाय मना । विकडे होय समुदाय ॥ ६१ ॥ ऐसे असज्जन जन जे कां । अपभ्रंश करिती आणिकां । ते कां परिसती आतां भाविकां- । कारणें धर्म बोलावे ॥ ६२ ॥ बोलिलें आहे श्रृतीं स्मृतीं पुराणीं । तें च बोलिजे प्रसंगप्रकरणीं । श्रोतीं परिसावें सुश्रवणीं । अगाध पुण्य ॥ ६३ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । महाविष्णुमहिमावर्णने । दशावतारादि देवभक्तमहिमावर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ६७ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो स्वसंवेद्या सनातना । नमो सदा नित्यनूतना । नमो शुद्धस्वरूपा सचेतना । निरंजना नमोस्तुते ॥ १ ॥ नमो अखंडमडळाकारा । नमो साकारनिराकारें निजाकारा । नमो सघना गगनांवरा । निरंतरा नमोस्तुते ॥ २ ॥ नमो निरंशा अविनाशा । नमो विस्तीर्णाद्विस्तीर्ण तरेशा । नमो वर्णरहिता स्वप्रकाशा । चिन्मयानंता नमोस्तुते ॥ ३ ॥ नमो निर्विषयानंदा । नमो निजलाभपूर्णपदा । नमो निर्मना निर्जीवा निर्देहा निर्द्वंद्वा । निरींद्रिया नमोस्तुते ॥ ४ ॥ नमो व्यतिरेक व्यापका । नमो अन्वया अव्ययात्मका । नमो प्रणत अभिन्ना भिन्नांका । भाससहिता नमोस्तुते ॥ ५ ॥ नमो सहज सरळा समसमाना । नमो विद्या अविद्या अखंडा विद्यमाना । नमो ज्ञान अज्ञान अभेदा चिद्घना । यथास्ति तथा नमोस्तुते ॥६॥ नमो तन्मयां श्रोतयांप्रति । अनन्य भावें अखंड प्रीति ।

---

१ परब्रह्म. २ अन्वाप्ति, ३ व्याप्ति.

वर्वे जालें निराकृति । विश्वाकारें भासला हे ॥ ७ ॥ स्वरूपसत्ता विश्वाकारी । प्रगटली च नसती हे जरि । एवढा स्वानंद हा तरि । कैसा बाह्य प्रकाशता ॥ ८ ॥ एथीचें बाहिरी तें हि आतवटीं । सेवट हि पडला असे पोटीं । अभ्यंतर बाह्य अघटी । अवघें च कीं ॥ ९ ॥ अघटित स्वजातीय विजातीय स्वगत । ब्रह्म भेदत्रयविरहित । ह्मणौनि श्रुतिस्तव आशकोचित । दिसे भासे तें ब्रह्म ॥१०॥ अनुभवे उघडिया दृष्टीं । ब्रह्मरूप सर्व सृष्टि । तन्मयें ब्रह्मकर्मी ब्रह्मपुष्टी । ब्रह्मरूप स्वभावें ॥ ११ ॥ कर्मेसीं कर्ता ब्रह्ममय । ऐसें श्रुतीस्मृतीचें प्रमेय । तरि तें कर्म ब्रह्मनिष्ठासी काय । प्रतिनंद्ध होईल ॥ १२ ॥ ब्रह्मनिष्ठासी काहीं च । तत्वता कर्तव्य नाहीं च । सहजकर्मप्रवाहीं च । यावदेह तावत्तें ॥ १३ ॥ ब्रह्मनिष्ठता हि इंद्रियस्वभाव । न पालटे अथवा नव्हे वांव । तैसा च स्वकर्मप्रादुर्भाव । महामुक्ता हि अवश्य ॥१४॥ जयाची जीवदशा च पालटली । कर्मकोशा हि तन्मयता आली । अहेतुक तथापि जाली । ते कर्तव्यता तत्वता ॥ १५ ॥ कर्मकर्तव्यता अगत्य जाली । तेव्हा विधिकिंकरता तों आली । खडङ्ञानियाची हे बोली । अंखडीं हे असेना ॥ १६ ॥ ब्रह्मानुभवे स्वयत्नेंविण हि स्वता । आपपण च विधिविधान कर्मवर्मता । तया अखडैक ब्रह्मभूता । किंकरत्व तें कैचें ॥१७॥ आता असो हा निर्वाहो । निसर्ध्यासी कैचा समोहो । परिसा सहजकर्मप्रवाहो । वर्णाश्रमधर्मीचा ॥ १८ ॥ स्वकर्म साडूनि परकर्मी प्रवेशे । तो पाखडी जाणावा विशेषें । तो सर्वत्रहिष्कृत दोषें । दडिजे यमकिंकरीं ॥ १९ ॥ ब्राह्मण क्षेत्रि वैश्य शूद्र वर्ण च्यारि । च्यारि च आश्रम नित्य निर्धारी । पचम असेचना सा हि भीतरीं । वेदकर्म वर्णत्रयीं ॥ २० ॥ स्त्रिया शूद्रासी आचार । पुराणोक्त हा निर्धार ।

---

१ वळ २ प्रतिकारक. ३ व्यर्थ ४ विधिविधानाप्रमाणें वागणूक किंकरता= दास्य. ५ नादावत पदार्थाचे ज्ञान. ६. आत्मज्ञानाचे ठिकाण. ७ वर्तणूक अथवा व्यवस्था ८ नि सदेहासी? ९ अतिभ्रांति. १० क्षत्रिय. ११ ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि सन्यास. १२ पहिल्या तीन वर्णांस.

विधवांसी विशेष सविस्तर । तें च आतां बोलिजे ॥ २१ ॥ गर्भाधानादि सर्व संस्कार । करावे मंत्रविधानपुरसर । स्त्रियांसी अमंत्रता काळविधिप्रकार । करणें मंगळप्रद ॥ २२ ॥ पुत्र उपजतां च पिता । सचैल स्नानें जातकर्म स्वतां । हिरण्यश्राद्ध करावें मंत्रता । अन्नश्राद्धें चांडाळासम ॥२३॥ अभ्युदयिक श्राद्ध । पित्यानें करावें प्रसिद्ध । अस्पष्टहीनार्थ गुर्वक्षर विषमाक्षरविरहित शुद्ध । नाम ठेवावें सूतकांतीं ॥२४॥ अरूपें रूप अवलंबिलें । अनायासी नाम ठाकलें । अकर्म्यासी कर्म आरंभलें । ऐक्यरूप सर्व हि ॥ २५ ॥ तृतीय वर्षी चौलकर्म । पंचम षष्ठ अथवा सप्तम । गृह्योक्त कर्मपूर्वक नेम । करावें विधिपूर्वक ॥ २६ ॥ दैवयोगें गर्भाधानादि चौलपर्यंत । जरि जालें अतिक्रांत । तरि पादकृच्छ्र प्रायश्चित्त । तदर्ध चौलीं बोलिलें ॥२७॥ गर्भाष्टम अथवा अष्टम वत्सरीं । ब्राह्मणासी उपनयन निर्धारीं । आषोडशाब्द अंतरायें करी । गौमतस्मृति प्रसिद्ध ॥ २८ ॥ गर्भैकादशम वर्षी राजन्य । मौंजीकर्म धन्य । आद्वाविंशति वर्षपर्यंत अनन्य । अवकाश असे संकटीं ॥ २९ ॥ गर्भद्वादशाब्दीं वैश्याचें । उपनयन बोलिलें साचें । चतुर्विंशति वर्षवरि याचें । मुक्त असे संकटीं ॥३०॥ एतत्काळावधीसी हि अतिक्रम जाला । साविली पतित ह्मणिजे तयाला । सर्वथा बोलों नये लीला । स्वभावें हि तयासी ॥ ३१ ॥ द्विजोपनयनाचा मुख्य काळ । तयाचा व्यतिक्रमीं प्रायश्चित्त बहुळ । द्वादशाब्दावधीं कृच्छ्र केवळ । मग चांद्रायन आचरावें ॥ ३२ ॥ मग सांतपनें दोनी । आचरावीं भर्वसेनी । हें न करितां मौंजीबंधनीं । पतित कर्ता ब्रह्म हा ॥ ३३ ॥ मौंजीबंधन ब्राह्मणा । क्षेत्रिया धनुषग्रहण जाणा । औंवी वैश्यासी ग्रहणा । आता अंजिनें अवधारा ॥ ३४ ॥ ब्राह्मणा मृगचर्म प्रधान । क्षेत्रियासी रौहिजीन । वैश्यासी बोलिलें अजजीन । दंडधारण परिसावें ॥ ३५ ॥ पाळाशदंड केशपर्यंत विप्रासी । उदुंबर आललाट क्षेत्रियासी । नासाग्रपर्यंत बिल्वदंड वैश्यासी । आता वस्त्रें अवधारा ॥ ३६ ॥

---

१ राहिलें. २ जावळ काढणें. ३ अवी=मेंढा. ४ आसनें.

काषाय मांजिष्ठ हारिद्र [4]चैलें । ब्राह्मण क्षेत्री वैश्य क्रम ठेलें । ब्राह्मणें गुरुगृहीं वसावें सीळें । वेदाभ्यासपर्यंत ॥ ३७ ॥ प्रातस्नायी गुरुसेवक वर्णी । वर्णी ह्मणिजे स्त्री दृष्टी न पाहे नायिके कर्णी । समिधा कुश फळीं पर्णीं । नित्य संतर्पी गुरूसी ॥ ३८ ॥ यज्ञोपवीत अजिन मुंज-दंड । नष्ट भ्रष्ट होतां मंत्रीं नवीं ध्यावीं अखंड । जळप्रवाह करावीं जें खंड । जेनीं भिक्षान्नभोजन ॥३९॥ भिक्षान्न श्रोत्रियागारींचें । जितें-द्रियता मागावें साचें । गुरूसी अर्पूनि आज्ञेनें त्याचे । स्वयें भोजन करावें मौनें ॥ ४० ॥ यज्ञ करावे प्रति दिवसीं । ब्रह्मयज्ञ ह्मणिजे तर्प-णासीं । अग्निकार्यपरित्यागी त्यासी । पातित्य बोलती बुध ॥ ४१ ॥ ब्रह्मयज्ञघ्न तो ब्रह्मघ्न । गुरुशिश्रूषाअकृत कृतघ्न । देवार्चन न करी तो पुण्यघ्न । ह्मणौनि करावीं प्रयत्नें ॥ ४२ ॥ नित्य भिक्षान्न भक्षावें । कदा एकान्न न सेवावें । अनिंद्य विप्रगृहीं मागावें । त्यागावें निंद्य जनासी ॥ ४३ ॥ स्त्रीसेवन मधु मांसाशन । लवण तांबूल दंतधावन । उ-च्छिष्ट दिवाशयन परिवाद उपताप विप्रालाप अंजन । पापंडजन शूद्रसंग वर्जावा ॥ ४४ ॥ असावें अभिवंदनसीळ । ज्ञानवृद्ध तपोवृद्ध वयोवृद्ध केवळ । वेदशास्त्र उपदेष्टा सुसीळ । आदिकरूनि वंद्य वंदावे ॥ ४५ ॥ सर्वथा वंदूं नयेति ब्राह्मणा । त्यांचिया परिसावें लक्षणा । नीचवर्णाश्रम उँचा विचक्षणा । वंदूं नयेति सर्वथा ॥ ४६ ॥ नास्तिक अमर्याद कृतघ्न ग्रामयाचक । पापंड पतित व्रात्य नक्षत्रपाठक । पातकी उन्मत्त पठ धूर्त धांत्रतादि अनेक । अशुचि नये अभिवंदूं ॥४७॥ अति उच्च जयाचें शिर । हीनांग अधिकांग मूर्खतर । सर्वथा वंदूं नये तो नर । विनीतें हि शाश्वतः ॥४८॥ स्नान करिता जळांत असतां । भक्षितां अथवा उदक घेतां । भिक्षान्न समिधा पुष्पें करीं असतां । वांततां भांडता शयनता अवंद्य ॥ ४९ ॥ स्त्रिया वंदाविया पतिव्रतादि सुमता । माता आदिकरूनि ज्या वंद्या शाश्वता ।

---

१ भगवें. २ तावडें. ३ हिरवें. ४ कपडा. ५ अग्निहोत्र्याच्या घरचें. ६ पतितपणाची स्थिति. ७ अतिशय उंच. ८ दैवज्ञ, प्रश्नज्योतिषी. ९ वांति होत असताना.

अवघा वदू नयेति तत्त्वता । श्रवण करीं तयासी ॥ ५० ॥ भर्तृघ्नी पुष्पिणी जारा । सूतैका गर्भपातिनी दुराचारा । कृतघ्नी चंडा कळहपरा । वदू नये सर्वथा ॥५१॥ सभा यज्ञशाळा देवगार । तेथें रांग्नि अग्नि देवाभिमुख नमस्कार । प्रत्येकें जरि करी नर । तरि हरी पूर्वपुण्यासी ॥ ५२ ॥ श्राद्ध व्रत दान देवतार्चन । यज्ञ तर्पण करिता न करावें वदन । न कळोन करिल प्रतिवचन । आपण तया नेंदावें ॥ ५३ ॥ वद्य अवद्य शास्त्रता । वदावे न वदावे वर्णिले सक्षेपता । अध्ययनप्रकार परिसा आता । पादप्रक्षाळन अचमन करावें ॥ ५४ ॥ गुरुचरणीं ठेऊनि शिर । सादर वैसावें समोर । अध्ययन करावें स्वरवर्णोच्चार । वर्ज्यी तिथी वर्जोनिया ॥ ५५ ॥ अष्टक चतुर्दशी प्रतिपदा पर्वी । महाभरणीं श्रवणद्वादशीं श्रोत्रीमरणीं सर्वी । आषाढी कार्तिकी फाल्गुनी कृष्णद्वितीया उर्वी । भाद्रपदा पक्ष द्वितीया ग्राम दाही वर्जावे ॥ ५६ ॥ माघी सप्तमी नवमी अश्विनी युक्ता । सूर्य परिवेशीं गृहासि येता श्रोत्रिया मुक्ता । थोर कळहो सध्याकाळ अकाळवृष्टि घनगर्जना य्यक्ता । इतुक्या वेळा अध्ययनीं ॥ ५७ ॥ उल्का शनी प्रपात । विप्रा अपमान होत । मन्वादि युगादि वुद्धिमत । वर्जूत का अध्ययनासी ॥ ५८ ॥ कृष्ण तृतिया वैशाखीर्सा । प्रेत पक्षीं त्रयोदशी । कार्तिक शुद्ध नवमी माघ पौर्णिमेसी । युगादि महा पुण्यकाळ ॥ ५९ ॥ मन्वादि श्रवण करीं आता । आश्विनीयुक्त कार्तिक शुक्र नवमी द्वादशी सीता । तृतिया चैत्रीं भाद्रपदीं आषाढ शुक्र दशमी शीता । माघमासींची सप्तमी ॥ ६० ॥ श्रावणमासीं कृष्णाष्टमी । आषाढी पौर्णिमा फाल्गुनी आमा नेमीं । पौष एकादशी सीता दशमी । कार्तिक फाल्गुन चैत्र ज्येष्ठी ॥ ६१ ॥ या मन्वादि विख्याता । श्राद्धादि पुण्यतिथीसी तत्वता । श्राद्धीं चद्रसूर्यग्रहणीं अनया दिसी वर्मता । अध्ययन करू नये ॥ ६२ ॥ शवानुगमनीं

---

१ नव यास मारणारी २ रतुस्नात ३ वाळतीण ४ रागीट किंवा उग्र स्त्री ५ राही तर नव्हे ? ६ उलट नमस्कार करू नये ७ अध्ययन करण्यास वर्ज्य तिथी ८ पात, पतन. ९ अमावास्या

आरण्य पदार्थे । दोहीं सुतर्कीं न पढावें । सर्पदर्शन भूमिकंपादि उत्पातप्रादुर्भावें । इत्यादिकीं पढों नये ॥ ६३ ॥ अनाध्यायीं अध्ययन करी तरि । प्रजाप्रज्ञा यश श्री आयुष्य[1] बळ आरोग्यता यम हरी । ब्रह्महत्येचा दोष वैसे शिरीं । त्यासह वदों वसों नये ॥ ६४ ॥ अनधीत शास्त्रीं प्रवर्ते नर । त्याचा व्यर्थ सर्व आचार । वेदरूप साक्षात विष्णु सर्वेश्वर । शब्दब्रह्ममय वेद ॥ ६५ ॥ ह्मणौनि वेदशास्त्र सदाचारें । कर्मफळ पाविजे नरें । सांग पढोनि वर्ते दुराचारें । तो हि जाला पतित ॥ ६६ ॥ जरि पढे स्वरहीन । तरि अवश्य पावे पतन । ऐसा तन्हि अध्ययनाभास जतन । करावा च कीं कळीमाजि ॥ ६७ ॥ आतां कळी कळींत अनधीत । गायत्री मात्रें वेदवंत । ते हि शास्त्राचार करुत । युगासारिखा सर्व हि ॥ ६८ ॥ श्रुति स्मृति विप्रडोळे । एकेविण एक भोंगळे । दोन्ही नाहींत ते अंध वोंगळे । दोन्ही असोनि ते पतित ॥ ६९ ॥ आतां असो हें काळासारिखें । आचरण च मांडलें पारिखें । तथापि अभिमानियें ओंरिखें । रुचिधर्मी धर्मीमा ॥ ७० ॥ कलियुगीं कल्मपमय मन । निश्चयें अन्य धर्मी अनधिकारी जन । राम या द्व्यक्षरनामस्मरणप्रेमें सज्जन । मोक्ष पावती तत्वता ॥ ७१ ॥ भक्तियुक्त करितां कर्म । निउन तें पूर्ण करितें वर्म । अधर्माचा च करी धर्म । नामस्मरण रामाचें ॥ ७२ ॥ रामनाम उच्चारितां भावें । चतुर्वेदपारायणफळ पावे । केवळ वेदाध्ययनाच्या च अभावें । हरिभक्त न तरे हें न घडे ॥ ७३ ॥ याची साक्षि प्रत्यक्ष पुराणीं । रामनाम अनायासें येता वाणीं । सर्व धर्मबहिष्कृत पापी वैकुंठपट्टणीं । होऊनि राहिले दिव्यदेही ॥ ७४ ॥ ते हि सत्ययुगाभीतरीं । मदोन्मत्त दुराचारी । आतां ये कलियुगीं तरि । काय करितीं बापुडीं ॥ ७५ ॥ सर्व धर्मी आहे भक्ति । परि करावया नाहीं शक्ति । वर्जावया अधर्माची व्यक्ति । चरफडती परि नावरे ॥ ७६ ॥ तथापि हि कळीपासूनि तरावें ।

---

[1] रक्षण करण्याकरितां.

ह्मणौनि हरिनाम स्मरती भावें । ते न तरती कर्म सांगता अभावें । तरि काय नाममहिमा असत्य ॥ ७७ ॥ ह्मणौनि भगवद्भक्तीचें सामर्थ्य अकळ । भक्ता भगवद्रूप च कर्म सकळ । जैसें ब्रह्मरूप गंगाजळ । नितळ ढहुळ अवघें च ॥ ७८ ॥ कर्म कर्ता फळप्राप्तिता । विष्णुमय आहे तत्वता । ते विष्णुस्वरूप सायोज्यता । विष्णुस्मरणें तद्भक्ता॥७९॥ आता कर्म ब्रह्मयेक्य भावें । महा मुक्ता हि स्वभावें । सहज सुखें स्वानु- भवें । अहेतुक हि कौतुक ॥ ८० ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामि- रामदासकृते । भक्तियुक्तसदाचारे गर्भाधानादि ब्रह्मचर्याश्रमधर्मवर्णन । नाम प्रकरण समाप्तम् ॥ ६८ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो सद्रूपा परमेश्वरा । नमो सदाचारसीळ करुणाकरा । नमो सज्जनवज्रपंजरा । नमो भक्तजनवत्सळा ॥ १ ॥ नमो सत्कर्मफळदा । नमो सत्कर्मरुद्वरदा । नमो सत्कर्मे[1] कर्मकंदा- । विध्वंसका श्रीहरि ॥२॥ नमो सत्कर्मप्रवर्तका । नमो कर्माकर्म विकर्मापहारका । नमो कर्मसाक्षी निष्कर्मात्मका । नमो कर्मब्रह्मस्वरूपा ॥ ३ ॥ नमो योगीजनमनोरमा । नमो योगकर्मप्रकाशका रामा । नमो भक्तजनविश्रामा । भक्तिकर्मप्रबोधका ॥ ४ ॥ नमो वर्णाश्रमधर्मविकाशा । नमो वर्णाश्रमातीता स्वप्रकाशा । नमो सहजकर्मप्रेरका परेशा । नमो कर्मसरक्षणा ॥ ५ ॥ नमो निर्द्वंद्वा निरामया निराभासा । नमो भासाभासस्वरूपा चिद्विलासा । नमो अखंडा- नंदा विनोदावभासा । कारण कारणकारणा ॥६॥ तुजवेगळें काहीं च नाहीं । तरि कर्म कर्तव्य कर्ता तव रूप पाही । तुजहूनि अन्य असते जरि काहीं । तरि भिन्नता घडती हो ॥ ७ ॥ आता तुज विश्वबीजाचा विस्तार । हो का स्थूळमानें हि दृश्याकार । साचासारिखा हि दिसो

---

[1] कर्मकांड

जनप्रचार । आचारविचारें विचित्र ॥८॥ तो अवघा च सदाचार योर्गे । तुझेन स्वरूपें अमोघें । तेथें ह्मणणें न घडे नाहीं न करीं नेंवे । तन्मया तया महामुक्ता ॥ ९ ॥ आग्रह निग्रह ग्रहणीं त्यागीं । सहजीं असेना मुक्ताआंगीं । पूर्वप्रकरणीं वर्णिलें ब्रह्मचर्यालागि । आतां गृहस्थाचार परिसावे ॥ १० ॥ वेदाभ्यासपर्यंत गुरुगृहीं वसोन । सेवापूर्वक करूनि अध्ययन । मग गुरुआज्ञा घेऊन । दाराग्रहण करावें ॥ ११ ॥ रूप लक्षण गुण धन्या । सुसीळा धर्मचारिणी कन्या । वरावी सुकुळोद्भवा अन्या । विलक्षणा वर्जावी ॥ १२ ॥ पितृतः सप्त मातृतः पंच । हें सप्तम पंचम होय साच । हें वर्जून करावें मुलग्न तें च । अन्यथा गुरुतल्पग ॥ १३ ॥ रोगिणी सरोगकुळींची । वृत्ताक्षी[1] विपरीताक्षी जे साची । अतिकेशा अकेशा ते चि । कासयासी वरावी ॥ १४ ॥ स्थूळ गुल्फ दीर्घ जंघा पुरुषाकृति । स्मश्रु व्यंजनान्विता विकृतिवती । वृथा हास्य सदा अन्य गृहीं वसति । विवादसीळा न वरावी ॥ १५ ॥ अमिता निष्ठुरा बहु वादाड । स्थूळदंता स्थूळोष्ठी घर्घरस्वरा[2] द्वाड । अति कृष्णा शुभ्रा ताम्रा रडरड । सदा करी ते न करावी ॥ १६ ॥ कुत्सिता धूर्ता अनर्थभाषिणी । सर्वथा वर्जावी लोकद्वेषिणी । गर्विता वक्रवृत्ति चोरटी कुलक्षणी । दीर्घनासा वर्जावी ॥१७॥ ऐसीं वधूचीं विलक्षणें । वर्जिलीं ग्रंथकारें विचक्षणें । तें साडूनि सुलक्षणें । वधूलागीं वरावें ॥१८॥ न कळतां वरिजे कुमारिका । तेव्हा नेणिजे लक्षणाका । तरि प्रगल्भा जालिया ते नायका । तत्काळ च तजावी ॥ १९ ॥ तजूनि जाऊं नेंदावी दुरी । नियतें रक्षावी स्वभुवनांतरीं । दूरि दवडितां यथेष्टाचारीं । लागों पाहे दूषण ॥ २० ॥ अथवा दवडावया च योग्य जाली । किंवा आपण च निघोनि गेली । तरि घटस्फोटें शुद्धता जाली । आणिक लग्न करावें ॥ २१ ॥ तैसीं च वराचीं लक्षणें शास्त्रकारीं । लक्षावीं च कीं गृहस्थीं चतुरीं । अयुक्त सांडूनियां दूरि । द्यावी कुमारी सुलक्षणा

---

[1] गोलवाटोळ्या डोळ्यासारखे जिचे डोळे आहेत अशी. [2] भनगद.

॥ २२ ॥ वर तो थोर च असे जाणता। त्याची प्रसिद्ध दिसे लक्षणता। तथापि हि न कळे दैवयोगता । जरि स्वधर्मापासूनि भ्रष्टला ॥ २३ ॥ तरि स्त्रीपुत्रीं हि भ्रष्टावें । ऐसें न घडे शास्त्रभावें । प्रति शरीरीं वर्णधर्मरक्षण करावें । बोलिलें तेणें प्रकारें ॥ २४ ॥ विवाह आहेति अष्टविध। ब्राह्मणादि पूर्वोत्तर प्रसिद्ध । ब्राह्य दैव आर्ष प्राजापत्य आसुर एवविध । गांधर्व राक्षस पैशाच ॥२५॥ यामध्यें ब्राह्मणासी अगत्य । ब्राह्य दैव आर्ष प्राजापत्य । पूर्वाभावें अपर हें सत्य । दाराग्रहण ब्राह्मणा ॥ २६ ॥ गृहस्थाश्रमावलंबनीं । यज्ञोपवीतें धरावीं दोनी । एक ब्रह्मसूत्र उत्तरीस्थानीं । दुसरें हें अगत्य ॥ २७ ॥ सुवर्णकुंडलें धौतवस्त्रयुग । चंदनानुलेपन लिंगाग । श्मश्रु कर्म वेण दंडधारण योग । जळपूर्ण कमंडलु ॥ २८ ॥ पुष्पमाळा सुगंधादि धारण । उष्ण कंटक निवारणार्थ छत्री पादत्राण । नित्य स्वाध्याय यथोक्ताचरण । परान्न परापवाद वर्जावीं ॥ २९ ॥ पायें पायासी न घासावें । उच्छिष्ट सर्वथा त्यजावें । दोहीं हस्तीं न खाजवावें । आपुलें शिर सर्वथा ॥ ३० ॥ पूज्य देवालय डांवलूं नये । देवतार्चन आत्मन स्नानान्वये । व्रत श्राद्धादि क्रिया करूं नये । मुक्तशिखा एकवस्त्रें ॥ ३१ ॥ बैसों नये उष्ट्रावरी । सेऊं नये परनारि । परवेश्न्यें करूं नये निर्धारीं । शुष्क वाद वर्जावा ॥ ३२ ॥ श्राद्धतर्पणेंविण अपसव्यता । कदा असों नये स्वता । असूया मत्सर न करावा शास्त्रता । दिवा निद्रा करूं नये ॥३३॥ अनुवादों नये परपाप । वदों नये स्वपुण्यप्रताप । स्ववय स्वजन्मनक्षत्र मान रूप । वदों नये सर्वथा ॥३४॥ *त्यजावें अशास्त्रश्रवणास । त्यजावा दुर्जनसहवास । त्यजावें द्यूत ग्राम्य*गीतास । मनापासूनि द्विजवरें ॥३५॥ आर्द्रअस्थी उच्छिष्ट । शूद्र पतित स्पष्ट । होतां सर्पमिपंजस्पृष्ट । सचैल स्नान करावें ॥ ३६ ॥ *श्वान* कुर्कुट मार्जार देवळक । मद्यभांड रजस्वला चंडाळ आणिक । चितिची काष्ठादि सकळिक । अस्पृष्टास्पृष्टीं सचैल स्नान ॥ ३७ ॥ दीप खेंट्वा

---

१ जोडे. २ टाकू ३ दुसऱ्याचें उणें पाहूं नय. ४ दोषारोप. ५ पुन:पुन्हा उच्चारूं नये. ६ हाडूक. ७ गारुड्याचा स्पर्श. ८ कोंबडा. ९ खाट, बाज.

तनुछाया । केश वस्त्र नख पानीया । अंश संमार्जनीं रज पुण्यक्षया । कारण ह्मणौनि वर्जावीं ॥ ३८ ॥ पुण्यक्षेत्र धर्मसभा । अश्वत्थ देवतायतन शोभा । चतुष्पथ सामिप्यें पुण्यद प्रभा । अपसव्यें घेऊनि जाऊं नये ॥ ३९ ॥ शिरोभ्यंगावशेष तेलें करीं । लेपन करूं नये शरीरीं । अशौचता तांबूलचर्वण निर्धारीं । उठऊं नये निद्रिस्था ॥४०॥ अग्नि देव गुरू पूजे । नित्य तत्पर असावें द्विजें । एकहस्तें वामहस्तें मुखांबुजें । अंबु प्राशन करूं नये ॥ ४१ ॥ गुरुछाया गुरुआज्ञा गुरुमर्यादा । उल्लंघूं च नये कदां । विप्र व्रती यति योगिनी निंदा । करूं नये द्विजवरें ॥ ४२ ॥ करूं नये कदां मर्मविदारण । पुण्यकाळीं करावें श्राद्धाचरण । धरावें अग्निशिश्रूषण । औपासन त्यागी सुरापी ॥४३॥ निघाळिया नवें धान्य । श्रोत्रीगृहासी आळियां धन्य । पुण्य तीर्थक्षेत्रीं अनन्य । श्राद्ध करावें अगत्य ॥ ४४ ॥ ऊर्ध्व पुंड्र त्रिपुंड्रधारण । वैष्णवां शांभवां सांप्रदायप्रमाण । एवमादि करितां स्वधर्माचरण । विष्णु संतुष्टे तयासी ॥ ४५ ॥ असो ऐसे धर्म बोलिले । तेथें जें जें निउन जालें । तेथें जेणें हरिस्मरण केलें । संपूर्ण जालें तें कर्म ॥ ४६ ॥ हरिस्मरणें सर्व सपूर्णता । हरिस्मरणें अधर्म पावे स्वधर्मता । हरिस्मरणें हरिसायोज्यता । विधिनिषेध ते किंकर ॥ ४७ ॥ हरि सर्वधर्मधारक भर्त्ता । हरिरूप कर्म आणि कर्त्ता । हरिविण नाहीं अन्य वार्ता । हरिस्वरूपानुभवें ॥ ४८ ॥ सहस्र छिद्रें दिसतीं घटता । आकाश न खडे तेणें स्वता । तैसा ब्रह्मानुभवीं कर्मछिद्रता । सछिद्र नव्हे स्वरूपें ॥ ४९ ॥ आतां असो हें बोलिलें सीळ । पुढें परिसा नित्यकर्म केवळ । जेणें पाविजे संपूर्ण फळ । अपूर्ण ते पूर्ण हरिरूपें ॥ ५० ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । सदाचारे गृहस्थसीळवर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ६९ ॥

---

१ शेळी. २ पाणी. ३ सन्यासी.

॥ श्रीरामो जयति ॥

नमो निराभास च साभासा । नमो भास च निराभासा । साभास च निराभास च ऐसा । अपरिछिन्ना नमोस्तुते ॥ १ ॥ नमो निःप्रपंचा प्रपंचाकारा । नमो स्वस्वरूपता अलिप्ता तद्विकारा । नमो निखळा श्रुतिनिर्धारा । कर्मधर्मस्वरूपा ॥ २ ॥ कर्तयासी मिथ्या जीवता । ते तन्मय तुज ध्यातां । तेथें सहज कर्म धर्मता । तुजवेगळी घडेना ॥ ३ ॥ तूं सकळादि स्वस्वरूप एक । जेथें असेचना द्वैतांक । तेथें मासलें विश्व अनेक । तें त्यावेगळें नव्हे च कीं ॥ ४ ॥ आंवर्त कंतेरी कंल्लोळ । तद्विकारें अविकारें केवळ । स्वयें स्वरूपें शुद्ध जळ । दुजें तेथें कैंचें हो ॥ ५ ॥ तैसी निर्गुण निर्विकारता । अथवा सगुण साकारता । ब्रह्मस्वरूप च कीं स्वतां । दुजें कैंचें बोलाया ॥ ६ ॥ तरी ब्रह्मत्वें ब्रह्मरूप । कर्मत्वें कर्मरूप । कर्मब्रह्मत्वें स्वस्वरूप । स्वसंवेद्य तें ॥७॥ असो हेतु मात सहित । कर्म कर्ता ब्रह्म सदोदित । अखंड अभेद अद्वैत । द्वैताभासता तद्विलास ॥ ८ ॥ जैसी अघटित घटना प्रपंचासी । न्रजूनि समव नाहीं आत्मयासी । तैसी कर्मकर्तव्यता मुक्तासी । करूनि अकर्तृत्व न मोडे ॥९॥ आघवीं ब्रह्म मध्यें भासलें कर्म । तें तन्मय च हें बोधमर्म । तन्मय महामुक्त क्रिया कर्म । तो च आतां परिसावा ॥१०॥ पूर्व प्रकरणीं वर्णिलें सीळ । आतां बोलिजे नित्यकर्म केवळ । ब्रह्मचर्य निरोपिलें निश्चळ । गृहस्थाचार परिसावा ॥११॥ ब्राह्ममुहूर्तीं सुप्तप्रबोधु । राम स्मरोनिया स्वबोधु । स्वकर्मी प्रवर्ते साधु । अविच्युत रामचिंतनें ॥१२॥ रामचिंतनचमत्कार । अखंड वृत्ति तदाकार । सहज संपादे सदाचार । मौनें अमौनें अभग ॥ १३ ॥ रायविनोदाचा क्रियाक्रम । तो आत्मस्मरणें विस्मरणेंविण सम । कर्मसाहित्यासी न दिसे विराम । हे हातवटी च त्यासी मुळींहूनि ॥१४॥ तैसा मुळींहूनि तपोनिष्ठ स्वकर्मतत्पर । तेणें

---

१ भोंवरा. २ कातर. ३ खळसळाट. ४ कल्पना. ५ घडलेली गोष्ट. उत्पन्न करून. ७ झोपेंतून जागे होऊन. ८ रायनद=बहुरूपी. ९ शेवट.

स्वभाव च शोभे शरीर । तेणें च साधनें आत्मसाक्षात्कार । ब्रह्मरूप सर्व हि ॥१५॥ देहबुद्धि मलिनत्वें मळमूत्र । त्यागावया विधि विचित्र। मनोश्रवणीं ब्रह्मसूत्र । ब्रह्मज्ञ ब्राह्मणें घालावें ॥ १६ ॥ ते श्रवणधारणा साक्षात्कारी । अखंडता सव्यापसव्य उभयत्वरहित प्रकारीं । मूत्रीं दक्षणकर्णीं पुरीषार्थ वामे निर्धारीं । पुण्य मैथुनीं उपवीत ॥ १७ ॥ दिवसा बैसावें उदङ्मुख । रात्रौ दक्षिणेसी च दक्षिणामुख । वस्त्रें आच्छादूनि मस्तक । समपाद मौनेंसीं ॥ १८ ॥ वाट गोठणें नदीतटाकं । वृक्षछाया कांतारें उद्यानादिक । अग्नि ब्राह्मण देव गुरु गो स्त्री सकळिक। यांसन्निध बैसों नये ॥१९॥ तुषं भस्म अस्थि जळीं । मळमूत्र करूं नये कव्हणियेकाळीं । इत्यादि वर्जून उक्त सतृणस्थळीं। मळमूत्रोत्सर्ग करावा ॥२०॥ यत्नें करावा शौचविधि । शौचमुळें द्विजत्वा प्रसिद्धि । शौचाचार न करी दुर्बुद्धि । त्याचें सर्व कर्म निष्फळ ॥२१॥ शौचाचार दों प्रकारीं । भावशुद्धि अभ्यंतरीं । मृतिका जळें बाहेरीं । प्रक्षाळण प्रसिद्ध ॥ २२ ॥ अंतरशौचेविण बहि:शौच । खरकटें पात्र जैसें तैसा च । अंतरशौच कैसा तें च । निरोपिजेत असे ॥ २३ ॥ अंतरशौच ह्मणिजे भावशुद्धि । भावनेसी देहो च मी हे च अशुद्धि । आत्मसाक्षात्कारें त्रिशुद्धि। अंतरशौच तत्वता ॥ २४ ॥ ऐसें ह्मणिजेलि अर्थविद्दीं । सदाचार बोळिजे जीवपदीं । आत्मसाक्षात्कार अविद्दीं । स्वकर्म सर्वत्र बोळिजे ॥ २५ ॥ ऐसिया प्रश्नाचें प्रत्योत्तर । वक्ता देतसे जोडूनि कर । जो नित्यकर्मनिष्ट आसुर । होते आहेति आतां हि ॥ २६ ॥ तयाचें देहाभिमानपूर्वक । कर्म तें संसारसूचक । ब्रह्मनिष्ठां ब्रह्मात्मक । तेथें ब्रह्मैक्य सर्वत्र ॥ २७ ॥ तत्वता आत्मसाक्षात्कारेंविण शौच । देहाभिमानें तो आहा च बाहा च । जे मळ बाहेरी निघाले ते च । भरले असती अंतरीं ॥ २८ ॥ मळत्यागाचा बाह्य वळसा । अंतर ग्रहणाचा निर्मळ कैसा । अपूर्व शास्त्रार्थ हा ऐसा । कर्म प्रवृत्तिकारणें ॥ २९ ॥

---

१ मलविसर्जनाचे वेळीं. २ गुरचरणीची जमीन. ३ अरण्य. ४ बाग. ५ कोंडा, भूस. ६ निश्चयेंकरून. ७ राक्षस.

देहबुद्धि च अमंगळ । भवभावना दोषमूळ । सर्व च निर्मळ सर्व च समळ । तत्त्वता निर्मळ तें नव्हे ॥ ३० ॥ ब्रह्मस्वरूप सदोदित निर्मळ । तेथें कैंचें जीवकल्पनामळ । तये स्वरूपसाक्षात्कारीं अनिवळ । तो च शुद्ध अखंड ॥ ३१ ॥ आतां बाह्यशौचशुद्धांसी । मृत्तिकाजळें च अनायासीं । अति शुद्धता बोलिजे त्यासी । श्रवण करावें यथार्थ ॥ ३२ ॥ वामकरें लिंग उचलूनि धरावें । निराळें ऊर्ध्वसी लागों नेदावें । मळापासूनि अलिकडे यावें । तेथें शोच करावा ॥३३॥ मुखश्रादि वल्मिकोद्भूता । हळेंदंतादि निर्गता । वापीकूपादि खनिता । मृत्तिका शौचीं अग्राह्य ॥ ३४ ॥ त्यक्त करूनि अयुक्त स्थळें । अनुष्ठित यथोक्त स्थळींची सुसीळें । शौचार्थ आणावी निर्मळें । शौचाचाराकारणें ॥ ३५ ॥ एकवेळ लिंगासी लाऊनि । प्रक्षाळावें तये स्थानीं । पचवेळ लाऊनि अपानीं । दुर्गंधापहार करावा ॥ ३६ ॥ तेथूनि उठोनि तीरासी यावें । शौचशेष साडूनि द्यावें । आणिकें जळें आरभावें । करचरणक्षाळण ॥ ३७ ॥ दशवार मृत्तिका तोयें । वामपाणी प्रक्षाळावा. स्वयें । सप्तवार प्रक्षाळण उभये । हस्तकीं मृत्तिका लाऊनि ॥ ३८ ॥ तीनिवेळ पादतळपृष्ठीं । मृत्तिकाशौच कीजे सृष्टीं । आजानु प्रक्षाळण तुष्टी । जाणिया तें जळ तजावें ॥ ३९ ॥ अष्टौ गण्डूष मुखभरीं । वामे टाकावे भूमीवरी । ब्रह्मसूत्र कर्णींचें काढूनि करीं । तीनि आचमनें करावीं ॥४०॥ प्राङ्मुख अथवा उदङ्मुख बैसावें । आतां मूत्रशौचासी च परिसावें । एकदां मृज्जळें लिंग प्रक्षाळावें । वामकरा त्रिवार दोहींसी दोनि पदाधोर्ध्व एकदा ॥ ४१ ॥ रेतोत्सर्गीं मूत्रवत । षड् गण्डूष टाकावे यथोचित । दो आचमनीं शुचिस्मृत । आतां आचमन परिसावें ॥ ४२ ॥ दुर्गंधफेनरहित निर्मळ । तें च आचमनीं प्रशस्थ जळ । आचमनक्रमांतीं अंगस्पर्श केवळ । श्रौत स्मार्त यथाविधि ॥ ४३ ॥ मूळ पद्धतिप्रमाण । करावें स्वकर्माचरण । तथापि हि प्रकरण । पुष्टीकारणें बोलिजे ॥ ४४ ॥ वाम-

१ मातीचा. २ मूषकादि. ३ वारुळाची. ४ नागराचा फाळ. ५ राणून वाढलेली. ६ जरा हात ७ गुडघ्यापर्यंत

करतळीं जळ घ्यावें । दोनि वेळ कपोळें मार्जावें । तर्जनीअंगुष्ट जळप्लुत स्पर्शावें । नासरंध्रीं द्विवार ॥४५॥ अंगुष्टअनामिकायोगें यथाक्रमें । चक्षु श्रोत्र स्पर्शावे नेमें । कनिष्टिकाअंगुष्टें द्विजोत्तमें । नाभि स्पर्शावा स्वयें ॥ ४६ ॥ पाणीतळें उरस्थळ । सर्व अंगुलिकाअग्रीं शिर केवळ । ऐसें आचमन करितां सफळ ।[1]कर्मसिद्धि प्रसिद्ध ॥ ४७ ॥ आतां केशवादि कृष्णपर्यंत । चतुर्विंशति नामीं भगवंत । अंगस्पर्शी स्मरावा क्रमोचित । त्रिराचमनपूर्वक ॥ ४८ ॥ कीट स्मश्रु नखादि अस्पृष्टोदक । निजोनि अथवा एकहस्तें घेतां उदक । पादशेष शौचशेष हें सकळिक । सप्तांबु सुरासमान ॥ ४९ ॥ प्रमाण ऐसें आचमन जळा । गोकर्णाकार करूनि करतळा[2] । उडिद बुडे सगळा । इतुकें बोलिलें ब्राह्मणा ॥ ५० ॥ अन्य शंखस्मृतिवचन । विप्रा हृदयपावे ऐसें आचमन । कंठपर्यंत क्षेत्रिया वैश्यादिकां सर्वां समान । तालुकापर्यंत पावेतों ॥ ५१ ॥ स्त्री शूद्रां शिरस्पर्शमात्रें । स्पर्शावीं न लगती सर्व गात्रें । तद्विधि हा धर्मशास्त्रें । विधवा व्रती यतिवत ॥ ५२ ॥ हा शौचविधि गृहस्थासी बोलिला । द्विगुण ब्रह्मचर्यें पाहिजे केला । त्रिगुण वानप्रस्था संन्यासियाला । चतुर्गुण अगत्य ॥ ५३ ॥ स्त्रिया शूद्र अनुपनीत विधि । केवळ गंधलेपक्षयावधि । अतःपर परिसा धर्मबुद्धीं । दंतधावनप्रकार ॥ ५४ ॥ स्वग्रामीं पूर्ण आचार । पथीसी तदर्ध साचार । आपत्काळ आणि आतुर । तयांसी नेम असेना ॥ ५५ ॥ आयुष्य बळ यश तेज । प्रजा पशू वसू काज । ब्रह्म प्रज्ञा[4] मेधा[5] दे मज । हे वनस्पतिप्रार्थना ॥ ५६ ॥ खैदिरे[6] करंज कदंब । वट तिंतिणि वेणु आम्र निंब । अपामार्ग[7] बिल्व अर्क उदुंबर प्रलंब । द्वादशांगुळ तर्जनीप्रमाण ॥ ५७ ॥ अभाव असतां उक्त काष्टासी । भाग्य छुच्या अपामार्गासी । आणि वर्जा तिथी प्रसंगासी । दंतकाष्ट अग्राह्य ॥ ५८ ॥ श्राद्धीं यज्ञीं अजीर्णीं । विवाहीं व्रतोपवासादि वर्णीं । उक्त अभावीं तृणपर्णी । दंत-

---

१ गाल. २ जळानें परिपूर्ण भरलेलें. ३ अष्ट संख्याक देव ते. ४ बुद्धि. ५ स्मरणशक्ति. ६ खदिर ७ आघाडा.

शोधन करावें करागुळें ॥ ५९ ॥ इष्टिका लोष्ठ पाषाण । अगारें वाळुका लोहचूर्ण । केवळ करागुळिका दूषण । ऐसा असे एक पक्ष ॥ ६० ॥ द्वादश गडुप टाकावे । तेणें मुखशुद्धि एकें भावें । धर्म रक्षूनि लक्षावें । मुखदुर्गंधविनाशा ॥ ६१ ॥ यानतरें स्नानप्रकार । सुसीळीं परिसावा सादर । उत्तम मध्यम सामान्यपर । नदी तडाग कूप भाड ॥ ६२ ॥ नदीस हि रजकस्थळीं स्नान । गणिकागृहीं भोजन । ते यमालया जाती द्विजजन । हे अत्रिस्मृति विख्याता ॥ ६३ ॥ यदर्थी श्रुतिस्मृतिसाक्षी लिहिता । सर्वथा नावरे ग्रथगाथा । सर्वज्ञ जाणती सर्वथा । नेणते लिहिल्या हि नेणती ॥ ६४ ॥ प्रवाहाभिमुख स्नान मार्जन अघमर्षण । अन्यत्र सूर्याभि आनन । रात्रौ प्राङ्मुख का अग्निवदन । स्नानादि कर्म धर्मविदा ॥ ६५ ॥ शाखा जे का आपस्तभी । जळीं स्नानार्थ आनाभि । जीवत्पित्रु दक्षिण कँच उभय शुभीं । मृतपितृक स्नासी ॥ ६६ ॥ निवडिता नावरे शाखाभेद । सर्वांसी ग्राह्य सर्व हि वेद । पूर्वी तरि वेद अभेद । मध्ये शाखा भेदिल्या ॥ ६७ ॥ निरोधूनि कर्ण नाशिक मुख । मुपळस्नान करावें यथासुख । देहो प्रक्षाळूनि प्रवाहमुख । पुनः स्नान द्विराचमन करावें ॥ ६८ ॥ सिखा मुक्त करूनि ते काळीं । नारायणस्मरण मुखकमळीं । ॐ नमः पुरःसर मत्रावळी । चतुर्स्र प्रकल्पूनिया ॥ ६९ ॥ वेदोक्त मत्रस्नान । सीतासीतेति महिमान । गगादि तीर्थ-आवाहन । भावें करावें भागवतें ॥ ७० ॥ सर्वपापक्षयकारी । स्नान विष्णुस्मरणें करी । तो सपूर्ण शुद्धात्मा ससारीं । हरिपद पावे निर्धारें ॥ ७१ ॥ जे जे कर्मी निउन पडे । तेथें हरिस्मरण घडे । तरि तें कर्मफळ किती वापुडें । कर्ता हरिरूप अखड ॥ ७२ ॥ निरंतर विष्णुस्मरणपर । तत्वता न पडे अतर । तो हरिरूप जयाचा किंकर । विधिनिषेधा निषेधु ॥ ७३ ॥ आपोनारायण साक्षात ।

---

१ वीट २ मातीचें ढेकुळ ३ कोळसा. ४ कापुर. ५ धोबी कपडे धुतात त्या ठिकाण। ६ नाभापर्यंत ७ केस. ८ दावून, कोंडून. ९ शेंडी. १० चतुरस्र. [2] ११ सीत+असीत+इति. १२ बोलावणें.

वेदोनारायण विख्यात । कर्तानारायण कर्तृत्वातीत । सर्व करूनि अकर्ता ॥ ७४ ॥ ऐसिया अखड अनुसधानें । स्वस्वरूप समाधानें । कर्में च निष्कर्म चिद्घनें । ब्रह्मरूपें चोळलीं ॥ ७५ ॥ कर्म च ब्रह्मत्वासी आलें । तेथें निउनपूर्ण संपूर्ण जाले । कर्तृत्वासहित फळ प्रवेशलें । स्वस्वरूपीं सामरस्यें ॥ ७६ ॥ ऐसें आहे जरि तत्वता । भेदितो हि न भेदे आतां । तरि च स्वानुभवी स्वतां । आत्मबोधें आचरती ॥ ७७ ॥ आतां असो हें स्वतसिद्धासी । परिहार लागला कासयासी । उघडी सृष्टि उघडे दृष्टीसी । झांकणें, कैचें जें काढावें ॥७८॥ प्रातःस्नान अर्कवारीं[२] अगत्य । शौच दंतधावनपूर्वक सत्य । नद्यादिकीं करावें स्वाचार चैत्य[३] । तेणें राहे अविचळ ॥ ७९ ॥ आपप्रार्थना करावी स्वतां । तेथीची मेचता[४] आणि मळिनता । गळो ह्मणोनि सव्य हस्तकें तत्वता । नैऋत्य दिशे जळ टाकावें ॥ ८० ॥ उभें असतां स्नानजळीं । आवर्त[५] करावा करतळीं । नारायणतीर्थ चतुर्हस्त ते वेळीं । तये जळीं कल्पावे ॥ ८१ ॥ तीर्थप्रार्थना करावी । माझीं सर्व पातकें हरावीं । असज्जनान्नादि आघवीं । दुष्ट प्रतिग्रहादि दुष्कृतें ॥ ८२ ॥ नारायण वरुण इंद्रादि देवतें । प्रार्थावीं एकचित्तें । पापें हरूनि सर्वदा मातें । संरक्षण करावें ॥ ८३ ॥ सर्व साधारण जें जळ । तेथें तीर्थ-आवाहन सफळ । तीर्थीं च स्नान करिता केवळ । अन्यावाहन कासया ॥ ८४ ॥ आपोहिष्ठेति नवपदीं मार्जन । इमंमे इत्यादिकें च अघमर्षण । घ्राण कर्ण धरूनि,मुखमजन । त्रिवार मंत्र जपावा ॥ ८५ ॥ तेणें होती दहन सर्व दोष । पुण्य पाविजे अति विशेष । अश्वमेधावभृतस्नान अशेष । फल पाविजे तयाचें ॥ ८६ ॥ हो का जळीं अथवा स्थळीं । अघमर्षण नित्यकाळीं । करितां पापाची होय होळी । सूर्योदयीं तम जैसें ॥ ८७ ॥ योनिमुद्रा जळीं रेखूनि । तीनि वेळ निर्मंजोनि । गायत्रीमंत्रें मूर्ध्नि मुख उर सिंचोनि । सिखाबंधनें द्विराचमन करावें ॥८८॥ जळांत[६]

[१] निरास. [२] रविवारीं. [३] यज्ञमंडप, देऊळ. [४] घनता, दाटी [५] चक्र, जलभ्रम. [६] स्नान करून.

असतां जळाचा । ऊर्ध्व पुंड्र रेखावा साचा । तिलकेंविण निर्फळ त्याचा । पितृतर्पणप्रकार ॥ ८९ ॥ यानंतरें बाहेरि काढूनि वामचरण । सव्यें करावें यक्ष्मणतर्पण । जें म्यां दूपिलें जळ तनुमळप्रक्षाळण । करूनियां तद्दोप परिहारा ॥ ९० ॥ प्रातःस्नानीं वस्त्रनिष्पीडण । एकेचास्मत्कुले जाता उच्चारून । तीरीं दक्षणामुख होऊन । वामभागीं करावें ॥ ९१ ॥ यानंतरें द्विराचमन करावें । वस्त्रनिष्पीडण जळीं न करावें । ज्ञानदुर्बळ करी तरि स्वभावें । वृथा गेलें तें स्नान ॥ ९२ ॥ आतां नदीप्रार्थना बोलिली । जें म्यां ज्ञानता अज्ञानता पापें केलीं । तें सर्व हि क्षमा करीं वहिलीं । लोकमाते नमोस्तुते ॥ ९३ ॥ दर्भ विसर्जून ग्रहण ।,यथोचित करावें पद्धतिप्रमाण । जप आचमन करावें तर्पण । शुर्ष्क आर्द्र वस्त्रें जळीं स्थळीं ॥९४॥ सुरासम पृष्ठीवरी गळतां शिखा । वामे रुधिरबिंदुसम देखा । दक्षणभागीं करावी पुण्यलेखा । जान्हवीसम तें जळ ॥९५॥ स्नानजळ निरपूं नये करें । पुसू नये यथोक्तांबरें । सत्तार्ध कोटितीर्थें गेमाधारें । आश्रयूनि असतीं तें ॥९६॥ जरि वस्त्रें अथवा हस्तकें । प्रमार्जिलें अविवेकें । तरि श्वानलेह्यसम पातकें । आणि इतुक्याचें जळ वर्जिलें ॥ ९७ ॥ शिर मुखींचें पवित्र नीर । पिवंति देव आणि पितर । मध्यस्थ यक्ष गधर्व अधस्थ जंतु इतर । ह्मणौनि तनु पुसूं निरपूं नये ॥ ९८ ॥ आतां च वस्त्रधारणविधि विख्यात । काशाय कृष्ण मळिन केशदूषित । छिन्नाग्र अधौत पूर्वदिनधौत । तजावें जें जळीं पिळिलें ॥ ९९ ॥ नीळि ताम्र चित्र वस्त्र नेसे । तत्तुसख्या वत्सर यमावतीसी वसे । पट्टकुळ ऊर्णपट्टीं नसे । नीळि आदि दोष हा ॥ १०० ॥ धोत्रें प्रक्षाळूनि । वामभागीं स्थळीं पिळूनि । चतुर्गुणित शुद्ध झाडूनि । प्रांगग्र याळों घालावीं ॥ १ ॥ दक्षिणाग्र पसरिलें तारें । पुनः प्रक्षाळिल्या शुद्ध निर्धारीं । खंड वस्त्र वस्त्रार्ध नेसे अर्द्ध पांघुरे तारें । श्वानोच्छिष्टसम स्पर्प ॥ २ ॥ अन्य पक्ष स्मृत्यंतरें । शिर शुष्क करावें शुष्कांबरें । शिखा-

बंधन करावें करें । अन्यथा होय राक्षस ॥ ३ ॥ यथोक्त वाळलें सोवळें नेसावें । पंच कच्छयुक्त ते परिसावें । दोनि दोहीं कुक्षीसी स्वभावें । दोनि नाभीं एक पृष्ठीसी ॥ ४ ॥ अष्ट हस्त सदश नवें । नान्यधारित तें शुद्ध नेसावें । जानुमूळपर्यंत पंच कच्छवंत भावें । परिधान करावें प्रपस्थ ॥ ५ ॥ अकच्छ अथवा पुच्छकच्छ । कटिवेष्टन द्विपुच्छ । जवं असे तवं तुच्छ । शूद्र जैसा तैसा तो ॥ ६ ॥ मंत्रपुरःसर वस्त्रग्रहण । करावें यथोक्त उत्तरीवस्त्रधारण । एकवस्त्रें संध्या जप देवतार्चन तर्पण । यज्ञ दान धर्म भोजनादि करूं नये ॥ ७ ॥ बहिस्नानीं वस्त्रपरिधानानंतरें । सांर्द्र अध सांडावें अंबर । गृहस्नानीं वारि धरावें न धरितां नर । पुनस्नानें शुद्ध तो ॥ ८ ॥ प्रातःस्नानीं वस्त्र पिळून । मग करावें संध्यावंदन । मध्यानस्नानीं वस्त्रनिष्पीडण । तर्पणानंतरें करावें ॥ ९ ॥ मध्यान्हकाळीं तृपाक्रांत । देव पितृ आदि समस्त । वायुस्वरूपें असती तिष्ठत । ह्मणौनि तर्पणापूर्वी पिळूं नये ॥ ११० ॥ प्रातर्मध्यान्ह स्नानद्वय । हा गृहस्थवानप्रस्थविपय । यति त्रिकाळस्नान अन्वय । श्रुति स्मृति प्रमाण ॥ ११ ॥ आतां गृहस्नान गृहस्थविधि । अशक्त आहे जरि सुबुद्धि । तरि उष्णोदकें आधीं । स्नान करावें यथोक्त ॥ १२ ॥ आधीं च पवित्र असे आप । विशेष अग्नि पुण्यरूप । उभयसंयोगें निःपाप । उष्णोदकस्नान हि ॥ १३ ॥ प्रथम करावें पादप्रक्षाळन । त्यानंतर द्विराचमन । दर्भ करीं धरून । शिखा स्पर्शावी करें ॥ १४ ॥ यानंतरें प्राणायाम । विप्राभिमुख बैसावें नेम । विप्राभावें गृहाभिमुख हा क्रम । शास्त्रकारीं बोलिला ॥ १५ ॥ सीतोदकीं घालावें उष्णोदक । गायत्रीमंत्रें शिखा बांधोनि संकल्प-पूर्वक । मंत्रोक्तस्नान करूत धार्मिक । तें हि स्नान उत्तम ॥ १६ ॥ शूद्रहस्तें अमंत्र अकाळ शक्तासी उष्णजळ । हरिस्मरणेंविण सर्व प्रकारें निर्फळ । विशेष दंभाचार कुटिळ ब्रह्मद्वेषी खळ । तो रजकसीळा कर्म-

---

१ असें न केलें तर. २ घराबाहेर स्नान केल्यानंतर. ३ ओलें. ४ कर्म-नाशा नदीची.

नाशेची ॥ १७॥ गयामार्गीं कर्मनाशा नदी । तिचा स्पर्श हों नये पदीं। तेथींची रजकसीळा प्रमादीं । सर्व प्रकारीं अपवित्र ॥ १८॥ आतां असोत ते दुर्जन । परिसा धार्मिकांचें गृहस्नान । अघमर्षण जळांतर तर्पण मार्जन । उष्णोदकीं वर्जावें ॥ १९ ॥ स्नानामध्यें आचमन नलगे गृहस्था । स्नानांतींच्या च आचमनें शुद्धता। वस्त्रपीडणें नलगे तत्वता। अधोअग्र आर्द्रवस्त्र पिळावें ॥ १२० ॥ वस्त्रधारण पूर्ववत । संध्यादि कर्म यथोचित । आतां अति अशक्तासी बहुत । स्नानप्रकार ते परिसावे ॥ २१ ॥ गृहस्थविपयैक उष्णोदकस्नान बोलिलें । आतां अति अशक्त प्रकार चालिलें । कंठस्नान आर्द्रवस्त्रें अंगमार्जन केलें । पाहिजे मंत्रपूर्वक ॥ २२ ॥ जैसजैसी अंगशक्तीसी निउनता । तैसतैसी स्नानें बोलिली धर्मता । मांत्र भौम आग्नेय वायव्य दिव्य तत्वता । वारुण मानस सप्तस्नानें ॥ २३ ॥ यें सप्तस्नानें समान । विशेप मानसाचें महिमान । तयाचें अनुक्रमें कीजेलि वर्णन । सावधान परिसावें ॥ २४ ॥ मांत्र ह्मणिजे मंत्रस्नान । आपोहिष्ठादि मंत्रीं तनुमार्जन । प्रणवयुक्त आपाद पेचन । हें मंत्रस्नान प्रसिद्ध ॥ २५ ॥ येणें हरे संवत्सरकृत पाप । आइका आतां भूमिस्नानाचें रूप । पृथ्वीति मंत्रीं शुचि स्थळींचे मृत्तिकेचा लेप । गायत्रीमंत्रें करावा हें भूमिस्नान ॥ २६ ॥ आतां आग्नेयस्नान तें येणें प्रकारें । सद्योजातेति गोस्पर्श करें । वामदेवेति उच्चारें । गोळा वळावा तयाचा ॥ २७ ॥ अघोरेण वाळों घालावा । तत्पुरुषेण दग्ध करावा । ईशानमंत्रें आरंभावा । भस्मस्नानविधि ऐसा ॥ २८ ॥ ईशानेति शिरस्थान । तत्पुरुषेण वदन । अघोरेण वक्षोदर वामदेवेति गुह्यस्थान । सद्योजातेति चरणासी ॥ २९ ॥ प्रणवेन सर्वांग उद्धूळित हें भस्मस्नान । आतां वायव्याचें अनुसंधान । गोरेंजें शरीर सधूसर करी पवन । तें वायव्यस्नान गायत्रीमंत्रें ॥ १३० ॥ आतां दिव्यस्नान केवळ । असो काळ अथवा अवकाळ । मेघविवर्जित सूर्य-

मंडळ। तस्यां वृष्टौ तद्दिव्यम् ॥ ३१ ॥ वारुणस्नान जें बोलिलें प्रथम। मानसस्नानाचा परिसा क्रम। चतुर्भुज शंखचक्रगदाधर मेघशाम। तस्यांगुष्ठोद्भवा जान्हवी ॥३२॥ तयेमाजि मानसें राहोनि उभें। हृदय वसवूनि श्रीवल्लभें। विष्णुनाम स्मरोनि मुखजळदार्भे। तें मानसस्नान विष्णुमय॥३३॥ मन विष्णुमय विष्णुस्मरणें। विष्णुपदतीर्थचिंतनें नामोच्चारणें। अखंड विष्णुमय स्नानाचरणें। तें मानसस्नान पावन ॥ ३४ ॥ पक्षांतरीं गायत्रीस्नान। जळ दशवार गायत्रीमंत्रें अभिमंत्रून। आपादमस्तकप्रोक्षणें गायत्रीस्नान। सर्व पापोपहारक ॥ ३५ ॥ पुण्यावाचनादि शुभकाळीं। मंगळस्नान नरकचतुर्दश्यादि भूमंडळीं। तें अवश्यमेव कर्तव्य सकळीं। करावें च कीं शास्त्रता ॥ ३६ ॥ मकरसंक्रांति रथसप्तमी ग्रहण दर्शनी। आरोग्य पुत्रमित्रार्थी जनीं। तेणें न करावें उष्णोदकस्नान पुण्यदिनीं। अर्द्धोदयादि महापर्वी ॥ ३७ ॥ उभय सुतकी श्राद्ध दिवसीं। अस्पृश्यास्पृष्ट दर्श पौर्णिमासी। उष्णोदकस्नान चतुर्दशी पौर्णमासीसि। गोहत्यासम पातक मृत मातृपितृका ॥ ३८ ॥ नित्य नैमित्तिक क्रिया अमंगळ फर्षेनी। तीर्थअभावें उष्णोदकस्नानें करावीं जनीं। जेथें पुरुषा सचैळ तेथें सुवासिनी। अशिरस्नान आणि जटी शिरोरोगी ॥ ३९ ॥ हो कां दिवस अथवा निशी। ग्रहण उद्वाह संक्रांती आर्त प्रसवेंसी। हें आदिकरूनि नैमित्तिक स्नान बोलिजे यासी। हें तत्काळ च करावें॥ १४० ॥ मैथुनें दंपती दोन्ही अशुचि। सहजशयनीं उठतां नारी शुचि। पुरुष सहज उठतां हि अशुचि। प्रातःस्नानें शुद्धता ॥ ४१ ॥ अथ स्पर्ष कां कुक्कुट देवळक मार्जार। शूद्र सुतकी शव श्वान खर। इत्यादि स्पर्षी स्नानमात्रें नर। शुद्ध होय सचैळें ॥ ४२ ॥ सूर्प शय्या पादत्राण संमार्जेनी। स्नान करून स्पर्शों नये सज्जनीं। प्रमादात इत्यादि स्पर्ष होतां जनीं। पुनस्नानें शुद्धता ॥ ४३ ॥ देवकूपीं देवसदनीं। स्नान करूं नये सेंदुनी। आणिकें देतां पात्रें भरूनि। उभय स्पर्षी सचैळ ॥ ४४ ॥

---

१ अमावास्या. २ अमंगळता आणणारी. ३ विवाहप्रसंग. ४ सोयरसुतकांत ५ सूप. ६ जोडा. ७ केरसुणी. ८ चुकून. ९ स्वतः पाणी शेंदून काढून.

अजीर्ण शोक स्मश्रू मैथुन । दुःस्वप्न दुर्जनस्पर्श वमन । होतां अमेध्य सस्पर्शन । स्नानमात्रें शुद्धता ॥ ४५ ॥ मानुषा छि सस्नेह रेत । रजश्वलामळ श्लेष्मा मळ नेत्रजात । स्वेद मद्य हे मेध्य विख्यात । स्मृतिसंग्रहीं बोलिले ॥४६॥ दीपाग्नि दीपतैल भस्म अस्थि रजश्वला । सकाम नित्य स्पर्पोनी संस्कारी शव अवलीळा । तो नित्यसुतकी तया अमंगळा । स्पर्शतां सचैल स्नान करावें ॥ ४७ ॥ शूद्रशवाबरोबरी जातां द्विजोत्तम । नदीस्नान करूनि सत्तम । गायत्रीजप अष्टसहस्र नेम । तेणें होय शुद्धता ॥४८॥ चडाळशवसुतकीस्पर्श एका जाला । तो प्रमादें दुजयासी स्पर्षला । तो आचमनें गायत्रीजपें शुद्धत्वा आला । स्नान नलगे तयासी ॥ ४९ ॥ रजश्वलादिस्पर्शी शिशु बाळ कुमार । प्रोक्षण आचमन स्नान त्रिप्रकार । निरंन[१] शिशु अचूर्डा[२] बाळ अमौंजी[३] कुमर । त्याचा विधि शुद्धिकारणें ॥ १५० ॥ असो ऐसें नित्यनैमित्तिक । ब्रह्मभूतासी हि अवश्यक । ते ब्रह्मबोधें सर्वात्मक । कर्मी च ब्रह्मरूप ते ॥ १५१ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । स्वाचारनिरोपण । शौचदंतधावन । नित्यनैमित्तिक स्नान- । प्रकारवर्णन । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ७० ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो सर्व ईश्वरेश्वरा । नमो विश्वातीता विश्वंभरा । नमो निर्गुणा निराकारा । सगुण साकारा नमोस्तुते ॥ १ ॥ नमो सर्वकल्पनातीता । नमो सर्वस्वरूपा सर्वस्वरहिता । नमो अशेषा विशेषत्ता । नमो वाचा, वाचक अनिर्वाच्या ॥ २ ॥ नमो सर्वधर्मप्रकाशका । नमो सर्वकर्मप्रवर्तका । नमो सर्वकर्मधर्मधारका । नमो सर्वकर्मफळप्रदा ॥ ३ ॥ नमो सहजस्वरूपा । नमो ज्ञान ज्ञातृत्वेंसीं ज्ञेयरूपा । नमो ध्यान ध्यातृत्वेंसीं ध्येयस्वरूपा । नमो नित्या निश्चळा ॥ ४ ॥ नमो नमन नमिता नुरोनि[६]

---

१ अशुद्ध. २ 'अमेध्य' असें पाहिजे. ३ ज्याला अजून अन्न लावलें नाहीं तो शिशु. ४ ज्याचें चौलकर्म केलें नाहीं तो बाळ. ५ मुंज होईपर्यंत तो कुमार. ६ न उरोनि.

वेगळें । नम्यस्वरूप तूं सगळे । नमो नित्य नैमित्तिक काम्य कर्मकळे । करूनि नैष्कर्म फळप्रदा ॥ ५ ॥ पूर्व प्रकरणीं नित्य नैमित्तिक । स्नानप्रकार बोलिले संक्षेपक । आतां काम्य स्नानादिक । धर्म परिसावे धर्मज्ञीं ॥ ६ ॥ सर्वपापक्षयकामना हृदयकमळीं । तेणें कार्तिक मासीं यथामिळित जळीं । गायत्रीमंत्रें करावी आंघोळी । श्रीविष्णुनामस्मरणेंसीं ॥ ७ ॥ हविष्यान्न जिताहार । जितेंद्रिय जितांतर । कार्तिकादि प्रातस्नान करी नर । तो सर्वपापमुक्त हरिपद पावे ॥ ८ ॥ अथवा माघस्नान प्रयागीं । यथोक्त प्रकार प्रयोगीं । जो करिल पूर्वपुण्यप्रसंगीं । तो सर्वपापमुक्त हरिपद पावे ॥ ९ ॥ वैशाखस्नानाची थोरी । जे प्रसिद्ध पुराणांतरीं । जो प्राणी भावें प्रातःस्नान करी । तो सर्वपापमुक्त हरिपद पावे ॥ १० ॥ यथोक्त पर्वीं सागरस्नान वपन । विध्युक्त करितां पुण्यपावन । एक गर्भिणी पतिवांचून । समस्तां समस्त सुखदा तें ॥ ११ ॥ एकदां कर्तव्य प्रातस्नान । तेथें भावार्थकल्पना कार्तिकादि मज्जन । तेणें च हरिपद पावती सज्जन । जैसें स्वकर्मार्पणें हरि प्रसन्न ॥ १२ ॥ पृथ्वीवरील सर्व तीर्थसमूहो । सागरीं वसे निःसंदेहो । तरि एके सागरस्नानें पाहा हो । सर्व फळसंपूर्ण काम ॥ १३ ॥ जैसे एकें ब्रह्मार्पणें । होती सर्व देवां संतर्पणें । कीं एकें ब्रह्मानुभवें पुण्याचरणें । सर्व जालीं सार्थक ॥ १४ ॥ अविद्यक दोषी जीव होय शुद्ध । शून्यांतर सघन अपुत्रिकासी पुत्र हो बोध । सर्व स्वानंदमय प्रसिद्ध । अवगाहनें जेथिच्या ॥ १५ ॥ तीर्थपार्थक्यें संकल्प चित्र । सर्व तीर्थाधिष्ठानें प्रयोग स्वतंत्र । प्राणायामादि पूर्ववत पवित्र । सहज कर्म स्वभावें ॥ १६ ॥ मम सर्वसंकल्पदोषपरिहारार्थ । परम कल्याणप्राप्त्यर्थ । अखंडानंदप्राप्त्यर्थ । सागरस्नानं करिष्ये ॥ १७ ॥ जयाची अतरवृत्ति पत्नि । विकल्प गर्भिणी तो अग्राह्य तीर्थाधिष्ठानस्नानमुंडणीं । सर्व संशयमुक्त अंतःकरणीं । तो च युक्त हा मुख्यार्थ ॥ १८ ॥ क्रोधाहंकार पिप्पलादोद्भवा । अविद्या कृत्या भयंकरी जीवा । तिचे निक्षेपथ्याहारीं पाषाण घालावा । संकल्पुनि

१ धुचकुर्दी मारणें. २ निरनिराळ्या तीर्थी. ३ तीर्थराज, समुद्र. ४ राक्षसी.

टाकावा अर्णवीं ॥ १९ ॥ यानतरें आपोनारायणप्रार्थना । नमो जळस्था जगज्जीवना । नमो आपेआपा स्वरूप समाना । परमात्मया नमोस्तुते ॥ २० ॥ नमो रत्नगर्भा रत्नाकरा । नमो श्रीमंता नद नदेश्वरा । सर्व-तीर्थरूपा सागरा । गृहाणार्घ्य नमोस्तुते ॥ २१ ॥ सर्व तीर्थस्वरूपीं स्नान करूनि स्वतां । सवाह्यार्द्र तेथें च असतां । अनन्य भावें रामसीता । सहपरिवारें स्मरावीं ॥ २२ ॥ पूर्वे सुग्रीव दक्षिणे नळ । मौंद पश्चिमे उत्तरे द्विविंद अचळ । विभीषण हनुमत अगद निकट केवळ । मध्यें लक्ष्मणसीतेसह राम आत्मा ॥ २३ ॥ ऐसें करूनियां स्मरण । करावें जीवनी जीवनतर्पण । तें अपूर्व च परिसा विचक्षण । बोलिलें जैसें ॥ २४ ॥ पिप्पलादिक विकण्र कृतांत जीविजेश्वर । काळरात्री निद्रा दिवस गणेश्वर । वशिष्ट वामदेव शिव पराशर । नारद वाल्मिक वालिखल्य ॥ २५ ॥ नळ नीळ गवाक्ष गव यव मादन । जांबुवत सुग्रीव अगद हनुमान । मौंद द्विविंद कृष्णाभ शरभ जगज्जीवन । राम लक्ष्मण जानकी ॥ २६ ॥ राम आत्मा तत्परिवारीं । तर्पूनियां जीवनांतरीं । आब्रह्मस्तम्बेति मन्त्रोच्चारीं । तर्पण संपूर्ण करावें ॥ २७ ॥ ऐसें करितां समुद्रस्नान । होय दशजन्मार्जित दोप दहन । महिमा पूर्वी च वर्णिला गहन । अतुळ फळ अविचळ ॥ २८ ॥ दशजन्मार्जित पापक्षयकामें । जेष्ट शुद्ध सप्तमी हस्त नक्षत्र नेमें । भागीरथीस्नान बोलिलें परि हें अंतर्यामें । अल्प वर्णन वाटलें ॥ २९ ॥ जयेसी स्तविती श्रुति कल्लोळीं । यथाकाळीं अथवा अकाळीं । पातकी हि केवळ देता बुचकळी । स्वर्गपद पावे अवलीळा ॥ ३० ॥ तये सुरगंगेसी करितां स्नान । दशजन्माघाचें च दहन । पर्वकाळ-योगें हि हें काय गहन । स्तवन होईल हो जी ॥ ३१ ॥ हें सामान्य सरितेचें स्नानफळ । आतां स्वर्गकामार्थ केवळ । शिवसन्निध जें प्रवाहजळ । तेथें कृष्ण चतुर्दशीस्नानमात्रें ॥ ३२ ॥ महाफळ-कामें आश्विन शुद्ध सप्तमी । वाजपेयफळकामें चैत्र शुद्ध अष्टमी ।

---

१ स्मुरात.

बुधवासर पुनर्वसु नक्षत्र तद्दिनीं नेमा । प्रवाहोदकस्नान करावें ॥ ३३ ॥ विष्णुपदकामना मना । तेणें आषाढादि मासचतुष्टयीं प्रातस्नाना । करूनि करावें द्वादशीसी ब्रह्मभोजन गोदाना । तत्फळ पाविजे निश्चयें ॥ ३४ ॥ प्रयागस्नानफळस्पृहार्थे । सूर्यपर्वताधिक फळ स्वार्थे । अश्वत्थ-छायेसी जळ जें समर्थ । तेथें आमा स्नान करावें ॥ ३५ ॥ अश्वत्थ-रूपीं भगवंत । भूमंडळीं अचळ अच्युत । तयाचे छायाजळीं स्नात । अशेष दुरितें हरि हरी ॥३६॥ स्वभावें हि अश्वत्थछायेसी स्नान दान । देवतार्चन जप अनुष्ठान । ब्रह्मभोजनादि पुण्यफळ गहन । अन्य स्थळा कोटिगुणें ॥ ३७ ॥ जीव बृहस्पति सुरीं गुरु अंगिरा । आचार्य वाच-स्पती देव मंत्री इति नामोच्चारा । तर्पण करावें यानंतरें स्वधर्माचारा । इति गजछायामज्जन ॥ ३८ ॥ एकविस कुळांसहित परम गति । पावा-वयाची कामना चित्तीं । तेणें माघस्नान करावें यथापद्धति । सद्य पाविजे तत्फळ ॥३९॥ आतां परिसा तीर्थविधि । तीर्थ पावल्या दिवसा आधीं । तीर्थ उपवास करावा श्राद्धविधि । तीर्थदर्शनीं अगत्य ॥४०॥ यथाकाळीं अथवा अवकाळीं । जेव्हां तीर्थसंप्राप्ति ते काळीं । अवश्यमेव भूमंडळीं । श्राद्ध केलें पाहिजे ॥ ४१ ॥ पंचाशद्वायनात्पूर्वी क्षौर । निमित्तेंविण न करू नर । त्याहूनि ऊर्ध्व शास्त्राचार । स्वइच्छा वपन करावें ॥ ४२ ॥ तीर्थीं प्रायश्चित्तीं सदाचारीं । क्षौर अगत्य स्वधर्म निर्धारीं । मुंडणीं नि-षेध जेथें बोलिला तरी । कर्त्तनप्रकार करावा ॥ ४३ ॥ श्मश्रुनखप्लुत जें जळ । तें सुराबिंदुसम केवळ । ह्मणौनि श्मश्रु कर्त्तन नखछेदन तत्काळ । काळज्ञानें करावें ॥ ४४ ॥ राजकार्योपजीवी जीव । क्षेत्री वैश्य ऐसा च गमे भाव । तया श्मश्रु कर्तनीं काळ विचारीं अभाव । ब्राह्मणविषयी हा नव्हे ॥ ४५ ॥ ब्राह्मणासी सेवा युक्त स्वधर्मता । माता पिता अतिथी गुरु देवता । राजसेवा क्रयविक्रय पाप प्रतिग्रहता । हा अब्रह्मण्य विषयो ॥ ४६ ॥ आपत्काळीं तो काळ निवृत्तिवरी ।

१ पातकें. २ वातरणें.

मतांतरें शस्त्रजीविका आणि धर्मचोरी । सर्वे च प्रवर्तावें स्वधर्माचारीं । परि परसेवा वर्ज्य ब्राह्मणा ॥ ४७ ॥ आतां आपत्काळता हि आजन्मवरि । जरि ते च जीविका ब्राह्मण धरी । तरि तो हि चोर शस्त्रधारी । ब्राह्मण्यापासूनि भ्रष्टला ॥ ४८ ॥ शस्त्रधर हि होते द्रोणादिक । ते गुरु नव्हती सेवक । असो शास्त्रकार धर्मप्रतिपादक । ते हें बोलिले नाहींत ॥ ४९ ॥ आतां तैलाभ्यगप्रकार । मुतकांत बळिराज्य वसंतउदयादि निर्धार । तत्र तैलाभ्यग न करी पामर । तो नर नरकाप्रति जाईल ॥५०॥ अन्यद्रव्ययुक्त तैल । आणि केवळ जें सिरसेल । सुवासित जे पुष्पेल । तें दूषिलें नाहीं शास्त्रता ॥ ५१ ॥ पक्षातरें वासरविचार । केवळ वर्जावा सोमवार । रवि भोम गुरु भृग मिश्र द्रव्यप्रकार । पुष्प मृत्तिका दुर्वा गोमयादि ॥ ५२ ॥[१] वर्ज्या तिथी तिथित्रयादि प्रसिद्ध । पर्वकाळ शिवचतुर्दशी आणि श्राद्ध । पुत्र धन उभय नाशका निशिद्ध । दशमी त्रयोदशी द्वितीया ॥५३॥ या तिथींसी जे न्हाणिती । ते उभय फळासी हि न्हाणिती । तयाहूनि बरे जे न न्हाणिती । अंगत्येवांचूनि ब्राह्मणा ॥ ५४ ॥ आदित्यादि नवग्रहा देवा । अभ्यगीं तैलभाग भूमीसी यावा । तेणें सर्वार्थोंवपरिहार करावा । तो अभ्यग पुण्यद ॥ ५५ ॥ नव वधुवर गर्भिणी आणि बाळक । ब्राह्मण हि जे प्रवासादिक । तया तिथिदोप नाहीं दुर्मिळात्मक । ह्मणोनिया मुक्तता ॥ ५६ ॥ इति स्नानविधि चतुरग । नित्य नैमित्तिक काम्य तैलाभ्यग । सपूर्ण जाला आतां सांग । परिसा तिलकधारण ॥ ५७ ॥ जळ मृत्तिका सुगधचदन भस्म । जे जे काळीं जें बोलिलें तो परिसा क्रम । जळीं जळ स्थळीं मृत्तिका देवार्चनीं सुगंधचदन होम । करावा भस्मलेपनें ॥५८॥ जान्हवी गौतमी तीरमृत्तिका । तिलक करितां भाळफळकीं । पाप नाशे जैसें अह दीपका । देखोनि तमसपर्क ॥ ५९ ॥ तये मृत्तिकेचें वर्णफळ । कृष्णा शांतिक्षेम करी केवळ । आरक्ता वैश्य पीता श्रीदा शुभ्रा निर्मळ । विष्णुप्रीतिकारका

१ धुऊन टाकतात, आचरतात. २ जहर. ३ पुढें दिलेल्या चार प्रकारचा. ४ भालप्रदेश, कपाळ. ५ सहवास, सानिध्य. ६ काळी. ७ तांबडी. ८ श्री=लक्ष्मी देणारी.

॥ ६० ॥ ऊर्ध्व पुंड्र मृत्तिकेचा । त्रिपुंड्र तो भस्माचा । सुगंधचंदनें उभयाचा । धारणप्रकार प्रशस्थ ॥६१॥ तुळसीमूळेंमृदाधारण । महिमा वर्णिला असाधारण । द्वारवती गोपीचंदन हि कारण । परमेश्वरप्रीतीचें ॥ ६२ ॥ पुराणता परस्परें बोलिला दोष । तत्र विचक्षणा करणें न घडे द्वेष । स्व स्व सांप्रदायीं तो निर्दोष । भेद मूळ पापाचें ॥ ६३ ॥ मूळीं ब्रह्म तों अभेद । ब्राह्मण तो च जो ब्रह्मविद । अभिमानी ह्मणती ब्रह्मवेद । तें हि यथार्थ परि कळावें कीं ॥ ६४ ॥ वेदीं पूर्वपक्ष स्थापिला आधीं । भिन्न प्रकार भिन्न विधि । तो च सत्यत्वें आचरतां निषेधीं । आसुरादिक न सुटती ॥ ६५ ॥ वेदशास्त्रसंपन्न कामिक । वेद पूर्वपक्षसिद्धांतप्रतिपादक । दृश्यविद जे विरोचनादिक । तया तेथें च आग्रहो ॥६६॥ तया विषयलालसांचा काम । पावत च येतसे विराम । भेदद्वेषें हरिहरधाम । पावले नाहींत न पैवती ॥ ६७ ॥ एकाचे च भक्तीसी रंगलें मन । तया तद्रूप च दृश्यादृश्यमान । तेथें भेदद्वेषाचें संभावन । संपूर्ण प्रेमें असंभव ॥ ६८ ॥ तेजोराशीचा उपासक । तया सर्व तेजें तदात्मक । तेणें एक भजनें अनेक । सामरस्यफळप्राप्ति ॥ ६९ ॥ आतां असो हें साहित्य । देहाभिमानीं न मनीं सत्य । जेणें वेदें प्रकाशिला प्रपंच अमित्यें । तेणें च शेखीं निरशिला ॥७०॥ सेवटिल आश्रम संन्यास । तेथें काम्यकर्म देहभ्रम भेदाचा न्यासें । स्वयमात्मा स्वप्रकाश । अखंडानंद अद्वय ॥ ७१ ॥ त्रिपदा वाक्याचें विवरण । जीवेश्वर ऐक्याचें कारण । स्वसंवेद्य आत्मा आपण । विश्वरूपें स्वरूप ॥७२॥ हा विशेषीचा श्रुतिसिद्धांत । प्रत्यक्ष असतां विद्वद्विदित । मिथ्या भेद स्वकपोळकल्पित । द्वेष दोषदायक ॥७३॥ याकारणें प्रामाणिक । स्वसांप्रदायी स्वानंदें निःशंक । तिळकधारणादि कर्म सकळिक । सुखें करूत सुव्रत ॥७४॥

---

१ तुलसीवृंदावनांतील माती कपाळीं लावणें. २ द्वारकेतील. ३ केल्यापासून. ४ दासबोध ६-४-२४. ५ वेद हेंच ब्रह्मस्वरूप; तेव्हां वेदांचें संपूर्ण ज्ञान ज्याला झालें तोच खरा ब्रह्मज्ञानी. ६ प्रल्हादाचा मुलगा, किंवा सूर्य अगर चंद्र. ७ व त्यांच्याप्रमाणें जे असतील ते पुढें पावणार ही नाहींत. ८ सूर्याचा. ९ त्या. १० बहुतप्रकारें. ११ त्याग,

वैष्णव शांभव ब्राह्मण । ब्रह्मरूप श्रुतिप्रमाण । ब्रह्मस्वरूप शिव नारायण । सहज सद्भाव परस्परें ॥ ७५ ॥ आतां मिथ्या देहाभिमान असो परता । भगवद्भक्ताचारीं न सरतां । सर्वस्वानंदें समरसता । कथानुसंधान परिसावें ॥ ७६ ॥ अभ्यंगीं सुतकीं रात्रीं । विवाहीं पुत्रजन्मीं पवित्रीं । गोपीचंदन वर्जावें सर्वत्रीं । तत्संपर्क सप्तकुळदाहक ॥ ७७ ॥ भस्मत्रिपुंड्र अंगुष्ट अंगुळी । द्वादशांगुळ रेखावा चंद्रिकेंच भाळीं । अष्टांगुळ मध्यम चतुरंगुळीं । अधम त्रिपुंड्ररेखन ॥ ७८ ॥ त्रिपुंड्र अथवा ऊर्ध्व पुंड्ररेखन । करावें आरिसा अथवा जळीं पाहोन । तयाचें फळ अति गहन । परम पद तो पावे ॥ ७९ ॥ अन्यथा आदर्शें पुण्यदायक । एकादश्यादि वर्ज्य तिथीविण सकळिक । जळीं रूप पाहातां दारिद्र्यपातक । सवस्त्र जळीं रिघावें ॥ ८० ॥ दंडाकार ऊर्ध्व पुंड्र रेखावें भाळ । नासामूळमारभ्य आंत्राळ । एकांगुळ ध्यंगुळ त्रि चतुरंगुळ । विस्तारप्रमाण प्रसिद्ध ॥ ८१ ॥ वंशपत्राकार बाहूचा ठायीं । पद्मपत्राकृति हृदयीं । शेपदीपकळाइव पक्षांतराध्याइ । अन्य प्रकार हि बोलिले ॥ ८२ ॥ शुक्लपक्षीं केशवादि द्वादश नामीं । कृष्णपक्षीं संकर्पणादि नेमीं । तिळकधारण करावें संयमीं । विष्णुभक्तीं प्रेमळीं ॥ ८३ ॥ तत्र अंगुलिकीं फळश्रुति । अनामिकीं अन्नदा प्रदेशिनी मुक्ति । अंगुष्ट पुत्रद हे शास्त्रोक्ति । मध्यमा पुष्करी भवेत् ॥ ८४ ॥ नखें रेखूं नये तिलक । ऊर्ध्व पुंड्रविण शवतुल्य मस्तक । तें देखिल्या पुण्यवंत धार्मिक । तिहीं सूर्यावलोकन करावें ॥ ८५ ॥ हा वैष्णवांसी विधि जैसा । तैसा च शांभवांसी परियेसा । भस्मोद्धारणेंविण अपवित्र पुंसां । जीत च प्रेतवत् अपवित्र ॥ ८६ ॥ भस्मोद्धारणांगस्पर्प

---

१ मागें न सरकतां, त्याग न करितां २ चंद्राच्या कोरीप्रमाणें. ३ आरसा. ४ केशपर्यंत. ५ ध्यगुळ=दोन बोटांनीं. ६ वेळूच्या पानाच्या आकाराप्रमाणें. ७ दिव्याच्या ज्योतीप्रमाणें. ८ दुसऱ्या स्थळीं. ९ इंद्रियनिग्रह करणारानें. १० हाताचें बोट. ११ करंगळी जवळचें बोट. १२ तर्जनी किंवा आंगट्या जवळचें बोट. १३ मधलें बोट. १४ पुष्कर म्हणजे तरवारीचें म्यान किंवा पिंजरा, म्हणून पुष्करी=संरक्षण करणारें. १५ पुरुष.

विभूति । लागतां विमानीं बैसले राक्षसादि दुर्मति । तैसें च शंखच-
क्रांकितिलकक्षता आकृति । उत्तम गति पावले ॥ ८७ ॥ शिव-
स्मरणें भस्मधारणेंविण । अपवित्र पिंड आणि प्राण । तयासी देखतां
शिवस्मरणेंविण । शुद्धि नाहीं सर्वथा ॥ ८८ ॥ स्वस्वसांप्रदायरोचनार्थ।
पक्षप्रशंसा यथार्थ । भागवताप्रति व्यर्थ । भेद अभेद प्रबोधें ॥८९॥
शिवा विष्णुचा एक पिंड । अभेदीं कैंचें भेदबंड । ह्मणौनि ऊर्ध्व पुंड्रा-
वरी अखंड । त्रिपुंड् लाविती शाश्वता ॥ ९० ॥ सुगंधादि चंदनति-
लकावरी । भस्म लावावें नित्य निर्धारीं । नाना अष्टगंध जाले परि ।
भस्मावरी लाऊं नयेति ॥ ९१ ॥ चंदनादि सुगंध निषेध । तो गृहस्थ-
विषयो नव्हे अन्याश्रमबोध । चंदनें उभय पुंड्र शुद्ध । ऊर्ध्व पुंड्रावरी
त्रिपुंड् ॥ ९२ ॥ अथ विभूति उपनिषद्वर्णिता । अग्निहोत्र विरजाहोम
औपासन समुद्भूता । समिधोग्नि पाचनाग्नि दावाग्नि विख्याता । षड् स्थळस्था
विभूति ॥ ९३ ॥ वर्णत्रयासी अग्निहोत्र विरजाहोम विभूति । गृह-
स्थासी औपासनस्थिता निश्चितीं । आग्निकार्योद्भवा ब्रह्मचारिया शूद्रा-
प्रति । श्रोत्रियागार पाचनाची ॥ ९४ ॥ वाडवाग्नि समुद्भवा ।
इतरां प्रशस्य सर्वां शांभवा । महारुद्रादि सदा पूर्व देवर्षि यज्ञजा
अपूर्वा । मृदु शुभ्रा द्विजीं लावावी ॥ ९५ ॥ विभूतिविले-
पनविधि वामकरीं । भस्म घेऊनि दक्षण शाकाग्रा वरी । अग्निरित्यादि
मूळ मंत्रोच्चारीं । अस्त्रमंत्रें दिग्बंध करावा ॥ ९६ ॥ स्नानांतर शुक्लवस्त्र-
परिधान । त्यानंतर जळें मर्दूनि त्रिपुंड्रलेपन । मध्यान्हीं चंदनान्वितभस्म
हें वचन । सायान्हीं भस्म केवळ ॥ ९७ ॥ तत्र प्रयोग पूर्वोक्त प्रकारें
भस्म घेऊनि पाणितळीं । वरी दक्षण संपुटिका करूनि तत्काळीं ।
पूर्वोच्चरित पुण्यतिथौपर्यंत मंत्र मंजुळीं । सर्व संकल्प करावा ॥ ९८ ॥
मम आत्मशुद्धीदेहशुद्धीकारणें । विभूतिस्नान करितसे भस्मधारणें ।
विभूतिमंत्रास पिप्पलऋषि रुद्रदेवता गायत्रीछंद येणें । भस्मधारणे

---

१ प्रकाशित किंवा उजळित करण्याकारितां. २ शूद्रांसि.

विनियोगः ॥ ९९ ॥ शुद्ध स्फटिकसंकाशा एकमुखी । चतुर्भुजा मृगशृंगधरा शिवसखी । सर्वपापोद्रवशमनी वेदवंद्या ध्याऊनि सुखीं । भस्मधारण करावें ॥१००॥ जळ स्थळ अग्नि आकाशादि सकळ । निश्चयेंसीं भस्म या मंत्रें केवळ । रुद्रमंत्र प्रणव गायत्रीमूळमंत्र प्रेमळ । शिवनामें पडक्षरें ॥ १ ॥ यथोक्तप्रकारें प्रति अंगीं विभूति । प्रतिमंत्रें लावावी मंत्रवंतीं । मंत्रअभावें भाविकाप्रति । शिवनामस्मरणें सर्वकाळ ॥ २ ॥ अनामिका तर्जनी द्विअंगुळीं देखा । पुनः अंगुष्टें वोढावी मध्यें रेखा । पक्षांतरें मध्य त्रिअंगुळिका । त्रिपुंड्रेखनीं प्रशस्था ॥ ३ ॥ शिवस्वरूप त्रिगुणातीत । त्रिगुण शिवमय शिवबोधें सदोदित । त्रिगुण चिद्विलासता भासत । निराभास जें चिद्घन ॥ ४ ॥ मिथ्याभास प्रपंचजाळ । मिथ्या ह्मणिजे नाहीं च केवळ । नाहीं च तें भासेलि काय सकळ । भासाभासें शाश्वत ॥५॥ जें मृगजळ देखिजे सावकाश । तें च भासाभासें सूर्यप्रकाश । तैसें विश्वाभासें स्वप्रकाश । परब्रह्मस्वरूप ॥ ६ ॥ ब्रह्म निश्चळ परि चळणचाळक । जैसा निष्क्रियता चेष्टवी लोहचुंवक । गगनाऐसें च परि सघन सचेतनात्मक । स्वसंवेद्य सदोदित ॥ ७ ॥ अद्वैत अनंत सगळें । सगुणनिर्गुणत्व न निवडे वेगळें । जैसें आहे तैसें च असे उणें आगळें । न घडे तये अभेदीं ॥ ८ ॥ तेथें तद्विवर्त लीलां विलासतां । तो तन्मय च कीं तत्वता । असो अखंडत्व न खंडतां । त्रिपुटी तद्रूप तन्मया ॥ ९ ॥ आतां अकार उकार मकार । अनामिका मध्यमा तर्जनी साकार । त्रिमातृकामय ॐकार । तन्मय त्रिपुंड्र रेखिजे ॥ ११० ॥ ॐकार ब्रह्मरूप । देवत्रय वेदत्रय तद्रूप । त्रिविद्या त्रिपदावाक्यस्वरूप । त्रिपुंड्रविभूति तन्मय ॥ ११ ॥ भस्मत्रिपुंड्रेंविण धिग्भाळ । शिवालयेंविण धिग्ग्राम अमंगळ । देवतार्चनादि सर्व कर्म निर्फळ । भस्मधारणेंवांचूनि ॥ १२ ॥ भस्मधारणेंविण आकृति । सर्वथा अवलोकूं नये संतीं । तद्गृहींचें जळ सुरासम क्षितीं । तदन्न गोमांसतुल्य तें ॥१३॥ तैसें च स्वतंत्र शिवार्चनेंविण गोवधपाप । हा परस्परें वेदरहित विवाद

---

१ स्फटिकसदृश. २ अधिक. ३ विवर्त=जसून दिसतें तें.

विलाप । परि कोणें येणें यातना भोगिल्या भेदद्वेपरूप । तो नारकी पुराणीं ॥ १४ ॥ भस्मभाळ शिवभक्त युत । भोजनी पंक्ति होय पुनात । विशेष रुद्राक्षमाळाभृत । तो रुद्रतुल्य नाहीं नाहीं संशयो ॥ १५ ॥ शिवस्मरणें शिवरूप अंतरीं । तद्विभूति तदक्षधारणें तन्मय बाहेरीं । अंतर्बाह्य सघन शिव निर्धारीं । ह्मणौनि शिवरूप शांभव ॥ १६ ॥ सर्वदोषदहन सर्वपुण्यपावन । ब्रह्मादिकां अगम्य भस्ममहिमान । दोष-द्विजशवावरी चाळतां श्वान । भस्मचवडे उमटले ॥ १७ ॥ तेथें यम-दूतीं धरूनि नेतां जीव । शिवगणीं घातली धांव । विमानीं वाहोनि गौरव । दिव्यदेहें नेला शिवपदा ॥ १८ ॥ ह्मणौनि भोळे भक्त सदा-शिवाचे । विधान नेणती भस्ममंत्राचें । तरी शिवनामसंजीवनमंत्राचें । तेणें भस्म लावावें ॥१९॥ मंत्रविधीचा धरूनि हट । नव्हे ह्मणती रुक्ष कर्मठ । तरी दंभाचारविधानें पठ । पावला शिवपद ॥ १२० ॥ विधि नेणतां हि प्रेमळ । शिवपद पावले तत्काळ । ज्याच्या कथा परिसतां शर्मळ-। सागरीं तरिजे आतां हि ॥२१॥ अनन्यभाव शंकरचरणीं । अभाव मंत्राभ्यासकरणीं । आतां घोकूं बैसावें तरी मरणीं । गाठि आणि स्वर न बैसे ॥२२॥ तरि काय बहिर्मुखाच्या च बोलें । भजन सांडावें आपुलें । शिव-नामसामर्थ्य हि कळलें । त्याचा काय अपराध ॥ २३ ॥ काय वरवर्णो-क्ति आद्या । काय श्रुति स्मृति पुराण विद्या । जे मुखीं शिवनाममाळिका सद्या । तदन्य धन्य कोण त्रिभुवनीं ॥ २४ ॥ जैसा ॐकार मातृ-काचें अधिष्ठान । तैसें च शिवनाम मंत्रसंजीवन । तेणें करितां भस्म-लेपन । काय महिमा उणावे ॥ २५ ॥ उणें दुणें सरलें आतां । शिव-स्वरूप हृदयीं ध्यातां । शिव च होइजे स्वतां । विभूतिधारणकारणें ॥ १२६ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । सदाचारनिरोपण । भस्मधारणमहिमावर्णनं । संक्षेपोनाम प्रकरण समाप्तम् ॥ ७१ ॥

---

१ नरकवासी. २ शंभूचे भक्त. ३ पाप.

॥ श्रीरामो जयति ॥

नमो विश्वातीता विश्वव्यापका । नमो विश्वरूपा विश्वात्मका । जरि स्रजिलें च नसतें विश्वांका । तरि कोण जाणते हा महिमा ॥ १ ॥ आतां विश्वभान हि साचासारिखें । जरि साच च असतें तुजहूनि पारिखें । तन्हि घडोनि येतें आन सारिखें । तुझी अद्वैतता भंगती ॥२॥ आत्म विवर्त आत्मरूप । तेणें आपेआप अनुभविलें स्वरूप । तया स्वानंदें कोंदलें अमूप । अनंताकाश अखंड ॥ ३ ॥ ब्रह्म जैसें आहे तैसें च असतां । विवर्तरूपीं अभिनव सत्ता । ब्रह्मानुभव प्रगटला नसतां । नसतें च जीवत्व स्वप्नवत ॥ ४ ॥ तेथें कर्मफळ सुखदुख-भोग । भाथिलें च भोगितां सिणे मिथ्यामय जग । तेथींचें च सर्वी वर्ततां संत महाभाग । ब्रह्मभूत ब्रह्मअनुभवें ॥ ५ ॥ जैसा कांडींवाडीं कनकदंड । समान सरळा अखंड । तैसें ब्रह्म अनंत ब्रह्मांड । भासा-भासें हि सदोदित ॥ ६ ॥ जैसा एक वृक्ष मूळाग्रींहूनि पाहातां । भासे एकता आणि अनेकता । परि तयाची जे एकात्मता । ते नव्हे अन्य सारिखी ॥७॥ आतां ब्रह्मविवर्तीचा ब्रह्ममय जीव । तयासी ब्रह्मअधिष्ठानाचा अनुभव । तेणें स्वतसिद्ध च ब्रह्म एव । हें च अनन्य प्रणम्य ॥ ८ ॥ पूर्वे प्रकरणीं तिळकधारण- । विधीचें जालें निरोपण । आतां ब्रह्मसूत्रादि स्वधर्मकर्माचरण । ब्रह्मरूप परिसा ब्रह्मज्ञ ॥ ९ ॥ स्नान संध्या अध्ययन आधीं । करूनियां अत्रुटित ब्रह्मसूत्रें सुधी । चातीवरी कांतावें यथा-विधीं । स्त्रीकृत राहाटकृत निषिद्ध ॥ १० ॥ शुद्ध सूत्र एक पदरें । चतुरंगुळिका वेष्टूनि पुरें । पंणवेंति संख्या त्रिगुणाकारें । मग तें च तिपदरें वळलें च वळावें ॥ ११ ॥ प्रक्षाळूनि शुचि स्थळीं । नद्या-दिकीं हरिहर देउळीं । नव पदरात्मक सरळी । एकाकार अखंड ॥१२॥ ते नव पदरीं नव देवतें साचार । ब्रह्मा विष्णु शिव समीर । सोम सूर्य

---

१ उत्पन्न केलें. २ विश्व हीच कोणीएक नाटकाची रंगभूमि. ३ परोक्ष, भिन्नत्व. ४ स्फुरें. ५ समुद्र. ६ न तुटलेलें, अखंड. ७ सामान्य ( ९६ ) ८ वायु.

पितृ ॐकार । देवपक्षांतरें द्वादश ॥ १३ ॥ ब्रह्ममय ब्रह्मसूत्र । ब्रह्मग्रंथि त्रिगुणत्वीं तत्र । ब्रह्मज्ञ ब्राह्मण एकत्र । ब्रह्मरूप अखंड ॥ १४ ॥ नाभिपासूनि ब्रह्मरंध्रपर्यंत । ब्राह्मणासी ब्रह्मसूत्र उचित । ऊर्ध्व आयुक्षय अधं तपक्षय होत । यालागीं नाभि प्रमाण ॥ १५ ॥ अद्वैतीं द्वैतकोश त्रिगुणता । व्यष्टिसमष्टिरूप लघुदीर्घता । पोटीं सेवट जिरऊनि ब्रह्मग्रंथिता । द्वैतनिराशें अद्वैत यज्ञोपवीत ॥ १६ ॥ श्रौतस्मार्तकर्मी सज्जनीं । यज्ञोपवीतें धरावीं दोनी । तृतिय उत्तरीं चतुर्थ वसनीं । अभावता धरावें ॥ १७ ॥ पुत्रकामें पंचम । धर्मकामें ते अष्ट नेम । आयुःकामें धरावीं परम । बहु यज्ञोपवीतें ॥ १८ ॥ गृहस्थें एके यज्ञोपवीतें । जपहोमादि कर्मधर्मातें । जें जें केलें त्या श्रमातें । निर्फळता तत्वता ॥ १९ ॥ जनक जेष्ठ बंधु असतां । उत्तरी योगपट्ट तर्जनीं रजता । धरूं नये सर्वथा शास्त्रता । चित्रासन पादुकारोहण ॥ २० ॥ पडलें तुटलें यज्ञोपवीत । तरि स्नानपूर्वक मंत्रयुत । नवीन धरावें प्रत्येकें मंत्रित । अन्यथा एकें त्रुटितें सर्व हि ॥ २१ ॥ यज्ञोपवीतेति मंत्रोच्चारें । घालावीं दक्षण हस्त पुरःसरें । विक्रितादि अयुक्त निर्धारें । धरू च नयेति धार्मिकें ॥ २२ ॥ ब्राह्मण ब्रह्मसूत्र विक्रय करी । तो पतित सर्वप्रकारीं । ब्रह्मसूत्र दे ब्राह्मणासी तरि । ब्राह्मण्य तेणें अर्पिलें ॥ २३ ॥ सूत्रप्रक्षाळन परिसा धार्मिक । तैत्रै मैत्रै कठ कण्व चरक । वाजसनेयी कंठींचें काढून निर्शंक । सुखें प्रक्षाळूनि घालावीं ॥ २४ ॥ बव्हृच सामगादि यज्ञुशाखींहीं । कंठींचें काढूं च नये तिहीं । उपवीत करून प्रक्षाळावें पाहीं । अन्यथा पुनः संस्कारें शुद्धता ॥ २५ ॥ इति यज्ञोपवीतधारण । आतां संध्या परिसा प्रवीण । अहोरात्रीचें संधि सूर्य नक्षत्रेंविण । ते संध्याकाळ आणि मध्यान्ह ॥ २६ ॥ सूर्योदयापूर्वी त्रि घटिका । उत्तमा सतारका मध्यमा लुप्ततारका । अधमा सूर्यसहिता आवधि आइका । सूर्यदर्शनें समाप्ति

---

१ मस्तकापर्यंत. २ यापेक्षां मोठें असलें तर. ३ कमी. ४ योगासन करावयाचे वेळीं अंगावर जें वस्त्र टाकतात तें. ५ एक तुटलें असलें तरी सर्व नवीन घालावीं. ६ विकत आणलेलीं. ७ तैत्तिरीय. ८ मैत्रायणी. ९: बव्हृच=ऋग्वेदी.

॥ २७ ॥ सायसंध्या उत्तमामध्यमाधमा । सूर्यसहिता अस्तगता नक्षत्रसमी । मध्यान्ह प्रत्यक्ष च काय सीमा । संध्यास्थळ फळ आता ॥ २८ ॥ प्राची ना उदीच्यीं ग्रामाबाहेरि । नद्यादिकीं अथवा स्वागारीं । संध्या करावी प्रयत्नेंकरी । यथाकाळीं ब्राह्मणें ॥ २९ ॥ गृहीं फळ एकगुण [१]गोष्ठीं दशगुण । तीर्थीं वीसगुण नदीं शतगुण । गंगा सहस्रगुण अनंतगुण । श्रीविष्णुसमीप संध्या हे ॥ ३० ॥ कदाचित प्रमादें अनृत मद्यगंध । दिवानिद्रा मैथुन सम्मंध । [२]वृषळान्नें-प्रतिग्रही करी शुद्ध । बहिसंध्या हे तत्वता ॥ ३१ ॥ संध्याकल्प अपार । यथापद्धति सक्षेपाकार । शुद्ध पाठ स्वरीत उच्चार । अर्थावबोध अति धन्य ॥ ३२ ॥ केशवादि आचमन अंगस्पर्शन । ऊर्ध्वकेशीति शिखा-बंधन । प्राणायाम प्रणवचिंतन । यथोक्तप्रकारें करावें ॥ ३३ ॥ दक्षिण नासापुटें आकर्षन । वामेंकरूनि शनी-शनी विसर्जन । दोन्ही [३]पर्णा-ळिकापीडनें निरोधन । प्रत्येकीं गायत्री त्रयावधि ॥ ३४ ॥ कनिष्टिका अनामिका एकीकडे । अंगुष्ट एकला एकीकडे । प्राणनिरोधासी हें च दोहींकडे । तर्जनी मध्यमा अप्रयोजका ॥ ३५ ॥ दशप्रणवयुता गायत्री प्राणायामासी । न्यास मुद्रा बीजाक्षरासी । ऋचा लेहों नयेति प्रयासी । अवलोकिती सर्व हि ॥ ३६ ॥ सूर्यश्चेति मंत्रें आचमन । करूनि करावें दर्भनिसर्जन । पुनर्दर्भ करीं घेऊन । मार्जन तनूसी करावें ॥ ३७ ॥ गंगा वापिका तडाग नदीसी । हस्तोदकें करू नये मार्जनासी । पात्रस्थ अथवा वामकरस्थ तोयेंसीं । गृहीं मार्जन करावें ॥ ३८ ॥ दक्षिण हस्तीं जळ घेऊन । द्रुपदेति मंत्रें नासाग्रीं नेऊन । पापपुरुषनि[४]र्मज्जन करून । न पाहोन वामें टाकावें ॥ ३९ ॥ ऋतचेति ऋचीं अघमर्पण । त्रि आचमनें करूनि सूर्यार्पण । तीनि अर्घ्य द्यावे आपण । उभे राहोनि अंजुळीं ॥ ४० ॥ तेजोरूप दक्षिण नासाबिळें । मूर्धीमी न्यासें मंत्रमूळें । तें पुण्यस्वरूप तेजाळें । प्रणवाख्य प्रसिद्ध ॥ ४१ ॥ जळांजळी मूर्धि-

१ गोठाणात. २ अधार्मिक किंवा शूद्राचे घरचें अन्न घेणें. ३ इडा व पिंगळा या दोन्ही नासापुटनाड्या दाबून धरून. ४ निमज्जन=बुडी मारणें.

पर्यंत नेऊन । प्रणवपूर्वका गायत्री जपोन । प्रत्येकें तें मंत्रजीवन । ऊर्ध्व टाकावें त्रिवार ॥ ४२ ॥ तें अर्घ्यतेज वज्ररूप । राक्षस मारूं जात सूर्यासमीप । पुनरपि येऊनि आपेंप । मंत्रें स्थापावें स्वस्थानीं ॥ ४३ ॥ रक्षो वधदोपक्षपाकारें । आसावेति मंत्रें दक्षण करें । जळ फिरऊनि पृथ्वी प्रदक्षिणार्थ स्वशरीरें । शरीरप्रदक्षिणें शुद्धता ॥ ४४ ॥ यानंतरें संकल्पपूर्वक आवाहन ध्यान । विद्युक्त गायत्रीजपविसर्जन । बहिर्जानुबोघ्रलंघन व्यग्रमन । जप व्यर्थ कारक ॥ ४५ ॥ प्रार्थना वंदन स्वस्थानप्रेरण । यथोक्त मंत्रीं ब्रह्मार्पण । स्वजन्मनामशर्मन् उच्चारण । त्रिराचमन करावें ॥ ४६ ॥ त्रिकाळ संध्या प्रत्येकाकारें । यथोचित करावी द्विजवरें । तर्पण करूनियां आदरें । देवतार्चन करावें ॥ ४७ ॥ [1]दिवोदितें कर्में बोलिलीं । ते प्रमादास्तव राहिलीं । तरि रात्रौ प्रथम प्रहरीं पाहिजेति केलीं । कर्मत्यागें नरकपात ॥ ४८ ॥ नरकार्णवीं उभय कुळींचे । पूर्वज निमग्नत असती ज्याचे । ते स्वर्गाप्रति येती साचे । पुत्र करितां हरिपुजा ॥ ४८ ॥ तो पुजाविधि अपार । वैदिक मिश्र तांत्रिक त्रिप्रकार । भक्तासी पाहिजे निर्धार । हरीची आवडी अंतरीं ॥ ४९ ॥ मग भलता चि एक पदार्थ । पत्र पुष्प फळ तोय तो च समर्थ । विश्वासेंवीण सर्व हि व्यर्थ । नाना द्रव्यसंभार ॥ ५० ॥ भक्त्या संतोपे भगवंत । नवुगणीं तो अनत । हा मुख्य प्रकारें सिद्धांत । भावें भेटे श्रीहरि ॥ ५१ ॥ तें प्रेमसुख न ये सागता । अंतरींचें अंतरज्ञ जाणे स्वतां । अवकाश करूनि हि सांगों जातां । अनिर्वाच्य कैसें बोलावें ॥ ५२ ॥ येथें प्रत्यक्षासि काय प्रमाण । जेथें प्रगटला नारायण । तो च प्रेमळांतःकरण । अन्यथा यथा [3]संसिद्धि ॥ ५३ ॥ असो वेदेंकरूनि जैसी विप्रता । तैसी च प्रेमेंकरूनि भक्तता । यदर्थी विधि-

---

१ ही ओवी मुळांत मागाहून लिहिलेली आहे. २ चुवचळ्या रात असतील. ३ मुळ स्वभाव, जन्मसिद्ध गुण. ४ जो वेद जाणतो तोच खरा विप्र, किंवा ह्मणूनच त्याला विप्र असें ह्मणावयाचें, त्याप्रमाणें ज्याच्या ठिकाणीं परमेश्वराविषयीं अनन्य प्रेम आहे तो च खरा भक्त.

निषेधता । काय हो प्राप्त पुरुषासी ॥ ५४ ॥ कृतार्थ व्हावया जन । बोलिलें पाहिजे हरिहरभजन । तेन्हा तरि विधिविधान । निरोपिलें च पाहिजे ॥ ५५ ॥ स्थावर अथवा जगमं लिंग । शाळग्राम प्रतिमा श्रीरग । धातु शिळा दारू सुरग । चित्रीचीं लिखितादि ॥ ५६ ॥ अष्ट प्रकार प्रतिमा । ज्या बोलिल्या आहेति निरोपमा । त्यात याचया पूजनानुक्रमा । श्रवण करा पुण्यदायका ॥ ५७ ॥ सागोपाग षोडशोपचार । अथवा यथाशक्त्या भक्तिपुरस्सर । अवचक अनन्य अभ्यतर । पुजाद्रव्य सिद्ध करावें ॥५८॥ यानतरें देव स्मरोनि । सुखें बैसावें स्थिरासनीं । प्राङ्मुख का उदङ्मुख पूजनीं । प्रेमें पूरित मानसें ॥५९॥ सद्य सुवासमिश्रित तुळसी बिल्व पुष्प फळ । निर्मळ तीर्थींचें अथवा वस्त्रपूत जळ । वेगळाले पात्री योजावें अनुछिष्ट केवळ । यथोक्त समर्पणार्थ तें ॥ ६० ॥ आसन अर्घ्य पाद्य स्नान अच्मन । अभिषेकद्रव्यें जे काळीं जें उत्पन्न । पचामृतावेगळीं हि युक्षनारिकेळजीवन । आदिकरूनि यथोक्तें ॥६१ ॥ वस्त्रसूत्र गध परिमळद्रव्यें । अळकार सुमनें कालोद्भव्यें । दशाग धूप गुग्गुळ घृतप्लुत सुसेव्यें । धूमरूप सुवास ॥ ६२ ॥ धूम अपवित्र सर्वत्र वर्जिला । तो च सुसुष्टप्रकारें हरिसेव्य जाला । जेसा कामरूप देहो निंदिला । तो च सुभक्तया जाला राममय ॥ ६३ ॥ शुद्ध तन्मय वृत्ति अविकप । प्रदीप्त सुप्रकाशता दीप । अनुमोदनें अखड पुण्यरूप । सुरत्न ज्योति कर्पुर ॥ ६४ ॥ नैवेद्य षड्रसगर्भ चतुर्विधें । अन्नें पचामृतादि रसेंसीं विविधें । मद्यें सुगधें सुस्वादें प्रसिद्धें । अथवा जे शक्तिसारिखीं ॥ ६५ ॥ सुवासित सुसीतळ । आतृप्तापर्यंत अर्पावें जळ । जें जें देवाभक्ता प्रियतर केवळ । तें अर्पावें भगवता ॥ ६६ ॥ आचमन शुद्धाच्मन । करोद्वर्तन फळें सवसन । त्रयोदश गुण गहन । ताबूळ अर्पावें देवा ॥ ६७ ॥ पुजापूर्णार्थ दक्षणा । समर्पावी यथेष्ट कमळेक्षणा । वदन प्रार्थना प्रदक्षिणा । नृत्य गीत सुवाद्य ॥ ६८ ॥

१ स्वयभू. २ स्थापना केलेले, ३ निरपेक्षपणानें. ४ कालोद्भव. ५ समन्वया.

शंख चक्र गदा कौमोदकी । धनुष हळें मुषळ आयुधांकीं । श्रीवत्स वैजयंती कौस्तुभादिकीं । पूजन हरिप्रीत्यर्थ ॥ ६९ ॥ नंद सुनंद गरुड चंड प्रचंड । बळ महाबळ मुकुंद कुमुदेक्षण अखंड । विश्वक्सेन बृहस्पति परिवारदेवतें उदंड । धृवादिक वैष्णव ॥ ७० ॥ तैसाच शांभवीं श्रीसदाशिव । पुजूनियां सहगणपरिवार देव । समस्त पुजाधिकारीं शांभव । शिवपुजाशेषें पुजावे ॥ ७१ ॥ यानंतरें पुजांग हवनें । यथोक्त प्रकारें मूळमंत्रें अवदानें । मग कल्पूनियां चाळि विधानें । स्तवन करावें सुभावें ॥ ७२ ॥ वैदिक पौराणिक प्राकृत । जे देशीं जे भाषा विश्वविदित । तिनें वर्णावे शिव अच्युत । भक्तिभावें सुभक्तीं ॥७३॥ आतां परिसावे अपराध । जे द्वात्रिंशत्प्रसिद्ध । भगवत्पूजनीं विरुद्ध । वर्ज्य केले भागवतीं ॥ ७४ ॥ उपासनाविरुद्धतिलकें पूजन । आसुरकाळीं परमेश्वरार्चन । अभक्तपाचित पक्वान्न जीवन । नखस्पर्शयुक्त जें ॥ ७५ ॥ कोरें अथवा जीर्णांबर समपर्ण । अमौन घर्मळितांग आपण । मृत्पात्रीं धूप दीप समर्पण । वात मूत्र निरोधता ॥ ७६ ॥ अधोवातविमोक्षणीं अनाचमन । दारुकासन कां निरासन । पारखियाचें नेसोनि वसन । कां वेष्टन कवळ ॥ ७७ ॥ विष्णुपूजका भर्गद्वेषें । भवपूजका विष्णुरोष । हा परमापराध महद्दोष । नरकभागी ते नर ॥ ७८ ॥ वैष्णवा न पूजितां गणेश कर्पाळी । शांभवा वर्जितां वैनतेयें वनमाळी । क्रोधें उछेदन पुजा त्रिकाळीं । हे परमापराध प्रत्यक्ष ॥ ७९ ॥ शिवव्रतोछेद विष्णुपरां । विष्णुव्रतोछेद शांकरां । या दुर्जनाचया हट्टात्कारा । परमापराध बोलिजे ॥ ८० ॥ सोमवारीं आली हरिदिनी । तरी शिवासी हि उपोषन प्रिय तद्दिनीं । माघ फाल्गुन संधिभूत भोजनीं । कोणासी विष्णु भेटला ॥ ८१ ॥ शिव विष्णु स्वरूपें अद्वैत । भेद भाविल तो पतित । उभय संतोषक उभय व्रत-। रक्षण विचक्षणें करावें ॥ ८२ ॥ एका च देवाची ह्मणावी

१ नांगर. २ देवदाराचा पाट. ३ शिवाचा द्वेष. ४ शिव. ५ गरुड. ६ हट्टाची कृति.

अनन्य सेवा । तरि हें सर्वथा न घडे कळीं च या जीवा । देहो विकिला हीना मानवा । छांदेंवें कामकिंकरें ॥ ८३ ॥ विक्रय सेवा पापप्रतिग्रह जोडी । न करूनि काय करिती बापुडीं । पाई पडली परिग्रहवेडी । सुटका कैची आजन्म ॥ ८४ ॥ यालागीं भलतेणें प्रकारें । कुटुंबभरण कीजे नरें । तत्पापपरिहारार्थ भक्ति सादरें । तेथें भेद द्वेष न करावा ॥८५॥ यद्यपि जो वज्र पाखडें करी । तो परमापराधी शास्त्रांतरीं । जैसा कल्पतरुतळीं कल्पना करी । करटा निर्फळत्वें दडाची ॥ ८६ ॥ असो आतां अन्यापराध परिसावे । जो रजश्वलाभापणें मूढ भावें । अंधकारीं हरिहरा शिवे । वाम करीं धरूनि स्तपन करी ॥ ८७ ॥ अघृत गुग्गुळ कां केवळ घृत धूप । कां यथोक्त हि वस्त्रपात्र वातें समीप । समर्पिं तो अपराधरूप । अन्य पक्ष परिसावा ॥ ८८ ॥ वहन वा पादुकासी देवालया गमन । उच्छिष्ट अशौच भगवद्वदन कां अवदन । एके हस्तें नमन अप्रदक्षिण पादप्रसारण शयन । भूमीं कां मंचकीं सन्मुख ॥ ८९ ॥ अनिवेदित अप्रसाद भक्षण । मिथ्या भापण उच्च भापण । अप्रेमरुदन जल्प अग्रह अनुग्रह निग्रहण । क्रूर भाष्य स्त्रियेसी ॥ ९० ॥ कंबळा प्रावरण परानिंदास्तुति । रुक्ष वाद अधोवायु विमोक्षण गति । शक्त असोनि गौण उपचार पूजेप्रति । काळोद्भव भोग्यादि यचना ॥ ९१ ॥ देवाकडे पृष्टि निंदापरासी विवाद । गुरूसी मौन धरी जाणोनि कर्मवाद । सद्गुरूसी मज सर्वथा नाहीं भेद । सर्व प्रकारें सर्वथा ॥ ९२ ॥ एव प्रकारें अपराध बोलिले । ते धार्मिकीं पाहिजेत वर्जिले । जेणें भगवंत संतोषे तें केलें । पाहिजेति नियम सज्जनीं ॥ ९३ ॥ सांडूनियां भेदद्वेष । अपराध वर्जितां अशेप । कांहीं घडती जे शेप । ते नामस्मरणें निरशती ॥ ९४ ॥ हरिभजन पूजन मामोचार । यत्किंचित भलता एक प्रकार । घेंशें अर्वेशें विधीं अविधीं नर । घडोनि येतां कृतार्थ ॥ ९५ ॥ एवं प्रकारें देवार्चन

१ सग्रह. २ स्नपन ? ३ अनुकूल. ४ प्रतिकूल.

बोलिलें । आतां वैश्वदेव अतिथीपूजन आरंभलें । मग आपुलें भोजन ॥ ९६ ॥ वैश्वदेव बोलिला त्रिकाळ । पंचसूनादोपदहनमूळ । कडन पेंपेन संमार्जन इंधन जळ । इतुका जीवहिंसा घडे ॥ ९७ ॥ अहिंसा मुख्य धर्म । तो वैश्वदेवें घडे हें वर्म । हा न करितां अति अधर्म । ह्मणोनि केला पाहिजे ॥ ९८ ॥ अन्न कंद मुळ फळ शाक । मीळित द्रव्यें परि अवश्यक । अतिथीपूजन तदात्मक । विन्मुख होऊं नये तयासी ॥९९॥ निरग्निक तो नव्हे ब्राह्मण । अग्निहोत्र वर्जी पुराण । अग्निहोत्राचा ठाईं विचक्षण । वैश्वदेव बोलिले कलियुगीं ॥ १०० ॥ परस्त्री सोहोदर संन्यासी । मुख्या वर्जिलें संन्यासासी । महायज्ञ गवालंबन मद्यपानासी । देवरोत्पत्ति अन्योत्पत्ति स्त्रीदान ॥ १ ॥ इतुकीं वर्जिलीं या कारणें । यथोक्त न चलती ह्मणौनि पुराणें । तत्वता पतन पावती येणें । ह्मणौनिया कलियुगीं ॥ २ ॥ वेदीं करावें हा घंटाघोप । तें वाक्यसामर्थ्य निर्दोप । पुराणीं विपयव्यवस्था जाणोनि दोप । वर्जिले असे कळीमाजीं ॥ ३ ॥ पूर्वी सर्वस्वदानें अतिथीपूजन । तरि ते दोवे[१] हि गृहस्थ अति होते सज्जन । तेणें स्वधर्मसंरक्षणाचें मर्जन । नव्हे च एकमेकाचें ॥ ४ ॥ येणें कोळें तें राहिलें । समयाकडे पाहिजे पाहिलें । कुटुंब वर्जूनियां विहिलें । द्यावें अन्नवस्त्र धनधान्यादि ॥ ५ ॥ तें हि स्वशक्तीसारिखें न्यायें । वित्तशाठ्य केवळ करूं नये । ऋण घेऊनि धर्म करी त्या अन्यायें । महद्दोप दुर्गति ॥ ६ ॥ गृहस्थ आहे अति दुर्बळ सुसीळ । ब्राह्मण कलियुगींचे केवळ । बहुत च आले धरूनि वेळ । तरि एक उठवा शक्तिता ॥ ७ ॥ एक समयो येतो ऐसा हि । अनावृष्टि दुर्भिक्षें कांहीं च नाहीं । तरि वंदनें सुवचनें पुजावे पाही । राम जाणे अंतरींचें ॥ ८ ॥ अतिथी ह्मणिजे केवळ राम । अंतरात्मा तो हि राम । तयाचें सप्रेम घेतां नाम । सर्व संपूर्ण फळ पावे ॥ ९ ॥ आतां असो

---

१ या ओवींत मुळांत तीन च चरणें आहेत. २ पिसणें. ३ दान देणारा व घेणारा. ४ सुडी माल्म पावन होणें. ५ हल्लींच्या काळीं. ६ कुटुंबपोषणापुरतें मागें राखून. ७ धनाची चोरी, अप्रामाणिकपणा.

हे अति पाळवता । अतिथी दोपद पुण्यहा विमुख होतां । नाम ग्राम गोत्र नेणतां । विष्णुवद्विप्र पुजावा ॥ ११० ॥ अन्य वर्ण आचारभ्रष्ट जाले । ते हि जरि यथाकाळीं अकाळीं मार्गों आले । तरि यथाशक्त्या तुष्टविले । पाहिजेति अन्नवस्त्रदानें ॥ ११ ॥ ब्रह्मयज्ञ देवयज्ञ पितृयज्ञ । नृयज्ञ भूतयज्ञ हे पचमहायज्ञ । हे प्रत्यह करावे बोलती तत्वज्ञ । अन्यथा बोलिजे ब्रह्महा ॥ १२ ॥ ह्मणौनि आर्धी अथवा स्वपंक्त्या । अतिथीसी भोजन पूजन द्यावें भक्त्या । दूरि धरूं नये पाखंड अभक्त्या । धरी तरि अपमानें ब्रह्महा ॥ १३ ॥ भृत्यमित्रादि पंक्तियुक्तासी । स्वयें भोजन करावें हरिस्मरणें कां मौनेंसीं । मौन अन्नदोप न विध्वंसी । हरिस्मरणावांचूनि ॥१४॥ ग्रासोग्रासीं हरिनामस्मरण करी । आपण जेवी पोटभरि । तेणें संव्रुत होय थ्रीहरि । अन्नदोपमुक्त अनशनव्रती ॥ १५ ॥ दोपनिरशनमात्र केवळ । इतुकें च ऐसें नव्हे नामस्मरणफळ । निर्दोप करूनियां अविचळ । परमात्मप्राप्ति देतसे ॥ १६ ॥ भोजन करूनियां द्विजहस्तें । पात्रें करुऊं नयेति न्यस्तें । उच्छिष्टें काढावीं गृहस्थें । पत्नीं पुत्रें कां शिष्यें ॥ १७ ॥ अर्द्ध वस्त्र नेसे अर्द्ध पांघुरे । भोजनीं तो सुरापी निर्धारें । प्रत्यक्ष ल्वण सेविजे नरें । तरि तो गोमांसासी तत्वता ॥ १८ ॥ स्वादितार्द्ध पुनः खाय । मोदक फळ मुळ तोय पय । ग्रासशेप उच्छिष्ट अग्राह्य स्वकीय । परकीया हि अदेय शास्त्रता ॥ १९ ॥ भगवल्लेप सद्गुरुशेप । तो महाप्रसाद निर्दोप । तो अमानुष्य विपयों महापुरुप । सेव्य शास्त्रीं प्रतिपादिती ॥ १२० ॥ जेवि संन्यासादि वेदोक्त हि असतां । कलौ वर्ज्य केले तत्वता । तैसी गुरुशेपीं हि अन्नसंपर्कता । वर्जावीं च कीं विचक्षणीं ॥ २१ ॥ श्रीगुरुतीर्थप्रसादशेपेंविण । शिष्य कृतार्थ नव्हे प्रवीण । आणि उच्छिष्ट घ्यावें हें प्रमाण । शिवभाष्य गुरुगीता ॥ २२ ॥ तरि मासप्रसंम्ना मार्पीन्न जैसें । अन्नातीत गुरुशेप तैसें । अवश्य अंगिकारावें ऐसें । पक्षद्वय संरक्षण ॥२३॥

---

१ नग्न यानेंच दुसरें रूप असावें. २ चाकर. ३ काढून टाकणें. ४ माउ+प्रति+अन्ना ( आत्मान=परतावृत्ति ) ५ पेयद्रव्याची लाळ.

भगवल्लेप सहजमुक्त । गुरुशेप केलें पाहिजे व्यक्त । कलौ कित्येक गुरु च करिती त्यक्त । तेथें संकर होऊं पाहे ॥ २४ ॥ गुरुपरित्यागें होती नरक । तेथें संकर काय अधिक । परि त्रुणलें बाधिजेलि प्रवर्तक । ह्मणौनि बोलिलें पाहिजे ॥ २५ ॥ धर्मशास्त्रीं अपर्क अथवा स्नेहपर्क । अथवा केवळ जें पार्वकपक्क । तें शूद्रापासाव अदुर्ष्ये तेथें कं । शेपदोप संभवे ॥ २६ ॥ हुरडा'वोंप्यादि खेळेंमेळें । अथवा क्षीरौब्धि कीर्तन-काळें । सेवितां काय शेपशमळें । बाधिजेति श्रोत्रिहीं ॥ २७ ॥ असो' येथें च इतुका आग्रह केला । तरि वरकड आचार कोण तो सिद्ध जाला । हा महाप्रसाद ग्रंथीं बोलिला । नीच शेप मागतां मिळेना ॥२८॥ अनाचारवर्णन असो आतां । युगधर्मी येईल स्वभावता । अतिवादिया बहिर्मुखाचया हाता । एईल हि कोठूनि ते ॥२९॥ एका पात्रावरी दोनि वेळ । भोजन करूं नये करऊं नये केवळ । उच्छिष्ट सेऊं नये देऊं नये फळ । पाविजे पापाचें ॥१३०॥ उच्छिष्ट भोजन करी करवितां । ते व्रती सिर्क्थी पितामह तत्वता । उच्छिष्ट भोजन करी स्वतां । ह्मणौनि उच्छिष्ट वर्जावें ॥३१॥ अपोशन उत्तरापोशन । पयद्रव्य करितां भोजन । फुरका वाजऊं नये पतन । नरकीं होय तत्वता ॥ ३२ ॥ हितमैत्रैं न निंदितां । भोजन करावें ब्रह्मरूपता । सायंकाळीं हि अतिथीसह स्वतां । वैश्वदेव भोजन करावें ॥३३॥ सर्वथा करूं नये पंक्तिभेद । अगत्य आतुर पर्थ्येवाद । एर सर्वत्र सम स्वाद । आतां भोजनपात्रप्रकार ॥३४॥ गृहस्थासी करपात्र मृन्मयपात्र । लोहपात्र ताम्रपात्र वटार्क अश्वत्थ अपवित्र । चांद्रायनें होय पवित्र । एकवार भोजनें ॥ ३५ ॥ पोलाश पद्मिनी च्यूत माधव कर्दळी । भोजन प्रपस्थ ये पंचदळीं । उक्त अभावें जे मध्यस्थळीं । अथवा सर्व संकटीं ॥ ३६ ॥ स्वगृहीं सुवर्ण रौप्य कांस्य पात्रीं । सुखें भोजन करित श्रोत्री । श्वशुर मातुळ गृहेविण पवित्रीं । पर कांस्यपात्र वर्जावें ॥ ३७ ॥ असो

१ मूळ जनक. २ कर्चे. ३ तेलांत तळलेलें. ४ विस्तवात भाजलेलें. ५ दोष नाहीं. ६ कोठें. ७ पयनैवेद्य. ८ भात. ९ याचा कर्ता पितामह. १० पुढें ठेवलेलें, वाढलेलें. ११ ज्यास पथ्य असेल तो जरूर वगळून. १२ स्वाद. १३ पळसाचीं पानें. १४ पद्मपत्र. १५ आंबा. १६ माधवी=तुळस. १७ केळी.

हें आहे बहुत । प्रकरणपुष्टयर्थ बोलिलें किंचित । भोजनानंतरें मुखशुद्धता निश्चित । शास्त्रचिंता करावी ॥३८॥ वेदाध्ययन अर्थ मनन । हरिनामस्मरण हरीचें ध्यान । येणें कारितां अन्नपाचन । दोघें पावन । एकें च ॥३९॥ रात्रौ संध्यादि हरिकीर्तन । करूनि सुखें करावें शयन । अतिथीसी आस्तीर्ण प्रावरण देऊन । हरि स्मरोनि निजावें ॥ १४० ॥ गृहस्थ निमित्तेंविण निर्धारीं । पृथक् शय्या जरि तो करी । तरि अशक्त स्त्रीहत्या यथाकाळीं न रमे तरि । भ्रूणहत्या प्रत्यक्ष ॥ ४१ ॥ देव अमर अमृतपानें । मानव अमर पुत्रसंतानें । ह्मणौनि प्रजा रचानिया शास्त्रानुमोदनें । तदर्थ रति तो स्वधर्म ॥ ४२ ॥ एव प्रकारें गृहस्थाचार । वर्णिले सक्षेपाकार । वानप्रस्थ सन्यास अतःपर । अनुक्रमें बोलावें ॥ ४३ ॥ सन्यास वर्जिलासे कलियुगीं । वानप्रस्थ जयालागीं । यासी चालवेना तरि पतित जगीं । चालवेलि तरि अवश्य ॥ ४४ ॥ गृहस्थाश्रम जो सकाम । तेथें त्यासी न चलवे नेम । त्यासी वानप्रस्थ सन्यास श्रम । कळत कळत का लागला ॥ ४५ ॥ आता ऐसें ह्मणतील तीव्र आतुर । इतरा आश्रमाचा कैंचा निर्धार । तरि सन्यासियासी प्रायश्चित्त कैंचें ईतर । प्रायश्चित्तें तरी उद्धरती ॥ ४६ ॥ तथापि हि श्रीमत्शंकराचार्यादिक । ईश्वरावतार जे धर्मधारक । तींहीं अवश्य ग्रहण करावें तदात्मक । धर्म आता परिसावे ॥ ४७ ॥ देखोनि पळितादिकीं दूषिता काया । पुत्राचे सांभाळीं करूनि जाया । न्हावें त्रिषवेण स्नायी वना जाऊनियां । नखश्मश्रुजटाधर ॥ ४८ ॥ अधःशयायी ब्रह्मचारी । स्वप्नीं हि देखों नये नारी । पचयज्ञपरायण निर्धारीं । फळमुळाशनीं नेमस्थ ॥ ४९ ॥ भूतकृपाळु नारायणपरायण । एकदा अष्टौग्रासीं करावें प्राणरक्षण । ब्रह्मोपनिषदाचें पारायण । ग्राम्य फळें पुष्पें गधें वर्जावीं ॥ १५० ॥ अगत्य अभ्यग करावें वनस्नेहें । सीतळोदकीं सुप्रवाहें ।

---

१ आस्तरण=आंथरूण २ इतर आश्रम ३ ह्मातारपणामुळें केस पिकल्यावर. ४ ह्मालीं. ५ त्रि+सवन=सोमरस काढणें व पिणें, किंवा यज्ञयाग,

सर्वथा न लिंपावें तनु स्नेहें । निद्रा आळस वर्जावा ॥ ५१ ॥ परिवाद[1] मिथ्यावाद मृषावाद । सीतवातादि साहावे द्वंद्व । स्मरावा शंखचक्राब्जधर गोविंद । अग्निसेवा चांद्रायणादि करावी ॥ ५२ ॥ ऐसें वानप्रस्थ आचरतां वर्नीं । इंद्रियीं विषयवैराग्य जालिया मनीं । मग संन्यासग्रहण करावें विद्वज्जनीं । अन्यथा होय पतित ॥ ५३ ॥ वेदांताभ्यासनिरत अविरत । शांत दांत जितेंद्रिय निर्द्वंद्व मोहातीत । निरहंकार निर्मम कामक्रोधरहित । शमादिगुणसंपन्न ॥ ५४ ॥ नग्न अथवा जीर्ण कौपीन । मुंडी दंडी विवसन । स्वस्वरूपें समाधान । शत्रु मित्र असेना ॥ ५५ ॥ एक रात्र ग्रामीं त्रिरात्रि नगरीं । माधुकर[4] करावें अनिंदित विप्रागारीं । एकान्न लंपट यति होय तरि । प्रायश्चित्तायुतें शुद्ध नव्हे ॥५६॥ व्हावें त्रिपवण स्नायी । नारायणनिरामय स्मरावा हृदयीं । प्रणव जपरूप स्वाध्यायीं[5] । ब्रह्मबोध अखंडित ॥ ५७ ॥ विप्र लोभास्तव यतिप्रति । जरि करी नाना उपचार रीति । तरि तो चांडाळ जाईल नरकाप्रति । सर्वकर्मबहिष्कृत ॥ ५८ ॥ करूनि काम्य कर्मांचा न्यास । चिंतावा नारायण निराभास । ब्रह्मोपनिषदें वेदांतार्थाभ्यास । ब्रह्माहमस्मि त्रिपदार्थें ॥ ५९ ॥ तो संन्यासी ब्रह्मभूत । तया विश्व ब्रह्म सदोदित । युगानुसार जें विपरीत । तें वर्जिलें पुराणीं ॥ १६० ॥ संन्यासी अवलंबूनि राजयोग । यथेष्ट सेवी उपभोग । विवाद औपाधिक प्रसंग । आगमें वामकर प्रबोधी ॥ ६१ ॥ मंत्र यंत्र तंत्र शक्ति[6]पूजन । पट्टळं[7] यामळं[8] बळिदान । जारण मारणादि विध्वंसन । सांगोनि शिष्य करूं नये ॥ ६२ ॥ तयाचा शिष्य तो वानप्रस्थ । तया सन्यास च द्यावा हें प्रपस्थ । कीं शाक्त करावे कामरूप गृहस्थ । नरकाप्रति जावया ॥६३॥ हा संन्यास बरा कीं गृहस्थाश्रम बरा । जो अद्यापि आहे कृपेश्वरा । आणि मोक्षसाधन तो ज्ञानद्वारा । ज्ञानजननी हरिभक्ति ॥ ६४ ॥

---

१ शिवीगाळ करणें. २ असत्य भाषण. ३ व्याजस्तुति. ४ पांच घरीं भिक्षा मागणें. ५ शास्त्र, शास्त्राभ्यास. ६ देवीचें पूजन. ७ पट्टला=देश किंवा लोक, मंडळी. ८ यामलं=जोडी.

संन्यासग्रहणेविण हि मुक्त जाले । शुकवामदेवादि श्रुतीं वर्णिले । योगाभ्यासें हि बहु तरले । कपिलादि योगेश्वर ॥ ६५ ॥ हरिहरभक्तियोग सुभक्त । असंख्यात जाले विमुक्त । केवळ हरिहरनामस्मरणें अभक्त । दुराचारी हि उद्धरले ॥ ६६ ॥ तेणें हरिहरनामस्मरणें स्वतां । कलियुगीं तरावें तत्वता । कलींत व्यर्थ सदाचारता । तें च युगधर्मीं परिसावें ॥१६७॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । सदाचारवर्णाश्रमधर्मवर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ७२ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो विश्वरूपा विश्वंभरा । नमो उत्पत्तिस्थितिप्रळयकरा । नमो उत्पत्तिस्थितिलयपरा[1] । सदोदिता शाश्वता ॥ १ ॥ नमो समस्त देवमया । नमो समस्त भक्तध्येया । नमो समस्तरूपा निरामया । रूपारूपा अनंता ॥ २ ॥ नमो वर्णावर्णरहिता एकार्णवा । नमो कर्माकर्मातीता स्वयमेवा । नमो समस्त जगदाधारा माधवा । पतितजनपावना ॥ ३ ॥ नमो निखिळा[2] स्वरूप सघना । नमो सुरासुरांतरस्था समसमाना । मारणें तारणें हे जीवभावना । तूं शिव सर्व भूतात्मा ॥ ४ ॥ जीवबुध्या भवभय भेद । तूं आत्मा अखंड अभेद । भेदाभासमात्र हा विनोद । सकळ तुज अकळाचा ॥ ५ ॥ तुझे च निर्मिले सर्व जीव । तयां तुजवांचूनि कैंचा ठाव । तुज तों असेचना जीवभाव । भोगलाघव अचोज ॥ ६ ॥ नमो विश्वीं विश्वातीता विश्वसारा । नमो साकारनिराकारीं निजाकारा । नमो गगनघनव्यापका सघना सूक्ष्मतरा । नमो व्याप्यव्यापकस्वरूपा ॥ ७ ॥ नमन करूनि जगद्वंद्या । वद्य वंदन वदक अभेदा स्वसंवेद्या । तन्मयां श्रोतयां प्रार्थना तत्ववेद्या । अग्रानुसंधान परिसावें ॥ ८ ॥ पूर्व प्रकरणीं सदाचार । वर्णन वर्णाश्रमधर्मपर । जालें परि युगधर्मानुसार । तें च आतां परिसावें ॥९॥ कृत त्रेत द्वापार कलि । संपूर्ण धर्म कृत काळीं ।

---

१ परा=कामात पूर्णपणें गुतलेला. २ निखिला=संपूर्ण.

देव दानव यक्ष रक्ष पन्नगादि ते वेळीं । सर्व हि देवस्वरूप ॥ १० ॥ सर्व हि कृतयुगीं धार्मिक । हृष्ट सदाचारसीळ चातुर्वर्ण्य लोक । वेद-विभाग नाहीं सकळ हि एक । अध्ययन करी द्विजोत्तम ॥ ११ ॥ सर्व हि सदा नारायणपर । तपध्यानस्मरणतत्पर । शमदमादि साधनसंपन्न नर । सर्व अवगुणवर्जित ॥ १२ ॥ सर्व हि सत्यपरायण । सर्व शास्त्रार्थ विचक्षण । प्राणिमात्र सुलक्षण । स्त्रिया सुंदरा सगुणा पतिव्रता ॥१३॥ दुख दारिद्र पाप संताप । याचा असेचना आरोप । दीर्घायु सुखसंपन्न आपेंआप । अंतीं परमगति पावती ॥१४॥ भगवंताएवढा करुणाकर । नामस्मरणाऐसें साधन थोर । कृतयुगासमान मनोहर । युग कैंचें दुसरें ॥ १५ ॥ आतां असो हें वर्णावया कैंची थोरी । जेथें शुक्लवर्ण होता श्रीहरि । परिसा त्रेतायुग जेथें मुरारि । जाला आरक्तवर्ण ॥ १६ ॥ त्रिपाद धर्म जाला । एक पाद असे लोपला । किंचित्क्लेश जनमनाला । किंचित्सुकृत लोपलें ॥ १७ ॥ क्रियायोगरत सकळ । सर्व यज्ञकर्मकुशळ । सत्यव्रत दानसीळ । ध्यानपर नर प्रेमळ ॥१८॥ द्वापरीं पीतवर्ण पीतांबर । आर्ध धर्म आर्ध अधर्म साचार । तैसे च सत्यअसत्ययुक्त नर । यज्ञक्रिया सकाम ॥ १९ ॥ स्वर्ग अर्थ कामना मना । किंचित्कल्मपभावना जना । कोण्ही देखोनि पुण्यरचना । असूया करी मछर॥२०॥ अधर्मार्द्धें क्षीणायुषी होती । दुख दारिद्र पाप ताप हि पावती । सज्जनाची स्वतंत्र च असे गति । युगें काय तयासी[1] ॥ २१ ॥ आतां ऐसें लक्षिजेल विचक्षणीं । जेथें कृष्णत्व पावला चक्रपाणी । तेथें तयाचे भक्त युक्ताचरणी । कैसे राहों शकती हो ॥ २२ ॥ तरि याचें भगवद्वाक्यें प्रत्युत्तर । मम माया दुर्जया हे साचार । तथापि ममाश्रित अनन्य नर । मायाजाळ निस्तरती ते ॥ २३ ॥ पिता साहोनि नाना वोढी । बाळकासी अनर्थींहूनि काढी । तैसी या भगवंताची प्रौढी । शरणांगता संरक्षी ॥ २४ ॥ एका अंबरीषकारणें । दश जन्म धरिले नारायणें ।

---

१ सुखी, आनंदी. २ चतुर्युगापैकीं कोणत्याही युगांत सज्जन हे नेहमीं सज्जन च राहणार, काळमहिमा त्यांस बाधू शकणार नाहीं.

जो अजन्मा श्रुतीं पुराणें । वर्णिती कीर्ति जयाची ॥ २५ ॥ विचित्ररूपें विचित्रनामें । विचित्रशक्ति विचित्रमुक्ति नेमें । विचित्रवर्में सर्वोत्तमें । स्वभक्तजना सरक्षिजे ॥ २६ ॥ असो ऐसें हि जन्हि आहे । भगवंत भक्ता सामाळिताहे । तथापि कळीसी तों हें न साहे । सज्जनाचा द्वेपी तो ॥ २७ ॥ जन्हि अर्ती जैसें कर्म तैसें फळ । हे अति यथार्थ अविचळ । मध्यें जिणें जें अलुमाळ । तेथें विपरीत कळीचें ॥ २८ ॥ सतासी कष्ट सतोपती दुष्ट । जन स्वभावें स्वधर्मनष्ट । सत कष्टती तेथें स्पष्ट । दुर्जना तन्हि सुख कैंचें ॥ २९ ॥ युगत्रयधर्म सक्षेपें बोलिले । आणि ते पूर्वी क्रमोनि गेले । आतां प्रस्तुत कळी चाले । तद्धर्म परिसा विस्तरें ॥ ३० ॥ कलियुग महा घोर । सर्व दोषाचा आकार । वर्णचतुष्टय नारीनर । सर्व धर्मपराङ्मुख ॥ ३१ ॥ वेदविन्मुख विप्र । दभाचार च मानिती क्षिप्रं । अधर्मजीविका अक्षिप्र । न सुटे शुक्तिकीटवत ॥ ३२ ॥ असूया तिरस्कार शुष्क वैर । अधर्मनिरत वृथा अहंकार । परस्परें आक्षेप साक्षेप घोर । मी च अधिक हा फळहो ॥ ३३ ॥ धर्महेतु मात्र धार्मिक । तयाचा द्वेप करणें अवश्यक । घात घडला तरि कौतुक । पुरलें सर्व जन्माचें ॥ ३४ ॥ पुण्यशून्य पापरूप । विद्याविमुख अविद्याकूप । ब्राह्मण आदि जो वर्णभूप । सर्व सकर यथेष्ट ॥ ३५ ॥ स्वधर्मकर्ममर्यादा उडे । तेन्हां संकरत्व अनायासें घडे । महद्दोप लपविला पदरीं पडे । सहज सकर अनिवार ॥ ३६ ॥ वेद शास्त्र पुराण देवऋपि । वितड पाखडे वृथा दूपी । गुरुमर्यादा उल्लघी द्वेषी । ब्रह्मज्ञाना सज्जना ॥ ३७ ॥ विध्वशी ब्रह्माभ्यास क्रियायोग । निःशक मुक्त अतरीं जारभोग । लटिकें च वरिवरि निस्पृहसोंग । समुदायें न मनी कोण्हासी ॥ ३८ ॥ आत्मप्रतीति गुरुप्रतीति शास्त्रप्रतीति । हे अवघी च अवगणी नीति । नवीन च अवलबी रीति । ते च माने बाष्कळा ॥ ३९ ॥ जाणत जाणत मिथ्या देहाभिमानें । परंपरेसी पावावया पतनें । धारिष्ट च धरिती शमलमय

१ मूर्तिमत दोष. २ तत्काळ, शीघ्र. ३ चारी वर्णांत श्रेष्ठ.

मनें। पारि गुरुबोध नाइकवे ॥ ४० ॥ कलियुगीं रामनाम पतितपावन । ते मावार्थी लागला शून्यात्मवादहुताशन । तेणें परमार्थप्रातीचें केलें दहन । हा महिमा प्रसिद्ध कळीचा ॥ ४१ ॥ हें परमार्थविपयविटंबन । प्रपंचमय कामिक जन । दृश्यविद विषयतृष्णा गहन । मच्छर क्रोध द्वेपिये ॥ ४२ ॥ पापास्तव अल्पायुषी होती । दुखदारिद्रतापें पीडती । तपसत्यविहीन द्विजाति । चिंतान्हेर्दीं निमग्न ॥४३॥ उच्चासनीं वैसती नीच । नीच स्थानें पावती उच्च । सज्जन सीदेती देववेदमहिमा लोपे साच । दुर्ज्जन दोषीं प्रमोदती ॥ ४४ ॥ कुलांगना जारकर्म करिती । निंदिती भेदिती छेदिती पति । पुत्र पितया शिष्य गुरूसी द्वेपिती । कृष्णी कृष्णत्व आलियां ॥४५॥ परान्न परद्रव्य परस्त्री लोलुप । द्विज होती कैंचा पापभयसंकल्प । कैंचें तीर्थ व्रत दान जप । उपहास करिती करित्याचे ॥ ४६ ॥ हविष्यान्नासाठीं देशोल्लंघन। करिती परि न पवती द्विजजन। महानदीतीरीं कुदालिकाखनेन । करूनि पेरिती औपधी ॥४७॥ निरंतर अवर्पन ।क्षुधाभयें पीडे जन। तस्करभयें कंपायमान । नीतिसंरक्षण तें कैंचें ॥ ४८ ॥ मछमांसाशनें जीविका । होईल सर्वां ब्राह्मणादिकां । असो सर्व धर्म लोपे लोकां । अल्पयुत्व अपमृत्यु ॥४९॥ पोडश वर्षे जो वांचला । तो परमायुषी प्रसिद्ध जाला । पांचवे साहवे वर्षीं कन्यकांला । गर्भ संभवती कलियुगीं ॥ ५० ॥ सर्व मर्यादा होतां भग्न । कैंचें कोण लावील लग्न । पुरुपामागें स्त्रिया नग्न । बळात्कारें धांवती ॥ ५१ ॥ म्लेंछराज्य होईल प्रवळ । पीडा पावेलि द्विजकुळ । ब्राह्मण करकैर्पणभेणें विकळ । गिरिकंदरीं भ्रमती सकुटुंब ॥५२॥ कैंचें परमेश्वर भजन पूजन कीर्तन । कैंचें वाद्य महोत्साह नर्तन । कैंचें अध्ययन अध्यापन यजन दान । प्रतिग्रह निःशंक ॥ ५३ ॥ कैंचे पंचमहायज्ञ । जन दंभाचारनिमग्न । कैंचा आचार विचार विभग्न । होऊन जाईल सर्व

---

१ ब्राह्मण. २ चिंतासरोवरांत. ३ सुस्त, आळशी होतात. ४ 'कलियुगाची मध्यरात्र सुरू झाल्यावर. ५ कुदळीनें खणून. ६ पावसाचा अभाव. ७ म्लेंच्छ आपले हात धरून ओढतील या भीतीनें.

हि ॥ ५४ ॥ जैसजैसा ब्राह्मणादि अनाचार । तैसतैसा कळीचा पडिभरें । जैसा कुपथ्य आचरता रोगातुर । रोगवृद्धि स्वभावें ॥ ५५ ॥ यज्ञादि कर्मलोप होतां । वृष्टि नव्हे स्वभावता । इंद्रादि ज्या देवता । यज्ञभागेंविण विव्हळा ॥ ५६ ॥ चातकवत सर्वजन । घनार्थ अवलोकिती गगन । न्हंधे काया दीर्घाहार बहु अपलें मन । क्षुधानळें विदग्ध ॥ ५७ ॥ वसुधा देखोनि निरन्न । विप्र प्रवेशती महावन । योगियाचेपरि करिती जीवन । कदीं फळीं कुटुवा ॥ ५८ ॥ रविशशिग्रहणें असंख्यात । कोण्ही नव्हती सुस्नात । गंगा भागीरथी आदि विख्यात । तीर्थें जाती स्वर्गासी ॥ ५९ ॥ कळीसी अडीच सहस्र वर्षें जालीं । तें च देवताचक्रें पृथ्वी त्यागिली । ऋषिवृंदें अप्रत्यक्ष जालीं । सर्व सामर्थ्य लोपलें ॥ ६० ॥ कल्पवृक्ष कामधेनु चिंतामणी । परिस वैडूर्यादि तेजखाणी । अपसव्यशंख शाळग्राम निधि गुणीं । सिद्धि सिद्धि औषधीकळा पळालिया ॥ ६१ ॥ कलौ प्रथमचरणीं प्रथमारंभकाळीं । चारिसहस्र सातशतें सत्तरीं वर्षें होते वेळीं । अन्योन्य आरंभलें भूमंडळीं । लक्ष सहस्र पुढें ते आहेति च ॥ ६२ ॥ द्वापराची छाया हि असतां । पृथ्वी हरिहरीं साडिली नसता । हिमाचळदक्षिणे क्षारसिंधुवलयांकिता । भरतवर्ष कर्मभूमिका ॥ ६३ ॥ अत्र तीव्र शासन यावनी । अब्रह्मण्य जाली कित्येक अवनी । मर्यादानदी हरिपदीं तत्तीर्थपावनी । एकमेवाद्वितीयता ॥६४॥ शेप कर्मभूमिके द्वितीयाभिनिवेप । तो हि आत्मानुभवें अद्वैतवेप । करावया प्रबोध कळी प्रवेप । प्रवर्तलासें आदरें ॥६५॥ जैसें सत्सगमहिमानें । बळात्कारें सतत्व च पाविजे जनें । त्यजऊनि असत्कर्में असत्साधनें । स्वसायोज्यता सर्वस्वें ॥ ६६ ॥ नानाविधें तीर्थें देवतें । उच्छेदूंनि भजविती भगवतातें । स्वानुभव देऊनियां जनातें ।

---

१ आधिक्य, भर. २ ठेंगणी. ३ उजवीकडे ज्याचा खोलगट भाग आहे असा शख. ४ गतकली ४७७० ह्मणजे शके १५९१ हें साल येतें. यावरून या ग्रंथाची रचना कोणत्या शकात झाली हें समजण्यास येथें आधार मिळतो. (पहा दासबोध ६-४-७). ५ नाश करून.

सज्जन कारिती स्वतेजें ॥ ६७ ॥ आतां असो ऐसा राजविद्याप्रबोध। राष्ट्रस्थां प्रजाचा काय चाले शोध। देहबुद्धीसी मांडला वध। शिखा जाली सिखासूत्रा ॥ ६८ ॥ आतां च जाला वर्णसंकर। अशेष उद्भवला पापाचार। कैंची भक्ति कैंचा हरिहर। बाह्याकार किंचित ॥ ६९ ॥ तथापि स्मृतिकाराचा बळात्कार। हरिहरभक्ति करावी सहाचार। दोहींसी मांडला बळात्कार। सज्जनें काय करावें ॥ ७० ॥ वर्णाश्रमधर्म नचले कळियुगीं। ह्मणौनि भगवद्भक्ति योजिली गतीलागीं। ते हि नचले आतां काय करावें जगीं। मुमुक्षु तेणें तरणासी ॥७१॥ ऐसिये संकटीं हें च गमे। रामनाम जिन्हां जपावें अंतरयामें। तेणें सर्व हि पापजाळ निर्गमे। हरिचिंतनें नान्यथा ॥ ७२ ॥ नामस्मरण नामोच्चारण। रामप्रीतीचें कारण। रामीं रंगावें अंतःकरण। भृंगकीटकी न्यायें ॥ ७३ ॥ मन विश्वासलें पाहिजे रामीं। तेणें प्रेमा उपजे नामीं। तें नाम स्मरतां अतरयामीं। आणि गर्जे[1] सारिखें चि ॥७४॥ तेणें रामनामस्मरणेंविण। कोणें प्रकारें तरेलि कोण। कळीमाजीं पापाचरण। कायएक घडेना ॥ ७५ ॥ कोण्हीएक कांहीं कांहीं आवरी। परि परकीय संसर्गासी काय करी। मुख्य पातकें अवघीं च्यारीं। संसर्गी पांचवा समान ॥ ७६ ॥ शक्त न निवारी पापकारका। तरि अर्द्ध भाग फळभोग आइका। ऐसिया साडेपांचा पापापासूनि सुटका। कोणेपरि होईल ॥७७॥ आरमला च असतां संकर। होत च असता एकाकार। कांहींएक धर्महेतु नर। प्रारब्धबळें चुकले जे ॥७८॥ तयांसी संसार करितां कळिकाळीं। महद्दोष घडोनि येती बळीं। तयाची यातना निरयस्थळीं। ते च आतां बोलिजेलि ॥ ७९ ॥ सर्व धर्म जालिया सपाट। स्वर्गपदाची मोडेलि वाट। यमावतीचा दाटेलि धोपट। पाया पधाड मिळेना ॥८०॥ पापकारक आणि प्रेरक। अवघे च भोगिती महा नरक। तेथें श्रीमद्रामनाम तारक। जरि हा स्मरे सप्रेम ॥ ८१ ॥ कृत त्रेत द्वापार पर्यंत। यमशासन किंचित किंचित। कळीं यवन यमदूत। यांचें जगेरें

[1] जगर=चिलरात; किंवा झगरें.

माजलें ॥ ८२ ॥ यमावतीपासूनि कर्मभूमिभाग । येथें विषयभोग तेथें नरकयोग । निरंतर वाहों लागले मार्ग । राहाट पाटाचे परि ॥ ८३ ॥ कर्मभूमि यमावतीचा ठायीं । गजर माडला ये समयीं । इतर छपन्न कोटि वसुधरा कायी । कळीं प्रवेशों शकेलि ॥ ८४ ॥ इतर भूमडळीं कृतांत । प्रवेशे परि यथानियतें । स्वर्गपाताळादि पुण्यजनांत । कलिकाळवार्ता हि नाहीं ॥ ८५ ॥ जेथें निरंतर हरिहरस्मरण । जेथें स्फुरद्रूप शिवनारायण । जेथींचे जन पुण्यपरायण । तेथें कळी न प्रवेशे ॥ ८६ ॥ असो कर्मभूमिके अकर्मभरें । कळीसी ढळती चामीकरें । येथें हि रामीं मीनलें अंतरें । कळी न बाधी तयासीं ॥ ८७ ॥ जयाचें रामीं मीनलें मन । तया काय करिती बाह्य दुर्जन । तनुतेसी तरि आहे च निदान । दास लीन श्रीरामीं ॥ ८८ ॥ हरिहरीं धरिली च आहे धरा । करित च आहेति भक्तकैवारा । तव पचत्व पावलें शरिरा । ह्मणिजे राम अखंड ॥ ८९ ॥ यथार्थ कृपाळ सर्वेश्वर । जें शरीर आहे नश्वर । नाहींतरी महा भागवत नर । काय करिते ये काळीं ॥ ९० ॥ आता हे च प्रार्थना अच्युता । स्वभक्ताकृति यथोचिता । स्वरूपीं सामावी अनंता । मग हो पुढें भलेंतें च ॥ ९१ ॥ पुढें हि स्वभक्तबीजाकारें । रक्षिसील च काळानुसारें । परि ते हि धैर्यवंत होती अंतरें । विषकडिकाकीटवत ॥ ९२ ॥ अथवा तुझिया सरक्षणा । कोण जाणे नारायणा । कैसें रक्षिलें प्रेमपरायणा । मार्कंडेया कल्पांतीं ॥९३॥ आता प्रार्थूनिया भगवंत । निरोपणीं स्वस्थ केलें चित्त । कथानुसंधान यथोचित । श्रवण करावें सज्जनीं ॥ ९४ ॥ कळिमळसंदिग्ध जे का जीव । तयाचा आरंभला भवप्रभाव । जन्हि योजला हि एकार्णव । तन्हि नीति बोलावी ॥ ९५ ॥ युगानुसार सत्कर्महेतु । याचा तुटों नेदावा तंतु । पुढें कृपासागर भगवंतु । पतितपावन च आहे ॥९६॥ नामसमर्थ्रासी आणि पतन । हें तों न घडे कीं साक्षी त्रिभुवन । जन्हि

१ ज्याप्रमाणें नियम घालून दिले आहेत त्याप्रमाणें. २ काय वाटेल तें. ३ वेष्टलेले. ४ जलप्रलय, जगबुडणें.

लोपलें सर्व साधन । तन्हि हें कल्पांतीं घडेना ॥ ९७ ॥ यालागीं शरीर असतां स्वस्थ । शस्त्र शास्त्र करू नये न्यस्त । वीरें द्विजवरें ऐसी समस्त । नीति आहे लौकिकीं ॥ ९८ ॥ आतां कळीकृत दोषफळ । निरयदंड जो सकळ । तो परिसावा अविकळ । होऊनियां प्रेमळीं ॥ ९९ ॥ रामनामामृत ज्याचे अंतरीं । तया बाह्य विषें तें काय करी । नाम तारक संसारीं । विशेष ये कलियुगीं ॥ १०० ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । युगधर्मवर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ७३ ॥'

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो नारायणा अनंता । नमो नमतजनजीवना अच्युता । नमो यममार्गसुखदकरा भगवंता । यत्किंचिद्भगवदाशयें ॥ १ ॥ पूर्व प्रकरणांतीं पातकियाप्रति । वक्ष्यमाण यातना यमावर्ती । तरि तो यममार्ग प्रथम श्रोतीं । परिसावा तन्निवारणा ॥ २ ॥ षडशीतिसहस्र विषम । यममार्ग अति दुर्गम । पातकियासी भयद भीम । पुण्यरूपा सुखरूप ॥ ३ ॥ धर्मशून्य प्रेतभूत । नग्न शुष्ककुरकंठ ताल्लुकाक्रांत । दीर्घ स्वरें आक्रंदत । नाना आयुधीं ताडितां ॥ ४ ॥ दुःखास्तव इतस्तता धांवती । पाशनिबद्ध कोणीकडे जाती । कृपासिंधु अंतरला श्रीपति । ते तरि यमदूत प्रत्यक्ष ॥ ५ ॥ पाउल न घालवे पुढारें । मागें ताडिती अति निकरें । आरडती पोळलेन अंतरें । जीवें जावें केउतें ॥ ६ ॥ सुस्वरें न स्मरती च राम । धरूनि मिथ्या संसारसंभ्रम । अंतीं आरंभला अति विराम । कीव एईल कोणासी ॥ ७ ॥ किविलवाणीं कांपती बापुडीं । दूत ह्मणती आठवा आपुली जोडी[४] । तडतडा करिती तडातोडी । पुढें चाळविती हरिहीना ॥ ८ ॥ तो मार्ग न पाहवे डोळां ।

---

१ त्याग. २ रामनामाला अमृताची उपमा दिली ह्मणून विषयांला विषाची उपमा दिली आहे. ३ दयायची. ४ जोडलेलें सुकृत अथवा दुष्कृत. ५ हरीला अंतरलेले पापी.

क्वचित्पंक क्वचिद्वन्हिज्वाळा । क्वचित्तप्तकर्दम तप्तसैकतें सिळा । धारा शस्त्राकारा चरणतळां ॥ ९ ॥ धगधगीत इंगळाचिया रासी । महाधूम विखी जो बुबुळासी । अति वायु शोषक सर्वांगासी । अति सीत भीत जन जया ॥ १० ॥ अंगारवृष्टि शिळावृष्टि शस्त्रवृष्टि दुर्गम । तप्तकर्दम अति क्षारकर्दमवृष्टि भीम । अति सीतळ अति उसळत्त जळवृष्टि प्रळयोपम । महानिम्नानि क्वचिच्च ॥ ११ ॥ अमूलाग्र निबद्ध वज्रकंटक तरुवर । जे मृत्युलोकीं नयनीं हि अगोचर । त्याच वन एकदाट दुस्तर । असीपत्रदव दुर्गम ॥ १२ ॥ वज्रसूचिकातुल्य तीक्ष्ण ऊर्ध्वाग्र । कंटक एकदाट भूमीवरी समग्र । सीळा कंदर धूळि गोटे सेवाळादि दुस्तर । गाढांधकार गर्जना ॥ १३ ॥ रामविमुख दुःखरूपी । आक्रोशत क्रंदत प्लोवत पापी । रुदत पाशयंत्रित भीमस्वरूपी । शस्त्राग्रें अंकुशें रोजनि चालविती ॥१४॥ विचित्रपाश विचित्रस्थानीं । नाशिकाग्रीं ग्रीवें भुजीं कटीं पदाभिधानी । केचिन्निरुछास नेत्र बुजूनि । अयोभार लिंगाग्रीं नासाग्रीं कर्णद्वयीं ॥ १५ ॥ हरिहरविमुखीं पापजनीं । ज्वरादि जाच भोगिजेति स्वकर्मे स्मरोनि । क्षुत्तृपाक्रांत छाया जळें वाचूनि । वाळलीं कंठोरु तालुका ॥ १६ ॥ धन्य तें यमदूतांचें काठिण्य । धन्य तें दोषियाचें अपुण्य । तेथें असेचना कारुण्य । दोष फिटला पाहिजे ॥ १७ ॥ तत्र असेना प्रतिपक्ष । जिता जीवासी तें अलक्ष । परि शास्त्रीं पुराणीं प्रत्यक्ष । गिर्वा आहेति बोलिले ॥ १८ ॥ तयाचे नमनीं तीनि धडे । तत्र असमदादिक काय बापुडे । तथापि आपुलिया च परि पोडें । प्रयत्न तों पाहों करूनि ॥ १९ ॥ अजि परिसोनि हे अति यातना । महद्भय वाटलें माझिया मना । ह्मणौनियां मनाची करितों प्रार्थना । जें संकल्पविकल्पात्मक ॥ २० ॥ अत्र कित्येक नास्तिक विकल्पक । ह्मणतील कैंचे जाच साच नरक । यदर्थी निरुत्तरकरण सविवेक । वाक्य परिसा विचक्षण ॥ २१ ॥ जया

---

१ वालुकामय. २ धडपडत, उड्या मारीत. ३ गिरा=वाणी, किंवा गीर्वाण=संस्कृत, किंवा देव. ४ योग्यीनें, योग्यतेनें.

निश्चयें यातना असत्य । तया पाप संक्षेप कां हो सत्य । असत्य
ारि अवघें च असत्य । कां सत्य तरि सत्य अवघें हि ॥ २२ ॥
कारणें गहन कर्माची गति । दुष्कर्मभोग न सरे कल्पांतीं । पुनः
ष्टि सृजील प्रजापति । तेव्हां हि तें च फळ पुढें ॥ २३ ॥ तरि
त दुष्कृतदंड दारुण । भोगावा तत्वता आपुला आपण । तो सर्वथा
र्गृत विचक्षण । विवेकबोधेंकरूनि ॥ २४ ॥ संसार तरि केवळ
:ख । दुराचार काय पावती सुख । अमृतें अमर नव्हे तो विख ।
तल्या काय होईल ॥ २५ ॥ ह्मणौनि विपरीत वासना आवरीं । मना
मीं प्रीति स्थावरी । यथाशक्तया पुण्यकर्मै करीं । नाम स्मरें रामाचें
२६ ॥ रामस्मरण करितां काळीं । रामार्पण करितां कर्में प्रेमळीं ।
ाउन तें पूर्ण सर्व पुण्यफळीं । बोळेले बोळेगें ॥ २७ ॥ तया सद्य-
क्ता ब्रह्मभूता । गलंतर कैचें निर्भ्रांता । जो अनन्य भक्त महामुक्त
ग्तां । स्तविला वेदांतसिद्धांतीं ॥ २८ ॥ आतां साधारण सुकृति
ग्लीळां । जेणें भोगेछा ठेविली पुण्यफळा । तया पुण्यजना मार्गीं सुख-
ोहळा । तो च आतां परिसावा ॥ २९ ॥ पुण्यास्तव भक्ति भक्तिस्तव
ण्य । एवं उभय प्रकार अनन्य । असो पुण्यजन जे धन्य । सुख-
ापन्न मार्गस्थ ॥ ३० ॥ अन्नदानी जीवनदानी । स्वादन्नभोजनी पय-
ानी । घृतमधुक्षीरदानी अमृताशनी । सुखरूप ये यमाप्रति ॥ ३१ ॥
ान्नदाता सेवी पायँस । दीपदानें सुप्रकाश दिशादश । वस्त्रदो दिव्यां-
रें परिधानें सुप्रकाश । परिस्करप्रद पूज्य सुरां ॥ ३२ ॥ गोदानें सर्व-
ामसमन्वित । परमोत्साहें यमाप्रति पावत । ह्मणौनि स्वहस्तें
ोदान करत । सर्व हि सर्व हि सुखार्थ ॥ ३३ ॥
ूमिदो गृहदो बैसोनि विमानीं । अप्सरसंकीर्णं क्रीडत पावे यमस्थानीं ।
्यदो रथदो सर्वभोगेंसीं विमानीं । वृपद यानारूढ पावे ॥ ३४ ॥

---

१ यत्न. २ प्राप्त होतात. ३ रामसेवा करण्यापासून. ४ निश्चित. ५ क्षीर.
६ रथारूढ.

फळपुष्पद सर्वसंतोषें । अप्सरसकीर्ण पावती सुवेषें । सर्वकामसमन्वित विशेषें । ताम्बूलप्रद हि पात्रे ॥ ३५ ॥ माता पिता गुरु यति ब्राह्मण ब्रह्मचारी । इत्यादि शिश्रुषापर सर्वभूतहितकारी । सर्वभोग सर्वसंतोषान्वित विमानावरी । अमरा पूज्यमान येती यमाळया ॥ ३६ ॥ विद्यादानी पूज्यमान । पुराण पाठक स्तुयमान । सुखें पावती यमदर्शन । जे नि काम रामप्रीत्यर्थ ॥ ३७ ॥ एवमादि प्रकारीं पापपुण्यकारी । सुखें दुखें पावती यमपुरी । पुण्यत्तमा यम शखचक्रगदाधारी । चतुर्भुज घनशाम ॥ ३८ ॥ पुण्यत्तमा प्रति मित्रवत । स्नेहें पुजूनि प्रिय बोलत । धन्य धन्य तुह्मी बुद्धिमत । या निरयापासूनि सुटलेति ॥३९॥ तुह्मीं केलें पुण्यार्चन । तें फळ परत्रसाधन । जे स्वहित न करिती मानवजन । ते आत्मघाती वर पापी ॥ ४० ॥ अनित्य, दु खरूप ससार । रोगादि विकळ कुश्चिळ शरीर । मळ मूत्र वात श्लेष्म कृमी केवळ नर । दुर्गंध स्पष्ट हि देखता ॥ ४१ ॥ या च या च विषयभोगाकारणें । न पानोनि हि पाप करी विसरोनि मरणें । ते आत्महते परम विटंबणें । भोगिती ह्मणे यमधर्म ॥ ४२ ॥ तस्मात धन्य ते च जनीं । जे धर्म सग्रहिती जन्मोनि । धार्मिक पूज्य उभयस्थानीं । स्तव्य भव्य सुखभागी ॥ ४३ ॥ ऐसें यम पुण्यरूपा प्रीतीं गौरवें । स्तऊनि ह्मणे पुण्यपदाप्रति जावें । यत्किंचित पापफळ असलें तरि स्वभावें । अनुभविजे सेवटीं ॥ ४४ ॥ ऐसें पुण्यरूपासी पुजूनि । पावऊनि सर्वभोगान्वित स्थानीं । यथार्चनें दिव्य सुखसदनीं । भोगावया ते जाती ॥ ४५ ॥ यानतरें पापियाप्रति यम । अंजनाद्रि योजनत्रय भीम । वत्तिसभुज आयुधें विद्युत्पुंजोपम । प्रळयांबुदघोष होय रक्ताक्ष ॥ ४६ ॥ दीर्घ नाशिक दंष्ट्रा कराळा विकराळ मुख । अतकोपम दूत असख्य उभे सन्मुख । सभे चित्रगुप्त भीषण ज्वरादिसकुळ दु ख । द्यावया तया पापिया ॥ ४७ ॥ तव ते पाशबद्ध छिन्नाग कपायमान । तयाप्रति गर्जती नेत्र ताऊन दटाऊन ।

---

१ काजळाचा जणू काय पर्वत. २ प्रळयकाळच्या मेघगर्जनेसारखा भयकर आवाज करून.

कां रे पातकें केलीं निःशंक होऊन । तेव्हां बरें वाटलें ॥४८॥ तयांची यातना भोगा आतां । कां वृथा चिंता दुःख करिता । कृतकर्मफळ साहावें स्वतां । पक्षपात नाहीं यमधर्मा ॥४९॥ या च धर्मराजाची वाणी । पूर्वीं च वदली नव्हती रे¹ पुराणीं । ऐसिये चित्रगुप्ताचे भाषणीं । तूष्णीं² स्थित अपराधी ॥ ५० ॥ मग यमाज्ञाकारी³ प्रचंड । करिते जाले चंड दंड । नरकाचा ठाईं वितंडें⁴ । टाकिते जाले अति वेगें ॥ ५१ ॥ आपुलें पातकाचें फळ । नाना यातना यथाव चिरकाळ । अति दुःख भोगूनि शेप शमळ । अंधतमादि योनीं भोगवी ॥ ५२ ॥ वृक्ष वल्ली गुल्म⁵ लता । तृण औपधी पापाण पाप पर्वतता । या स्थावर योनी प्रथमता । पापावशेषें पावती ॥ ५३ ॥ अंधतमआवृत्त जीव केवळ । आसुख दुःख पावती पापमूळ । दहन छेदनें होती विकळ । पळों विवळों न शकती ॥ ५४ ॥ तत्र पुण्य तरु पुण्य पापाण । जया मस्तकीं वंदिती वंदिती विचक्षण । आदिकरूनि शिवनारायण । शोभा मिरविती सुरनर ॥५५॥ जयाचेन पूजनें वंदनें । तुटती पापियाचीं कर्मबंधनें । ते परमपुण्याचीं सुखसदनें । पुण्य गिरि आदि सर्व हि ॥५६॥ हे स्थावरता परि पवित्र । पापावशेप स्थावर तो अपवित्र । ते सर्वथा स्पर्शों न शके अत्र । जेथें सुरासुरसंपदा ॥ ५७ ॥ आतां अग्रजन्म कृमि पशु पक्षी । जळजादि⁶ जीव जे अलक्षी । जो एकमेका परस्परें भक्षी । ते दुःखरूप कंपित भयभीत ॥ ५८ ॥ जो पातकोत्पत्ति अपार । चिरें⁷ दुःखी क्षणभंगुर । अतःपर चंडाळ अंत्यजादि नर । नरकीं जीत च पचती जे ॥ ५९ ॥ इत्यादि अष्टादश पगडजाति । अनुलोम⁸ प्रतिलोमात्मका⁹ किती । चतुर्लक्ष मनुष्ययोनि क्षितीं । धर्महीन जड गाढमूढ¹⁰ हि ॥ ६० ॥ तत्र ब्राह्मणादि वर्णचतुष्टय । जया धर्माधर्म नीति न्याय । ते हि जे करिती परमान्याय । महद्दोषादि दोषातें ॥ ६१ ॥ ते मुख्य ब्राह्मण दरिद्री दुःखी

१ कां रे ! २ मुकाट्यानें. ३ यमाच्या आज्ञेप्रमाणें वागणारें. ४ विशाळ. ५ दाट झाडी, झुडुपें. ६ जळापासून उत्पन्न होणारे सर्व प्रकारचे जीव. ७ निरंतर. ८ उच्च वर्णाचा पुरुष व हीन वर्णाची स्त्री यांपासून झालेली प्रजा. ९ उच्च वर्णाची स्त्री व हीन वर्णाचा पुरुष यांपासून झालेली प्रजा. १० अतिशय.

पापप्रकृति । होऊनि पुनः पापें नरका येती । ऐसी आहे पातकाची स्थितिगति । कल्पक्षई हि अक्षयीं ॥६२॥ तैसी च फळश्रुति पुण्याची। पुण्यें स्वर्गसुख भोगूनि पुण्यशेषें चि । जन्मती पुण्यवंत पुनः पुण्यें सर्व चि । पुण्यपदाप्रति जाती ॥ ६३ ॥ एवं पापपुण्यफळ भोज । विश्व-नाशीं हि अविनाश हें चोज । पुनः प्रवृत्तिकाळीं पद्मज । पूर्ववत च रचितसे ॥ ६४ ॥ आतां स्त्री पुरुष नपुंसक । पापास्तव शरीरें अनेक। परि मूळीं जीवांकें जो एक । तो च सर्व योनी फिरतसे ॥ ६५॥ जीव जीवी आणि जीवें । लिंगत्रय संज्ञा नाहीं मूळ भावें । ह्मणौनिया तत्वता स्वभावें । सर्व भोग जीवा एकासी ॥ ६६ ॥ कित्येक ऐसें हि ह्मणती। स्त्रियांचे पुरुष पुरुषांच्या स्त्रिया नव्हती । तत्र अकळ च आहे ईश्वर-गति । यथामति बहुमत्त ॥ ६७ ॥ असो आतां हें बहुश्रुता मना । अलक्ष न करी परिस विज्ञापना । डोळे झांकूनि केली पापार्चना । ते उघडी डोळीं भोगावी ॥ ६८ ॥ तरि आतां एक करावें। सर्वथा पातक नादरावें । पुण्य प्रेमें आदरावें । तरि च सुख पाविजे ॥ ६९ ॥ तूं जें जें करिसी तें तें तरि । सुखाकारणें हे निर्धारीं। दुःखालागिं ये संसारीं। कोण्ही कांहिं च करित नसे ॥ ७० ॥ तरि सुख दुःख भोगी जो जीव । तो तरि आहे च कीं स्वयमेव । देह पडती घडती तेथें अहं-भाव । ठेऊं नको विवेकें ॥ ७१ ॥ सकळ दोषमूळ मी व्यक्ति । सर्व पुण्यफळ भगवद्भक्ति । भजन पूजन नामोक्ति । काळस्थिता सत्क्रिया ॥ ७२ ॥ क्रियेचा ठाईं जें जें छिद्रें । तें नामस्मरणें होय अछिद्र । अभद्र हरूनि करी भद्र । नामस्मरण रामाचें ॥ ७३ ॥ याळागि हे च प्रार्थना पदोपदीं । जिव्हा वेष्टिजे नामपदीं । तेणें पाविजे स्वानंदपदीं । परमोंपदी चुकतील ॥ ७४ ॥ एवं यममार्गवर्णन जालें । आतां यातनाकथनानुसंधान लागलें । हे कथा पौराणकी परिसे तया

---

१ अंक=चिन्ह. २ कमतरता किंवा दोषात्मक भाग ३: अशुभ. ४ संकटें. दुःखकारक प्रसंग. ५ पुराणांतील.

चुकलें । हरिप्रसादें यमभय ॥ ७५ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । यममार्गवर्णनें । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ७४ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो नारायणा नरकांतका । नमो स्मर्तृ निरयनिवारका । नमो अशेष संक्लेशक्षयकारका । नामस्मरणमात्रतः ॥ १ ॥ नमो नाममया नामात्मका रामा । नमो नामरूपमया रूपात्मका शामा । नमो नामरूपातीता विश्वविश्रामा । नमो नामरूपमया अव्यया ॥ २ ॥ सकृन्नामस्मरण मुक्तिदा । नमो अशेपाघहरा मुकुंदा । नामधारकोद्धारका गोविंदा । पतितपावनाभिधाना ॥ ३ ॥ कैंचें कर्म कैंचे धर्म । केवळ कळींमाजि अधर्म । तेथें तरणोपाय नाम हें वर्म । नाना ग्रंथीं परमार्थी ॥ ४ ॥ कर्म धर्म पंगु जाले । उपाय च अपायासी आले । तेथें अविनाश ह्मणोनि बोलिलें । निगमबीज नाम हें ॥ ५ ॥ ऐसें समर्थ रामनाम । तें श्रोतयाहृदयीं असो सप्रेम । मग काय करिल तो यम । आणि यातना तयाच्या ॥ ६ ॥ पूर्व प्रकरणांतीं कथानुसंधान । पापभेद निरयजाच वर्णन । तें च बोलिजे सावधान । परिसा आतां सर्व हि ॥ ७ ॥ पौराणिकी पुण्यकथा । यमधर्मे कथिलें भगीरथा । श्रवणमात्रें श्रीहरिकथा । यममार्ग निवारे ॥ ८ ॥ आतां धैर्य अवलंबूनि परिसावें । प्रतिपदीं हरिस्मरण करावें । सज्जन कृपाळु न साहवें । परदुःख ह्मणोनि प्रार्थिलें ॥ ९ ॥ तपनवाळुकाकुंभ कुंभीपाक । रौरव महारौरवादिक । निरुच्छ्वास दुःखदायक । काळसूत्र प्रमर्दन ॥ १० ॥ असिपत्रवन तीक्ष्णधार । लाळकुंड हिम पडिभर । मृपावस्थां वसाकूप दुस्तर । वैतरणीनदी दुर्गंधा ॥ ११ ॥ स्वमक्ष मूत्रपान पुरीषन्हदें । तप्तशूळ तप्तसीळा शाल्मली दम दुःखद । शोणितकूप शोणित भोजन

---

१ एकदां नामस्मरण केल्यानें देखील. २ वेदांतील रहस्य. ३ सज्जन हे 'परदुःखेन दुःखित' असल्यामुळें, दुसऱ्यास दुःख झालेलें त्याला सहन होत नाहीं. ४ अधिकता, ५ मृषा=मिथ्या. ६ मज्जाकूप. ७ नरकाची नदी. ८ सळ, ९ तळें

श्वमांसाशन स्वेद । वन्हिज्वाळानिवेशन ॥ १२ ॥ शिळावृष्टि शस्त्र-वृष्टि । क्षारोदक उष्णोदकवृष्टि । दडपानअग्निवृष्टि । तप्ताय पिंडभक्षण ॥ १३ ॥ अधःशिर शोषण मरुत्पतन । पाषाणवर्षन कृमिभोजन । कर्वतविदारण भ्रमण क्षारांबुपान । पुरीषभक्षण प्रलेप[१] ॥ १४ ॥ रेत-पान धूम्रपान पाशबंध । शूळानुरोहण सर्वसंधिदहन प्रसिद्ध । अंगार-शयन मूपळमर्दन विविध । काष्ठयंत्रें कर्शन छेदनें[२] ॥ १५ ॥ पत्त-नोत्पतन गजदडादि यातना । गजदत मत्त माहिप व्याघ्र श्वानादि नाना । सर्प विषकंटक पिपीलिकादंश पापजना । क्षारांबु निंबु मुखघ्राणादि अति दंड ॥ १६ ॥ लवणभक्षण स्नायुछेद शिरछेद आस्थिछेद । क्षारांबु-निमज्जन सडलेंमांसभोजन प्रमाद । पित्तपान श्लेष्मभोजन वृक्षाग्रपतन भयद । जळांतर्मज्जन महा ॥ १७ ॥ पाषाणधारण कंटकशयन । महा दुर्गंधकर्दमीं शयन । बहु शस्त्रास्त्रधाराशयन । तप्तभूमि तप्तप्रतिमा स्तंभ ॥ १८ ॥ महा तिक्तनिषेवण अति कटुकें[३] । पाषाणभक्षण कषायोदकें । अति उष्ण उसळततैल पापकारक । पान करविती तयासी ॥ १९ ॥ अति उष्ण अति सीतोदक शेचन[४] स्नान । दशनिनिरशन[५] तप्तायशयन । सूचिकानिक्षेप नखोनखीं नयन । श्रीहरिनामविमुखासी ॥ २० ॥ शिश्नवृषणीं आयोभार । इत्यादि यातना अपार । कोटिच्या कोटि सविस्तर । सहस्राब्दीं न सांगवती ॥ २१ ॥ या यातना ज्या ज्या दोषा-स्तव । तत्वता भोगिती जीव । तें आतां परिसावें माधव- । विमुख पातकार्चन ॥ २२ ॥ ब्रह्महा मद्यपी तेयी[८] गुरुतल्पग । चत्वारि महापा-तकी दुर्भग । याचा जो निरतर करी संग । तो याबराबरी पाचवा ॥ २३ ॥ यालागि दुष्टसग नावडे संतां । एव्हवीं काय आहे तया द्वेषता । दोष सर्वथा करू नये स्वता । आणि दुसरा कारितां वर्जावा ॥ २४ ॥ पापी शुद्ध होईल प्रायश्चित्तें । परि सर्वथा शुद्धि नाहीं प्रेरकांतें । अनु-

---

१ माखणे. २ तिखट वाढणें, खाणें. ३ कडु. ४ सिंचन. ५ दात पाडणें. ६ तापलेल्या लोखडावर निजवणें. ७ सुईवर अगर हत्तीच्या सोंडेवर फेकणें. ८ स्तेय=चोरी. ९ ब्रह्महत्या सुरापान स्तेय गुर्वंगनागमः । महाति पातकान्याहुः संसर्गश्चापि तैस्सह ॥. १० प्रवर्तकास.

मोदन देईल पातकियातें । तया तयाहिपरिस यातना ॥ २५ ॥ आतां महापातकासमान दोष । बोलिले आहेति महापुरुष । ते परिसोत कां निर्दोष । श्रोतेजन सज्जन ॥ २६ ॥ वृथापाक ह्मणिजे असाक्षीभोजन सदां । अदेशी वेदविक्रयी ब्राह्मणदूषकासमदा । धनादि देईन ह्मणोनि नेदी तया संकल्पप्रदा । ब्रह्महा हें अभिधान ॥ २७ ॥ जो धर्म नेणें धर्मज्ञ द्वेषी उपेक्षा करी । अशनपानास्नानार्थ गोब्राह्मण निवारी । अनधीत शास्त्रार्थ प्रतिष्ठी वृथाहंकारी । तो ब्रह्महासमान मानव ॥२८॥ प्रायश्चित्त वैद्यक ज्योतिष धर्मनिर्णय । शास्त्राश्रयेविण बोलों कृतान्याय । ऐश्वर्यविद्याधनमदें द्विजा आक्षेपी तो होय । ब्रह्मघातकासमान ॥ २९ ॥ परनिंदाआत्मोत्कर्षवादी । असत्यवंत अन्योद्वेगरत प्रमादी । अन्य-सूचक दंभाचारवंत स्मृति पदीं । ब्रह्मघातकासमान ॥ ३० ॥ अधर्मरत प्राणिवधनिरत । इत्यादि ब्रह्महासम विख्यात । अतःपर परि-सोत बहुतश्रुत । मद्यपानासम दोष ॥ ३१ ॥ गणान्न गणकान्न पति-तान्न । औपासनपरित्याग देवळैकान्न । सुरापत्नीमैथुन रजस्वलादर्शन शूद्रपंक्त्याअन्न । शिवनिर्माल्य पलांडु लशुनसेवन पाप सुराप ॥ ३२ ॥ एवमादि दोष बहुत । सुरापानसमान विख्यात । अच्युतस्मरणेंविण अच्युत । सांचती फळ द्यावया ॥ ३३ ॥ आतां सुवर्णस्तेयोतुल्य दोष बहुवस । धातु रत्नें वस्त्रें कस्तुरी कर्पुर चंदनादि सुवास । धान्यें कंदें फळें तृण काष्ठ रुद्राक्ष मधु गौरसादि रस । सर्वचौर्य स्तेयतुल्य ॥ ३४ ॥ पितृ-यज्ञपरित्यागी । धर्मकार्यलोप करी जगीं । यतिनिंदा करी तयालागि । स्तेयतुल्यता तत्वता ॥ ३५ ॥ मुकुंदनाम न स्मरता भारतीं । नाना पातकें घडती न झडती । आतां गुरुतल्पासमान क्षितीं । महद्दोष परि-सावे ॥ ३६ ॥ दोषश्रवणश्रमपरिहारा । पदोपदीं स्मरावें हरिहरा । तेणें विश्रांति होय अभ्यंतरा । दोषी होती निर्दोष ॥ ३७ ॥ भगिनी कन्यका

१ ज्या शास्त्राचा अभ्यास केला नाहीं त्याबद्दल. २ दूषण देतो. ३ दुसरा रागावला किंवा दुःखी झाला ह्मणजे आनंद मानणारा. ४ वेडेचार करणारा. ५ पुष्कळ लोकांकरिता शिजवलेलें अन्न. ६ गणक=गणिती, ज्योतिषी. ७ देवळ=देवापुढील धान्यावर निर्वाह करणारा. ८ कांदा. ९ स्तेय=चोरी.

भाउजई स्नुषा । सर्ववर्णांच्या परत्रिया स्वस्त्री हि रजश्वळा सदोषा। मद्य-
पत्नी विध्वंस्तस्त्रीगमन करी तया पुरुषा । गुरुतल्पगासम दोष ॥ ३८ ॥
वेदशास्त्रश्रद्धाहीन । स्वधर्मकर्मत्यागी दुर्जन । अकाळ कर्माचरण मळिन।
हे गुरुतल्पतुल्य हो ॥३९॥ इत्यादि महापातकातुल्य पापें। मुख्य चत्वारि
आपुल्या रूपें । याचा संसर्गी समान साक्षेपें । हे पचमहापातकी ॥४०॥
यासी अष्टादश स्मृतिकारीं । प्रायश्चित्तें योजिलीं ग्रथांतरीं । ते पुढें बो-
लिजेति आतां अवधारीं । अप्रायश्चित्त पातकें ॥ ४१ ॥ स्त्रीशूद्रें प्रति-
ष्ठिले हरिहर । तयासी ब्राह्मणादि करिती नमस्कार । ते शुद्ध नव्हती
निरतर । प्रायश्चित्तायुतें हि ॥ ४२ ॥ सर्वयातना सर्वकाळ । यावच्चद्र
तारा रविमडळ । वेदशास्त्रसपन्न हि स्त्रीकृतें सतकोटिकुळ । अकल्प वसे
रौरवीं ॥ ४३ ॥ ब्राह्मणप्रतिष्ठित हरिशकर । तयासी हि करावया स्पर्शा-
कार । इतुकियासी नाहीं अधिकार । राजा स्त्री अनुपनीत पतित ॥४४॥
आतां श्रुतिस्मृतिसिद्धात । अन्यथा भाविल तो पतित । परतु विषयव्य-
वस्था निभ्रात । कळली पाहिजे च कीं ॥ ४५ ॥ ज्ञानयोग भक्तियोग
कर्मयोग । जन्हि यासी परस्परें आहे सयोग । तन्हि यथाधिकारें आपु-
लाले प्रसग । प्रतिष्ठिले पाहिजेत कीं ॥ ४६ ॥ तरि केवळ कर्मठाप्रति
हे बोळ । जेथें भक्तीची नाहीं बोल । भक्तिमहिमा अति सखोल । विधि-
अधीन च हें न घडे ॥ ४७ ॥ राजे स्त्रिया अनुपनीत पतित । हरि-
हरस्पर्शे पूजनें रतले बहुत । हा परिहारें सूचिला प्रख्यात । हें हि आहे
ह्मणोनिया ॥ ४८ ॥ भगवत्कृपा जाली जयावरि । तो चढला सर्वांचे
शिरीं । अभक्तजन जे ससारीं । तया अयुक्ता अस्पर्श हरिहर ॥ ४९ ॥
भगवतीं च असतें च प्रेम । तरि का घडतें न झडतें दुष्कर्म । आता
असो हें भक्तिवर्म । प्राप्त कैचें असचिता ॥ ५० ॥ विश्वास-
घातकी कृतघ्न कुसगी । सद्गुरुनिंदा द्रोह सद्गुरुपरित्यागी । देववेद-
सत्कथानिंदक पाखडी जगीं । इत्यादिका प्रायश्चित्त असेना ॥ ५१ ॥

---

१ विश्वासातली. २ अनुपवीत ३ निरास.

यातना अप्रायश्चित्त पातकांतें । सर्व निरयीं कल्पकोटिसहस्रशतें । जाचिती सहितवंशायुतें । रामस्मरणविमुखासी ॥ ५२ ॥ यानंतरें कर्मावशेषें-करूनि । त्रिकल्प पाषाणादि स्थावर योनीं । ततः शतसहस्र वर्षे षष्टी विष्ठा कृमि होती मेदिनी । मग सर्प होती कल्प पुढें सहस्र युगें पशु होती ॥ ५३ ॥ यानंतरें अनुक्रमें । म्लेंछगोळक कुंडगोळक तमें । मग अकिंचन विप्र पापप्रतिगृही नेमें । पुनर्नरक अचुक ॥ ५४ ॥ यम ह्मणे भगीरथा राया । म्यां तुज यातना सांगितल्या या । प्रत्येकें युगपर्यंत महा पातकिया । हरिविमुखा प्रसिद्ध ॥ ५५ ॥ मग सप्तजन्म होय रासभ । दशजन्म श्वान विड्वराह अशुभ । मग विष्ठा कृमि शताब्द अक्षोभ । मूषक तावत्काळवरि ॥ ५६ ॥ सहस्रजन्म मृगादि पशुयाति । ततः गोशरीरीं मंदमति । शताब्द स्थावरानंतरें स्थिति । अप्रायश्चित्त पापाची ॥ ५७ ॥ उपरि सप्तजन्म होय चंडाळ । मग षोडशजन्म शूद्रादि हीनजाति अमंगळ । मग वैश्य क्षेत्री कुश्चळ । वाध्यमानोपजी-विका ॥ ५८ ॥ मग दरिद्री व्याधिवंत विप्र पातकी । पुनः पापप्रतिग्रहें पुनर्नारकी । असूयाविष्ट रौरवीं कल्पद्वय मग लोकीं । चंडाळ होय सप्त जन्म ॥ ५९ ॥ गौ ब्राह्मण अग्नीसी देता वारि । तो शतजन्म श्वान चंडाळ होय संसारीं । जन्मत्रय व्याघ्र विट्कृमि याउपरि । नरक एकविस युगें ॥६०॥ निंदक निष्ठुरभाषी दानघ्ना । तप्तायपिंड मुखीं दाटिती त्या कृतघ्ना । सूचिका आदळिती नख लोचना । पाय टांगूनि मारिती यमदूत ॥ ६१ ॥ ऐसें शताब्द ताडूनि शोणितन्हर्दीं । तावत्काळ बुडविती पाषाण कंठ प्रमादीं । तावत्काळ सर्वनरक परमापदीं । मग जन्मती आमिष-आहारीं ॥६२॥ परद्रव्य हरी त्याचे कर । उखळीं मुसळें कांडिती चूर । तप्त पाषाण धरविती त्रयवत्सर । सप्ताब्दें भेदिती काळसूत्रें ॥ ६३ ॥ मग क्रमें च नरकाग्नीचा ठाईं पचत । आक्रंदती आठऊनि उपार्जित ।

---

१ कुंड=नवरा जिवंत असतां परपुरुषापासून झालेली प्रजोत्पत्ति आणि गोळक=नवरा निवर्तल्यावर वरप्रमाणें झालेलीं मुलें. २ गाढव. ३ मत्सरानें पछाडलें ह्मणजे. ४ विट् किंवा विड्=शाप देणें.

याळागि चोर्यादि हरण न करावें निभ्रांत । पोट न भरे तरि वरी मजुरी ॥ ६४ ॥ परस्वसूचका युगसहस्रपर्यंत । तप्तायपिंड भक्षविती धगधगीत । सदत रसना उपडूनि कोंडित । निरुछ्वासीं अकल्प ॥६५॥ परस्त्रीलंपटाची यातना । ताम्रस्त्री ताऊनि धगधगायमाना । ह्मणती आलगी हे तुझिया तनुमना । निववीत होती वहुत ॥ ६६ ॥ आक्रंदे करपता आग । ह्मणती भोगीं आपुला फळभोग । ऐसी यातना करूनि मग । नरकभाग अनुक्रमें ॥ ६७ ॥ पतिवाचूनि परपुरुषीं रमें नारी । तिसी तप्ताय पुरुप तप्ताय सेजेवरी । आलगविती वळात्कारीं । कल्पपर्यंत निश्चित ॥ ६८ ॥ तेथूनि सोडूनि ते जारदारा । हुताशनसमोत्वैर्णे करिती मारा । अर्यस्तंभीं बाधती दुराचारा । सहस्राब्दपर्यंत ॥६९॥ यानतरें क्षारोदकें दडिती । क्रमें च सर्वा हि नरकीं जाचिती । याकारणें वर्जावी पापरति । दडभेणें नरनारीं ॥ ७० ॥ कृतकर्म न सुटे उभय लोकीं । तरि कैसी करावी डोळेझाकी । नश्वर सुखाभिळापें अविवेकीं । न बुडावें दुःखसागरीं ॥ ७१ ॥ आता असो हें रामकृपा प्रगटे । तयाची च पातकीं वासना विटे । रामनाम स्मरता घापुटें । परमानद सदोदित ॥ ७२ ॥ रामविमुख वधी गौब्राह्मण मुक्त क्षेत्रीं । ते पचकल्प सर्व यातना भोगिती गात्रीं । वद्याची निंदा परिसती सादरें श्रोत्रीं । त्याचे कर्ण उत्पाटूनि ॥ ७३ ॥ ते बीळीं उसळत तेल जळत उल्बैण । तप्तायपिंट दाटिती दारुण । कुभीपाकीं घालिती आता नास्तिक शिवनारायण-। विमुखदुःख परिसावें ॥ ७४ ॥ कोटिवर्षे चारिती लवण । आकल्प करविती पुरीपभक्षण । तप्तसैकतभोजन दारुण । युगपर्यंत रौरव ॥ ७५ ॥ ब्राह्मणा क्रोधदृष्टीं लक्षी त्या खळा । तप्त सूचिका सहस्र दाटिती डोळा । क्षारोदकें दडिती कुश्चिळा । मग करवतें विदारिती ॥ ७६ ॥ विश्वासघाती मर्यादाघाती परान्न चिती । तया श्वमास चारिती श्वानाहातीं फाडविती । प्रति नरकीं

पचिजेति ।[1] अब्दप्रमाण यमकिंकरीं ॥ ७७ ॥ सर्वप्रतिग्रही नक्षत्रपाठकं । जे कां देवळकान्नभक्षक । तया आकल्पपर्यंत सर्व हि नरक । विष्ठाभोगरत सदा ॥ ७८ ॥ यानतरें पावोनि भूमि । सप्तजन्म चडाळ होय नेमीं । अति दुःख दारिद्र रोगें अतरयामीं । पीडित परम पातकी ॥७९॥ निष्ठुरभाषी असत्यनिरत । त्याची सदंश रसना उपडित । मग तया तैलक्वार्थी घालित । क्षारोदकें दडिती ॥ ८० ॥ मग विष्ठामूत्रनिषेवण । फाळसूत्रें भेदिती दारुण । मग पापावशेषें निर्माण । म्लेंछ होती भूमंडळीं ॥ ८१॥ अन्येोद्वेगरत वैतरणींत घालिती । पचमहायज्ञत्यक्ता व्याळ चारिती । औपासँन परित्यक्ता रौरवीं पचविती। अनुष्ठानहीन कृमी भोजी ॥ ८२ ॥ पूर्वोक्त जे च्यारि । यासी दुःखपचकें युगेंवरि । मग उपजती संसारीं । परसेवक होऊनि ॥८३॥ विप्र ग्रामासिकोरा दान करी । तो सर्वनरकीं पचे आचंद्रतारावरि । अधिक करें पचकल्प परोपरी । नरक सहस्रकुळेंसीं ॥ ८४ ॥ विप्र ग्रामकर अनुमानी । तया ब्रह्महत्या अयुत निदानीं । अतिथीविन्मुख जो नित्यानि । तो स्वविष्ठा भोजी नान्यथा ॥ ८५ ॥ काळसूत्र मर्दन घोर । चतुर्युग पावे पामर । दुर्लभ पावोनि नरसंसार । न भजे च जो हरिहरा ॥ ८६ ॥ स्वदत्ता अथवा परदत्ता । पृथ्वीदानाचा जो हता । तो कोटिकुळेंसीं मृतिका भक्षी स्वता । प्रतिनरकीं कोटिकल्प ॥ ८७ ॥ यानंतरें पावे अवनीं । शताद्र होय कृमिभोजनी । मग विड्वराह होय जनीं । वर्षे साठिसहस्र ॥ ८८ ॥ अयोनि वियोनि पशुयोनीचा ठाई । शिंकें रेत परमान्याई । तो रेत भोजी वसाकूपाचा ठायीं । पचे सहस्राब्दें ॥ ८९ ॥ उपवासदिनीं दतधावनतत्पर । तो घोर नरक पावे नर । व्याघ्र भक्षिती तो पामर । च्यारि युगेंपर्यंत ॥९०॥ मृपा भोजी भूमडळ । तो सहित आपुलें कोटिकुळ । ऊष्ण कर्दमीं बुडे ग्वळ । विष्टेंन्हिदीं सहस्रयुगें ॥ ९१ ॥

---

१ ज्योतिषी. २ दातासहित, ३ कडकडित तेलात. ४ गृह्याग्नि. ५ ग्रामकरासी. ६ सशय घेई, किंवा अनु=हीन मानी. ७ शांत=शिंपडणें. ८ मास. ९ व्यर्थ. १० विष्टेच्या तळ्यात.

तदंती नरकयातना । यावच्चतुर्दश इंद्रगणना । तदंतीं जन्म पावे जो निंद्य जनां । ऋणी कुष्ठी शतजन्में ॥ ९२ ॥ जो स्वधर्म परित्यागी पांपांडी । तयाचा संग धरी जो बंडी । ते दोघे हि महद्दोषी लंडी । नरकीं कल्पकोटिसहस्त्र ॥ ९३ ॥ भृतकाध्यापक भृतकाध्यायी । आकल्प पचती नरकाचा ठाईं । ततो म्लेंछजन्म पावती अन्यायी । रामावांचूनि कामिक ॥ ९४ ॥ स्त्रीशूद्रासमीप वेद पढे । तो अनुक्रमें सर्व हि नरकीं चढे । कल्पकोटिसहस्त्र गाढे । दुःखभोग भोगित ॥ ९५ ॥ देवद्रव्य गुरुद्रव्यापहारक जगीं । तो ब्रह्महत्याकृत यातना भोगी । अनाथ द्वेषी अनाथधन हरी त्यालगी । रक्तभकद्रयीं खिळिती ॥ ९६ ॥ ऊर्ध्व-पाद अधःशिर । नाकीं मुखीं धूम्रपान ब्रह्मवत्सर । आराम देवपूजा पुष्पहंतार । तया घोर नरक वन्हिज्वाळाप्रवेश ॥ ९७ ॥ जळीं देउळीं उत्सेजी देहजमळ । तो भोगी भ्रूणहत्यायातनाफळ । अथवा जळीं भुक्तशेष टाकी केवळ । तया ग्रास प्रेतायुधीं भेदिती ॥ ९८ ॥ आर्त रावें आक्रंदती । अत्युष्णु तेल पाजिती । तो कुंभीपाकीं घालिती । अनुक्रमेंकरूनि ॥ ९९ ॥ काष्ठतृणादि ब्रह्मस्व हरी । तो नरक भोगी आचंद्रतारावरी । ब्रह्मस्व इह संपद्विनाश करी । परत्र नरकाय च ॥ १०० ॥ कूटसाक्षी दे जो कुबुद्धी । तो सर्वयातना भोगी चतुर्दश इंद्रावधि । पुत्रपौत्रनाश परत्रा बाधी । रौरव असत्य साक्षिता ॥ १ ॥ जे अतिकामिक मिथ्यावादी त्याचे मुखीं । पंन्नगोपमाजळा डसवितां होती दुःखी । एवं पष्टि समं स्थित्वा सेखीं । क्षारांबुशेचनयातना ॥ २ ॥ स्वमांसआहारनिरत । क्षारकर्दमीं प्रवेशत । मग गज भूमीसी मर्दित । मरुत्पनदुःखद ॥ ३ ॥ तदंतीं जन्मे पृथ्वीवरि । हीनांग निंद्य सचराचरीं । निकट असतां स्वकाळीं न रमे स्वनारी । तया यातना ब्रह्महासम ॥ ४ ॥ अनाचारनिरत देखोनि । शक्त न निवारी जनीं । तया

१ कर्जबाजारी. २ नास्तिक. ३ बाडगा, उन्मत्त. ४ भृतक=पैसे घेऊन, भाडोत्री. ५ टाकतो. ६ जेऊन राहिलेलें उष्टें. ७ फेकून मारण्याचें शस्त्र, बरची. ८ दु:खित, दीन स्वरानें, दुःखाच्या आरोळीनें. ९ कोंडा. १० खोटी साक्ष. ११ पन्नग=सर्प.

पापार्द्धभाग भर्त्सेनीं । नाइके तरि तो च पातकी ॥ ५ ॥ पापगणना करी द्वेषें दुजयाची । असिलें तरि तुल्यता पावे त्याची । मिथ्यादोष-आरोपणाची । द्विगुणता स्ववाक्यप्रमाणें ॥ ६ ॥ निःपापीं पाप आरोपी । तो आचंद्रतारा नरकीं पचे पापी । सदोषाचे दोष गणी तो दोषरूपी । विद्यमानें पापें अर्द्ध जाती येती निंदका ॥ ७ ॥ निंदा करणें शब्दमात्रें । तयाचीं तों न भंगती गात्रें । निंदक दंडिती नाना शस्त्रें । ह्मणौनि वर्जावी निंदा ॥ ८ ॥ पातकियासी ह्मणे भला । तयासी हि यमधर्म क्षोभला । पातकियाची निंदा स्तुति करी त्याला । पातक च संप्राप्त ॥ ९ ॥ पुण्यपुरुषाचें भजन पूजन वंदन स्तवन । करी तो जन तत्वता होय सज्जन । द्वेष निंदा करी तो पावे पतन । यालागि संत सेवावे ॥ ११० ॥ कन्यागामी तया श्वान भक्षिती । शूद्रपान मूढावस्था क्रमें पावती । व्रत न उजवितां टाकिती । ते असिपत्रवनीं ततो हीनांग ॥ ११ ॥ अन्य व्रतासी विघ्न करी । तया श्लेष्मभोजन यमपुरीं । न्याय धर्मशास्त्र शिक्षापक्षपात धरी । तो निःपाप नव्हे प्रायश्चित्तायुतें ॥ १२ ॥ चंडाळ होय गोमांसाशी । वाचा विप्र अपमानी तयासी । ब्रह्महासम यातना नि-श्चयेंसीं । देताविघ्नकर्ता शतसहस्रधाधिक ॥१३॥ एकाचा हरूनि विप्रास दे अर्थ । तया दोषियाचें दातृत्व व्यर्थ । तो नरक पावे परमार्थ । ज्याचा अर्थ तयासी ॥ १४ ॥ प्रभूसांप्रदानें लाळ चारिती । यतिनिं-दका सिळायंत्रीं वोढिती । आरामछेदी त्रिसप्तयुगें श्वभोजन होती । क्रमें सर्व हि यातना ॥ १५ ॥ देवालय तडाग पुण्याराम भेत्ता पट । तो कोटि कोटि कुळेंसीं कल्पकोट्ययुतानि पट् । नाना यातना प्रत्येकें भोगूनि सेवट । विसकल्पें विट्क्रमी ॥ १६ ॥ तदंतीं ते विड्वराह क्रमि भोजी । एकविस युगें मग चंडाळ जगामाजि । ग्रामनाशकारकाची यातना सहजीं । मज न सागवे ह्मणे यमधर्म ॥ १७ ॥ देवापहारक

१ एक विशिष्ट प्रकारचा नरक आहे. २ उपजीविकेच्या मुख्य साधनाचें दान केले तर. ३ भेदन करणारा. ४ विद्+क्रमी=दमला, कटाळा आला.

ग्रामदाहकाची यातना । सर्व नरकभोग जर्व ग्रहा स्रजी रचना । पापार्द्धभाग भोगे कारितां पापगणना । भळतयाची भळत्यानें ॥१८॥ कुंडाशी गोळेंकाशी ग्रामयाचक । अयाज्य याजी आव्हायक देवळक नक्षत्रपाठक। हे ग्रामचांडाळ प्रत्येकें यातना सकळिक.। एकविस युगें भोगिती॥१९॥ मग सप्तजन्म चंडाळयोनि दुराचारा । उछिष्टभोजी मित्रद्रोही यासी तीव्रा यातना आचंद्रतारा । उत्सैन्न पितृदेवें ज्या वेदमार्गबहिष्कृता पापंडी या नरा । यातना बहवः स्मृता ॥ १२० ॥ एवं बहुविध पातकें आणि नरकदंड । वर्णिलें विस्तरें परि हे आहेति उदंड । अशेप वर्णावया वितंडें । कोण क्षेमें पावेल ॥ २१ ॥ या सकळा पापासी धर्मशास्त्रविधानता । प्रायश्चित्ताचरणें होय शुद्धता । तरि तो प्रायश्चित्तप्रकार परिसा आतां । पुढिलिये प्रकरणीं ॥ २२ ॥ आतां कळीमाजि संकरकाळीं । प्रायश्चित्त हे अभिनव नव्हाळी । तथापि शास्त्रमर्यादा वचनबोळी । तें तो ऐसी च कीं असे ॥ २३ ॥ तरि बाह्यप्रायश्चित्त जड कर्ममय । तेणें नव्हे निःशेप पापक्षय । अविद्वत अनधिकारी काय । अंगवैगुण्यें सुटेलि ॥ २४ ॥ द्रव्यदेशकाळ कर्मकळाप अनुताप । एणें यथोक्तें प्रायश्चित्ताचें रूप । हें कदापि न योजे तथापि कृत साक्षेप । पापभीत सुटे स्पष्ट आधीं ॥ २५ ॥ नकळतें दोप आणि प्राक्जन्मावशेप । हें तो अनिर्वर्त्य विशेप । एणें काळें तरि बहुतेक पुरुप। करिती अधर्मजीविका ॥ २६ ॥ पापद्रव्य पुष्टता देहाला । तेथें अन्य दोपासी कोण म्याला । महा अंहों निर्भय जाला । कूपानुकुल्य कुपथासी ॥ २७ ॥ अष्टादशाभिधीं रंग । तयापुढें न चढे दुजा रंग । शाम तम तत्व तें अभंग । विराजमान महिमानें ॥ २८ ॥ शुक्लांवरें मळिनें जालीं । तें स्वभावें च शामते आलीं । कित्येकें शुद्धे हि रंगविलीं । हा च निघाला प्रचार ॥२९॥ आतां असो हें समयानु-

---

१ कुंटण. २ रांडलेक. ३ उच्छेद केला, किंवा शाप दिला. ४ अघटित, विशाळ. ५ सुख. ६ प्राप्ति, नवीन गोष्ट. ७ पूर्वजन्मीं भोगून शिलक राहिलेले. ८ अनिवार. ९ अंहस्=पाप. १० अभिधा=मूळचा.

सार । कर्मविरोधी कैंचा प्रायश्चित्तप्रकार । स्थळांतरीं ज्या दोषा सूचिला परिहार । तो तें च पुन्हा घटतां अघटतां ॥ १३० ॥ कुंजर प्रक्षाळूनि सांई केला । धूळि घेणें हें न चुके त्याला । तरि तो अधिक लेप जाला । क्षाळणश्रम निरार्थक ॥ ३१ ॥ अतएव द्वादशाब्दादि प्रायश्चित्ताचारें । निःशेष पापक्षय नव्हे निर्धारें । तो समूळ सकृत् रामनामोच्चारें । होऊनि जाय तत्वता ॥ ३२ ॥ ऐसें ह्मणतील रुक्ष विचक्षण । तरि कां वोलिलें प्रायश्चित्तलक्षण । तरि तें अतिरेकभयसंरक्षण । कल्पिलें शास्त्रकारीं ॥ ३३ ॥ साहे नामाचा प्रताप । एवढें अनंत ब्रह्मांडीं नाहीं पाप । तत्रस्थ पातकीं केलिया सांक्षेप । करितां न करवे अकल्पें ॥ ३४ ॥ तेथें एका जीवाच्या दोषावरि । कैसें प्रेरावें शास्त्रकारीं । ह्मणौनि जैसे दोष तैसे च त्यावरि । प्रायश्चित्तोपाय सूचिले ॥ ३५॥ कर्मरूपासी कर्मरूपीं च निर्वाहो । ऐसा च साच आहे प्रवाहो । हा यथाधिकारें निर्वाहो । केला असे तत्वज्ञीं ॥ ३६ ॥ हे हि कर्मरूप प्रायश्चित्तस्थिति । करावी समीप कमळापति । हरिस्मरणेंविण कल्पांतीं । कर्म कळसीं चढेना ॥ ३७ ॥ हरिस्मरणें कर्मब्रहिष्कृत । असंख्य तरले पुराणविश्रुत । हा महिमा सेवटीं वोलिजेलि प्रस्तुत । प्रायश्चित्तार्थ पारिसावा ॥१३८॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । पातकयातनावर्णनं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ७५ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो अशेषाघतृणहुताशनामा । नमो स्मरणमात्रें पतितपरंधामा । नमो स्मर्तृजनसंपूर्णकामा । नमो रवूत्तमा राघवा ॥ १ ॥ नमो जगदेकनिधानरूपा । सप्रेम स्मरणमात्रें समीपा । तुज न स्मरोनि पापसंतापा । दुःख दारिद्रा भोगिती ॥ २ ॥ निधानाआड असे विवर्सी ।

---

१ दाखविला. २ यत्न. ३ तुझें स्मरण करणाऱ्या जनांचे संपूर्ण मनोरथ पुरविणारा. ४ भूत, विघ्नदेवता.

तुज आडपडदा च नाहीं आश्रितासी । वळिदान अंजन पाहिजे त्यांसी । तूं प्रगट सद्य स्वकीय ॥ ३ ॥ तुझया नामापरतें सुखद सोपें । साधन कैंचें हरावया पापें । ऐसें विश्वविख्यात असतां कर्मरूपें । प्रायश्चित्तें जीवासी ॥४॥ स्वयें आत्मा असोनि आपण । मिथ्या वळकाविलें जीवपण । तेथें इछूनियां पवित्रपण । देह दंडी आखंड ॥५॥ तवं तें अनृतपणें अपवित्र । कष्ट करितां हि नव्हे पवित्र । जवं सद्गुरुराज सत्क्षेत्र । जोडलें नाहीं तत्वता ॥ ६ ॥ सद्गुरुस्वरूप सर्वात्मतीर्थ । तेथें स्वानुभवें जाला कृतार्थ । तयाचा तो च देहो यथार्थ । ब्रह्मरूप केवळ ॥ ७ ॥ तैसें रामनामस्मरणेंविण । प्रायश्चित्तमात्र होय क्षीणें । तें च स्मरतां प्रेमप्रवीण । पुण्यरूप स्वयें च ॥ ८ ॥ हरिहरस्मरणाचें महिमान । पूर्वदोष अशेष होती दहन । पुढें दोषप्रवृत्तीसी न वर्ते मन । दोष निंदा न तनुता ते ॥ ९ ॥ जन्मसहस्रार्जित तपप्रभाव । तरि च रामनामीं बैसे भाव । अतपता अभाविक जो जीव । तया बहिर्मुखा बाह्य कर्मता ॥ १० ॥ भक्त ज्ञानी नित्य निःपाप । कदापि कर्मलोपादि लघु पाप । तरि तयाचें प्रायश्चित्त हि तद्रूप । तेथें जडत्वें घडेना ॥ ११ ॥ स्वप्नींचीं दुष्कृतें विचित्रें । भस्म होती जागृतिमात्रें । तैसा ज्ञानी विशुद्ध पवित्रें । स्वरूपावबोधेंकरूनि ॥ १२ ॥ भगवद्भक्ताचीं संसारकर्में । भगवद्रूप भगवंतार्पण वर्में । परम पावनें भागवतधर्में । अधर्में च येती धर्मत्वा ॥ १३ ॥ कदापि भव स्वभावतां भासे । तें नामस्मरणमात्रें च नासे । भक्त ज्ञानी काय करूं बैसे । प्रायश्चित्त जडरूपा ॥ १४ ॥ दृढ कर्मठ मीमांसक । परि तो हि लक्षामाजि एक । रक्षावया कर्मबीजांक । जो भगवंतें वाचविला ॥ १५ ॥ तो हि अति दुर्लभ ये जनीं । प्रायश्चित्तप्रकार तयालागुनी । आतां तो चि बोलिजेलि सज्जनीं । श्रवण करावें सादर ॥ १६ ॥ नारायणविमुखा प्रायश्चित्त । कदां न

---

१ निधान प्राप्त होण्यास. २ प्रायश्चित्ताच्या फलांत कमतरता होते. ३ जर पूर्व जन्मीं तप केलें नसेल. ४ बाह्य ! ५ मर्म, गुह्य, सार. ६ संसार.

घडे अकल्पांत । सुरांभांड अशुद्ध गंगाजळगत । ह्मणौनि हरिस्मरण युक्त करावें ॥ १७ ॥ ब्रह्महा मद्यप स्तेयी चत्वारि । महापातकी प्रसिद्ध चराचरीं । निरंतर संवत्सर याचा संग धरी । शयनासन भोजनीं तो तत्सम ॥ १८ ॥ रामरहित ज्याचें कुळ । तें ब्रह्महत्यादि दोषांचें स्वस्थळ । रामानुरक्त दोषदैवानळ । तेथें येतें पतंगवत् ॥ १९ ॥ प्रमादास्तव पाप घडे । तें च कृतोपायें विघडे । साक्षेपकृत प्रायश्चित्तें न उडे । मशकपक्षीपर्वतैव ॥ २० ॥ अज्ञानास्तव ब्रह्महत्या घडे दैवें । तेणें वनीं वल्कलधारी जटी व्हावें । स्वहेंतविप्रकपोळ करीं ध्यावें । त्याच्या अभावें अन्य तन्हीं ॥ २१ ॥ तद्भव्य ध्वजदंडीं धरूनि वनचर । एकदां परिमित वनफळाहार । अध्ययनअध्यापनरहित स्वाचार । स्नानसंध्या करावी त्रिकाळ ॥ २२ ॥ हरिस्मरण करावें अनुतापें । ब्रह्मचर्यें गंधमोल्यें वर्जावीं साक्षेपें । पुण्यतीर्थीं पुण्याश्रमीं भ्रमावें दीनरूपें । शून्यमस्तक मलिनांग ॥२३॥ जरि वनीं नव्हे प्राणधारण । तरि ग्रामीं कृत स्मशानखर्परग्रहण । सप्तागारीं करावें भीक्षाटण । चातुर्वर्णीं वा त्रिवर्णीं ॥२४॥ येणें काळें तरि ऐसें गमे । बरें जरि द्विजागारीं च भ्रमे । अन्यवर्ण स्वधर्महेतु हि तमें । सांडूनियां भ्रष्टले ॥ २५ ॥ मृष्टामृष्टविचारें युक्ताशन । एकदां करावें कृत हरिचिंतन । ऐसें द्वादशाब्दपर्यंत पर्यटण । करावें पापक्षयार्थ ॥ २६ ॥ साश्रुनयन कृश शरीरीं । तिष्ठावें भागवतद्वारीं । वदावें आक्रंद करुणास्वरीं । मी ब्रह्महा ब्रह्महा ह्मणोनि ॥ २७ ॥ संपूर्णावधि तो कृतानुताप । हरिस्मरणें होय निःपाप । कर्माहि होय अपेंआप । मग स्नान वपनविधि शुद्धता ॥ २८ ॥ व्रतंस्थ च स्वोपदीं वा रोगापदीं ।

---

१ मुळचें मद्याचें भांडें आहे त्यांत गंगाजल जरी ठेवलें तरी तें भांडें अशुद्ध च राहतें. २ महापातक्याशीं आहारव्यवहार करणारा ही महापातकी च समजावा. ३ दोषदावानल=दोषरूपी वडवाग्नि. ४ ज्या विप्राला मारलें असेल त्याच्या डोक्याची करटी. ५ सुगंध द्रव्यें, पुष्पें वगैरे. ६ स्मशानांतील एखादी फुटकी अगर खापर घेऊन. ७ शुद्धाशुद्ध, स्पर्शास्पर्श, पक्वापक्व. ८ त्याला पूर्ण पश्चात्ताप होईपर्यंत याप्रमाणें आचरण केलें पाहिजे. ९ कर्मविधि करण्यास पात्र. १० याप्रमाणें व्रत करित-असतांना. ११ अकस्मित रीतीनें.

मृत्यु पावला प्रमादीं । तरि तो मुक्तपाप मुक्तिपदीं । पावे हरिहरस्मरणें ॥ २९ ॥ आता अन्योपाय गोब्राह्मणार्थ । प्राण वेचिता होय कृतार्थ । का ब्राह्मणा देता स्वधर्मोपार्जित यदर्थ । अर्युत गोदानें सुटे ब्रह्महा ॥३०॥ दीक्षित क्षत्री क्षत्रेविण मारिता । ब्रह्महा मर्ते होय शुद्धता । का अग्निप्रवेश वा मरुत्प्रपतनता । हत्या हत तयाची ॥ ३१ ॥ दीक्षितब्रह्महत्येसी द्विगुण । आचार्यहत्येसी मुख्य चतुर्गुण । केवळ जातिमात्र जो ब्राह्मण । तत्र अब्दमात्रें शुद्धता ॥ ३२ ॥ हे ब्रह्महत्यानिष्कृति ब्राह्मणासी । द्विगुणें प्रायश्चित्तें क्षेत्रियासी । त्रिगुणें शुद्धता वैश्या शूद्रासी । प्रायश्चित्त असेचिना ॥ ३३ ॥ रायें करावी शिक्षा दड । पुढें यमारतीसी असे उदड । ब्राह्मणीवधें अर्ध पूर्वोक्त चड । कन्यका शुद्धि पादेमात्रें ॥ ३४ ॥ पाद प्रायश्चित्त अनुपनितवधीं । ब्राह्मणा क्षेत्रीहत्येसी षडब्द कृछ्राचरणें शुद्धि । वैश्यहा वत्सरत्रय कृछ्रविधि । शूद्रहा शुद्ध वत्सरें ॥३५॥ दीक्षितब्राह्मणीहत्येसी अष्ट सवत्सर । बोलिला ब्रह्महत्याप्रायश्चित्ताचार । वृद्धातुर स्त्रीबाळासी मुनिवर । अर्ध व्रत बोलिले ॥ ३६ ॥ आता 'गोडी पैष्टी' मांध्वी सुरा । त्रिधी अपेय वर्णचतुरा । स्त्रियासी प्रवर्ज्य तत्पानें अवधारा । अज्ञता प्रायश्चित्त ॥ ३७ ॥ क्षीर घृत गोमूत्र अथवा अन्यतम । स्नात्वार्द्रवस्त्र नामस्मरण सनियम । आयास लोह वा ताम्र पात्रीं तप्त हुताशनोपम । तत्प्राशनें देहातीं शुद्धि नान्यथा ॥ ३८ ॥ नेणता जळेंबुध्या आस्वादपर्यंत । तया ब्रह्महत्यानतचिन्ह वर्जित । आतुररोगनिवृत्तीसी तत्रोचित । पुनरुपनयनें चाद्रायन द्वय ॥ ३९ ॥ सुरास्पर्प सुराभांडोदक । सुराभाडलित भक्षणादिक । हें सुरापानासम पातक । नि पातकी परिसावें ॥ ४० ॥ ताळ फनस द्राक्ष खर्जुर सभेवें । मधुक

१ दहाहजार २ चान्यामध्यें इकडून तिकडे पळालें असतां, किंवा कडेलोट झाला असता ३ एक वर्षपर्यंत ४ ब्राह्मणस्त्री. ५ एक चतुर्थांश. ६ अनुपवीत २ ७ आतुर=अजारी, मनानें अगर शरिरानें दुखवलेला ८ गुळापासून झालेली ९ अन्नापासून तयार केलेली १० मध्यापासून तयार केलेली ११ या तिन्ही प्रकारची दारू कोणत्याही वर्णास पिण्यास अयोग्य आहे १२ शुद्ध पाणी आहे असें समजून. १३ आस्वाद. १४ यापासून तयार केलेले.

शैळें मंजिष्ट जळ नारिकेळोद्भव । इत्यादिनीं गौडीमाध्वीसुराइव । सर्वथा विप्रीं वर्जावें ॥ ४१ ॥ आतां परिसा सुवर्णस्तेयता । परोक्ष अथवा अपरोक्षता । बळात्कारें अथवा चौर्यता । परस्वापहरण भलें हि ॥४२॥ तत्र सुवर्णप्रामाण मन्वादिक । तिहीं वर्णिला जो विवेक । तो प्राश्चित्त-प्रकार धार्मिक । परिसोत कां विचक्षण ॥ ४३ ॥ गवाक्षद्वारीं सूर्यरश्मी-दृश्य त्रसरेणु । तस्याष्टकें लिक्षो तत्त्रयें राजसेर्षप प्रमाणु । गौरसेर्षप तत्त्रयें तत्पटकें यैव तद्विगुणु । कृष्णाळ तत्पंचकें माप तत्पोडशे सुवर्ण ॥ ४४ ॥ हरितां ब्रह्मस्व अज्ञानता । ब्रह्महत्याव्रत आचरावें ध्वजकपाल-रहिता । गुरु याज्ञिक धार्मिक श्रोत्रियाचें हरितां कृत व्रता । करीषांछा-दित दग्ध देहीं विशुद्धि ॥ ४५ ॥ ब्रह्मस्वापहारी क्षेत्रीं कारिताश्वमेध । कां स्वतनुभार सुवर्णदानें शुद्ध । पश्चात्तापें परतोनि देइल तो सांतपेणें विशुद्ध । द्वादशाह उपोषणें ॥ ४६ ॥ रत्नें मनुष्यें स्त्री धेनु भूमि आदि । हरी तो सुवर्णतुल्य दोषी प्रमादी । तथापि अर्ध प्रायश्चित्तें तत्व-विदीं । निष्कृति असे सूचिली ॥ ४७ ॥ त्रसरेणुतुल्य हेमहरण । तत्र प्राणायामद्वयें शुद्ध ब्राह्मण । प्राणायामत्रयें लिक्षाप्रमाण । राजसर्षपीं प्राणायाम चत्वारि ॥ ४८ ॥ गौरसर्पपीं स्नात्वा शुचि सम्यक् । गायत्री-जप अष्टसहस्रक । यवमात्र हेमापहारक । शुद्ध आसायान्ह गायत्र्या ॥ ४९ ॥ कृष्णाळप्रमाण हेमहारका । सांतपणें शुद्धि धार्मिका । माप-हरणीं गोमूत्रपक्व यवन्नोशनें कारका । मासत्रयें हरिस्मरण पूजनें विमुक्ति ॥ ५० ॥ किंचित न्यून सुवर्णस्तेय । गोमुत्रपक्व यवभुक् अब्दें शुद्ध होय । सुवर्णसंख्या सुवर्णहरा उपाय । द्वादशाब्द ब्रह्महत्याव्रत अचिन्ह ॥ ५१ ॥ सुवर्णसंख्या निउन रजतचौर्य । त्याचें शोधन सम्यक् सांतपण

बोलिले आर्य । दश निष्कपर्यंत ऊर्ध्व निष्क चतुष्टय तस्य प्रायश्चित्तकार्य। चांद्रायन आचरावें ॥ ५२ ॥ दशादिशत निष्कांत रजत । हरण तरणी चांद्रायनद्वय उचित । शतादूर्ध्व सहस्रांत तावत । चांद्रायनें शुद्धता ॥ ५३ ॥ सहस्रादधिक रौप्यापहार । तया ब्रह्महत्याव्रतें परिहार। कांस्य ।पितळ अयादि धातुप्रकार । याचें शोधन सहस्र निष्कमानें पराक ॥५४॥ रत्नचौर्याचें प्रशोधन । रजतस्तेयतेसमान । आतां गुरुतल्पगशुद्धि विधान । रामस्मरणपूर्वक ॥ ५५ ॥ स्वमाता अथवा तत्सपत्नी । गमन अज्ञानें अप्रयत्नीं । लिंग छेदूनि प्रयत्नीं । करीं घेऊनि जावें निरुतिप्रति ॥ ५६ ॥ मार्गे पाहों नये परतोनि । पुढें काय आहे न पाहावें नयनीं । राम राम स्मरतां देहपतनीं । शुद्धता कां मरुत्पतनें ॥ ५७ ॥ सवर्णोत्तमवर्ण परस्त्रीगमन । जरि घडलें अज्ञानेंकरून । तरि ब्रह्महत्याव्रतार्चन । शुद्ध करी तत्वता ॥ ५८ ॥ उन्मद सादरें भोगी मुग्धा। रेतसिक्ता योनि स्निग्धा । तयाची आकृति जालियां दग्धा । जीवा होय निष्कृति ॥ ५९ ॥ सवर्णोत्तमवर्ण परदारागामी । चोळखोनि खोंचला अंतरयामी । रेतद्राव नव्हतां उठला रामनामीं । तो ब्रह्महा व्रतार्द्धे शुद्ध ॥ ६० ॥ मातृगामी रेतपात नव्हतां पापासी भ्याला । राम राम ह्मणत आक्रंदत वेगळा झाला। सम्यग्ब्रह्महत्याव्रतें शुद्धि त्याला । रेतपातें दहनता ॥६१॥ पितृभार्या त्रिवर्णाचिया। त्यांचें गमन एकदां घडलें जया। तया विशुद्धि ब्रह्महाव्रत केलिया । नवाब्द षडाब्द त्रिअब्द क्रमें ॥६२॥ मातृस्वसा पितृस्वसा आत्मजा । आचार्यश्वशुरमातुळजाया कामकाजा। गमन करी तया निर्लज्जा । प्रायश्चित्त परिसावें ॥ ६३ ॥ धिगि ते जन हरिविमुख । जया पापाचरणें वाटे सुख। प्रायश्चित्ताचें चि देहांतदुख। कां आकल्प अल्प सुखें॥६४॥ दिनद्वय जरि गमन करी । तरि ब्रह्महाव्रत द्वादशाब्दवरि । एकदिनीं बहुवार विचरे दुराचारी। तरि अब्दत्रयें विशुद्धि ॥ ६५ ॥ एके दिवसीं एकवार । तो अब्दव्रतें शुद्ध साचार । दिनत्रय

---

१ तरुण स्त्री. २ न होतां. ३ वर्णाच्या अनुक्रमाप्रमाणें.

गामी पामर । अग्निदग्ध विशुद्ध ॥ ६६ ॥ चंडाळी पुल्कसी भगिनी । श्वपा शिष्यस्त्री मित्रमानिनी । याचा ठाईं एकवार गमनीं । ब्रह्महाव्रतार्द्धें शुद्धता ॥ ६७ ॥ अकामता घडे अकल्पित । तो अब्दत्रय कृच्छ्रें पुनात । महापापकृज्जनसंगनिरत । त्याचें प्रायश्चित्त बोलिजे ॥६८॥ प्रायश्चित्त-विशुद्धात्मा सफळ । तयाचें सर्व सत्कर्म देतसे फळ । प्रायश्चित्तविहीन अमगळ । तें फळे नामें हरीच्या ॥ ६९ ॥ मुख्य चत्वारि महापापी । जयाच्या संगें जो जाला तद्रूपी । तेणें तत्प्रायश्चित्तें पुनरपि । शुद्धता करावी आपुली ॥ ७० ॥ अज्ञानात्संगतीं पचरात्र । तो काय कृच्छ्रें होय पवित्र । द्वादशाह संगें अपवित्र । तया महा सांतपणें विशुद्धि ॥ ७१ ॥ आर्द्धमासें द्वादशोपवास । मासें पराक चांद्रें त्रिमास । षण्मास ससर्ग घडे ज्यास । तया चांद्रायनत्रय बोलिलें ॥ ७२ ॥ किंचित निउनाब्द ससर्गासी । षण्मास व्रताचरण विशुद्धीसी । याचे त्रिगुणित ज्ञानसगासी । बोलिलेंसें यथाक्रमें ॥ ७३ ॥ आतां मडुक नकुळ काकमुखक वाराहो । श्वान मार्ज्जर अजादि कुक्कुट देहो । याचे वधीं शुद्धि कृच्छ्रार्द्धें पाहा हो । अश्वहत्ये त्रि त्रि कृच्छ्र ॥ ७४ ॥ तप्तकृच्छ्र कुंजरवधीं । अज्ञानता गोघ्ना परार्के शुद्धि । ज्ञानता जो गौ वधी । तया निष्कृति असेना ॥ ७५ ॥ टिटिभ चक्रवाक हस कारंडक । उलूक सारस कपोत जळपादुक शुक । चाप वळाक शिशुमार कछपादिक । वधीं द्वादशाह अभोजन ॥ ७६ ॥ पुष्पमूळ फळ भक्ष्य भोज्यापहारी । पंचगव्यसेवनें शुद्धि अथातरीं । शुष्ककाष्ट तृण द्रुम गुड चर्म वस्त्र आमिषोंकारी । रात्रित्रय अभोजन ॥ ७७ ॥ रेतोविण मूत्र भोजनें प्राजापत्य । शूद्रोच्छिष्टभोजनीं चांद्रायन सत्य । रजस्वला चडाळ महापातकी सुतकी अनित्य । इत्यादिक रजकउच्छिष्ट स्पृष्टें ॥७८॥ करावें सचेल स्नान । यथोक्त घृतप्राशन । शुध्यर्थ यथार्थ अनुष्ठान । अष्टशत गायत्री ॥ ७९ ॥

---

१ पुक्कशी=हीनवर्णाची, शूद्र स्त्रीस निषादापासून झालेली, या नांवाच्या जातीची. २ चार महापातकांपैकीं कोणतें ही महापाप करणाऱ्या मनुष्याची संगति धरणारास. ३ कडक, खरमरित प्रायश्चित्त किंवा तपश्चर्या. ४ आमिष=मांस, किंवा लाचलुचपत.

बोलिले आर्य । दश निष्कपर्यंत ऊर्ध्वं निष्क चतुष्टय तस्य प्रायश्चित्तकार्य। चांद्रायन आचरावें ॥ ५२ ॥ दशादिशत निष्कांत रजत । हरण तरणी चांद्रायनद्वय उचित । शतादूर्ध्व सहस्रात तावत । चांद्रायनें शुद्धता ॥ ५३ ॥ सहस्रादधिक रौप्यापहार । तया ब्रह्महत्याव्रतें परिहार। कास्य ।पितळ अयादि धातुप्रकार । याचें शोधन सहस्र निष्कमानें पराक ॥५४॥ रत्नचौर्याचे प्रशोधन । रजतस्तेयतेसमान । आता गुरुतल्पगशुद्धि विधान । रामस्मरणपूर्वक ॥ ५५ ॥ स्वमाता अथवा तत्सपत्नी । गमन अज्ञानें अप्रयत्नीं । लिंग छेदूनि प्रयत्नीं । करीं घेऊनि जावें निरृतिप्रति ॥ ५६ ॥ मागें पाहों नये परतोनि । पुढें काय आहे न पाहावें नयनीं । राम राम स्मरता देहपतनीं । शुद्धता कां मरुत्पतनें ॥ ५७ ॥ सवर्णोत्तमवर्णं परस्त्रीगमन । जरि घडलें अज्ञानेंकरून । तरि ब्रह्महत्याव्रतार्चन । शुद्ध करी तत्वता ॥ ५८ ॥ उन्मद सादरें भोगी मुग्धा। रेतसिक्ता योनि स्निग्धा । तयाची आकृति जालियां दग्धा । जीवा होय निष्कृति ॥ ५९ ॥ सवर्णोत्तमवर्ण परदारागामी । बोळखोनि खोंचला अंतरयामीं । रेतद्राव नव्हतां उठला रामनामीं । तो ब्रह्महा व्रतार्द्धे शुद्ध ॥ ६० ॥ मातृगामी रेतपात नव्हतां पापासी भ्याला । राम राम ह्मणत आक्रंदत वेगळा झाला। सम्यग्ब्रह्महत्याव्रतें शुद्धि त्याला । रेतपातें दहनता ॥६१॥ पितृभार्या त्रिवर्णाचिया।त्याचें गमन एकदां घडलें जया। तया विशुद्धि ब्रह्महाव्रत केलिया । नवाब्द षडाब्द त्रिअब्द क्रमें ॥६२॥ मातृस्वसा पितृस्वसा आत्मजा । आचार्यश्वशुरमातुळजाया कामकाजा । गमन करी तया निर्लज्जा । प्रायश्चित्त परिसावें ॥ ६३ ॥ धिगि ते जन हरिविमुख । जया पापाचरणें वाटे सुख। प्रायश्चित्तार्चे चि देहांतदुख । कां आकल्प अल्प सुखें॥६४॥ दिनद्वय जरि गमन करी । तरि ब्रह्महाव्रत द्वादशाब्दवरि । एकदिनीं बहुवार विचरे दुराचारी। तरि अब्दत्रये विशुद्धि ॥ ६५ ॥ एके दिवसीं एकवार । तो अब्दव्रतें शुद्ध साचार । दिनत्रय

---

१ तरुण स्त्री. २ न होतां. ३ वर्णाच्या अनुक्रमाप्रमाणें.

गामी पामर । अग्निदग्ध विशुद्ध ॥ ६६ ॥ चंडाळी पुल्कसी भगिनी । स्नुषा शिष्यस्त्री मित्रमानिनी । याचा ठाईं एकवार गमनीं । ब्रह्महाव्रतार्द्धे शुद्धता ॥ ६७ ॥ अकामता घडे अकल्पित । तो अब्दत्रय कृच्छ्रे पुनात । महापापकृज्जनसंगनिरत । त्याचें प्रायश्चित्त बोलिजे ॥६८॥ प्रायश्चित्त-विशुद्धात्मा सफळ । तयाचें सर्व सत्कर्म देतसे फळ । प्रायश्चित्तविहीन अमंगळ । तें फळे नामें हरीच्या ॥ ६९ ॥ मुख्य चत्वारि महापापी । जयाच्या संगें जो जाला तद्रूपी । तेणें तत्प्रायश्चित्तें पुनरपि । शुद्धता करावी आपुली ॥ ७० ॥ अज्ञानात्संगतीं पंचरात्र । तो काय कृच्छ्रें होय पवित्र । द्वादशाह संगें अपवित्र । तया महा सांतपणें विशुद्धि ॥ ७१ ॥ आर्द्धमासें द्वादशोपवास । मासें पराक चांद्रें त्रिमास । षण्मास संसर्ग घडे ज्यास । तया चांद्रायनत्रय बोलिलें ॥ ७२ ॥ किंचित निउनाब्द संसर्गासी । षण्मास व्रताचरण विशुद्धीसी । याचे त्रिगुणित ज्ञानसंगासी । बोलिलेंसें यथाक्रमें ॥ ७३ ॥ आतां मंडुक नकुळ काकमुखक वाराहो । श्वान मार्ज्जर अजादि कुक्कुट देहो । याचे वधीं शुद्धि कृच्छ्रार्द्धे पाहा हो । अश्वहत्ये त्रि त्रि कृच्छ्र ॥ ७४ ॥ तप्तकृच्छ्र कुंजरवधीं । अज्ञानता गोघ्ना पराकें शुद्धि । ज्ञानता जो गौ वधी । तया निष्कृति असेना ॥ ७५ ॥ टिटिभ चक्रवाक हंस कारंडक । उलूक सारस कपोत जळपादुक शुक । चाप वळाक शिशुमार कछपादिक । वधीं द्वादशाह अभोजन ॥ ७६ ॥ पुष्पमूळ फळ भक्ष्य भोज्यापहारी । पंचगव्यसेवनें शुद्धि प्रथांतरीं । शुष्ककाष्ट तृण द्रुम गुड चर्म वस्त्र आमि-षाकारी । रात्रित्रय अभोजन ॥ ७७ ॥ रेतोविण मूत्र भोजनें प्राजापत्य । शूद्रोच्छिष्टभोजनीं चांद्रायन सत्य । रजश्वळा चंडाळ महापातकी सुतकी अनित्य । इत्यादिक रजकउछिष्ट स्पृष्टें ॥७८॥ करावें सचेल स्नान । यथोक्त घृतप्राशन । शुध्यर्थ यथार्थ अनुष्ठान । अष्टशत गायत्री ॥ ७९ ॥

१ पुक्कशी=हीनवर्णाची, शूद्र स्त्रीस निषादापासून झालेली, या नावाच्या जातीची. २ चार महापातकापैकीं कोणतें ही महापाप करणाऱ्या मनुष्याची संगति धरणारास. ३ कडक, खरमरित प्रायश्चित्त किंवा तपश्चर्या. ४ आमिष=मांस, किंवा लाचलुचपत.

याहूनि अन्यतमस्पर्शें भोजन । जरि घडोनियां आलें नेणोन । तयासी प्रायश्चित्त त्रिरात्र अभोजन । पंचगव्यप्राशनें ॥ ८० ॥ भक्षूनि अन्न वमन जालें । तद्दिनीं पाहिजे स्नान लंघन केलें । द्वितीयेन्हीं घृत यथोक्त प्राशिलें । पाहिजे शुद्धतेकारणें ॥ ८१ ॥ व्रतादिकांमाजि आइ-कतां वर्ज्य ध्वनि । अष्टोत्तरसहस्र जपावी वेदजननी[1] । देवद्विजनिंदा अधिक सर्वा पापांहूनि । निष्कृति नाहीं तयासी ॥ ८२ ॥ आतां असो हें प्रत्येकें । महापातकांतुल्य उपपातकें । जयासमान तयाचेनि तुकें[2] । प्रायश्चित्त यथाविधि ॥ ८३ ॥ प्रायश्चित्त जितुकें करणें । तितुकें नाराय-णस्मरणें । तरि च शुद्धि पाविजे येणें । अन्यता पतित नान्यथा ॥८४॥ प्रायश्चित्तविधि आहे अपार । श्रुत्याश्रयें स्वयें अष्टादश स्मृतिकार । बोलिले आहेति तें संक्षेपाकार । वर्णिलें अत्र किंचित ॥ ८५ ॥ तत्र कृच्छ्र चांद्रायन परिसावें । जें केलियां शुद्धि पाविजे जीवें । यमयातने-पासूनि सुटावें । कृतपातकापासूनि ॥ ८६ ॥ एकभुक्त नक्त[3] तथैवायाचित[4] । अथवा एकें उपोषणें उचित । तें पदकृच्छ्र बोलिजे विख्यात । आतां पर्णकृच्छ्र परिसावें ॥ ८७ ॥ वटोदुंबर राजीवें[5] बिल्वपत्र कुशोदक । प्रत्यकें प्रत्यह पिवती धार्मिक । ते पर्णकृच्छ्र पिण्याकोदक[6] तक्रांबु सक्तूना एक एक । सेवनोपवासें सौम्यकृच्छ्र ॥ ८८ ॥ हविष्य प्रातराशी च हविर्पानापान । हविपायाचित एक एक ग्राससेवन । प्रत्यकें पूर्ववत् दिनत्रय उपोषन । अन्योपवासत्रयें अतिकृच्छ्र ॥ ८९ ॥ गोमुत्र गोमय क्षीर दधि घृत कुशजीवन । यथोक्त सेवनें एकरात्रि उपोषणें कृच्छ्र सांतपन । हे षट् प्रकार षडह सेऊनि प्रत्यकें उपोषन । सप्तमाहि कृच्छ्र महासांतपन तें ॥ ९० ॥ दिनत्रय प्रत्यकें ऊष्णघृत क्षीर जळ अनिळ[8] । घृत पळद्वय तोय पये[9] एक एक सेवनोपवास निर्मळ । अनिळाहार म्हणिजे दिनत्रय लंघन च केवळ । हें तप्तकृच्छ्र सायान्ह सेवनें ॥ ९१ ॥ केवळ तप्त

---

१ गायत्री. २ वजनानें, प्रमाणानें. ३ फक्त एकदा रात्रीं जेवणें. ४ न बोलावतां दुसऱ्याचे घरीं जेवावयास जाणें. ५ निळ्यारगाचें कमल. ६ पिण्याक=पेंड किंवा केशर. ७ कढविलेलें लोणी. ८ वायु. ९ दूध.

गोमूत्रसेवन । तें एकान्हकृच्छ्र करी शरीरशोधनें । जेणेंकरूनि धार्मिक जन । नव्हेती कलीं कलंकी ॥९२॥ दिवसा उपवास रात्रौ जळवास । प्राजापत्य समता त्यास । आतां परिसा चांद्रायनास । यथाकळा ऱ्हास वृद्धि ॥ ९३ ॥ शुक्लपक्षीं प्रत्यह एक एक ग्रास चढवावा । कृष्णपक्षीं एक एक प्रत्यह उतरावा । दर्शदिनीं युक्ताहार करावा । हें अयन चांद्र प्रसिद्ध ॥९४॥ चतुर पिंडप्राशन प्रातःकाळीं । चतुर सूर्यअस्तीं सायंवेळीं । हें शिशुचांद्रायन पिंडत्रय हविष्यसेवनें भूतळीं । मासें चंद्रसालोक्य ॥ ९५॥ अत्र देशकाळवर्तमान जाणोनि । नैमित्तिक नित्य कर्मे विचारूनि । कर्तव्य हें प्रति ग्रंथीं महा मुनी । बोलिले आहेति प्रसिद्ध ॥ ९६ ॥ प्रस्तुत नित्यकर्मविरोधकाळीं । नैमित्तिकाचरण हे नव्हाळि । तथापि अभक्त जनाचे रूपोळीं । अत्र वा तत्र दंडणें ॥ ९७ ॥ आतां जे अनुतापी रागादिमुक्त । सर्वभूत दयायुक्त । हरिहरस्मरणपर सुभक्त । ते स्मरणमात्रें निर्दोष ॥ ९८ ॥ महापातकें अथवा उपपातकें । अथवा अनंत ब्रह्मांडींचीं अनेकें । एका च भागवतावरि पडती तरि तो एकें । नाममात्रें विशुद्ध ॥ ९९ ॥ नारायण अनाद्य विश्वरूप अनामय । स्मरेलि जो सप्रेम सदयहृदय । स्मरण पूजन ध्यान नमन एक उपाय । करी सर्वपापमुक्त शुद्धात्मा ॥ १०० ॥ संपर्कें अथवा व्यामोहें पुजा । वडे गरुडवाहना वृषभध्वजा । तो विध्वंसूनि सर्व पापपुंजा । पावे परम पदातें ॥ १ ॥ सकृद्विष्णुस्मरणेंकरीं । क्लेशसंचय निरशेष निर्धारीं । स्वर्गादि भोग पावे दिव्य शरीरीं । उभय लोकीं अविघ्न ॥ २ ॥ दुर्लभ मनुष्यजन्म पावोनि । जो विष्णु वा शिव यजी भाग्याभिधानी । तो महापातकी हि शुद्धात्मा जनीं । पावे परम स्थानातें ॥ ३ ॥ सर्व तीर्थें सर्व यज्ञ सर्व वेदाध्ययन । षोडशांशें न पवती करितां नारायणार्चन । वेदशास्त्र तीर्थ तप यज्ञादि कर्में अभक्त जन । कृतार्थ नव्हे सर्वथा

---

१ शुद्धि. २ होत नाहींत. ३ कळकट, अर्थात अशुद्ध. ४ अमावास्येला. ५ रूपानें. ६ दुसऱ्याच्या संगतीनें, सहवासानें. ७ चवल वृत्तीनें. ८ पापाचे ढीग. ९ योगानें. १० नारायणार्चनाचें जें फळ आहे त्याचा षोडशांश.

॥ ४ ॥ सांगकर्म प्रायश्चित्त न घडे अत्र । अघटित घडलें तरि सांकल्पित पापक्षयमात्र । नामस्मरणमात्रें समूळ सर्व पापक्षय तत्र । विशेष हरिपदसंप्राप्ति ॥ ५ ॥ कर्म प्रायश्चित्त शुद्धात्मा विमानीं । कोण बैसोनि पावला हरिहरस्थानीं । नामस्मरणें सकृद्बैसले देवयानीं । अजामीळ भिल्लादि असंख्य ॥ ६ ॥ तें हि नाम प्रमादें पातकियाचे । अवचट उच्चारितां वाचें । तो उच्चार हि नीट कैंचा मुखीं वालिमकाचे । मरा मरा हे प्रथमता ॥७॥ मरा पुढें एकें चमत्कारें । रामनाम सिद्ध जालें साक्षात्कारें । तें उफराटें च सुफराटें होऊनि सकृदुच्चारें । ब्रह्महत्यादि दोष विध्वंशिले ॥ ८ ॥ करूनि अशेष दोषध्वंश । रामोच्चारमहिमा अविनाश । तेणें रामरूप जाला स्वप्रकाश । तद्देहो अग्रकवी ब्रह्मऋषि ॥ ९ ॥ तारकब्रह्म रामनाम महादेव । उपदेशूनि असंख्यात उद्धरी पापी जीव । तेथें कर्मरूप प्रायश्चित्तप्रादुर्भाव । तयाची संभावना हि असेना ॥ ११० ॥ प्रायश्चित्तें देहांतें जीव पावे शुद्धता । नामस्मरणें राम निःपाप करूनि कैवल्यदाता । येणें च देह दवडूनि असतां च जीवता । ब्रह्मरूप करितसे ॥ ११ ॥ मग तो[२] नामामृतमाधुर्यलुब्ध । बैसोनि राहिला असंख्यात अब्द । परि प्रथमोच्चार राम हा शब्द । तेणें च जाला कृतार्थ ॥ १२ ॥ ह्मणौनि सर्वशुद्धि सर्वसिद्धीचें मूळ । सर्वशास्त्रसिद्धांतें होय केवळ । तें सर्वभावें स्मरतां सप्रेमळ । सर्व संतोष पावती ॥ ११३ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामिरामदासकृते । प्रायश्चित्तनिरोपणं । नाम प्रकरणं समाप्तम् ॥ ७६ ॥

---

॥ श्रीरामो जयति ॥

नमो संपूर्ण गुणनिधाना । नमो संपूर्ण फळदाभिधाना । नमो संपूर्ण योगादि विधाना—। अधिक नामा श्रीरामा ॥ १ ॥ नमो संपूर्ण

---

१ या जन्मांतील सकल्पविकल्पामुळें जें पापाचरण घडतें त्या पापाचा मात्र नाश, वर सांगितलेलें पुण्य करूं शकतें. २ वाल्मिक ऋषि.

सिद्धिदा । नमो संपूर्ण बुद्धिदा । नमो संपूर्ण विधिदा । नामसंस्मरणमात्रें ॥२॥ नमो नमस्ते निजलाभपूर्णा । नमो नमस्ते नमितास्तिपूर्णा । नमो नमस्ते जगदेकपूर्णा । नमोस्तु पूर्णाश्रितकाम रामा ॥३॥ नमो भजकजनवत्छळा । नमो आश्रिताश्रया परम कृपाळा । नमो पतितपावना दीनदयाळा । नमो भक्तवज्रपंजरा ॥ ४ ॥ नमो अशेषें जीवजिवलगा । नमो अशेष जीवअंतरंगा । नमो अशेष सर्तृभयभंगा । समानसुखदा गोविंदा ॥५॥ नमो श्रुतिस्तवनीं अनंता । नमो शेषाशेषमुखीं अगणितां । नमो सुरमुनिवर विधाता । कुंठित लुंठितें तव स्तवीं ॥ ६ ॥ तो तूं अजामीळादि अनादरस्मरणीं । सादर जालासी चक्रपाणी । नक्रारि स्मरतां विकळवाणीं । गरुडारूढ पावलासी ॥ ७ ॥ ध्रुव उपमन्यु भद्रसीळादि बाळें । सांभाळिलीं तुवां दीनदयाळें । सर्वधर्मबहिष्कृतें अपवित्रें अमंगळें । मेव्यभिल्लादि तारिलीं ॥ ८ ॥ यालागि नमोस्तुते पतितपावना । संपूर्ण करावी मम भावना । कळिमळें मळिना हीना दीना । उद्धरीं हारि स्वनामें ॥ ९ ॥ ऐसा वदूनि विश्ववद्य । जो स्तुतीं सादर समीप सद्य । तो भुवनेश भगवान् प्रणमूनि अर्घ्य । तन्मयां प्रार्थी सज्जना ॥ १० ॥ सज्जन सज्जनेश वेपदयें । हरिहर एकात्मक शोभती स्वयें । तरि जन सज्जनान्वयें । पावती परमेश्वरासी ॥ ११ ॥ प्रस्तुत सज्जनावीण सत्कथा । कैसी एईल भाविकश्रुतिपंथा । एणें काळें कित्येकें स्वमतगाथा । प्रति पाखंडी प्रतिष्ठिती ॥१२॥ श्रुतिसत्समत स्वानुभव । साक्षी त्रय अलक्षें प्रमादीं जीव । स्वकपोळकल्पना अगौरव । रौरवपद प्रशंसिती ॥ १३ ॥ तत्र समुदाय हि मिळती तद्गतांचे । जैसे कुंश्चिळीं पुज मक्षिकांचे । परि मक्षिका उत्तमा

---

१ आश्रित जनांचे हेतु पूर्ण करणारा. २ संपूर्ण जीवमात्र. ३ शेष आपल्या सहस्र मुखानीं ज्याचे गुण वर्णन करतांना थकला, अशा तुला. ४ क्रियाशून्य झाला. ५ तुझ्या ठिकाणीं मुळींच प्रेम नसतांना फक्त तुझ्या नामाचा उच्चार केल्यामुळें. ६ गजेंद्र. ७ भाविक कल्पना, विश्वास, निश्चय. ८ प्रथमतः ९ जन सज्जन झाले ह्मणजे च हरिहरस्वरूपा मिळतात. ह्मणून प्रत्येकानें सज्जन व्हावें. १० कर्णरंध्रावर. ११ असज्जन. १२ जाणतें ज्ञान. १३ अतिशय मोहामुळें, असावधपणानें. १४ घाणेऱ्या जागेवर.

तयांचे । भाव पंचामृतीं हि ॥ १४ ॥ मक्षिकाहूनि कुश्चित पाखंडी । उत्तमाशय न मनी लेंडी । यथा प्रतिष्ठित बंडी । समुदायें च साभिमानी ॥ १५ ॥ ते स्वसमाजीं च वाचिती । कोण्ही कोण्हाचे नाइकती । परि तें अलक्ष करूनियां संतीं । श्रवण कीजे सत्कथा ॥ १६ ॥ खरीं खोटीं नाणीं एकवाटलीं । परि परीक्षक निवडी वेगळालीं । धातु शुद्ध वोळखोनि चाली । चालवी मुळींचिये ॥ १७ ॥ एन्हवीं खरीं खोटीं दोनी । आहेति च मुळींहूनि । काय नपुंसक निर्नाशिकादि मेदिनी । दवडून घाली बाहेरी ॥ १८ ॥ पुण्यवंत च प्रांणें अंगी केलें । पातकी काय आहेति वर्जिले । वैकुंठीची च वाट चाले । नरकीची काय राहिली ॥ १९ ॥ तस्मात उभयपरीक्षाप्रविण । तया एका सज्जनाविण । सहज च लोपे सद्ग्रंथनिरोपण । जैसी दृष्टीविण सृष्टिरचना हे ॥ २० ॥ स्वभावें चतुःषष्टाष्टादशादि लोप । जाला होतां च काळीचा किंचित आरोप । जयां धार्मिकां धर्महेतूचा साक्षेप । तयां हि बैसे न चालवे ॥ २१ ॥ पुढें तरि यांमें घटिका पळें पळें । अधर्म वाढों च लागला बळें । तेथें सहज च सद्ग्रंथमूळें । असंत च लोपलीं कीं ॥ २२ ॥ जनकृतार्थतेकारणें । कृत परमार्थप्रकरणें । ते जन च मळिन काळें जेणें । तेणें अधिकारें धिःकारता ॥ २३ ॥ आतां अल्प पुण्यें बहुत पाप । तरे परि न तरे आपेंआप । तस्मात यत्किंचित सत्यबीजारोप । यत्न करिल ईश्वर ॥ २४ ॥ पुढें तयांचा च करूनि विस्तार । धर्मसंस्था करिल विश्वंभर । तें सज्जनस्वरूपें सर्वेश्वर । धरिल स्वकीय निज वोजे[10] ॥ २५ ॥ यथा यथा सज्जनसंस्था । तथा तथा सद्ग्रंथावस्था । तस्मात् तया स्वरूपस्था । प्रणम्य भावगम्यातें ॥ २६ ॥ सज्जन सद्गुरु सर्वेश्वर । येथें नित्य नूतन सप्रेम भजनभर । तरि च कृतार्थता स्वकार्यसिध्या कातरें । फिरे त्याची

---

१ भित्रा. २ पृथ्वी. ३ प्राणवायुनें. ४ अंगिकार केला. ५ चतुर्वेद, षट्शास्त्रें, अष्टादश पुराणें यांचा लोप झाला. ६ सुरवात. ७ प्रहर. ८ सद्ग्रंथ असून ही त्यांचे प्रतिपादन करणारा न राहिल्यामुळें नसल्याप्रमाणें च आहेत. ९ बीजाचा. १० चांगुलपणानें. ११ स्वकार्य सिद्ध झाल्यावर. १२ भिना.

फिरे प्रीति हि ॥ २७ ॥ मागुता फिरोनि भरे पापा । ते च सद्गुरु सर्वेशाची अकृपा । नित्य नूतन प्रेमळ सद्गुरु सर्वेश स्वरूपा । ते च कृपा हा प्रगटार्थ ॥ २८ ॥ आतां सत्यमानससरोवरावांचूनि । सज्जनराजहंस कैंचे दिसती नयनीं । दैवयोगें दिसतां जनीं । लाहो घ्यावा तयाचा ॥ २९ ॥ यालागि सद्भावें संतजना । प्रणम्य सद्भावें पुनःपुना । भक्तिरहस्यकथानुसंधाना । पूर्णता ज्यांच्या अनुमोदनें ॥ ३० ॥ भक्तिरहस्य याचें नाम । अत्र विषयो भक्तिप्रेम । तत्रैव हि परम सुगम । मुख्या नामसंस्मरण ॥ ३१ ॥ बहुतेक जनमन मळिन कळिमळें । कित्तेक उदरभरणार्थ च विकळे । कोण्हीएक मुमुक्षु वापुडें भोळें । आचारविचारअविपन्न ॥ ३२ ॥ तयाच्या तरणोपायाकारणें । रामनाम प्रेरिलें व्यासोनारायणें । जें मुळींहूनि वर्णिती श्रुती पुराणें । तें ये काळीं विशेषें ॥ ३३ ॥ कलौ कल्मषमय मानसें । अन्यत्र धर्मीं अधिकार च नसे । करित च असतां न घडती जैसे । शास्त्रार्थ तैसें यथार्थ ॥ ३४ ॥ ऐसें जेव्हां तत्वता जालें । तेव्हां विप्रा पातित्य घडोनि आलें । व्याचे बिभीषणें शपथ केलें । कृत्रिमें कळीचा विप्र होईन ॥ ३५ ॥ हे स्थिति विप्रा वर्णेश्वरा । तेथें गति कैंची हो इतरा । तया सर्वांचा तरणोपाय अवधारा । ब्रह्मवाक्य सादर ॥ ३६ ॥ केवळ रामनामस्मरण । ज्याचें अक्षरद्वयें उचारण । तेणें ब्राह्मणादि सर्व साधारण । मुक्ति पावती तत्वता ॥३७॥ जैसा वैडूर्य लागतां अन्य खडा । तद्रूप च होय धडफुडा । तेथें कैंचा वर्णावर्णाचा निवाडा । आवघे भगवद्रूप तैसें ॥ ३८ ॥ भगवद्भजन पूजन प्रदक्षिण । दर्शन स्पर्शन सर्वस्वार्पण । विधि अथवा अविधि अनन्यप्राण । यथा मीळितमात्रें च ॥३९॥ यामाजि घडोनि एतां एक । पातकें दग्ध होऊनि अनेक । पाविजे भगवंत पुण्यश्लोक । कुळेंसहित तत्वता ॥ ४० ॥ फलौ करितां हि न करवे स्वकर्म । धरितां हि न धरवे

---

१ जोडून ठेवलेलें सुकृत. २ छद. ३ व्याकुळ. ४ आचार, विचार, विद्वत्ता या विरहित. ५ दोषयुक्त. ६ शास्त्रोक्त आचरण वास्तविक पाहिजे त्याप्रमाणें करूं लागलें तर होत नाहीं. ७ धर्मापासून च्युति. ८ एक रत्न. ९ सरोवर.

स्वधर्म । मनीं हि न स्मरवे यागयोगवर्म । तैसें तरि काहीं हें नव्हे ॥४१॥ हें तरि निमोलें निपट सोपें । सर्वसाधारणीं हि करावें साक्षेपें । जो हरिहर न पविजे उग्र तपें । तो स्वयें भेटे येऊनि ॥४२॥ असो काहीं च न करवे जन्हि । तरि वैसले निर्जळे ठाई तन्हि । भगवन्नाम स्मरता वैखरीं । काहीं च आयास न लगती ॥ ४३ ॥ तेणें केवळ नामस्मरणें । निजागें वोळैगिजे नारायणें । फिटे दृष्टीचें पारणें । वैकुठ कैळास पाहतां ॥ ४४ ॥ हरिहरनामस्मरणमहिमानें । अपराधी हि यत्किंचित भजनें । एकें परमेश्वरानुसंधानें । घर्शे अथवा अर्शे हि ॥ ४५ ॥ प्रावती प्राणी सहपरिवारें । हरिहरस्थानें मनोहरें । त्याची सर्व हि कामना पुरे । इंद्रियेंसीं मन निवे ॥ ४६ ॥ दिव्य स्त्री दिव्य पुरुप । दिव्य भोग दिव्य सतोप । रोग वियोग नाहीं जरा मरण दोप । क्षीणता चिंताचिंता असेना ॥ ४७ ॥ क्रोध द्वेप मद मछर । नाहीं मळनिर्मळ शरीर । स्वप्रकाशता कैंचा अधकार । तनुमनासी ते ठाई ॥ ४८ ॥ ज्या भगवत्स्मरणें भगवद्रूप । मूळ येऊनि वैकुठकैळासभूप । विमानीं वाहोनि कृत्साक्षेप । घेऊनि येती स्वपदासी ॥ ४९ ॥ हें जयाच्या अर्धस्थ भजनाचें महिमान । त्याचें प्रत्यक्ष नित्य दर्शन वदन । तेणें अविच्युत आनदसदन । च्युति च नाहीं तत्सुखा ॥ ५० ॥ एवढिया सुखाचा अनुभव । पावे मृत्युलोकीचा जेणें जीव । तये अक्लेश भजनीं धरूनि भाव । कोणा स्पृहा उपजेना ॥ ५१ ॥ नामस्मरण निमोलें रामाचें । हें काय प्रतारणा कीं आहे साचें । हें रहस्य श्रुति स्मृति सर्वा ग्रथाचें । कीं मनुष्यकृत कल्पना ॥५२॥ हें उघडें सुखसाध्य निधान । साधका अधिकाची समाधान । तरि अवश्यमेव हरिहराभिधान । यथाप्रेम स्मरावें ॥ ५३ ॥ श्रीविष्णुचरणीं प्रेमळ । तेणें तदात्मता स्मरावा कठनीळ । श्रीशकराब्रिकमळीं अळिकुळ । तेणें तदात्मता हरि स्मरावा ॥५४॥

---

१ प्राप्त करून घेता येतें. २ अनुसधान=ध्यान ३ इहलोकींच्या. ४ नित्य, शाश्वत. ५ ज्या अक्लेश भजनानें. ६ इच्छा. ७ फुकटचें. ८ फसवणूक.

वैष्णवें शांभवें दर्शनोल्लर्षी । महादेव महाविष्णु वदावे सद्भावीं । वाचा नयन शांकावे माळर्य जीवीं । हें नव्हे भागवतलक्षण ॥ ५५ ॥ भक्तिरहस्यें हरिशंकर । एकात्मा हा नित्य निर्धार । तैसे च शांभव वैष्णव सोहदर । भक्ति जननी दोघांची ॥ ५६ ॥ देवादेवासी एकात्मता । अति प्रीति चाळविती॰स्वता । तैसी च भक्ताभक्तासी अखंडता । प्रीति असावी परस्परें ॥ ५७ ॥ आता भक्तिरहस्याचें हि रहस्य । देवा भक्ता सामरस्य । भक्तिप्रेमता नव्हता वैरस्य । अभेदता हें अपूर्व ॥५८॥ कितेक ह्मणती ऐसें हि । भेदेंविण भक्तिसुख नाहीं । देव भक्त एक च पाही । तेथें स्मरण प्रेम तें कैंचें ॥ ५९ ॥ मागें हि जे भक्त जाले । ते दीनभावें देवासी भजले । मग ते हरिहराळय पावले । हें प्रत्यक्षप्रमाण ॥६०॥ ऐसी हे जनअशंका । याचें प्रत्युत्तर आइका । हें सत्य च आहे बहुतेका । नव लक्षणपर्यंत ॥ ६१ ॥ नवविधा भक्ति दश लक्षणी । वर्णिली आहे विचक्षणीं । सत्व रज तम त्रिगुणी । उत्तम मध्यम कनिष्ट ॥ ६२ ॥ दाहावी भक्ति ते उत्तमोत्तम । जे जाणती स्वयें आत्माराम । नारदादि भागवतोत्तम । मुक्त होत्साते सुभक्त ॥ ६३ ॥ जे विषयतृष्णानिर्मुक्त । जे विवेकसंपन्नता विरक्त । जया विषयीं असेचना विभक्त । हरिस्वरूप सर्वत्र ॥ ६४ ॥ जया उत्पत्ति स्थिति कल्पांत । दृश्य आहे मार्कंडेयादिकां निश्चित । जया एकार्णवीं नेणिया भगवंत । आपणासी अंतु नाहीं ॥ ६५ ॥ ते महामुक्त परमभागवत उत्पन्नज्ञानी । भगवद्भक्तियोगें हें प्रसिद्ध जनीं । भगवतनामस्मरणामृत जीवनीं । दशम लक्षण विचक्षण ॥ ६६ ॥ आता पूर्वोक्त जे बोलिलें । ते हि प्रथम दीन अनाथत्वें स्मरले । सेखीं ईश्वरसायोज्यता पावले । जीवभेद तो कैंचा

१ देवाविषयीं भक्ति, प्रेम राहिलें नाहा तर त्या ठिकाणी मत्सरामुळें द्वेषभाव मात्र उत्पन्न होतो, व एकदा द्वेषभाव वाढला ह्मणजे तेथें समरसता राहणें हें केवळ अघटित किंवा अशक्य होय २ देव आपल्यापेक्षा श्रेष्ट, आपण दीन, असा भाव ठेवून ह्मणजे निराळेपणा दाखवून ३ भक्तीचे जे नऊ प्रकार सांगितले आहेत त्याचा क्रमाक्रमानें अभ्यास करून नववी भक्ति पूर्णपणें साध्य होईपर्यंत वरील आशंका खरी आहे. ४ याचा संबंध भगवंताकडे. ५ अन्य. ६ नारदमार्कंडेयादिक.

॥ ६७ ॥ देव होऊनि भजावें देवासी¹। स्वदेह देवरूप करावा अंग-न्यासीं । अथवा केवळ प्रेमळ विधि न कळे ज्यासी । तो देवभावें देवमय ॥ ६८ ॥ तस्मादशलक्षणभक्तीचें मूळ । नामस्मरणमात्र केवळ । तया अधीन स्वयें विश्वमूळ । सच्चिदानंद परमेश ॥ ६९ ॥ तें भग-वंताचें गुणकर्मसहित नाम–) संकीर्तन मृदंगटाळउत्सहें सप्रेम । दुंदुभी कांहाळा लाऊनि भागवतोत्तम । करी हरि तेथें तिष्ठत ॥ ७० ॥ तो जयजयकार नामघोष । जेथवरि परिसती त्यांचे जळती दोष । हा समाजोत्सव निर्दोष । करी बहुतां जीवातें ॥ ७१ ॥ आतां देशकाळवर्तमानेंकरीं² । स्वयें च स्मरे जो अंतरीं । त्याचा रुणियां³ होऊनि मुरारि । पुरारि⁴ पुढें तिष्ठत ॥ ७२ ॥ तया भक्ताची देवासी थोर भीड । तो जरि परलोकाची हि न धरी चाड । तरि तयाचें येथें च पुरवी कोड । सच कैवल्यसुखाचें ॥ ७३ ॥ जो नाम स्मरे निरंतर । तयारूप प्रकाशी परमेश्वर । जयासी ब्रह्मोपनिषदीं मुनिवर । निरंतर वर्णिती ॥ ७४ ॥ जें निर्गुण निराकार । जें निष्क्रिय निर्विकार । जें निश्चळ नित्य निरंतर । सभरांभरित⁵ ॥ ७५ ॥ जें आकाश व्यापूनि सावकाश । जें नेणतां भासे अवकाश । तें जाणतां शुद्ध सचेतन स्व-प्रकाश । स्वसंवेद्य स्वयमेव ॥ ७६ ॥ तें तत्वता नेणतां । तेथें च भासे आकाशता । तयाविण ठाव रिता । त्रसरेणुपुरता असेना⁷ ॥ ७७ ॥ जें अद्वैत जगत्कारण । जेथें असेचना जगद्वारण⁶ । या वचनार्थाचें विवरण । विरळा लाभे गुरुदास ॥ ७८ ॥ जें बोलिजे जगत्कारण वाचें । तेथें जगद्वारण नाहीं हें कैसें साचें । जगत्कारणधारण हें कार्य ज्याचें । तें विश्वातीत हें अघटित ॥ ७९ ॥ ऐसें हें प्रामाणिक प्रश्नोत्तर । काय ह्मणों येईल नव्हे साचार । आतां येथींचा च मूळ विचार । बोलिजेतसे तत्वता ॥ ८० ॥ जैसा ब्रह्मीं सघनीं शून्यमय गगनाभास । तैसा च

---

१ एक चर्मवाद्य आहे. २ देशकालवर्तमानावर नजर देऊन. ३ ऋणी. ४ शिव. ५ सबराभरीत=बाह्याभ्यंतरित ह्मणजे व्यापक. ६ भेद. ७ नभीं वावरे जो अणुरेणु कांहीं । रिता ठाव या राघवावीण नाहीं ॥ ( मनाचे श्लोक )

तत्र विश्वता अन्यथाभास । स्वस्वरूप सदोदित निरायास । आहे तैसें च असता हि ॥८१॥ चत्वारि चक्षु प्रकाशक द्वय । शून्य दीप प्रभात तोय । तत्र कीं निजातीय वर्ते द्वितीय । तद्वचिद्विलासता हे ॥ ८२ ॥ केवळ अद्वैतीं आत्मतत्वीं । द्वैताभा भासली नाना तत्वीं । तत्र अपृथकता पृथकत्वीं । बुधा बुद्धिमतासी ॥ ८३ ॥ गोधूमांचा राशी एक । तेथें दाणे असती अनेक । तरि काय द्वैतभेद सविवेक । कल्पिती तेथें ॥ ८४ ॥ अथवा सूर्यरश्मी असंख्यात । तेथें काय सचरों शके दुजें द्वैत । तैसें आत्मस्वरूप सदोदित । तन्मय तद्भूत भूतमय ॥ ८५ ॥ हा महदद्वैतबोध बोलिजे जाला । जया अद्वैतबोध शुद्ध जाला । द्वैतभ्रम नसता फिटला । सर्व ब्रह्मेति अकथ्य ॥ ८६ ॥ ब्रह्मविद बोलिले आर्य । अहो हें परम आश्चिर्य । कारण च गिसरले कार्य । देखोनिया सत्यत्वें ॥ ८७ ॥ घडूनि कनकाची गैंठी । कंकणें घातलीं मणगटीं । तयाच्या नामरूपासी च घाळूनि मिठी । हेम हरपलें ह्मणे ॥ ८८ ॥ सोनें तें च जें खोटी । हे वेगळी भागारोंची हेमपेटी । हे विपरीत कल्पना ते च खोटी । आत्म हेम सृष्टि कार्यकारणें ॥८९॥ एणें अर्थे स्वसतोपें । सर्व ब्रह्मेति घटाघोपें । श्रुति गर्जती अर्थविशेषें । सिद्धांतांचिया स्वतसिद्ध ॥ ९० ॥ हा च वेदांतशास्त्रसिद्धांतींचा अर्थ । हा च पुराणीं प्रगट परमार्थ । हा च सर्वा ब्रह्मविदाचा यथार्थ । शुद्धानुभव सिद्ध ॥ ९१ ॥ जरि निजातीय विश्व होतें । तरि तें प्रश्नोत्तर घडों येतें । विश्व च ब्रह्म या सिद्धांतें । सर्वाशय निरशले ॥९२॥ असो वैकुंठनायक विश्वात्मा । अथवा कैलासनाथ चिदात्मा । प्रपंच-नश्वर अनात्मा । आपण जीव तेथींचा ॥ ९३ ॥ हे मिथ्या द्वैतोद्भव कल्पना । असेचना दशमलक्षण भगवद्भजना । जो समरस सच्चिदानंदघना । जाला असे स्वभावें ॥९४॥ आत्मस्वरूप सदोदित । तेथें जीवत्व कल्पिती भ्रांत । तत्र सद्गुरुदास निभ्रांत । ते स्वतसिद्ध स्वरूप ॥ ९५ ॥

---

१ श्रम किंवा थकवा रहित २ गव्हाची ३ असें ह्मणता येणार नाही, ४ लगड, गोळा ५ भागारें=सोनें, ६ असतें

तया स्वस्वरूपाहूनि रितें । नाहीं अणुत्व ना स्थळ अणुपुरतें । क्रमंमुक्ति तयां सद्यमुक्तांतें । बंधेंसहित असेना ॥९६॥ जें आकाशाहूनि विस्तीर्ण शुद्ध सूक्ष्म सचेतन अव्यय । तद्विवर्त विश्वत्वाभेसीं विश्वकारण निरामय । तदखंडतेसी तदंश च तदन्यतेविण तन्मय । तत्र कुत्र गत्यंतर ॥९७॥ तया रामनामस्मरणें आभारला । स्वस्वरूपें अलंगूनि ठेला । एक च होत्साते भिन्नाभा स्वलीला । अद्वैतसुखानुभवार्थ ॥ ९८ ॥ तयाचा भव च असंभव । तया जितां च निरशला जीवभाव । जीवत्वावांचूनि सहज च वांव । मरण होऊनि ठेलें ॥ ९९ ॥ ते शरीरी अशरीरीसमान । देह वर्ततां निवर्ततां विद्यमान । सद्य सचेतन सघन सनातन । सूक्ष्मात्सूक्ष्म निरंश महताहूनि हि महत् ॥ १०० ॥ तयाची जे देहदशा । ते ब्रह्म च अवलंबी सुवेशा । तत्संगसुखामृत भाग्यपुरुषा । सान्निध्यास च आतुडे ॥ १ ॥ तया दर्शम भक्ताचे जे भक्त । ते भगवद्भक्त हें भगवंतोक्त । स्वस्वरूपें समान शिक्ते । रामनामामृतें जे ॥ २ ॥ स्वयें श्रीराम उपदेशी रामनाम । तें च दास हि उपदेशिती सप्रेम । स्वस्वरूप प्रबोध परम । कृपाकटाक्षें अविच्युत ॥ ३ ॥ तयासी कांहिं च न करितां घडमोडी । इकडील तिकडे न कल्पितां काडी । ब्रह्मरूप विश्वता उघडी । स्वकीय संसारेंसहित ॥ ४ ॥ तयाचा देहो ब्रह्मरूप । इंद्रियें ब्रह्मस्वरूप । विषय तो हि स्वस्वरूप । कर्म क्रिया तन्मय ॥५॥ तो अविनाश नित्यानंदघन । तद्देहदर्शन हि कैवल्यनिधान । तयाचें सहज समाधान । समाधीं चि विश्रांति ॥ ६ ॥ तयाची भवस्थिति च केवळ । परम समाधान सिद्धीचें फळ । गति जे कां अलुमोळ । ते यात्रा मुख्य देवाची ॥ ७ ॥ जे जे मातृका मुखीं उमटे । ते ते महामंत्रबीज प्रगटे । चित्तधर्मावें चिंतन घटे । तें आत्मचिंतन अखंड ॥ ८ ॥ तयाची दृष्टि जेथवरि पडे । तेथूनियां हि पैलिकडे । ऐल पैल निरसूनि थैंडे । परब्रह्म सदोदित ॥ ९ ॥ दृश्य

---

१ चतुर्विधा मुक्तीसिरी अनुक्रमानें एक एक मुक्ति. २ व्यर्थ. ३ सांपडे. ४ दहावी भक्ति जी वर सांगितली त्या प्रकारचे भक्त. ५ ओलावा. ६ किंचित. ७ पलिकडच्या तीरावर गेल्यावर अलिकडचे तीर वगैरे कांहीं एक न दिसतां सर्वच ब्रह्ममय दिसतें.

दृष्टि दर्शन । सृष्टि पाणी स्पर्शन । अंतःकरण स्फूर्ति वेदन । अवघें च ब्रह्मस्वरूप ॥ ११० ॥ सहज च स्वरूप ऐसें च आहे । शब्दसाधना हि न साहे । विचित्र विश्वाभास तन्मय पाहे । न पाहे तन्हि तद्रूप ॥ ११ ॥ निश्चयें सर्व ब्रह्म असे । तरि तें विवंचितां न विवंचितां अनायासें । विवंचना हि वेगळी नसे । स्वसंवेद्य स्वरूप ॥ १२ ॥ एवढी स्वस्थिति अविचळ । हें केवळ रामनामस्मरणाचें फळ । तें नाम न विसंभर्ता प्रेमळ । तया प्रणम्य पुनःपुना ॥ १३ ॥ भक्तिरहस्य प्रति प्रकरणीं । फळश्रुति बोलिली श्रवणपठणीं । ते सच आहे अंतःकरणीं । विकल्प कल्पना न करावी ॥ १४ ॥ भगवदाशय अनंतफळद । तो प्रति प्रकरणीं परमानंद । विशेष विचित्र कथानुवाद । विचित्र फळद कां नव्हती ॥ १५ ॥ श्रुतिस्मृतिपुराणार्थ- । तात्पर्य न मनी जो यथार्थ । *तो श्रवण हि करूनियां व्यर्थ । विकल्पें केला पातकी ॥ १६ ॥ तो* सर्वधर्मबहिष्कृत अमंगळ । रौरवीं पचे चिरकाळ । सिद्धांतविकल्पी च केवळ । शुद्ध च नव्हे तत्वता ॥ १७ ॥ ऐसा जो कां वज्रदोषी । तो हि तत्काळ च सप्रेम नामघोषीं । दिव्य देहो पुण्य वेषीं । पावे परम पदातें ॥ १८ ॥ येथे बोलिले आचार विचार । तितुके नामस्मरणें साचार । नामस्मरण सर्वाधार । नामें कृतार्थता केवळ ॥ १९ ॥ नामें रूपें स्वसंवेद्य श्रीराम । समर्तृसजनसंपूर्णकाम । भक्त्यां भजतां स्वात्माराम । नामनिष्ठां निवोत कां ॥ १२० ॥ नाम तारक च कळियुगीं । हें प्रसिद्ध आहे त्रिजगीं । तें निरंतर तारु भाविकालागि । सच स्मरणें सर्वदां ॥ २१ ॥ स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्य । यत्र सर्वप्रकार सामरस्य । तत्र कदापि हि वैरस्य । घडों न शके तत्वता ॥ २२ ॥ शकें दशकें उणी सोळाशतें । कीलकनाम संवत्छरातें । विजयोदशमीसी भक्तविजयातें । ग्रंथ संपूर्ण पूर्णफळद ॥ १२३ ॥ स्वस्ति श्री शके ॥१६९१॥

---

१ ज्ञान किंवा अनुभव. २ मनांत निश्चय किंवा अनिश्चय ठरविणें. ३ महादोषी. ४ आश्विन शुद्ध १० शकें १५९०.

विरोधीनाम संवछरे । अश्विन वद्य अष्टमी रविवार पुष्य नक्षत्र । तद्दिनीं । स्वस्ति श्रीमद्भक्तिरहस्ये । रामीरामदासकृते । हरिहरभक्तिमहिमावर्णने । ब्रह्मकर्मवर्णन । चतुर्वर्णाश्रमस्वकर्म । वर्णनं इदं पुस्तकं । मठ चाफळ श्रीरामचंद्रचरणारविंदीं । सेवेसी लेखन । हस्ताक्षर गिर्मोजी उद्धव । देशकुळकरणी । तारळेकर । शुभं भवतु । श्रीसद्गुरु रामचंद्रार्पण ॥



# ॥ सुगमोपाय ॥

श्रीराम

वदू देव सकळाद्य । आदिमध्यातरहित सर्वं । गणि विगणि स्वंस-वेद्य । गणाधीश ॥ १ ॥ जयाचें स्वरूप निर्धारिता । नव्हे मानवमातगा भिन्नता । तो चि नरकुंजर स्वता । नामें रूपें ॥ २ ॥ नामारूपाची उभारी । हे जयेची वोडवरी । ते चि मूळमाया खेचरी । अक्षरस्वरूपा ॥ ३ ॥ अनतीं अद्वेतीं अक्षोभीं । कैचें दुसरें सधन स्वयभीं । तथापि "विवर्तरूपें तन्ही उभी । आभासे च कीं ॥ ४ ॥ तयेचिये पदद्वंद्वीं । तादात्म्यभावें अभिवदी । प्रसन्नपणें परमानदी । दाखवी स्वरूप आपुलें ॥ ५ ॥ तव ते शुद्ध चैतन्यकळा । जैसी अग्निरूप चि कीं ज्वाळा । प्रभे आणि अखडमंडळा । कैचि वेगळिकें ॥ ६ ॥ यैसी मूळदृष्टि मूळ-

---

१ नित्य २ मूळ पोथींतील ह्या अक्षरें बरोबर लागलीं नाहींत 'गणिविणाणि' अशीं अक्षरें दिसतात अर्थ कळत नाहीं " गणीं विगणीं " अशीं अक्षरें वाचल्यास, आपल्या व दुसऱ्याच्या गणात स्वसवेद्य असा गणपति असा अर्थ करावा. ३ आत्मानुभवी ४ मातग=गज, हत्ती ५ कुंजर=हत्ती ६ नाम आणि रूप हीं मिथ्या आहेत, राक्षसी मायेचा खेळ आहेत. ७ गारोड्याचा खळ ८ राक्षसी ९ जिचें स्वरूप अक्षर ह्मणजे नाश न पावणारें आहे १० अनत, अद्वैत, अक्षोभ आणि स्वत सिद्ध असें ज " एकमेवाद्वितीय ब्रह्म " त्याच्या ठिकाणी दुसरी वस्तु कोठून असणार? ११ वास्तविक नसून दिसतें त्या रूपानें, भासमय दृश्य स्वरूपानें १२ अखड आहे मडळ ज्याचें असा सूर्य १३ ज्याप्रमाणें अग्नीच्या ठिकाणीं ज्वाला मिरवते आणि ज्वाळेचा गाभा अग्निच असतो, ह्मणजे अग्नि आणि ज्वाला हे दोन शब्द बोलावे मात्र, परतु ज्वाला आणि अग्नि एक अग्निच होत, अथवा ज्याप्रमाणें सूर्याच्या ठिकाणी प्रभा मिरवते व प्रभेला अधिष्ठान सूर्य च असतो, ह्मणजे प्रभा आणि सूर्य हे दोन शब्द बोलावे मात्र, परतु प्रभा आणि सूर्य एक सूर्यच होत, त्याप्रमाणें प्रकृति व पुरुष हे नाममात्र भेद आहेत, वस्तुत दोन्ही मिळून एका पुरुषाचाच सर्व विलास आहे परमात्मा आणि माया एकस्वरूपच ह्मणजे परमात्मस्वरूपच आहेत

माया । स्तविली ब्रह्मरूप ब्रह्मतनया । ब्रह्मैक्यें स्तव्य स्तवन स्तवितेया । बोळली वदनीं ॥ ७ ॥ आता स्त्रीलिंग पुल्लिंग नपूसक । काहीं च नव्होनि हे सकळिक । तो सद्गुरु श्रीरघुनायक । सर्वस्वेंसी वंदिला ॥८॥ जो देव तोचि गुरु । ऐसा मुख्य शास्त्रीचा निर्धारु । तो स्वयेंच प्रत्यक्षाकारु । श्रीरामें दाखविला ॥ ९ ॥ उत्पन्न ज्ञानी ईश्वर गुरुस्थानीं । पूर्वोत्पर होत चि आहेति जनीं । ते पूर्वजन्मीं च सर्व साधनीं । निष्पन्न ह्मणोनिया ॥ १० ॥ येन्हवी हा ईश्वरानुग्रह सत्ता । सद्गुरु सच्छास्त्र पाविजे तत्वता । त्या ईश्वरें स्वयें अंगिकारिता । काय येक नव्हे ॥ ११ ॥ हें कदापि अघटित घडे । जैसें अनायासें निधान जोडे । परतु सर्वेही सृष्टीकडे । बोलों चि न ये ॥ १२ ॥ जैसे अर्थप्राप्तीसी करावे उपाय । तेसे परमार्थासी धरावे सद्गुरूचे पाय । यावाचूनि अर्थी परमार्थी काय । केसेनि तरतील ॥ १३ ॥ असो जया श्रीरामें स्वकीय केलें । तया चराचर गुरुत्वा आलें । का जें रामरूपें असे सचलें । ह्मणउनिया ॥ १४ ॥ तया सद्गुरु सर्वोत्तमा । पूजीन आत्मया श्रीरामा । सगुणनिर्गुणीं समत्व प्रेमा । हें च अखंड आवाहन ॥ १५ ॥ समूळ कल्पना निचित्र वसन । हें चि समर्पिलें दिव्यासन । अर्घ्य पाद्य स्नान आच्मन । अवघीयाचि आपें ॥ १६ ॥ मुळी येक ततु स्वतत्र । तो त्रिगुणित करूनि विचित्र । निगृथितो गृथित ब्रह्मसूत्रें ।

---

१ सरस्वति २ स्तवन करणाऱ्याला ३ प्राप्त झाली ४ गुरुशिष्यपरपरा ही अखंड आहे गुरुचे मूळगुरु पहात गेले ह्मणजे थेट ब्रह्मापर्यंत ठेप पोंचते. तस्मात् यावत् गुरु सर्वथैव ईश्वराशी च ठरतात ह्मणून ईश्वर च सर्वत्र गुरुमय आहे अथवा गुरु ईश्वररूपी आहेत " गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वर । गुरु साक्षात् परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नम " ॥ असें व्यासवचन आहे " जैसा देव तैसा गुरु । शास्त्रीं बोलिला हा विचारु ॥ " दासबोध ४×८×३२. ५ कदाचित् " व्युत्पन " बद्दल " उत्पन " शब्द लिहिला गेला असावा, किंवा शेवटच्या दोन चरणात पूर्व जन्माचा संबध आणलेला असल्यामुळें उत्पन्नज्ञानी ह्मणजे जन्मत. ज्ञानी असें ह्मणण्याचा च हेतु असावा ६ आत्मज्ञानी, सिद्ध. ७ परतु ईश्वरानें अंगिकार करावा असली अघटित गोष्ट सृष्टीमध्यें नेहमीं च घडते असें मान नाहीं. ८ त्रिगुणरूप. ९ निग्रथिता=ब्रह्मगाठेवाचून असलेल्या सूत्राला. १० यज्ञोपवीत.

म्हणें मत्रें समर्पिलें ॥ १७ ॥ अनंताकाश हें चि अंबर । सघन शुद्ध सूक्ष्मतर । स्वप्रकाश अति सुंदर । निर्द्वंद्वीं[3] द्वंद्व शोभलें ॥ १८ ॥ नामें रूपें नानाकार । परि सुवर्णमय चि अलंकार । नवविधा नवरत्नजडित मनोहर । श्रीरामीं समर्पिलीं ॥१९॥ अष्टभाव अष्टगंधें[2] । मुळीच्या स्वरूपें सहज शुद्धें । स्वभावें चि सहज सिद्धें । श्रीरामांगीं चर्चिलीं ॥२०॥ माया मालती मुळींचें झाड । विचित्र फुलीं फुललें चोंड । त्याचे सघन गुंफिले माळिकाजोड । गुणीं[4] गुणत्व हि दिसेनां ॥२१॥ त्या घातलिया श्रीरामाच्या गळा । वृगुठी[6] त्रुविली[7] सुमर्नखोळा । रुंजीतें संत षड्‌दपाळा । मुक्तें मस्तकीं वाहिलीं ॥ २२ ॥ नाना परिमळ आणि धूप । हें सुगंधाचें स्वरूप । गधवती पृथ्वी तद्रूप । अवघी च रामीं अर्पिली ॥ २३ ॥ अशेष ही तेजाचा दिवा । वृत्तिसहित वोवाळिला देवा । तें रूप अवलोकितां जीवा । कोटि जन्महत्या नासती ॥ २४ ॥ अमृताचें ही निजसार । माधुर्यैक रसाधार । परमामृत तें परिकर । नित्यतृप्तासी नैवेद्य ॥ २५ ॥ साधन सुरतरूचें पक्क फळ । अविनाश सबाह्य रसाळ । अखड चिरें[14] वेष्टिलें विमळ । सहज चि समर्पिलें ॥ २६ ॥ आधीं सगळें चि फोडिलें पुगीफळ । मग भिन्नांश कल्पिले सकळ । सेखीं[15] सुरग सरस तांबूल । श्रीरामवदनीं विराजे ॥ २७ ॥

---

१ वस्त्र. २ कप, रोमांच, स्फुरण, प्रेमाश्रु स्वेद, हास्य, लास्य व गायन असे आठ स्थायीभाव. ३ पुष्कळ. ४ दाट. ५ मालतीचीं फुलें इतकीं दाट गुंफलेलीं असावीं, कीं माळेचा दोरा सुद्धां दिसूं नये. तद्वत् मायोत्पादक जगाची रचना इतकी दाट झाली आहे कीं ती ज्या ततूंत ओंवलेली आहे तो ततू दिसत नाहीं. मत्तः परतर नान्यत्किंचिदस्ति धनजय । मयि सर्वमिद प्रोत सूत्रे मणिगणा इव ॥ श्रीभगवद्गीता ७×७. ६ वीरगुंठी, पद्मकेश. ७ तुरविली, पूजिली. ८ खोल=टोप ९ गुजारव करीत आहेत. १० षट्पद+पाळ=भ्रमराचा समुदाय ११ मोकळीं फुलें १२ चागलें. १३ निलतृप्तस्य नैवेद्यस्ताबूल च कुतो विभो. । परा पूजा. १४ वस्त्रानें. १५ सुपारी. १६ शेवटीं.

हिरण्यगर्भ हें चि हिरण्य । श्रीरामीं अर्पितां अनंत पुण्य । जगज्जीवनें सार्द्र अनन्य । दक्षणा पूजापूर्णार्थ ॥ २८ ॥ मुळीहूनि च नाहीं अंजन । तरी तदाकार च कीं नीरांजन । तें च श्रीरामीं नीरांजन । चिद्रत्नप्रभा ॥ २९ ॥ अमर सुमन पूर्णांजुळी । सर्वं ब्रह्मेति श्रुति कल्लोळी । सुगंध सुरंग मोकळी । श्रीरामीं समर्पिळीं ॥ ३० ॥ प्रकृतिचक्रीं चक्रवर्ती । ह्मणौनि येकातपत्र हे प्रसिद्ध कीर्ति । जेथें अनंत रत्नें मुक्ताफळें झळकतीं । कळसी आणि जाळिके ॥ ३१ ॥ स्वपर्णारिंग रानदीप । कुळदीपकीं शोभे विभूतिरूप । चांमीकर प्रभे आणि उडूपें । नामें निःकळंकत्व पावला ॥ ३२ ॥ गंध व्येंजनें ल्घु चिरें । ढाळितां समर्पिजे समिरें । नभचुंबित रांमटके रुचिरें'' । अवतारचरितीं चित्रिले ॥३३॥ मच्छादि सिंहशरभरूपें । अखड दडाकारे तळपैती पंडपें । पीत पताका अति संक्षेपें । दास धरिती निशाणें ॥ ३४ ॥ श्रीरामेनिशाणीं विख्यात प्रतिज्ञापण । सत्य जितेंद्रिय निःकपट विहिताचरण । हें वागवी तो च दास नाहीं तरी शुकसारण । मिथ्या वेषधारी ॥ ३५ ॥ दुंदुभीघोषें गर्जे गगन । शून्यत्व सांडूनि जालें सघन । दशधा मंगळतुरें सुस्वन । अनाहत ध्वनी वाजती ॥ ३६ ॥ ऐसा अशेष विश्व श्रीमंत । राम

---

आत्मा सदोदित । उन्मनें मानसपूजनीं अनंत । सहज सभावें तुष्टला ॥ ३७ ॥ माझा राम अथवा चि आपण । दुसरें नाहीं त्याची च आण । हे स्थिल न मोडतां स्वामीसेवकपण । दिधलें ऐसा उदार ॥ ३८ ॥ बाप औदार्याची थोरी । जेणें विश्व पडतसे घोरीं । तें राज्य देऊनियां करीं । नित्य मुक्त बिभीषण ॥ ३९ ॥ जयाचे स्वरूपीं इतर । उपमीय नाहीं ऐसा सुंदर । सगुणत्वें अगुणत्वें निर्विकार[1] । गंभीर ऐसा ॥४०॥ विचित्र लीळेची रीती । एकीं च वस्तु परि एक तरती एक मरती । दैवी आसुरी संपत्ति स्वरूपामृतीं । वानर आणि राक्षस ॥ ४१ ॥ रामसत्तेची नवलपरी । पृथ्वी तारिली उदकावरी । [3]ते अदृश्य म्हणौनि सागरीं । शीळा प्रत्यक्ष तारिल्या ॥ ४२ ॥ उदक वोळावे कासयावरी । तरी कार्य कारणाचें उदरीं । ऐसें पाहतां शेवटवरी । श्रीरामीं च सर्वेही ॥ ४३ ॥ राम इछेस्तव अघटित घटना विश्वस्थिति । राम अनिछेस्तव अभंग भंगे होय शांती । ते साक्षी प्रत्यक्ष लंका कनकावती । दग्ध केली पावकें ॥ ४४ ॥ अनादि रामआज्ञेचें शासन । अद्यापि चराचरीं अनुलंघ्यमान । केलें शरें स्वर्गपथावरोधन । तें अविनाश अविनाश ॥ ४५ ॥ ऐसे राम अनंताचे अनंत गुण । वर्णितां शेषास हि जाला शीण । वाल्मीकें शत-

---

१ सगुणत्व व अगुणत्व या दोन्ही विकारापासून अलिप्त. २ सर्व निर्मित वस्तूंत स्वयव्यापक परमात्मा सर्वात्मरूपानें प्रविष्ट होऊन अखंड विराजमान असता एक वस्तु तरते व एक वस्तु मरते हें काय ? तर त्याच्या अगाध लीलेचा हा एक मासला आहे. दैवी संपत्तीचे वानर तरले व आसुरी संपत्तीचे राक्षस मेले. ३ पृथ्वी पाण्यावर आहे ही गोष्ट अदृश्य असल्यामुळें श्रीरामानें शिळा पाण्यावर तरतांना प्रत्यक्ष दाखविल्या. ४ पृथ्वी उदकावर; उदक कशावर ? तर तेजावर; तेज वायूवर; अशा प्रकारें कारणाच्या ठिकाणीं कार्य असतें, असें पहात पहात श्रीरामापर्यंत परंपरा पोंचते. ५ रामाच्या इच्छेचा प्रभाव केवढा आहे तो पहा. रामाची इच्छा झाल्या बरोबर जी कधीं घडून न येणारी अशी विश्वघटना घडून येते. व तीच इच्छा मोडल्या बरोबर जें अभग असतें तें भंगून जातें. याची साक्ष पटविण्याकरितां लंका सोन्याची असतां व सोनें कधीं दग्ध होत नाहीं असें असतां, रामाच्या अनिच्छेमुळें अभंग जें सोनें तें दग्ध होऊन गेलें.

कोटी रामायण । गणितां राम अगणित ॥ ४६ ॥ तो राम माझा स्वामी नाथ । सद्गुरु जगद्गुरु जगन्नाथ । अंतरीं प्रवेशोनि मनोरथ । प्रस्तुत वाचे चेवविले ॥ ४७ ॥ ऐसें करितां सद्गुरु श्रीरामस्तवन । रामरूप जालें जनमन । तद्रूपें श्रोते सज्जन । अनन्यभावें अभिवंदूं ॥४८॥ जे विवेक वैराग्याची विश्रांति । जे अभेद भक्तीची अंतर्गति । सम्यग्विज्ञानाची स्वयंजोति । मूर्तिमंत ॥ ४९ ॥ सर्व साधनांची उत्तर दशा कोडें । ज-यांचे क्रियेमाजी क्रीडे सुरवाडें । जेथें स्वाचार सुविचार चि वाडे । निर्वोळें नांदती ॥ ५० ॥ जे निश्चयासी हि निर्धार । जे भावार्थासी परमाधार । जे प्रेमळ कळेचें जिव्हार । स्वानंदाचें स्वरूप ॥ ५१ ॥ श्रुतिसारांशाचें सदन । होऊनि राहिलें ज्यांचें वदन । ज्यांचें वचनमात्रें कदनें । होय भवभ्रमाचें ॥ ५२ ॥ सुखी अंगिकारिती आश्रम । परि ते सर्व विश्रामांचा विश्राम । ज्यांच्या अंगिकारें च श्रीराम सर्वस्वें भेटे ॥५३॥ महिमान वर्णिजे त्यांचें । येवढें सामर्थ्य वाणीस कैचें । ते चि अधिकारी येथींचे । प्रार्थिले आधीं ॥ ५४ ॥ जैसे देव अधिकारी योगीं । तैसे च अध्यात्मशास्त्रीं आत्मयोगी । प्रार्थना करावी तयालागीं । हें सा-मर्थ्य चि त्यांचें ॥ ५५ ॥ ते सर्वज्ञ परि श्रवणीं सादर । जैसा अमरां-सी च अमृतपानीं आदर । अनधिकारियां विश्व थोर । सिंहकात्मजा-सारिखा ॥ ५६ ॥ सर्वज्ञ च सर्व ही सज्जन । परि वक्ता असे एकवचन । ह्मणून आपुलेन पूर्णपणें । मौन्यमुद्रारूढ परिसती ॥ ५७ ॥ येथें अ-ध्यात्मविषय । श्रुति समंध सुगमोपाय । प्रयोजन शिष्यप्रार्थना होय । सर्व-ज्ञतेकारणें ॥ ५८ ॥ सुगमोपायें आत्मस्थिति । सद्गुरु शिष्याप्रति उपदे-शिती । ते गुरुशिष्यलक्षणसंपत्ति । बोलिजेलि आतां ॥ ५९ ॥ त्या-नंतर अधिकारिया शिष्याकारणें । अंगिकारूनि उपदेश करणें । उठ-विजेलि द्वैताचें धरणें । मुळींहूनि ॥ ६० ॥ तेथें अज्ञानतमाचा नाश । ज्ञानसूर्याचा होय प्रकाश । स्वानंद विस्मय सावकाश । शिष्य प्रश्न करील ॥ ६१ ॥ प्रश्नपरिहारार्थ पदद्वयाचा अर्थ । तृतीय पदें कीजेलि

१ निर्धास्तपणें. २ काळीज. ३ निर्दाळन. ४ योगयागाचे ठिकाणीं. ५ तद्‍ त्व. ६ असि.

कृतार्थ । माया ब्रह्म भिन्न भिन्नार्थ । निवडिजेलि आधीं ॥ ६२ ॥ तो ही भिन्नत्वाचा संभ्रम । निरासिजेलि बोधूनि अद्वैत निभ्रम । समस्तं खल्विदं ब्रह्म । निरोपिजेल ॥ ६३ ॥ हे स्थिति नित्य निरंतर । व्हाव-याळागीं दृढतर । अभेद भक्तीचा निर्धार । कीजेल सुगमें ॥ ६४ ॥ ते भक्तीसी आभारलेपणें । विरक्ति स्वानुभूति अनायास गुणें । अवघिया देवें च आपणासि देणें । भक्तां हातीं ॥ ६५ ॥ भक्तिविरक्तियुक्त नित्य-मुक्त । स्वकर्मकर्तव्य यथोक्त । नसोनि विधिकिंकरत्व हें व्यक्त । बोलि-जेलि अनुक्रमें ॥ ६६ ॥ तरि सज्जन सुह्रद कृपाभरीं । माझी मति हे बाळक्रीडा करी । वाणी लुलित चि परि आशयज्ञ चतुरीं । आदरेंसीं परिसिजे ॥६७॥ स्वस्ति श्रीमत्सुगमोपाये । रामीरामदासकृते । मंगळाचरनं नाम । प्रथम प्रकरणम् ॥ श्रीरामार्पण ॥ राम ॥

---

॥ श्रीराम ॥

पूर्वे प्रकरणाचे प्रांतीं । वक्ष्यमाण पदार्थ बोलिले निर्गुती । तेथें प्रथम गुरुशिष्यलक्षणस्थिति । ते चि बोलिजेत विस्तरें ॥ १ ॥ आतां परिसावें महंतीं । आधीं गुरुलक्षणसंपत्ति । एक सद्गुरु प्रसिद्ध होती । एक ते असद्गुरु ॥ २ ॥ सच्छब्दें ब्रह्म शाश्वत । असत्प्रपंच अशाश्वत । जयाची बुद्धि जेथें निरत । तें चि अभिधान तयासी ॥ ३ ॥ सद्गु-रुमध्यें एक शरण्य एक अशरण्य । असद्गुरुमध्यें ही वरेण्य एक अव-रेण्य । स्त्रिया आणि हीन वर्ण । तेथें गुरुत्व चि नाहीं ॥ ४ ॥ ऐसें ही असे साधारण वचन । जें सकळीं सकळांपासूनि घ्यावें ज्ञान । तरि सद्गुरूचें पडेलि ओवर्पण । तेव्हां कीं हें ॥ ५ ॥ पूज्य असतां विद्य-मान । अपूज्याचें करी पूजन । तेथें फळ कैचें हानिस्थान । ऐसीं वाक्यें

पुराणीं ॥६॥ गुरुत्वाचांठाईं धरूनि भाव । भजन मांडिलें सांडूनि देव । तो तरणोपाय कीं प्रादुर्भाव । निर्फळलें दोषाचा ॥ ७ ॥ जयांसि महावाक्यीं अनधिकारित्व । तेथें गुरुत्व हें धनेवीण दातृत्व । आणि पूर्वीं ही प्रसारत्व । नाहीं परंपराचें[1] ॥ ८ ॥ आतां असोत ते अगुरु । परिसा गुरुपदप्रकारु । प्रथगाकारें[2] निर्धारु । बोलिजेलि जो ॥ ९ ॥ विषयाशइ[3] असद्गुरु । त्यांचा द्विविध विचारु । येकाचा सेव्यकारु[4] । येक तो सेऊं चि नये ॥ १० ॥ व्यभिचार अभिचारुक[5] । जारणमारणविध्वंसनादिक । कुयंत्र मत्रवंत कामिक । काय करावे ॥ ११ ॥ आमिषविक्रई[6] जो कश्मळ[7] । त्याभोवतें मिळे ककाकार्ककुळ[8] । तेथें मुक्तभोक्ते[9] जे मरोळ[10] । ते कासया वैसती ॥ १२ ॥ आतां परंपराशुद्ध शब्दज्ञान । आणि आपण वाष्कळ क्रिया मलिन । तो असद्गुरु परि शिष्य उदासीन[11] । तेणें संकटीं सेऊं नये[12] ॥१३॥ जैसें अनर्ध्य[13] रत्न पर्कीं पडलें । काय तें पंकत्व त्यासि जडलें । तें जारि दुर्बळा सांपडलें । तेणें अवश्य घ्यावें ॥ १४ ॥ परि तया वापुडिया मुमुक्षा । लागेल कोणाची बरी दीक्षा । स्वयें[14] च सत्साधनें अपरोक्षा । पावणें हें दुर्गम[15] ॥ १५ ॥ समर्था सद्गुरूचे पाय । न जोडती तरि करिल काय । परंतु ज्यांचा भव अनुभव तरणोपाय । ते चि शिष्यां तारकु ॥ १६ ॥ एवं असद्गुरूचें लक्षणद्वय । वर्णिलें यथा अन्वय । आतां सद्गुरुवृत्तद्वद्ववर्णन उपाय । निर्द्वद्वतेकारणें[16] ॥ १७ ॥ आतां सद्गुरु आणि सेव्य नाहीं । हें परमाश्चिर्य

---

१ पूर्वी हि अशा रीतीनें परपरा प्रसार पावलेली नाही. २ पृथक्पणें. ३ विषयासक्त. ४ सेवा करण्या जोगता. ५ मन्त्री, जादूटोणा करणारा. ६ मांस विकणारा. ७ मळीण, अमगळ, पापी ८ बगळे व कावळे यांचा समुदाय. ९ मुक्ताफलांचा उपभोग घेणारे. १० हंसपक्षी. ११विषयाविषयीं उदासीन, वैराग्यशील. १२ हा प्रश्न आहे. सेवावा हा भावार्थ. १३ अमोलिक, अमूल्य. १४ स्वतः सत्साधनें करून अपरोक्षानुभव पावणें हें दुर्घट आहे. सद्गुरुविण मोक्ष पावावा । हें कल्पांतीं न घडे ॥ ( दासबोध ५।१।४४). जमाचा दिठिवा वसतु । जव न रिघे निगम वनाआतु । तव आपुलिये फळा हातु । न घेपतिहि ॥ ( अमृतानुभव २।१८.) १५ ब्रह्मज्ञान. १६ द्वंद्व नाहींसें होण्याकरितां.

दिसे पाहीं । ऐसें ह्मणिजेलि तरि परिसिजे जें कांहीं । वोलिजेतसे ॥१८॥ सल्लक्षणें आणि सद्वृत्त । आणि निरंतर असे निवृत्त[1] । न लक्षी शिष्य आर्तचित्त[2] । स्वकीयानंदें[3] ॥ १९ ॥ अथवा जोडलीया परमार्थ । आपण जाला कृतार्थ । परंतु शिष्यप्रवोधीं समर्थ । नव्हे चि जो स्वता ॥२०॥ तो सद्गुरु हें प्रसिद्ध । परि शिष्याचें कार्य नव्हे सिद्ध । तयाचें सेवन च विरुद्ध । प्रातिविपईं[4] ॥ २१ ॥ जैसा धनवंत आहे यथार्थ । परि याचका प्राप्त नव्हे अर्थ । तयासि वोलेंगणें चि व्यर्थ । उभयता श्रम ॥ २२ ॥ तस्मात्सद्गुरु होत्साता अभेज्य[5] । स्वभावें चि सच्छिष्यासि जाला त्याज्य । आतां परिसावा परम यज्य[6] । सद्गुरु स्वामी ॥ २३ ॥ सद्गुरुनामस्मरणमात्रें । तत्काळ पावन होती गात्रें । नमस्कार कारितील तें मात्रें । पूर्ण परमानंदाचीं ॥२४॥ कारितां सद्गुरूचें स्तवन । परादि वाचा पडे मौन । जरि तयाचे चि होय वरदान[8] । तरि तद्रूपत्वें वर्णवे ॥ २५ ॥ सद्गुरु ह्मणिजे सर्वेश्वर । त्याचिया गुणासि कैंचा पार । तथापि करावया जगदुद्धार । मनुष्यवेषधारी ॥ २६ ॥ जयाचिये उघडिये दृष्टीं । ब्रह्मरूप नांदती सृष्टी । आकार निराकार हे गोष्टी । उरली नाहीं ॥ २७ ॥ समाधि होत्साता व्युत्थान । नुरोनि जाणती सर्व ही भान । काष्ठादि देहींचें स्थानमान । जयां सहज चि तुछ ॥ २८ ॥ देह-प्रारब्धाचिये गती । आत्मा ब्रह्मांडासि ही नेती । परि पिंड ब्रह्मांड हे भ्रांती । नाहीं जयां ॥ २९ ॥ योगसामर्थ्यें वोळे[10] सिद्धि । मर्त्य पावे अमरत्व शुद्धि । परि तयांसि नाहीं देहेंबुद्धि[11] । आत्माराम सर्वदा ॥३०॥ येथें आक्षेप असे गहन । देहबुद्धि चि जाली दहन । तेणें पिंडरक्षिते

---

१ जनसंगापासून, सृष्टिव्यवहारापासून निवृत्त झालेला. २ दुःखित, विषण्ण, संसारतापानें दीन झालेले. ३ स्वतःच्या आनंदानें. ४ शरण जाणें. ५ सेवा करण्यास योग्य नव्हे असा. ६ पूज्य. ७ जे त्यांना वंदन करतात त्यांना नामरूपरहित अखंडानंदाची प्राप्ति होते. ८ प्रसाद. ९ श्रीगुरूच्या दृष्टीचें ऐश्वर्य असें आहे कीं, शिष्याचे ठिकाणीं अविद्येनें प्रतीत होणारें जगत् हें ब्रह्मपणाला येतें ह्मणजे जगत् ब्रह्म च होतें. १० प्राप्त होते. ११ देह तो च मी अशी भावना.

योग आवाहन । कासयासि करावें ॥ ३१ ॥ या प्रश्नाचें प्रत्योत्तर । श्रवण करावें सादर । ब्रह्मानंदें निर्विकार । स्वाचारीं स्वानुभवीं ॥३२॥ निजात्मत्व प्राप्त जालें । तथापि देह उरलेपणें तन्हीं राहिलें । तेथें आचरण असें विहिलें[१] । प्रारब्धाचेनि प्रवाहें ॥ ३३ ॥ तेथें अविप्रकंपता योगेश्वरी । ब्रह्मरूप जे वर्ते संसारीं । तरी योगाभ्यास जो करी । तो काय भ्रमें बाधी ॥ ३४ ॥ हरिहरादि ब्रह्मादि जे पर्यंत । नवनाथ सोळा सिद्धादि अनंत । त्यांसि योगाभ्यास चि उचित । स्वभावशीळें ॥ ३५ ॥ आणिख ही ब्रह्मरूप जगीं । निरंतर वर्तती ब्रह्मयोगी । ते ब्रह्मरूप निजांगीं । क्रियेसहित ॥ ३६ ॥ ब्रह्मबोध नसतां अंतरीं । शुष्क काष्ठा च जो धरी । तो निर्फळ हें काय उत्तरीं । साधावें लागे ॥३७॥ केवळ देहसमंधी ज्ञान । त्याहूनि थोर कैचें अज्ञान । ह्मणोनि धन्य जे सज्ञान । सभंरसोनि ठेले ॥ ३८ ॥ यैसा पूर्वशंकेचा प्रांत । जाला चि कीं यथोचित । स्वानुभवी सदोदित । सहजस्वरूपीं ॥ ३९ ॥ ब्रह्मैक्यावबोध पारावारीं । आब्रह्मस्तंभवरि जीवलहरी । स्वानुभवें निजांगें क्रीडा करी । तो महासिद्ध सद्गुरु ॥ ४० ॥ जयाचें निजरूप देह । अनंत ब्रह्मांडाचें गेह । तया स्वयंभों शरीरसंदेह । मुळींहूनि नाहीं ॥४१॥ लीळा प्रकृति मानुषी । परि सामर्थ्य सर्व ही अमानुषी । कृपाकटाक्षें ब्रह्मवेषी । जीव करणें तत्काळ ॥ ४२ ॥ जया स्वरूपानुभवें कांहीं । निःशेष ही कर्तव्य उरलें नाहीं । सहज कर्म निपजे देहीं । तें ही ब्रह्मस्वरूप ॥४३॥ जयाचीये स्वासोस्वासीं । जप आले विश्रांतीसी । क्रीडेमाजी अनायासीं । तपें तापा विसरलीं ॥ ४४ ॥ जयाची सहज सुगम वाणी । व्याकर्ण तात्पर्याची खाणी । ज्याची स्वभावचर्चाश्रेणी । निश्रेणी परम पदाची ॥ ४५ ॥ जयाची स्थिति परमसेवा । गति च यात्रा आत्मदेवा । गोष्टी

---

१ विहित, योग्य. २ निश्चलता. ३ एकत्वाला पावले, ब्रह्मस्वरूपाकार झाले. ४ स्वतः सिद्धाला. ५ कल्याण करणारी. ६ स्वस्वरुपानदांत निमग्न झाल्याची स्थिति ही च त्याची परमसेवा. ७ तो चालतो ती च त्याची यात्रा. ८ त्याचें जें बोलणें तें च श्रीराघवाचें स्तवन.

स्तुति श्रीराघवा । चिंता चिंतन ध्यानाचें ॥ ४६ ॥ ब्रह्मीं अमूर्तत्व सीणलें । प्रपंचीं मूर्तत्व क्षीणलें । त्या दोहींसी सामरस्यत्व वाणलें । ज्याचेन स्वरूपें ॥ ४७ ॥ ब्रह्मीं कैंचा कृपाभर । न घडे दीनाचा अंगिकार । ह्मणोनि ब्रह्म मूर्तिमंत योगेश्वर । श्रीसद्गुरु सुसेव्य ॥४८॥ ब्रह्म स्पर्शासी न पडे ठावें । सद्गुरूसि कवळूनि क्षेमें द्यावें । ब्रह्म दृष्टीं न दिसे स्वभावें । डोळे भरूनि पाहावें गुरूशी ॥ ४९ ॥ ब्रह्मीं वाचा निवर्तती । सद्गुरूशीं बोलावें प्रेमप्रीतीं । ब्रह्मीं करितां न ये भक्ति । सद्गुरुमूर्ति पुजावी ॥५०॥ ब्रह्म देवाची देवकळा । परंतु ब्रह्मीं नव्हता हा सोहळा । ह्मणोनि ब्रह्म मूर्तिमंत स्वलीळा । सद्गुरु स्वामी ॥ ५१ ॥ ऐसा सद्गुरु श्रीराम तो अनुपम्य । तयासि अनन्यभावें प्रणम्य । जयाचें महिमान अगम्य । अनुग्रहें अनुभवे ॥ ५२ ॥ ऐसीं सद्गुरूचीं लक्षणें । लक्षावीं शिष्यें विचक्षणें । तयासि सेऊनि उपेक्षणें । पूर्वोक्तांसी ॥ ५३ ॥ तेणें स्वामी सद्गुरुनाथें । यथाधिकारें उद्धरावीं अनाथें । परतु शिष्यलक्षणें समर्थें । लक्षावीं च कीं ॥ ५४ ॥ तरि एक शिष्य एक असच्छिष्य । त्याहीमध्यें अपेक्ष्य उपेक्ष्य ऐसें भाष्य । एक ते केवळ अशिष्य । पतित आणि सुवासिनी ॥५५॥ प्रत्यक्ष पतित तों पाहों चि नये । कामिनी चित्रीं ही नये नये । तेथें एकांत करणें हें काये । अनुग्रह कीं ग्रहेंगती ॥५६॥ कदापि ऐसें ह्मणती उच्छृंखळ । आह्मी स्त्रीपुरुषत्व नेणों केवळ । तरि काय वशिष्ठ पराशराहूनि दुर्वळ । अधिक होईल कळीचा ॥५७॥ स्त्रीपुरुषत्व न दिसे अनुभवें जेणें । अनुग्रह करणें केवि घडे तेणें । अमर्यादतेचा पक्ष जयासि घेणें । तो अधःभ्रंशे तर्वता ॥ ५८ ॥ अहो स्वधर्माची ही भिन्न वार्ता । भर्ता देव गुरु भर्ता । तेथें अन्य धर्म सखोल गर्ता । पतनाशी

१ ब्रह्माच्या अमूर्त स्वरूपाची व प्रपचाच्या मूर्त स्वरूपाची कल्पना नष्ट होऊन, दोन्ही कल्पना सद्गुरूचे ठिकाणीं एक झाल्या. २ मूर्तिमत ब्रह्म ह्मणजे च श्रीसद्गुरु. ३ आलिंगन. ४ पूर्वी कथित केलेले तीन प्रकारचे गुरू. ५ भक्तिरहस्य प्रकरण ७ पहा. ६ स्त्रीत्व व पुरुषत्व यात भेद आह्मी मुळीं च जाणत नाहीं असें ह्मणणारे कलियुगांतील दुर्बळ लोक ते वसिष्ट, पराशराहून श्रेष्ठ आहेत असें ह्मणता येईल काय ? ७ विकारवश होतो. ८ सरोखर. ९ खड्डा, खांच.

च कीं ॥५९॥ स्त्रियांसी जप तप अनुष्ठान करणें । तें भर्तृप्रशसेकारणें । पतिव्रताप्रभावें चि तरणें । अंवलीळेकरूनि ॥ ६० ॥ कैवल्यनिधान-प्राप्तीचें अजन । मुख्य जिवासि आत्मज्ञान । तरि ज्ञानसिद्धीचें साधन । स्वामीसेवा पतिव्रते ॥ ६१ ॥ यन्हवी तन्हीं नवविध भजनें च केवळ । पृथुकाकारें कैवल्यफळ । तिहीं ज्ञानार्थ अन्य साधन केलें प्रबळ । कीं ज्ञान जालें चि नाहीं ॥ ६२ ॥ ते समर्था भगवताची भक्ति । हे दुर्वळा भ्रताराची न्यक्ति । ऐसी अभावाची वृत्ति । गुरुसेवनें ही सरेना ॥ ६३ ॥ गुरु ह्मणिजे प्रत्यक्ष मानव । परि तो सकळा देवाचा हि देव । ऐसा होय शिष्यसद्भाव । तरी च तो कृतार्थ ॥ ६४॥ गुरु ज्ञानउपदेश करी। भर्तारें विषयवासनें वरी । हें कल्पावें तरी सेवेची[४] थोरी । ज्ञानकळा प्रकाशी ॥ ६५ ॥ श्रीकृष्णमूर्तिदर्शनें । स्त्रिया तरल्या सस्पर्शनें । परतु अध्यात्मविद्याकर्षणें । उपदेशिल्या नाहींत ॥ ६६ ॥ पूर्वोत्पर आहेति च आत्मज्ञानी । आणि स्त्रिया हीं अति सुसीळा जनीं । परि परस्त्रीप्रबोधपरंपरा कानीं । नाइकिजेति जनीं ॥६७॥ कदापि विधवा अनाथा न्यस्तकामा । सुसीळा भजविल्या श्रीरामा । विजितेंद्रियें यथान्यायें तरि क्षमा । करील जानकीनाथ ॥ ६८ ॥ श्रीरामभजनें तरल्या गतभर्तृका । प्रसिद्ध पुराणीं गुणवत्यादिका । परतु अन्यं धर्मे तरल्या सभर्तृका । ऐसें नाहीं कोठें ही ॥ ६९ ॥ एव परस्त्रिया आणि पतित । शिष्य नव्हती हे निभ्रांत । आतां परिसावीं यथोचित। सत्शिष्यअसत्शिष्यलक्षणें ॥७०॥ उपेक्ष्यें जें असल्लक्षणें । तें बोलतां वाणी व्यर्थ शिणे । परतु सत्प्रशंसे-

---

१ सहज. २ त्या समर्थ ईश्वराची नवविधा भक्ति कोणीकडे व ह्या दुर्वळ भ्रताराची नवविधा भक्ति कोणीकडे अशी जिची आपल्या पतविषया अभाव वृत्ति असते तिचें समाधान गुरु करून हि होणें नाहीं. ३ भर्ता विषयवासना पुरविणारा असतो. ४ सेवेचा महिमा च असा आहे कीं ती ज्ञानकलेला प्रकाशते. ५ अध्यत्मविवेकडे मन ओढून घेऊन. ६ परस्त्रीला प्रबोध करण्याची परंपरा आमच्या कानीं आलेली नाहीं. ७ ज्यानीं कामाचा त्याग केला आहे असा. ८ श्रीरामाच्या भक्तीला लाविल्या. ९ पतिसेवेवाचून दुसऱ्या साधनानें. १० सुवासिनी. ११ निश्चित. १२ त्याज्य.

कारणें । बोलावें लागे ॥ ७१ ॥ धूर्त लंड विषय लंपट । उच्छृंखळ धीट वाजट । निर्लज्ज निष्ठुर आणि शठ । स्वकार्यतत्पर ॥ ७२ ॥ अभावी कुभावी कुश्चिळ । क्रूर क्रोधी कश्मळ । कामी कळाभिमानी कराळ । कातर आणि कुरटा ॥ ७३ ॥ आसुरी संपत्तीचा आसुर । सकाम अनुष्ठानाचा भर । कुविद्याअभ्यासीं तत्पर । दंभाचारवंत ॥७४॥ मंत्र यंत्र चमत्कार पाहे । ऋद्धि सिद्धीची तृष्णा वाहे । निश्चयीं चित्त क्षण न राहे । चंचळपणें ॥ ७५ ॥ वरि वरि भोळा अंतरीं कपटी । गुह्य गेवसी रिघोनि पोटीं । मर्म विदारूनि सेवटीं । आणिकां सेवित चि फिरे ॥ ७६ ॥ जिगीषपणें अति वाचाळ । सर्वज्ञतेचा मंद विशाळ । संतांपासूनि इच्छी प्रबळ । महत्व आणि सत्कार ॥ ७७ ॥ आतां असोत ते मोहमद्यांचीं भाजनें । केवीं भरावीं ज्ञानगंगाजीवनें । ब्रह्मज्ञ ब्राह्मणीं उदास मनें । परित्यक्त करावीं ॥ ७८ ॥ आहो सद्गुरु कारुण्यसागर । ह्मणोनि न करीत त्याचा अंगिकार । कां जें येथें घडतां अनादर । कोण उद्धरूं शकेलि ॥ ७९ ॥ एवं असच्छिष्य उपेक्षावे । हें प्रसिद्ध चि आहे स्वभावें । आतां यामध्यें ही एक आपेक्षावें । ते हि बोलिजेत असे ॥८०॥ ब्रह्मज्ञानाकारणें केवळ । बुद्धि पाहिजे अति विशाळ । ते बहिर्मुखा असिली प्रबळ । तरि तो अंगिकारावा ॥ ८१ ॥ कर्मठपणें कर्मनिष्ठ । जनभयें जितेंद्रिय वरिष्ठ । ते बुद्धि करितां ब्रह्मनिष्ठ । कष्ट कांहीं न लगती ॥ ८२ ॥ बाह्यरंगार्थ शरण आला । तया अंतरंग प्राप्त जाला । सहज बुद्धीनें आथिलें । कां पां आळस करील ॥८३॥ तक्र मागतां लाभे अमृत । तरि चतुर कां लपवी हात । लंका देऊनि चिरंजीव करी सीताकांत । काय विभीषणा न मने चि ॥८४॥ कुंभीं प्रदीप्त दीप होतां । त्याची कोंडली होती प्रकाशता । तो चि मंदिरीं ठेवितां स्वता । प्रकाश आहे तितुका ही ॥ ८५ ॥ तैसी देहबुद्धीची गोडी । धरूनि होतां

---

१ वाचाळ. २ घाणेरडा, पापी. ३ क्रूर, भयंकर, कर्कश स्वभावाचा. ४ भित्रा, भ्याड, नामर्द. ५ काढून घेतो. ६ जिंकण्याच्या इच्छेनें. ७ स्थानें, पात्रें. ८ ज्ञानरूपगंगेच्या उदकानें. ९ मदण करावें. १० संपन्न.

वृत्तिं बापुडी । तीसी स्वरूपप्राप्ति जालियां फुडी । न सोडी सोडवितां ही ॥ ८६ ॥ ह्मणोनि बहिर्मुख बुद्धिमंत । सकामतेचा शरणागत । असत् शिष्य परि उचित । गुंडऔषध प्रकार ॥ ८७ ॥ आतां सच्छिष्यामाजि उपेक्षा । त्याची ऐसी असे परीक्षा । सर्व लक्षणें आहेति मुमुक्षा । येकि बुद्धि चि नाहीं ॥ ८८ ॥ जैसें परम प्रीतीचें बाळ । आणि माता ही अति कृपाळ । जरि मुख चि नाहीं तरी स्तनकवळ । घालील कोठें ॥ ८९ ॥ अत्यंत थोरसाचिया भरा । हृदयीं लोटती अमृतधारा । बाह्य भिजविलियां शरीरा । काय प्रतिपाळ होईल ॥९०॥ त्योसी साधनयंत्रें पाडितां मुख । वांचलें तरि हो संन्मुख । परंतु सद्य निजात्मसुख । सेवनीं योग्य नव्हे चि ॥ ९१ ॥ एवं असत्शिष्याचीं उभय लक्षणें । त्याचें जालें परीक्षणें । आणि सच्छिष्य होत्साता उपेक्षणें । तें ही जालें ॥ ९२ ॥ आतां शुद्ध सच्छिष्य वर्णावया कोडें । याणी प्रवर्त्तली निवेडें । तरि सज्जन श्रीमंतीं स्वानंद सुरवाडें । श्रवण करावें ॥ ९३ ॥ मुख्य ज्ञानामृतासी सत्पात्र । ब्राह्मण होय पवित्र । कां जें प्रणवबीज आरोपिलें क्षेत्र । ह्मणउनियां ॥ ९४ ॥ वरि सद्गुरु कर्णधार जीवनें । अंकुरोनि विस्तारें शुद्ध सौधनें । तेथें निजात्मफळप्राप्ति महिमानें । अखंडित ॥ ९५ ॥ इतर वर्ण तरी स्वधर्मी च भ्रष्टले । तथापि जे अनुतापें तापले । शमें दमें साधनें ब्रह्मवर्चस्वा आले । तरि ते हि अंगिकारात्रे ॥ ९६ ॥ केवळ भावें स्मरती राम । विवेकें विषयवासनेचा विराम । कां तीव्र वैराग्यें दृढ नेम । सर्वसंगपरित्यागी ॥९७॥

---

१ खरोखर. २ ज्याप्रमाणें गुळाच्या गोडीवरोबर कडू औषध हि मनुष्य घेतो त्याप्रमाणें. ३ अतिशय स्नेहभरित झाली, अतिशय पान्हा आला. ४ त्या बाळाला यंत्राच्या साधनानें जरी मुख पाडलें व मुख पाडल्यावर तें कांहीं काळ वांचलें तरी तें बाळ फक्त सन्मुख ह्मणजे चांगल्या मुखाचें मात्र होईल; त्या मुखाला आपलें दुग्धप्राशनाचें काम करितां येणार नाही. ५ आवडीनें. कौतुकानें ६ निवडक शब्दांनीं. ७ प्रफुल्लित होऊन, सुखानें. ८ ॐकार मंत्ररूप बीज. ९ अंकुर फुटून. १० नित्यनैमित्तिक कर्मरूप साधनांच्या योगानें. ११ अंतरिंद्रियांचा निग्रह. १२ बाह्येंद्रियांचा निग्रह.

आतां असोत बोलिले इतर । मुख्य ब्राह्मण जे कां धेरामर । सर्व शास्त्राचा पावोनि पार । सद्गुरुकारणें विठ्ठळ ॥ ९८ ॥ सहज वंशज सुशीळ । समर्याद सहिष्णु बुद्धि विशाळ । निर्वाह धृति मेधा विमळ । आचारविचारवंत ॥ ९९ ॥ जैसा द्वादशरूपी दिवसपति । परि पृथकाकारें संपूर्ण स्थिति । तेवि सर्वलक्षणसंपन्न महामति । ज्या एकें च होय पूर्णता ॥ १०० ॥ ते मूर्तिद्वयें एकरूप । सद्गुरु सच्छिष्य ब्रह्मस्वरूप । करावया जगदोद्धार अर्पेअप । निःप्रपंच अवतरले ॥ १ ॥ ऐसी गुरु शिष्य लक्षणसंपत्ति । जे वर्णिली यथामति । ते संतां प्रिय येथें उपपत्ति । प्रसिद्ध च आहे ॥ २ ॥ विष्णूसी क्षीरसागरीं शयन । ह्मणोनि वल्लभें उपोषण । तैसे सज्जन ज्ञानघनें । ह्मणोनि आपें आवडे । ॥ ३ ॥ सोडूनि श्रुतिवाक्यनिर्गूढग्रंथीं । देशभाषा परमार्थ प्रगटावा ग्रंथीं । परंतु अश्रुत प्रमेय आणावें यदर्थी । अति साक्षेपी ग्रंथकार ॥४॥ परंतु उत्तरोत्तर अवशेष प्रमेयें । वाल्मिकापासोनि यथान्वयें । बोलत चि आले स्वयें । नवीन कोठूनि आणिती ॥ ५ ॥ तथापि जितुका ग्रंथ तितुकी मुंद्रा । हें भिन्न सामर्थ्य श्रीरामचंद्रा । येक च अर्थ बोलतां योगींद्रा । हें ही प्रसिद्ध च कीं ॥६॥ आतां पूर्वे सज्जन जगीं । सहज श्रेष्ट अपरांलागीं । त्या सर्वांचा शेष विभागी । प्रार्थित असे ॥७॥ सकळावशेष ब्रह्म निर्मळ । जेथें नाहीं मायापेंडळ । तें सद्गुरू सच्छिष्य उपदेशिती निखळ । पुढिलीये प्रकरणीं ॥ १०८ ॥ स्वस्ति श्रीमत्सुगमोपाये । रामीरामदासकृते । गुरुशिष्यलक्षणवर्णन । नाम द्वितिय प्रकरणम् ॥श्रीराम॥

---

श्रीराम

पूर्व प्रकरणांतीं कथा उत्पन्न । जे सद्गुरु सच्छिष्यासी करिती ब्रह्मसंपन्न । तरि आतां तें चि बोलिजेलि वित्पन्न । परिसोत अध्यात्मनिष्ठ

---

१ भूदेव. २ आर्त. ३ पृथक् पृथक्, बारा रूपानीं. ४ सद्गुरु व सच्छिष्य. ५ प्रिय. ६ ज्ञानपरिपूर्ण. ७ अज्ञानाचें बोलणें, बोबडे बोल. ८ गुप्त. ९ गाठ. १० ठसा, तन्हा. ११ पडळ.

॥१॥ शिष्यें श्रीगुरु कृपामूर्ति । प्रार्थिजे वर्णूनि विमळ कीर्ति । जी मज अज्ञान अनावृष्टि चातकाची आर्ति । निरशी ज्ञानघना ॥२॥ विषयमृगजळीं धरुनि अभिळाष । जीवमृग धावतां जाला हृदयशोष । शाश्वत जीवनसरोवरा करीं तोष । संतापतृषा निवारीं ॥ ३ ॥ जी मी मूढ पशुमत्सवेषी। काळहिंसकें धरिलों कर्मपाशीं । जगदेक धार्मिका अविनाशी । पुण्य घेईं सोडवीं ॥ ४ ॥ तापत्रयानळें पोळलों पाहें वैसावया । तवं जन दग्ध दिसे सद्गुरुराया । तुझी सुरतरु सफळ सीतळ छाया । ह्मणोनि खोळणी घेतली ॥ ५ ॥ विनंत विनवी सद्गदीत । नयनीं अश्रु उचंबळत । अनन्य भावें शरणागत । चरणावरी लोटला ॥ ६ ॥ बाप अनाथ जन अधिकारी । उठऊनि बैसविला समोरी । एका शिष्याचा कैवारी । ब्रह्मांड केलें स्वरूप ॥ ७ ॥ तो श्रीमत्सद्गुरु पंचानन । अभयकर चपेटा उभारून । महावाक्यघोषें गर्जायमान । देखोनि भवगज शमे शत्रेसीं ॥ ८ ॥ तेथें असंभव श्रींचा अति गजर । पातले अनंत सिद्ध अदृश्याकार । वरुण ईशान दिव्य चामर । आत्मभावें ढाळिती ॥ ९ ॥ स्वर्गस्था पूर्वजासि सोहळा । दुंदुभिगजराचा येकनळा । कोटि विघ्नें प्रेरी सेहस्रडोळा । परि.शांभव तेजें तन्मये ॥ १० ॥ कदापि ऐसें भावितील चतुर । अमर्यादता ईशानकरीं चामर । तरि अमर्यादा नव्हे तो अधिकार । आपुलिया पक्षाचा ॥ ११ ॥ ज्ञान मुख्य शार्वरी संपत्ति । तो जंव न करी साह्यवृत्ति । तंव जीवा दुर्बळासी आत्मप्राप्ति । हें केंवि घडों शके ॥ १२ ॥ तेथें देवत्रयाचिया शक्ति सूक्ष्मगति । ज्ञानोत्पत्ति सस्थिति ज्ञातृत्वाची हि शांति । सर्व जीव अशेष कर्म धर्म फळ निष्पत्ति । बोळोनि[13] आलिया ॥ १३ ॥ एवं संपूर्ण प्रातीच्या काळीं । सद्गुरु निजात्मत्वें न्याहाळी । अवलोकनद्वारा हृदयकमळीं ।

१ उत्कट इच्छा २ आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक असे त्रिविध ताप. ३ त्रिविध तापानें पोळलेले. ४ नम्र ५ 'तत्त्वमसि' हें महावाक्य. ६ ईशान्य दिशेचा अधिकारी ईश्वर. ७ उत्साह ८ एकोपा. ९ इंद्र १० अध्यात्मविद्या हिला शांकरी विद्या असें हि ह्मणतात. ११ ब्रह्मा, विष्णु आणि महेश. १२ उत्पत्ति, स्थिति, शांति ( लय ) १३ प्राप्त झाल्या.

चित्कळा प्रकाशिली ॥ १४ ॥ स्वकीय सांप्रदाय प्रमाण । केलें महावाक्य श्रवण विवरण । येथें शिष्यप्रज्ञा कारण । ते फळली स्वानुभवासी ॥ १५ ॥ तेणें अज्ञानतमासी नाश जाला । ज्ञानसूर्य अखंडैक प्रकाशला । ब्रह्मानुभवाब्धियें विकासला । भावाष्टकलिकासमूह ॥ १६ ॥ स्वानंदाश्रु नेत्रकमळीं । पांडुरता उत्पन्न गंडस्थळीं । कंठीं बाष्प हृदयकमळीं । दाटला स्वेद ॥ १७ ॥ जंघाद्वई प्रकंप थरथरां । रोमांचक उभारले शरीरा । निःसंज्ञता वाणली अभ्यंतरा । स्वानंद उभारा दाटला ॥ १८ ॥ तेथें शरीरा कोण सांवरी । तथापि अवस्था जिरऊनि अंतरीं । राहोनि प्रपंचा बाहेरी । प्रत्यगावृत्ति अवलोकी ॥ १९ ॥ अत्यंत भावार्थी सप्रेमळ । देवदर्शन घेतां उतावेळ । तवं देवत्व च पातलें केवळ । आपणां च पैं ॥ २० ॥ तया सुखासी कैंची समता । कोठें जीव कोठें निजात्मता । मग पूर्व सांसारिकें श्रमीं कृतार्थता । मानिता जाला ॥ २१ ॥ मिथ्यामय मायापटळ । सत्य चि भासलें होतें केवळ । जैसें नाथिलें चि मृगजळ । दाटलें दिसे ॥ २२ ॥ विचारितां तें कांहीं च नाहीं । शुद्ध स्वप्रकाश पाहीं । तैसें मिथ्या प्रपंचभान ही । केवळ ब्रह्म चि असे ॥ २३ ॥ ऐसा अवस्थात्रयाचा पावोनि प्रांत । चतुर्थीसी जाला सुविश्रांत । भासत च विश्व मिथ्याभूत । आत्मस्वरूप प्रकाशलें ॥ २४ ॥ निराकार निराभास निर्गुण । निर्मळ निश्चळ नित्य संपूर्ण । अनंताकाश व्यापूनि विस्तीर्ण । अपरांपर ॥ २५ ॥ आकार उत्पत्ति स्थिति नाशवंत । आत्मा निर्विकार सत्य शाश्वत । जेवि घट मठ विराट नाशे असत । आकाश अविकंप ॥ २६ ॥ नव्हे सीत पीत आरक्त नीळ । परि शुद्ध स्वप्रकाश सोज्वळ । गगनाहूनि सकुमार परि सघन नव्हे पोकळ । चित्तातीत परि सचेतन ॥ २७ ॥

---

१ ज्ञानाची ज्योत. २ शिष्याची विशाल बुद्धि. ३ पूर्वी केलेल्या सांसारिक श्रमाचें चीज झालें, असें मानिता झाला. ४ लटकें, खोटें. ५ जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ति. ६ जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्थांच्या पलीकडील जी अवस्था असते तिला तुरीय असें म्हणतात. ह्या स्थितीच्या ठिकाणीं वाचारंभण च संभवत नाहीं. तेथें स्फुरणाचा हि अस्त झाला आहे.

स्वरूपाभावें शून्य गगन । स्वरूपानुभवें सर्व ही सघन । दिसत च मिथ्या साकार भान । तैसें च हें ही ॥ २८ ॥ ऐसीये स्वरूपानंतसागरीं । चढली तन्मयत्वें चित्तलहरी । निःशेष सांसारिक भीतरीं १ बुडोनियां गेले ॥ २९ ॥ करितां निरालंबावलंबन । अर्धोन्मीलित जाले नयन । अंतःकरणचतुष्टयेंसीं मन । उन्मन जालें ॥ ३० ॥ ऐसा स्वानंदाचा सुकाळ । जाला जेथें नाहीं काळ वेळ । उपमा द्यावया तरी केवळ । विषयसुख चि आडळे ॥ ३१ ॥ तरि आब्रह्मस्तंभपर्यंत चि विषयानंद । तयासी वियोगदुःखाचा प्रमाद । आणि सेवीत अस्तां च होय मंद । विकृति वाटे ॥ ३२ ॥ ऐसिया सुखासी समता । केवि घडे स्वानंदा शाश्वता । तें निजात्मसुख स्वतां । स्वानुभवैकवेद्य ॥ ३३ ॥ स्वानंद तुळावया कंटाळे । सर्व जीवानंद तुकितां तुळे । पालडें गेलें अंतराळें । स्वानंदसीमा न कळे चि ॥ ३४ ॥ ऐसिये स्वानंदसुरवाडीं । अपेंअप अनुभवितां गोडी । प्रत्यगावृत्तीनें आवडीं । शरीर सांवरिलें ॥ ३५ ॥ जैसें भ्रष्ट भूपासी राज्य आलें । तेणें दुर्बळ सखया सांभाळिलें । तत्काळ चि समर्थ केलें । सामर्थ्यें आपुलिया ॥ ३६ ॥ सावध जालें अंतःकरणपचक । तेणें चेतविला इंद्रियदशक । परंतु स्वानंदाचें बीक । चढलें चि असे ॥ ३७ ॥ तो जागा ना निदैसुरा । येकायेकी ना दुसरा । अद्वैत च परि द्वैतप्रकारा । देखतु असे ॥ ३८ ॥ जैसें स्वप्नीं प्रत्यक्ष देखिलें जग । आणि जागा जालियां पाहे मग । तें स्मरत असे परि दृश्य भाग । मिथ्यामय जाला ॥ ३९ ॥ तैसें हें विश्व फिडार्ळ । निरसलें जैसें नभोचें सुनीळ । केवळ भासे अंतराळ । तैसें ब्रह्म अनुभवलें ॥ ४० ॥ कृतकृत्य ब्रह्मसाक्षात्कारें । निःशेष ही फिटलें भवेभुरें । दाटला सद्गुरूचेनि उपकारें । लोटला चरणांवरी ॥ ४१ ॥ सप्रेम साष्टांग नमस्कार घाली । प्रदक्षणा करी मंद पाउलीं । नाचे

---

१ निरालंब ह्मणजे आश्रयरहित जें परब्रह्म त्याचें अवलंबन. २ स्वानुभवानें च फक्त जाणलें जातें. ३ तोलतां. ४ पारडें. ५ स्वस्वरूपाकार वृत्तीने. ६ तेज. ७ निजलेला. ८ सोटें, लटकें. ९ भवरूपी भुरळ.

वाजवाजवी करताळी । जय सद्गुरु ह्मणऊनि ॥ ४२ ॥ उभा राहूनि कृतांजुळी । स्तुति करितसे मंजुळी । सद्गुरु रामा तू भूमंडळीं । अमूर्त मूर्तिमंता ॥ ४३ ॥ दासदेहाभिमान इंद्रियदशमुखांतका । जी जी दैवी संपत्ति निजपददायका । जी निर्विशेषा जगन्नायका । शरणागतवत्सल ॥ ४४ ॥ सद्गुरु रामा तूं सहस्रबाहु दशबाहु चतुर्बाहु द्विभुजा । सद्गुरु रामा तूं सहस्राक्ष पंचदशाक्ष द्विनेत्रांबुजा । सद्गुरु रामा तूं सहस्रपाद त्रिपाद द्विपाद सहजा । निराकारा निर्मळा ॥ ४५ ॥ तुझिया स्वरूपाचा विचार । तुजवीण न कळे हा निर्धार । ह्मणोनि करावया जगदोद्धार । तुज अमानुषी मानुष्य ॥ ४६ ॥ तूं ईश्वरेश्वरा आणि वनचरां । सुसेव्य जालासी करुणाकरा । अद्वयानंदा प्रकृतिपरा । शिष्य अंगिकारिसी ॥ ४७ ॥ जैसें बाळकाबरोबरी सक्रुपें । चालों बोलों लागिजे बापें । खडे मांडूनि लिहिजे साक्षेपें । तैसी करिसी शिष्यसंरक्षा ॥ ४८ ॥ जी तूं सर्वसंगपरित्यागी । आणि कारुण्येंकरूनि शिष्यानुरागी । तूं सम्यक् विज्ञानवान योगी । परि वियोगीं सांभाळिसी ॥ ४९ ॥ नवल तुझा कृपाकटाक्ष । प्रत्यक्ष अनुभवी अपरोक्ष । ब्रह्म च करणें मुमुक्ष । हें औदार्य अनुपम्य ॥५०॥ इंद्रादिदेवांसी जैसें भजावें । तैसें च तिहीं फळ द्यावें । विधानलोपें दुःख आणि छळावें । फळप्रातिद भजन चि ॥ ५१ ॥ सद्गुरु रामा तुझी प्रसिद्ध कीर्ति । भजनीं भावे च मानिसी पूर्ति । अभिमुख होतां चि विघ्न आर्ति । हरूनियां निजपद देशी ॥ ५२ ॥ कल्पवृक्ष कामधेनु चिंतामणी । उदारें होतीं वर्णिलीं पुराणीं । सायोज्यता आणि पुनर्याचा सिरोणी । कोण्ही निरसूं न शेकेति ॥ ५३ ॥ बाप सद्गुरु समर्थ दाता ।

---

१ भक्ताच्या ठिकाणीं असलेला दशेंद्रियरूपी दशमुखात्मक देहाभिमानरूपी जो रावण, त्याचा नाश करणारा. २ तू निर्गुण असून सगुणरूप धारण केलें आहेस. ३ दुःख. ४ उपभोग. ५ कल्पवृक्ष, कामधेनु, चिंतामणी हीं मागावें तें देण्याचे कामीं उदार ह्मणून त्यांची कीर्ति पुराणांतून वर्णिलेली आहे, परंतु तीं सायुज्यतामुक्ति देऊं शकत नाहींत किंवा पुनर्याचना सोडित नाहींत.

शिष्ययाचका दे आत्मसायोज्यता । तो ही कैवल्यदानी होय स्वतां । तेथें पुनर्याचा कैंची ॥ ५४ ॥ मेघीं औदार्य परि सामान्य । अनावृष्टि कार्पण्य देतसे दैन्य । सद्गुरु दानशूर अति धन्य । सदानंदप्रदाता ॥५५॥ करितां श्रीसद्गुरूचें स्तवन । शेषा अशेषमुखीं पडे मौन । परादि परतल्या आणि मन । ऐशा श्रुती गर्ज्जती ॥ ५६ ॥ ऐसिया सद्गुरु देवादिदेवा । उत्तीर्ण व्हावें कवणिया सेवा । जेणें ब्रह्मरूप केलें जीवा । कृपाकटाक्षेंकरूनि ॥ ५७ ॥ जो शाश्वत सुधासिंधु दे सकळ । त्यासी उत्तीर्णतेसी काय मृगजळ । कीं कल्पवृक्ष देईल त्यासी फळ । बोडंबरी-आम्राचें ॥ ५८ ॥ तथापि अवंचक स्थिति । समर्पी सर्व संपत्ति । ते गौण चि परि भजनरीतीं । प्रेमभावें संतोषे ॥ ५९ ॥ जैसें बाळ जेवितां बापाबरोबरी । ताटींचे च कवळ दे त्याचा करीं । तो तयाचें ह्मणोनि स्वीकारी । स्नेहभरें संतोषें ॥ ६० ॥ तें जरि वेंचू लागे त्यासी । तरि आपण च मुके सांगतासी । हे निष्ठा बाणे ज्या शिष्यासी । त्यासी जाली गुरुकृपा ॥ ६१ ॥ सद्गुरु औदार्यें उपदेशिती लक्ष्याशीचें ज्ञान । परतु शिष्या स्वानुभवें चि कीं समाधान । तें अनुभवनिधानप्राप्तीचें अंजन । अनन्यभावें गुरुदास्य ॥ ६२ ॥ ह्मणोनियां जी सद्गुरु महाराजा । कैवल्यदानाचिया भोजा । तुवां निरशिला माझा बोजा । अनादि संसारसभ्रम ॥६३॥ पडलों होतों शक्तिचक्राचा मेळीं[10] । मज येकासी पंचभूतबाधेची ओंकळी । सद्गुरुस्वामी तूं पंचाक्षरी अतुंबळी । येकें अक्षरें उपचारिलें ॥ ६४ ॥ येका अक्षराची करूनि कंडसणी । निःशेष केली भूतझाडणी । मज मी भुललों होतों निर्वाणीं । त्या मज मातें लक्षविलें ॥ ६५ ॥ तें माझें सत्य स्वरूप मज चि नाकळे । असत्य प्रपंचें मन अकळे । तें चि निरंतर निवळे ।

१ शेषाचीं सर्व सहस्रमुखें मुकीं झालीं. २ "यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह" ३ गारुडी विद्येनें उत्पन्न केलेल्या आंब्याचें. ४ निष्कपट. ५ ग्रास. ६ फसवू. ७ मदतीला. ८ बरोबर. ९ मायारूप शक्ति. १० मेळ=संयोग. ११ अकळी, वेदना. १२ अतुल आहे बळ ज्याचें असा, अति बलाढ्य. १३ बटव्याची दोरी. १४ विव्हल होतें.

आणि तें चि होऊनि असावें ॥ ६६ ॥ ऐसें सांगिजे स्वामीनाथा। ह्मणोनि पाउलें धरिलीं माथां। कृपासिंधु ह्मणे कृतार्था। वत्सा इच्छा अनुपंग्य ॥ ६७ ॥ जें देवांदिकांसि हि दुर्मिळ। वहुत जन्मानुष्ठानाचें फळ। तें तूं पावलासि निर्मळ। परब्रह्मस्वरूप ॥ ६८ ॥ राई गौच्या शृंगावरि थरे। तंववरी मन स्वरूपीं भरे। तरि उभय कुळ पूर्वज निर्धारें। उद्धारातें पावती ॥६९॥ तरि तूं सुपुत्र पूर्वजा त्राता। तुज चि लागी प्रसवली माता। तुवां निरशिलें पुनरागैता। ब्रह्मसाक्षात्कारें ॥७०॥ आतां तुझें मनोगत। जें ब्रह्म अनुभविलें अनंत। तें चि होऊनि राहावें सतंत। ऐसें तुवां प्रार्थिलें ॥ ७१ ॥ वा रे परम कल्याण असो तुज। तुवां स्वानुभव स्मरविला मज। तुझेनि योगें प्रगट सहज। स्वानंदाचा सोहळा ॥ ७२ ॥ जैसें बाळकासी यावया स्तनपान। आधीं मातेसी मिळे भोजन। कां दुजयासी दाखवितां निधान। आधीं आपण देखिजे ॥७३॥ तरि आइक चित्ताचें लक्षण। स्वरूप ह्मणिजे आपरूप जाण। तेथें भावी पारिखेपण। मिथ्या प्रपंच ऑपंगी ॥ ७४ ॥ चित्ताचा स्वभाव ऐसा चि आहे। क्षणभरि ही निश्चळ न राहे। अवस्तुत्वेंसी वस्तुत्वें पाहे। राहे वस्तु विसरोनी ॥ ७५ ॥ चित्त चि प्रपंचरचनेचें कारण। ह्मणोनि यासी हें नव्हे दूपण। जयासी पावणें स्वरूपाची खूण। तेणें जिंकिलें पाहिजे ॥ ७६ ॥ हें चित्त जिंकिलियावीण। जितुकें साधन तितुका सीण। अँभिनिवेशासी च कारण। कैंचा तेथें परमार्थ ॥ ७७ ॥ केव्हढा या चित्ताचा चमत्कार। तपोधर्नासी करी अनुसर। आणि आश्रमीं ही योगेश्वर। त्यासी दे दैवी संपत्ति ॥ ७८ ॥ नव्हतां चित्त अपवर्ग। त्रिभुवनविजयीं हि उपसर्ग। नहुषें पावलियां स्वर्ग।

---

१ गाईच्या शिंगावर राईचा दाणा जितका वेळ राहतो, तितका वेळ मन स्वस्वरूपाकार झालें तरी. २ पुनर्जन्म. ३ आपलें रूप, आत्मरूप. ४ स्वीकार करितोस, पोसतोस. ५ मिथ्या जो प्रपंच त्याला. ६ आत्मस्वरूप. ७ आसक्तीला. ८ जे तपोधन आहेत त्यांना आपल्या पाठीमागें कुत्र्यासारखें यावयास लाविते. ९ न होतां. १० मोक्ष, लय. ११ उपद्रव. १२ आपल्या वैभवाच्या अहंकारामुळें नहुष राजाला सर्पयोनि प्राप्त झाल्याची कथा सर्वविश्रुत च आहे.

चित्तें अध:पातिला ॥ ७९ ॥ ब्रह्म निर्गुण निर्विकार निर्विकल्प। तेथें मनें च प्रपंच संकल्प विकल्प। तें मन वश्य जालियावीण जल्पे । कासयासी करावा ॥ ८० ॥ आतां व्हावयासि मनोजय। च्यारि बोलिले आहेति उपाय । सत्संग वासनात्याग आणि होय। प्राणस्पंदनिरोध ॥ ८१ ॥ आणि मुख्य चौथा प्रकार। करावा अध्यात्मविचार। ऐसे हे च्यारि प्रकार। प्रांजळ परिस अनुक्रमें ॥ ८२ ॥ तत्वतां सत्संग औतुडे। ऐसे चतुर कल्युगीं थोडे। कितेक झंकताती बापुडे । संत ह्मणऊनि असंतीं ॥ ८३ ॥ येकांचे सिद्धात परिसावे । तेणें सिद्धरसानुभवासी मुकावें। बुद्धीच्या मोहातें पावावें । ते संतवेषी असत ॥ ८४ ॥ ऐसीं अपसिद्धांतदर्शनें। पृथकाकारें कीजेति निर्शनें। तरी सावध होऊनि आकर्षणें। अर्थान्वयातें ॥ ८५ ॥ येकीं मुक्त केला यथेष्टाचार। येकीं येकदेशी विचार। एक ते स्वसिद्धांतानुसार। वेष चि घेऊनि वैसले ॥ ८६ ॥ कितेक ह्मणती गुरुवचननिश्चय मोक्ष। कितेक ह्मणती सर्वमेव वस्तुज्ञान मोक्ष प्रत्यक्ष। एक ह्मणती निरवयव वस्तूचें बाणतां लक्ष। मोक्ष कैंचा हो ॥ ८७ ॥ कितेक ह्मणती साकाराशी नाश आहे। निराकार शून्यत्वें निऊन पाहे। उभय पक्षविहीन न लाहे। तव मोक्ष कैंचा ॥ ८८ ॥ कितेक ह्मणती हांसोनी। हे आघवे चि ठकले ज्ञानाभिमानी। एकदेशी भक्तिविधानें वाचूनि। कैंचा मोक्ष ॥ ८९ ॥ कितेक बोलती वचन। मोक्ष कैसा पावती अविंपन्न। व्यापक सकळागमेशास्त्रनिदर्शन। त्यासी च मोक्ष ॥ ९० ॥ कितेक बोलती पाहीं। ज्याचा पडदा चि फिटला नाहीं। स्वाचार नानाचार त्यागेंवीण काहीं। मोक्ष न घडे ॥ ९१ ॥ एक ह्मणती नाना वांच्छा विकल्प-। विच्छेद नव्हता मोक्ष कैसा जाला स्वरुप। एक ह्मणती का करिता वाग्जल्प। मनपवननिरोधें मोक्ष ॥ ९२ ॥ एक ह्मणती महावाक्याचें विवरण। तो चि

---

१ वल्गना. २ प्राणायाम. ३ सापडे, मिळे. ४ फसतात. ५ न्यून. ६ भेदभावरूप पडदा.

मोक्ष स्वयें जाण । हें प्रत्यक्ष अनुभवें प्रमाण । कासयासी लागलें ॥ ९३ ॥ एक ह्मणती मधुमांसस्वादनोन्माद । चढतां सुरतक्रीडा विभ्रमानंद । परि हें काय जाणती मतिमंद । गुरुकृपेवांचूनि ॥ ९४ ॥ एक ह्मणती मोक्ष ह्मणिजे दृश्यादृश्यपरित्याग । एक ह्मणती मोक्ष ह्मणिजे स्वानंदबोधसंयोग । एक ह्मणती मोक्षाचें अवगला नाहीं सोंग । तंवं बोलिल्या काय होतें ॥ ९५ ॥ एक ह्मणती भस्मोद्धूळन जटास्थापन मौन । या नांव मोक्ष हें प्रत्यक्ष प्रमाण वचन । एक ह्मणती जप तप व्रत दान न करितां तीर्थाटण । घरीं च मोक्ष पडलाहे ॥ ९६ ॥ एक ह्मणती अहिंसा केशोत्पाटन । हें मुख्य मोक्षाचें लक्षण । यज्ञीं घेती पशूचे प्राण । ते ब्राह्मण मोक्ष न पवती ॥ ९७ ॥ ऐसें संकल्पविकल्परूप बहुत । दर्शनभेद असंख्यात । परंतु मोक्ष कोण्ही ही न पवत । तत्वज्ञानेंवांचूनि ॥ ९८ ॥ सांख्य वैष्णव पूर्वमीमांसक । शैव पाशुपत संन्यासी स्नातक । जंगम गाणेश बौध चार्वाक । शाक्त कौळादि[३] सर्व ही ॥ ९९ ॥ आचार्य दीक्षित नग्नव्रत । तापस तीर्थाटणी जपमौननिरत । अनशनी देहदमनी दत्तावधूत । बहिर्मुखत्वें वंचले ॥ १०० ॥ मत्तमत्तांग पाखंडखंडन । शंकरें दिग्विजयी पंचानन । तेणें वज्रसुचीवज्रनखीं विदारून । टाकिलीं चंडबंड गंडें ॥ १ ॥ असो संतवेषी असंत जाण । जैसे गुळगुळे गुळपाषाण । कीं बहुरूपीचे ब्राह्मण । काय पुजूं येतील ॥ २ ॥ जयासी दिग्भ्रम निश्चयाचा हार्ट । घलें चि चालिला चुकोनि वाट । तयाचा संग धरितां सेवट । विश्रांति कीं अपभ्रंश ॥ ३ ॥ ह्मणोनि इहीं लक्षणीं विनिर्मुक्त । महानुभावी नित्यमुक्त । सल्लक्षणीं संयुक्त । त्यांचा संग मनोजयीं ॥ ४ ॥ काशीस जावयाची आवडी । तयासी सुशीळ श्रीमंत जोडला कापडी ।

---

१ समजला. २ भिक्षु. ३ कौल=शाक्तिपूजक, शाक्ताचा च एक प्रकार आहे. ४ विषयोन्मुखत्वें. ५ श्रीशंकराचार्यांनीं पचानना ( सिंहा ) प्रमाणें पाखड मतें हीं च कोणी मत्त मतंग ( माजलेले हत्ती ) त्यांचीं चंडबड अशीं गंडस्थळें वज्रसूची वज्रनखांनीं विदारून टाकिलीं. ६ गुळासारखा होतो. ७ गुळांतील दगड. ८ दिशाभूल झाली असून हि जो हट्ट करितो. ९ यात्रेकरू.

त्याचेनि संगें सुखसुरवाडीं । श्रीविश्वनाथ भेटे ॥ ५ ॥ संत स्वभावें चि ब्रह्मनिष्ठ । त्यांचेनि संगें न करितां कष्ट । आचार विचार जोडतां स्पष्ट । स्वयें चि संत होइजे ॥ ६ ॥ तो सत्संग घडावयाला । बहुतजन्मसाधन पाहिजे त्याला । जोडला तरि रुचाया पचायाला । अंतरायें आहेति ॥ ७ ॥ पंचाक्षरी पायाळें पावणें दुर्गम । जोडला तरी निधानप्राप्ति सुगम । तैसा लाधलियां सत्समागम । ब्रह्मप्राप्ति अनायासें ॥८॥ मनोजयप्रकार चतुरंग । त्यामध्यें सविस्तर कथिला सत्संग । आतां वासनेचा परित्याग । तो ही सुगम अवधारी ॥ ९ ॥ वासनेचीं दोनीं अंगें । सुष्ट दुष्ट येणें भोगें । एक वाढे येक भंगे । फळपुष्पन्यायें ॥ ११० ॥ सुष्ट वासना जेथें वाढे । तेथें दुष्टत्व सहज चि काढे । परि येथें बळ पाहिजे गाढें । तया विवेकाचें ॥ ११ ॥ सांडूनियां स्वरूपानुसंधाना । विषयांकडे वोढे वासना । तेथें मिथ्यत्व कां ब्रह्मभावना । भोक्तया बाणे ॥ १२ ॥ तेथें वासनेसीं ऐसें जालें । जैसा द्रोण आला परी देह गेलें । आतां पहिलें चि पावतां भलें । ह्मणोनि भरे स्वरूपीं ॥ १३ ॥ विषयो सत्यत्वें नुरे । तरी च वासना स्वरूपीं भरे । विषयसत्यत्वें मागें न सरे । सारितां ही वासना ॥ १४ ॥ ब्रह्मरूप निराकार । तेथें वासना ही होय तदाकार । हा मुख्य त्यागाचा प्रकार । निरोपिला तत्वता ॥ १५ ॥ आतां प्राणस्पंधअवरोध । करितां प्रकार अति दुर्बोध । पवनवैरासी निर्वंध । करावा हाटयोगें ॥ १६ ॥ घालूनियां वज्रासन । ऊर्ध्वगती लाविजे पवन । अनुक्रमें षट्चक्रें भेदून । ब्रह्मांडासी न्यावा ॥ १७ ॥ सहवास मनपवनासी । जैसा सुमना सुगंधासी । गमन एकेंवीण एकासी । सर्वथा न घडे ॥ १८ ॥ सुमन सुके पृथ्वीवरी पडे । सुगंध अधिष्टानीं

---

१ अडथळे, विघ्नें. २ पायाळु. ३ प्राणवायूस. ४ योगशास्त्रांत देहांतील षट्चक्रांना पुढील नावें आहेत.–१ आधारचक्र ( मूलाधार चक्र ), २ लिंग चक्र ( स्वाधिष्ठान चक्र ), ३ नाभिचक्र ( मणिपूर चक्र ) ४ हृदयचक्र ( अनाहत चक्र ) ५ कंठचक्र ( विशुद्धि चक्र ) आणि ६ भ्रुकुटिमध्य ( आज्ञा चक्र ). ५ योगाभ्यासानें " कुंडलिनी " नांवाची नाडी उत्तेजित झाली ह्मणजे सुषुम्नेचें द्वार मोकळें होऊन प्राणवायू षट् चक्रांतून ऊर्ध्वगतिक होतो. ६ वाळल्यावर.

जडे । तेवीं पवन ब्रह्मांडीं कोंडे । मन मिळे स्वरूपीं ॥१९॥ आत्मा ब्रह्मरंध्रीं वसे । तेथें मन हें समरसे । तें तद्रश चि असे । ह्मणउनिया ॥१२०॥ मुळीं सागराचें चि नीर । वेगळेपणें भासे गर्ताकार । सगें ही मिळे तरी तदाकार । सहज चि असे ॥ २१ ॥ तैसें संकल्पविकल्पेंकरूनि मन । नाहीं तरी तें च चैतन्यघन । तेणें करूनि ऊर्ध्व गमन । अधिष्ठान कवळिलें ॥ २२ ॥ येथें आक्षेपिती चतुरादिक । आत्मा सबाह्याभ्यंतर व्यापक । त्यासी एकदेशी स्थान मस्तक । किमर्थ योगीं नेमिलें ॥ २३ ॥ तरि सदृष्टांत प्रश्नोत्तर । त्रैलोक्याधीश जानकीवर । तथापि एकदेशी अयोध्याधीश हें उत्तर । काय तितुका च करील ॥ २४ ॥ तैसें आकाशाहूनि विस्तीर्ण आत्मस्वरूप । शुद्ध सूक्ष्म अद्वय अव्यय अरूप । त्यासी योगधारणेनिमित्य एकदेशित्वारोप । काय तितुका चि करील ॥ २५ ॥ आकाश असे निर्द्वंद्व । घटें कवळलें हा अपवाद । घटाकाशीं शमे नाद । तो महदाकाशीं सिद्ध चि ॥ २६ ॥ तैसा आत्मा ब्रह्मरंध्रसदनीं । हे प्रसिद्ध वार्ता विद्वद्वदनीं । योगी समरसतां तये स्थानी । ब्रह्मरूप सर्वत्र ॥ २७ ॥ हे हाटयोगवार्ता वाटे रम्य । आणि फळप्राप्ति हि अनुपम्य । परतु क्रियासिद्ध सत्ययुगीं हि दुर्गम्य । तेथें कळींत केविं घडे ॥ २८ ॥ स्वदेहीं स्वर्गासी जाणें । पूर्वी होतें ऐकिजेति पुराणें । आतां कलयुगीं विमानावरी कोणें । आरोहण केलें ॥ २९ ॥ म्लेछकुळींत वसुधाचक्र । भ्रष्ट जाले धरामरशक्र । धर्मगजेंद्रासी कळिनक्र । आक्रमूनि ठेला ॥ १३० ॥ तेथें देहधारणेचा हाटयोग । न चले ऐसा जाला प्रसंग । करूनि शरीरसमधाचा त्याग । चिंती रामा सर्वगता ॥ ३१ ॥ मग फोकारिलें अनुभवधारा । सद्य प्रगट

---

१ भोंवऱ्याच्या रूपानें. २ आत बाहेर सर्वांस व्यापून आत्मा राहिला आहे. या विषयीं श्रुतीचें वचन असें आहे –'अन्तर्बहिश्च तत्सर्वं व्याप्य नारायण स्थित'. ३ जानकीवर राम हा त्रैलोक्याधीश असता अयोध्या नगरीकरिता अयोध्याधीश या दृष्टीनें एकदेशियत्वाचा आरोप करतात त्याप्रमाणें. ४ आत्मा सर्वव्यापक असता योगधारणेकरिता "आत्मा ब्रह्मरंध्रीं वसे" या दृष्टीनें एकदेशियत्वाचा आरोप केला आहे. ५ मोठमोठे ब्राह्मणश्रेष्ठ. ६ व्यापक अशा. ७ प्रगट केला.

देखिलें देवा । प्रत्यक्ष पावला कैवल्यठेवा । देहसमघातीत जो ॥ ३२ ॥ तरि कर्म योग आणि याग ज्यासी करणें । त्यासी वैसलें क्रियेचें धरणें । केवळ गोष्टीच्या विवेकें तरणें । ऐसें तें नव्हे ॥ ३३ ॥ भवरोग मुमुक्षदेहीं । त्यासी उपाय मत्र आणि औषध पाहीं । मत्र ह्मणिजे सुविचार जो काहिं । अन्य कष्ट न लगती ॥ ३४ ॥ आता औषध जयासी कर्तव्य । तेणें औषधी आणाव्या हिंडोनि अटव्य[१]। पुढें मात्रा उतरालिया दिव्य । होईल मुक्त सकष्टीं ॥ ३५ ॥ एवं कर्मयोग दु साध्य कष्ट । त्यायोग्य देह नव्हे आणि खेष्ट[२]। आता अध्यात्मविचार सुगम स्पष्ट । तो चि बोलिजेतसे ॥ ३६ ॥ उपदेश-काळीं ब्रह्म अनुभवलें । तें च निरतर व्हावया च्यारि उपाय होते बोलिले । सत्सग वासनात्याग हठयोग ऐसे तीन जाले । आता अध्यात्म चौथा परिसावा ॥ ३७ ॥ ज्याच्या अर्थे सार्थक अभिधान[३]। ग्रथासी मिखे विराजमान। ज्याचिये प्रशसेकारणें उद्घाटन[४]। इतुकें हि केलें॥३८॥ तरि जैसें समर्थाचिया बाळा । सुखासनीं च लागे डोळा । पीथेंगमन[५] त्या वेल्हाळा। सुखरूप चि कीं ॥ ३९ ॥ इतरा सकळा विकळा विद्या । ज्याचें फळ प्रपच अविद्या । ह्मणोनि अध्यात्मस्थिति सद्या । शाश्वत प्रतिपाद्यका ॥४०॥ आत्मसाक्षात्कार नित्यानित्यविचार । माया ब्रह्म जीव ईश्वर । पाप पुण्य कर्म ससार । कैसा आणि कोणासी ॥४१॥ इत्यादि विस्तार वीजारोपें । उपदेशकाळीं बोधिलीं सक्षेपें । तें चि सविस्तर साक्षेपें । महावाक्यार्थे परिसावें ॥ ४२ ॥ येणें अध्यात्मविचारबळें । जिंतावया[६] तुरे मन वेगळें । स्वानदस्वरूप वेगळें । अखडैक अनुभवें ॥४३॥ ऐसें बोलता सद्गुरुराजा । शिष्यें मस्तक न्यासिलें[७] चरणांबुजा । उच-

---

१ अरण्य २ खडतर. ३ ब्रह्मानुभवाची स्थिति कायम राहण्याकरिता जे चार उपाय सागितले आहेत त्यापैकी अध्यात्मविचार हा फार सुगम उपाय आहे व तो च या ग्रथात प्रामुरुयानें सागितला असल्यामुळें, ग्रथाच्या नावाला सार्थकता आली आहे. ४ स्पष्टीकरण. ५ घोड्यावर बसून बाहेर फिरावयास जाणें. पीथि= घोडा. ६ जिंकण्याकरिता. ७ ठेविला.

लितां उवगे वाटे सहजा । वेगळेपणें ॥ ४४ ॥ चरण आणि मस्तक केला येक । कोण भावार्थाचें कौतुक । ये स्थितीचें न तुटतां तुकें । उठोनियां प्रार्थितसे ॥ ४५ ॥ स्वामी तुझिया पदद्वयाचा संयोग[1]। तेथें समर्पोनि राहो माझें सर्वांग । तुझें अनन्य भजन महायोग । ऐसी धारणा देईं ॥ ४६ ॥ तुझें लीळाविग्रहीं दर्शन साकार । हा चि माझा स्वरूपसाक्षात्कार । ऐसिया वरदानें तंदनु साकार । विनवीन तें सांगावें ॥ ४७ ॥ वैद्य अश्विनीदेव जोडला जरी । तरी दर्शनें चि रोगासी नुरे उरी । तेथें रुचि पुरऊनि आरोग्य करी । याचें आश्चिर्य काय ॥ ४८ ॥ तैसा मी समर्थाचा अंकित । मजएवढा कोण भाग्य- श्रीमंत । तरि माझें रक्षूनियां मनोगत । कृतार्थ करावें ॥ ४९ ॥ ऐसा देखोनि शिष्यसद्भाव । कृपां द्रवला सद्गुरुराव । मस्तक स्पर्षे ह्मणे प्रादुर्भाव । हा चि कीं बोधाचा ॥ १५० ॥ पावावया संपूर्ण उर्वी । भाग्यलक्षण उमटती पूर्वी । तैसी तुझी सप्रेमता गुर्वी । संपूर्ण स्थिति- कारणें ॥ ५१ ॥ तरि वछा तुवां इछिलें जैसें । श्रुतितात्पर्य चि आहे तैसें । समस्त खल्विदं ब्रह्म ऐसें । बोलिजेलि सिद्धांतीं ॥ ५२ ॥ एऱ्हवीं ही गति आहे ऐसी । देव होऊनि जावें देवासी । ते देवीं च गौणत्व भासलें ज्यासी । तयासी प्राप्ति हे कैंची ॥ ५३ ॥ ह्मणऊनि तूं सहज सभाग्य । संपूर्ण आत्मप्राप्तियोग्य । तरि निःशंकता अनुभव- भोग्य । तितुके प्रश्न करावे ॥ ५४ ॥ ऐसा देखूनि सर्वांगिकार । करूनि साष्टांग नमस्कार । परमोल्हासें जोडूनि कर । शिष्य प्रश्न करील ॥ ५५ ॥ तये प्रश्नप्रत्योत्तरीं महावाक्याचा अर्थ । बोलिजेलि तो समर्थ । तो परिस तूं कृतार्थ । सदा स्वानुभवी ॥ १५६ ॥ स्वस्ति श्रीमत्सुग- मोपाये रामीरामदासकृते । मनोजयत्रयप्रकारवर्णनं । नाम तृतीय प्रकरणम् ॥ ३ ॥ श्रीरामदास समर्थ ॥ राम ॥

---

१ त्रास, दुःख. २ महत्व, वजन. ऐक्याची, अद्वैताची स्थिति कायम ठेवून. ३ वृद्धि. ४ भक्तमनोरथपूरणार्थ स्वकीय इच्छेनें धरलेला साकार देह त्याचें. ५ पृथ्वी, पृथ्वीचें राज्य. ६ मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात. ७ श्रेष्ठ.

श्रीराम

तृतीय प्रकरणाचा आवसांनीं । सद्गुरु जगज्जीवनघन बोळला देखोनि । शिष्यमनमयूर परात्पर पर विकाशूनी । हर्षे नाचे टाह फोडी ॥ १ ॥ ह्मणे जी ब्रह्म निर्गुण निराकार । ऐसा स्वामीनें निरोपिला निर्धार । तरि प्रत्यक्ष दिसे जो जगदाकार । हा कासयाचा आहे ॥२॥ माया हे कवणाची शक्ति । कीं स्वतंत्र च आहे इची व्यक्ति । ईश्वर कैसा आहे आणि जीव कोण हे युक्ति । सांगिजे स्वामी ॥ ३ ॥ जीवासी कैसा आहे भव । आणि कैसा ठाहे असंभव । पापपुण्याचा प्रादुर्भाव । कैसा आणि कोणासी ॥ ४ ॥ हे माझे प्रश्न अनुक्रमें । निरोपावे सद्गुरुसर्वो-त्तमें । परिसोनि स्वानंदाभिरामें । कृपाभरें बोळिजे ॥ ५ ॥ निरसावया चातकाची तृपा । मेघ निववी जगदशेषा । तेविं सच्छिष्याचिया संतोषा । सर्व ही ब्रह्म चि प्रबोधी ॥ ६ ॥ या रे शिष्या सुलक्षणा । परिस वत्सा विचक्षणा । महावाक्याचेया विवरणा । सावधान होई ॥ ७ ॥ बाळक जयंताचेनि दैवें । तरि आहारा अमृत चि कीं स्वभावें । तेथें सर्व ही स्वादतत्व फावे । अनायासें ॥ ८ ॥ तैसें महावाक्याचेनि अर्थे । तुझे प्रश्न फळती यथार्थे । तरि तें चि तुवां कृतार्थे । श्रवण करावें ॥ ९ ॥ जैसें चंचूचेनि सांडसें । क्षीरनीर निवडिजे राजहंसें । तैसें देहधर्मवंतें वायसें । कैसेनि होइजेळि ॥ १० ॥ हंसासी दोहींचा हि असे आहार । परंतु निवडूं जाणे क्षीरनीर । अंतरीं सामरस्य हा विचार । काय करणें लागे ॥ ११ ॥ नीरापासूनि च जालें क्षीर । तरि एकत्व साधितां काय कठिणतर । उन्हळूनि प्राशनकरिते चतुर । वायस काय होतील ॥ १२ ॥ ह्मणऊनि अवस्थांचें परिज्ञान ।

---

१ शेवटीं. २ लाभतो. ३ "तत्त्वमसि" हें महावाक्य. ४ राजहंसाचे च देहधर्म कावळ्याच्या ठिकाणीं असतात ह्मणून राजहंसाची कृति त्याकडून होईल काय? ५ प्रति दिवसरात्रींत जीवाच्या तीन अवस्था होत असतात. त्यांस जाग्रदवस्था अथवा स्थूलावस्था, स्वप्नावस्था अथवा सूक्ष्मावस्था आणि सुषुप्त्यवस्था अशीं नावें आहेत.

निवडूनि जाणे तो चि सज्ञान । येर्‍ही वर्तत असतां अयसान । इतरांसी होय ॥ १३ ॥ जागृतीदशेसीं जो संपन्न । तो चि स्वप्नीं होय अनुपपन्न । क्षुधा पीडतां सिद्धमन्न । परि तें काय होय तेथें ॥ १४ ॥ स्वप्नीं जाला जो श्रीमत । तो चेईलियां असे दरिद्रभूत । प्रत्यक्ष धन स्मरे परि हस्तगत । जागृतीसी तें नव्हे ॥ १५ ॥ निद्रा आलियां अति भरें । तेथें जागृति स्वप्न कांहीं न स्मरे । तुरीयेमाजीं निःशेष ही नुरे । अवस्थात्रय हें ॥ १६ ॥ तथापि स्वप्न आणि निद्रा । येथें न पविजे ज्ञानमुद्रा । तुरीया पाववी श्रीरामचंद्रा । परि जागृतीनें ते विकाशे ॥१७॥ येकिये अवस्थेचें सत्यत्व । दुजीमाजीं पावे मिथ्यत्व । परतु तुर्येचें व्यापकत्व । सर्वांमाजीं ॥ १८ ॥ सुषुप्तिस्वप्नासी सेजार । तैसा चि जागृतितुर्येचा विचार । स्वयं ब्रह्मेति हा निर्धार । दोहींसी तों अनुकूळ ॥१९॥ आतां स्वप्न आणि सुषुप्ति । येथें हि स्वयंत्वाची व्याप्ति । एव तुर्येची प्राप्ति । सर्वत्र हि असे ॥ २० ॥ आतां अवस्थातीत ज्ञानधारी । स्वयें तूं चि श्रवणाधिकारी । तरि बोलिजेति तें श्रवण करीं । त्रिपदांव्याख्यान ॥ २१ ॥ तत्पद आणि त्वपद । पृथकत्वें पदद्वंद्व । तेथें ही शुद्ध शर्वळ भेद । बोलिले ऐसे ॥ २२ ॥ ब्रह्म निर्गुण निराकार निर्मळ । नित्य सत्य निज निश्चळ । तो शुद्ध तत्पदार्थ केवळ । वर्णिला वेदीं ॥ २३ ॥ तें स्वयें चि आपेंआप । तेथें न घडे नाम रूप । मायामय विश्वानुभवआरोप । कीजे वस्तुत्वाचा हि ॥ २४ ॥ जरी दुजी गमे अवस्तु । तरी च ह्मणणें घडे वस्तु । द्वैतें दिधला नस्तां हस्तु । अद्वैतत्व उमें न राहे ॥ २५ ॥ आकारासी नस्तां ठाव । निराकारत्वा हि अभाव । असो मायेचा नस्तां प्रादुर्भाव । ब्रह्मीं ब्रह्मत्व स्फुरेना ॥ २६ ॥ एवं नामरूपाचें वर्म । हा सर्वथा नव्हे स्वरूपधर्म । मायाकवळित जीव स्वकर्म । स्वभावें

---

१ अत, नाश. २ क्रियाशून्य. ३ स्वप्नावस्थेंत. ४ जागा झाल्यावर. ५ अवस्थात्रयव्यतिरिक्त स्थितींत ह्मणजे तुरीयावस्थेंत, किंवा ब्रह्मानुभवस्थितीत ज्ञानरूप झालेला जो तूं. ६ "तत्त्वमसि" ह्या महावाक्याचें विवरण, ७ निरुपाधिक. ८ औपाधिक. ९ स्वतःसिद्ध.

बोलती ॥२७॥ मायातीत अविचळ अव्यय । शुद्ध तत्पदार्थ निष्क्रिय । तेथें चि विवर्तरूपिणी होय । उत्पन्न मूळमाया ॥२८॥ ब्रह्मीं माया कदां न घडे । आणि ब्रह्मेवीण हें हि केवीं घडे । ह्मणोनि अघटित घटना जोडे । नाम इचें ॥ २९ ॥ तीतें अधिष्ठूनि राहिलें । तेणें शुद्धासी शबळत्व आलें । तो शबळ तत्पदार्थ ऐसें बोलिलें । वेदांतशास्त्रीं ॥३०॥ विवर्ताचें रूप ऐसें असे । तत्वता सत्य असता अनारिसें भासे । निर्धारूं जाता कांहीं च नसे । भासलें तैसें ॥ ३१ ॥ हें मिथ्या च परि सत्य भासे जनदृष्टीं । ह्मणे सृष्टि सापेक्ष श्रुतीची गोष्टी । तत्वता सिद्धांताची पुष्टि । स्वरूपें चि कीं ॥ ३२ ॥ परब्रह्म परिपूर्ण असता । अपूर्णत्वेंवीण स्फुरे पूर्णता । दुजेनवीण अहंब्रह्मता । तें मायेचें स्वरूप ॥ ३३ ॥ हे अघटितघटना बोलिजे । अद्वैत जिणें प्रतिपाद्य कीजे । तिणें च नाथिलें द्वैत दाविजे । ह्मणऊनिया ॥३४॥ अद्वैत ह्मणिजे दुसरें नाहीं । तेथें दुजें तें लटिकें पाहीं । तथापि मिथ्याभास जो कांहीं । ते अघटितघटना ॥ ३५ ॥ शुद्ध प्रकाश नव्हता अनारिसा । तेथें नाथिला च जळदा-भास मृगासी कैसा । तो सूर्यविवर्त जैसा तैसा । ब्रह्मविवर्त मूळमाया जनातें ॥ ३६ ॥ ते मूळमाया जेथें आभासे । तयेतें अधिष्ठूनि जे वसे । तो शबळ तत्पदार्थ येर असे । शुद्ध च अवघा ॥ ३७ ॥ जैसें जेथें मृगजळ आभासलें । आणि तद्रूपत्वें व्यापकत्व जयासी आलें । तया प्रकाशा साकारत्व कल्पिलें । एर अवघा निराकार ॥ ३८ ॥ जो शुद्ध पदार्थ केवळ । तो चि उपाधिभेदें बोलिजे शबळ । तैसा च त्वंपदार्थ युगुळ— भेदें परिसावा ॥ ३९ ॥ जो तत्पदीचा शबळार्थ । तो च त्वंपदीचा शुद्धार्थ । जो त्वंपदीचा शुद्धार्थ । तो चि यथार्थ शबळत्वें ॥४०॥ मूळमायेची माया अविद्या दोनि व्यक्ति । आणि आवरणं विक्षेपें दोनि शक्ति । तदुपाधि ईश्वर जीव ऐसी युक्ति । तत्वविदांची ॥४१॥ मायाआवरणें

---

१ मिथ्याभासरूपी २ मायोपाधित ब्रह्म. ३ दुसऱ्यावर अवलंबून राहणारी. ४ परब्रह्मीं स्फुरण. ५ ज्या अघटित घटनेनें. ६ आच्छादक शक्ति अथवा अविद्या. ७ अन्यथाज्ञानरूप विद्या.

आवरला । तो प्रत्यगात्मा सर्वेश्वर बोलिला । अविद्याविक्षेपें तयाला । जीवत्व आरोपिजे ॥ ४२ ॥ माया अविद्या आदर्शस्थानीं । आत्म-प्रतिबिंब जीवेश्वर दोनी । हें वेदांत सिद्धांतीं निर्धारूनि । बोलिलें आहे ॥ ४३ ॥ येथें आक्षेप असे परम । करितां त्वंपदाचा उपक्रम । मूळीं बिंब प्रतिबिंब हा नेम । केविं घडों शके ॥ ४४ ॥ शुद्ध तत्प-दार्थ आपण । तेथें विजातीय कैंचा दर्पण । स्वयंभ सघनासी द्रष्टेपण । निराकृतीसी कैचें ॥ ४५ ॥ स्वनखमुकुरीं प्रतिबिंब दिसे । तेथें दर्पणीं भिन्नता नसे । परंतु द्रष्टा सावेव असे । आणि आवांका नाहीं ॥ ४६ ॥ यदर्थी प्रत्योत्तर देइजे गहन । जेणें समूळ संदेहो होय दहन । परिसे मन करूनियां वहन । विवेकाचें ॥ ४७ ॥ येथें विवेकें दृष्टि उघडे । तरी च हा परमार्थ आंगीं घडे । वेगळे पडती ते वेडे । काय करावे ॥ ४८ ॥ हा केवळ ब्रह्मींचा अनुभव । जया तो तन्मय परंतु जीव । जैसा तरंगलीं येक येक च परि भिन्न भाव । सागरत्वें एकात्मता ॥४९॥ जेवि आरिसां प्रतिबिंब न घडे । तथापि पाहातयाचे दृष्टीं पडे । तैसें अनुभवियां बिंब प्रतिबिंब घडे । आत्मरूपीं असेना ॥ ५० ॥ अनुभवत्व स्फुरे वेगळें । तोंवरि बिंब प्रतिबिंब उणें आगळें । अनुभवत्व मुरालियां सगळें । ब्रह्म चि कीं ॥ ५१ ॥ माया अविद्यादर्पणीं जीवेश्व-राकार । हे सविकार जीवासी भासती साकार । ऐसें बोलें तरि तया जीवत्वासी च थोर । किमर्थ ब्रह्मीं अविकारीं ॥ ५२ ॥ ऐसिये आक्षेपीं साक्षेपपूर्वक । प्रत्योत्तर देइजे तैसें आइक । पूर्वपक्षीं सिद्धांत चतुरादिक । न बोलती यालागीं ॥५३॥ आरंभलें असतां आवाहन । मध्यें च मांडिलें विसर्जन । तरि चातुर्यविषईं संमार्जन । जालें चि कीं ॥ ५४ ॥ येथींची ऐसी असे रीति । संदेहस्थानीं घडे देहस्थिति । यालागीं अघटितघटना हे स्थिति । पूर्वी च दाखविली ॥ ५५ ॥ आधीं आवघें बोलोनि जावें ।

---

१ आरसा. २ आश्रय. ३ चातुर्य साफ धुऊन गेलें असें ह्मणावें लागेल.

मग सिद्धांतीं विवचोवें । तये काळीं स्वभावें । निरशणें च नलगे ॥५६॥ तथापि पूर्वपक्ष ह्मणिजे मिथ्याभूत । येक सिद्धात चि होय शाश्वत । ह्मणौनि आदिमध्यात । तो चि बोलता न बोलता ॥ ५७ ॥ प्रस्तुत प्रश्नसगनिर्वाहो । केला पाहिजे नि सदेहो । जेणेंकरूनिया मोह । निरशोनि जाय ॥ ५८ ॥ तरी तुर्ये जागृतीचा सधि । ह्मणोनि ब्रह्म जीव हे सदेहबुद्धि । जागृतीसी जीवित्वाची प्रसिद्धि । तुरियेसी ब्रह्म चि केवळ ॥५९॥ एके अवस्थेचा अनुभव सिद्ध । दुजीसी वावें हें प्रसिद्ध । सधि सदेहकारक अशुद्ध । कामां चि नये ॥ ६० ॥ ह्मणसी अवस्थादि प्रपच ब्रह्मीं किमर्थ । हा भ्रम दुराग्रह न करीं व्यर्थ । हें असिपदीं यथार्थ । जाणसी स्वयें ॥ ६१ ॥ अत्र दृष्टात विचक्षणा । जनकें दिधलें क्षेत्र ब्राह्मणा । हळेंदतीं मजुषों लागतक्षणा । विप्र नातंळे तयेसी ॥६२॥ ह्मणे मज तवं अर्पिलें क्षेत्र । तेथींचा धान्यप्रतिगृह पवित्र । येर भूमिगत सर्वत्र । तितुकें नृपतीचें असे ॥ ६३ ॥ राजा ह्मणे म्या दिधली धरणी । तेथींच्या सर्वस्वाचा ब्राह्मण धणी । तव पडितें बोलिलें विचक्षणीं । मजुषेंत काय विचार ॥ ६४ ॥ माडुसें उघडूनि पाहे राजा । तव माजि स्वयें जनकात्मजा । ते स्वकीय चि कीं सहजा । तेणें वेवाद खुटला ॥ ६५ ॥ तैसें प्रपचाकारें काय आहे । हें आधीं शोधूनि पाहें । त्यानतरें सहजीं च राहे । विक्षेपेंसीं आक्षेप ॥ ६६ ॥ हरिणाबु दृष्टीं आभासलें । तें मिथ्यामय ऐसें अनुभवलें । परी हें का जालें ह्मणौनि माडिलें । ज्ञातृत्व जेणें ॥ ६७ ॥ तरि तें चातुर्यें कीं मूर्खपणें । जयासी मिथ्या ह्मणतसे आपण । तेव्हा तयाचें जालेपणें । कैसें सत्य होईल ॥ ६८ ॥ खपुष्प तरि असत्य । परि हें का जालें साग सत्य । हे आशका काय नित्य । कीं भ्रमाचें भूषण ॥ ६९ ॥ जरि तू ऐसें ह्मणसी । ब्रह्मीं अद्वैतीं कैंचा भ्रम कोणासी ।

---

१ मननयुक्त विचार करावा. २ व्यर्थ. ३ नागराच्या फाळाला. ४ माडुस, पेटी ५ स्पर्श देखील केला नाहा. ६ अस्तित्व. ७ आकाशपुष्प, अशक्य गोष्ट.

तरि आलें तुझिया चि निश्चयासी । भ्रमाचेंनि नास्तिक्य ॥ ७० ॥ भेदभ्रम मिथ्या जाला । तरि आत्मा च स्वसंवेद्य संचला । ह्मणसी भेद स्वामीनें होता बोलिला । तो मिथ्या तुज कळावया ॥ ७१ ॥ अनुभव करावयाची यैसी असे रीति । शिष्या स्वयें व्हावया आत्मप्रतीति । सद्गुरु सिद्धांत उपदेशूनि [1]व्यामिश्र बोलती । तन्निष्ठतां ह्मणती साधु साधु ॥ ७२ ॥ कदापि ऐसें कल्पील तुझें संदिग्ध मन । मज समाधि युत्थान दोहींचें ही ज्ञान । अवस्थातीत ज्ञानें स्थानमान । अवस्थांचें ही जाणे ॥ ७३ ॥ मज ब्रह्मींचें कळे येकत्व । आणि प्रपंचींचें ही अनेकत्व । परस्परीं अविरुद्धीं विरुद्धत्व । हें आश्चिर्य वाटे ॥ ७४ ॥ राउळें बोलिलें हें मिथ्याभान । ऐसियाचें तऱ्ही काय प्रयोजन । ह्मणिजेलि मिथ्या च तयाचें. काय विवंचन । तऱ्ही भास नव्हे अनारिसा ॥ ७५ ॥ ब्रह्मज्ञानें आमासासि बांधिलें । सत्यत्व होतें तेथें असत्यत्व साधिलें । परंतु प्रस्थान नाहीं उछेदिलें । मुळींहूनि ॥ ७६ ॥ ऐसें तुझें प्रश्नतात्पर्य । याचें प्रश्नोत्तर परिसे वैर्य । जे पूर्वोत्तर आर्य । बोलिले आहेत ॥ ७७ ॥ प्रस्तुत प्रश्नाचे अवसरीं । तूं आहेसि कीं जे भूमिकेवरी । तदनुसार बुझाऊं पुढें निर्धारीं । स्वयें चि जाणसी ॥ ७८ ॥ तरि स्वरूपस्थितीसी च्यारि भूमिका विख्याता । विक्षेपता गतायाता सुनिष्ठता । चौथी सुलीनता यांचीं स्वरूपें चि तूं तत्त्वता । परिस आधीं ॥ ७९ ॥ मनासी प्रेरितां ब्रह्माभ्यासीं । तें विषयांलागीं कुसमुंसी । पूर्वस्थिति विक्षेपें प्रवर्ते तिसी । विक्षेपता बोलिजे ॥ ८० ॥ मनें स्वरूप अपरांपर लक्षिलें । शीडकाकन्यायें पुनः प्रवृत्तीवरी आलें । तेथें तें रूप निर्धारू लागलें । ते गतायाता बोलि जाणावी ॥ ८१ ॥ ब्रह्म जें सदोदित सघन । तन्निष्ट

---

[1] उलट सुलट प्रश्नोत्तररूपानें किंवा पूर्वपक्ष उत्तरपक्ष करून. २ देवानें. ३ निरसिलें. ४ मुख्य. ५ जी भूमिका तू हल्लीं अंगिकारिली आहेस त्या भूमिकेच्या अनुरोधानें तुझी समजूत करून देऊं. ६ कासाविस होतें. ७ समुद्रावर अतराळांत फिरणारा कावळा इकडे तिकडे फिरून येऊन त्याला दुसरा काहीं आधार न सांपडल्यामुळें ज्याप्रमाणे गलबताच्या शिडावर येऊन बसतो त्याप्रमाणेंच मन हें इकडे तिकडे भटकून पुन्हां प्रवृत्तीवर येऊन स्थिर होतें.

होऊनि राहिलें मन । वेगळें तुजें चि दृश्यभान । ते सुनिष्टता प्रसिद्ध ॥ ८२ ॥ ऐसिया दृढ अनुसधानें । अर्सी लीन होइजे मनत्वें मनें । द्रष्टा दृश्य दर्शन स्वसवेद्य सघनें । ते भूमिका सुठीनता ॥ ८३ ॥ जैसें पाउलें पाउल क्रमावें । तैसें चौभूमींसी आक्रमावें । तेणें पाविजे स्वानुभवें । निजात्मस्थिति ॥ ८४ ॥ प्रश्न अथवा प्रश्नोत्तर हो का । तेथें कोण अवस्था कोण भूमिका । जव नेणिजे या विवेका । तव सशयो न फिटे ॥ ८५ ॥ आता गतायाता भूमिकानळवें । तुझा निर्द्वंद्वींचा प्रश्न-द्वद्वकदनें । तरि सद्दृष्टांत अनिळवें । आइक बापा ॥ ८६ ॥ तरणि तोय नेत्रस्थ तदर्शे आभासे । हे सूर्यसत्ता प्रसिद्ध दिसे । तैसें च आत्मसत्तेनें नसोनिया भासे । विश्वभान मनें त्वदर्शें ॥ ८७ ॥ आत्मस्वरूप अव्यक्त अविकार । परतु सत्तामात्रेक सघन हा निर्धार । प्रत्यक्ष भासता प्रपचा-कार । निराकारत्व न मोडे ॥ ८८ ॥ प्रपचभास भासत च मिथ्या ऐसें ह्मणे । परि केवळ आभास ही नाहीं न ह्मणे । मम माता वध्या ह्मणता अप्रमाण । होय वक्तृत्व चि तें ॥ ८९ ॥ एथें च आहे अवघा निवाड । तरी च शास्त्रज्ञा ही सद्गुरूची चाड । स्वानुभवीं होय कावाड । शब्दज्ञान नव्हे ॥९०॥ येथें मौनावले वेद । येथें चि जाले दर्शनभेद । शेषाशेषमुखीं निरनुवाद । येथें चि जाला ॥ ९१ ॥ आपल्या वेगळेपणें शब्दज्ञान । हें चि तुझिया सशयाचें स्थान । अनुभवें स्वयें चि निरभिमान । कैंचा सशय कोणासी ॥ ९२ ॥ ब्रह्म आणि प्रपचाचा जाण । वेगळेंपणें तो तू साग पा कोण । हें तुझें नाथिलें चि वेगळेंपण । कीं सत्य ऐसें पाहे पा ॥ ९३ ॥ ब्रह्म सत्य मिथ्या प्रपचत्व । मिथ्यत्वीं प्रतिपाद्य नास्तित्व । तरि अद्वैत आत्मतत्व । तू चि कीं स्वयें ॥ ९४ ॥ तेथें मीतूपणासी कैंचा ठाव । स्वयत्वेंवीण स्वयमेव । सहज सर्व सशय वाव । सर्वत्वेंसीं ॥ ९५ ॥ उपरी शिष्यशिरोमणी । मौनें मौळि[4] न्यसी चरणीं ।

---

१ ओव्या ७३ ते ७६ यातील प्रश्नसमुदाय २ निरर्थक ओरा ३ 'नेति नेति' असा उच्चार ४ मस्तक. ५ ठेवी

स्वानुभवें निर्भर वाणी । पांगुळली बोले ॥ ९६ ॥ जी जी शब्दसाध्य पदार्थमाळा । तेथें ही अनुभवैक वेद्य अर्थ निराळा । तरी परमार्थस्वरूप तुझें शब्दपाल्हाळा । आतुडेलि कैसें ॥ ९७ ॥ एतावता शब्दातीता । क्षराक्षरत्वें तूं चि समरोमरिता । मीतूंपणेंवीण कृपावंता । यथार्थ जनका ॥ ९८ ॥ व्यक्ताव्यक्त जाळेंमूळकंदा । सर्वत्वेंवीण सर्व तूं चि परमानंदा । तरि सेव्यसेवकभेदीं अभेदा । परमार्थवंद्या ॥ ९९ ॥ जो पिता तो चि पुत्र । हें मुख्य श्रुतिसूत्र । पूज्य पूजकत्व तथापि तत्र । काय पारिखें करूं शके ॥ १०० ॥ कांहीं च नेणिजे अज्ञान बाळें । त्यासी सर्व सिकविजे बापें कृपाळें । तैसें तुवां शरणांगतपाळें । प्रश्नप्रत्योत्तरीं प्रबोधिलें ॥ १ ॥ जी हें माझें आभारलेंपण । गगनीं न माय परि निःकारण । सर्व ही तुझें चि मीं उत्तीर्ण । कासयानें व्हावें ॥ २ ॥ सर्व ही पदार्थ हे तुझे । ते ही तुज वंचिलें करूनि माझे । तेथें उत्तीर्णता कैंची बोझें । अपराधाचें दूसरें ॥ ३ ॥ आतां मजपासीं असिजेत होतें मीपणें । तें ही माझें नव्हे तुझें जाईजणें । तें स्वकीय च तरी समर्पणें । संभवे चि ना कीं ॥ ४ ॥ आतां केवळ शुद्ध वाक्यकलिकांजुळी । क्रिया विकाशें पावो श्रीपदकमळीं । तेणें महाप्रसाद ह्मणोनि मौळीं । वंदिती सज्जन ॥ ५ ॥ असो जालें समूळ आशंकानिरसन । जेणें केलें होतें त्वंपदकथेतें आकर्षण । आतां तें चि बोलिजेलि निदर्शन । कीजे कर्णाचा नयनीं ॥ १०६ ॥ स्वस्ति श्रीसुगमोपाये । रामीरामदासकृते । मनोजये । अध्यात्मविद्यायां । तत्पद सांग त्वंपद शुद्धभाग वर्णनं । नाम चतुर्थ प्रकरणम् ॥ श्रीराम ॥

---

१ अतिशय भरित अथवा पूर्ण. २ निर्वल झाली. ३ केवळ अनुभवानेंच जाणण्यास योग्य. ४ सांपडेल, ५ व्यापक. ६ मायेचा मूळ उगम. ७ अशाश्वत.

॥ श्रीराम ॥

आतां स्वकीय छडिवाळ बाळक । मागे पुनःपुनः अवधान चि एक । तेणें जन विटे परि सज्जनासी अधिक । कृपा चि उपजे ॥ १ ॥ बाळकलाळनाचें सुख । तद्विपयीं वंध्या वहिर्मुख । जननीसी वाटे परम हरिख । वेळोवेळां आळवितां ॥२॥ तो अपवादेंता मात्र वेगळा । केवळ तिच्या चि मांसाचा गोळा । मुख्य जीवाचा जिव्हाळा । तिच्या जीवें जीतसे ॥ ३ ॥ ह्मणोनि जिवलग एकी माउली । वाढवी करतळाची करूनि साउली । तिच्या स्नेहाची बाहुली । इतरें काय जाणती ॥ ४ ॥ तेसें संतकृपाकामधेनूचें दुभेणें । कैसेनि येईल जनवृत्तिखेंडाणे । तरी माझें अवधानविपयीं च प्रार्थणें । वेळोवेळां ही आवडे ॥ ५ ॥ कोणी भावितील अभाविक । सतस्तवन हें स्वाभाविक । जननीवाळकन्यायें सार्थक । कोण केलें सकळाचें ॥ ६ ॥ तरी नारदादिकीं बहुता रीतीं । बहु तारिले त्याहावे किती । बाणासी प्रसन्न होता गिरिजापति । पुढील ही दासा निरविलें ॥ ७ ॥ प्रस्तुतें पुडरीकें पांडुरगातें । प्रसन्नकाळीं निरविलें दासातें । तरी मातेचा कळवळा तयातें । कैसा नाहीं ह्मणावा ॥८॥ येरवीं तरी सतअवधानापरतें । अध्यात्म कोठें होईल सरतें । काय पूर्णचद्रोदयीं भरतें । थिल्लरासी येईल ॥९॥ जैसें एका जीवाचेनि गुणें । सर्व पदार्थांचें सार्थक जिणें । तेणेंवीण वस्तुचेनि अनर्घ्यपणें । कोठें रूढि कीजेल ॥१०॥ ह्मणोनि सताचें अवधान । आत्मविवेचें सजीवन । वहिर्मुख जनीं निमज्जन । काय करावें लागे ॥११॥ ह्मणोनि अनन्यभावार्थनदीप्रवाह । संतस्वानंदसिंधूसी मिळे स्नेहें । तेणें सर्वस्वसायोज्यता लाहे । अवधानें-

---

१ आळ घेण्यापुरता, नावापुरता. २ बाहुल्य=अधिकता. ३ पान्हा घालणें. ४ जनवृत्ति हीच कोणी अल्पदुधी लाथाळ गाय, तिला. ५ बाणासुरास. ६ हल्लींच्या काळीं. ७ कारण सतसज्जन हे लाभकाळ आला असता आपल्या स्वतःपुरतेंच न पाहतां सताचे अर्थात परमेश्वराचे जे इतर भक्त आहेत त्यांचा पुत्रप्रेमाप्रमाणें कळवळा येऊन, त्याचें हित चिंतितात. ८ वय, मान्य. ९ लहान डबकें १० अमोलपणाने. ११ एकाकारवृत्तित्व. १२ बुडी मारणें,

सीं ॥ १२ ॥ बाप औदार्याची कोटि । एक अवधान मागण्यासाठीं । समूळ संतत्वरत्नांची पेटी । समर्पिली स्नेहें ॥ १३ ॥ तेणें सहज चि सावधान । संतां नाहीं वेवधान । पातलें मूळ कथानुसंधान । स्वानंदेसीं ॥ १४ ॥ पूर्वे प्रकरणीं कथा सिद्ध । सांग तत्पद आणि त्वंपद शुद्ध । शबळ त्वंपदार्थ प्रसिद्ध । बोलिजेलि आतां ॥ १५ ॥ शुद्ध तत्पदार्थ जें केवळब्रह्म । तो चि मायोपाधीं शबळ ऐसें वर्म । तो तो चि शुद्ध त्वंपदार्थ अनुक्रम । साधला सरळ ॥ १६ ॥ जो प्रत्यगात्मा ईश्वर शुद्ध त्वंपदार्थ । तो चि अविद्योपाधीं शबळें हें यथार्थ । संम्यगदृष्टीवीण हा पदार्थ । अकळ च कीं ॥ १७ ॥ सम्यगदृष्टीवीण जे प्रवीणें । ह्मणती शुद्ध तत्पदार्थ ब्रह्म जें निर्गुण । तें चि मायोपाधीं सगुण । हें केविं घडों शके ॥ १८ ॥ गुणाभावें निर्गुणता । गुणप्रभावें सगुणता । ऐसिया पदार्थाची स्पष्टता । अभिधानीं वर्ते ॥१९॥ जें जें मायोपाधीं गुणत्वा आलें । त्याचें निर्गुणत्व न दवडितां गेलें । वृक्षविस्तारें बुडालें । बीजत्व जैसें ॥२०॥ ऐसा पृथक्त्वाशय सैंधवखडा । प्रत्योत्तरार्णवीं विरऊं फुडा । तेणें संशयाचा निवाडा । होऊनि जाय ॥२१॥ तरि आधीं वेक्षमाण पदार्थ बोलिजेत । ते सशयस्थानीं असती वर्तत । पुढें तयांचा जो सिद्धांत । तो बोलणें चि असे ॥ २२ ॥ तैसें तत्पद आणि त्वपद । शुद्धशवळभेदें ब्रह्मविद । बोलती पुढें असिपद । सिद्धांतालागीं ॥२३॥ प्रस्तुत बोलिजे प्रसंगासारिखें । मुळीं ब्रह्म चि नाहीं पारिखें । मध्यें चि जें अनसारिखें । तें कोठूनि येईल ॥ २४ ॥ अत्र व्यतिरेक दृष्टांत च अन्वयें पाहें । जें बोलिलें वृक्षाकारें बीजत्व न राहे । तरि त्या बीजाचा चि वृक्ष जाला आहे । किं काय नाहीं ॥ २५ ॥ निराकार

---

१ शिष्य अनन्यभावानें व प्रेमयुक्त अंत.करणानें संतास शरण गेला तर त्याला त्याच्या इच्छेप्रमाणें आत्मसायोज्यता देतात, इतकें च नव्हे तर त्यास स्वत.स संत करितात. २ अडथळा, आडपडदा. ३ विवेकदृष्टीनें न पाहतां फक्त शब्दज्ञान जाणणारे. ४ निर्गुणत्व मायोपाधीनें सगुणत्व कसें पावतें, ह्मणजे निर्गुण आपल्या मूळच्या स्वरूपाहून पृथक होतें कीं काय असा प्रश्न आहे, त्याचें प्रत्युत्तर पुढें दिलें आहे. ५ जे आतां पुढें सांगावयाचे आहेत ते. ६ परोक्ष, विन्मुख.

बीज च उगवलें । तें चि अंकुरलें साकारलें । तें चि विशाळ वृक्षत्वें जालें । काय पारखें तयासी ॥ २६ ॥ तस्मात् अशेपासी विशेपता । येथार्थ चि कीं येकात्मता । हा मुख्य सिद्धांत तत्वता । श्रुतिवाक्यें ॥ २७ ॥ हें तात्पर्य असिपदाचें । त्वंपदारंभीं कां वोलिलें याचें । ऐसें ह्मणिजेल तरी याचें । प्रयोजन आहे ॥ २८ ॥ त्वंपद ह्मणिजे अनर्थाचें मूळ । त्वंपद अविद्येचें कुळ । सर्व ही भ्रमाचें फळ । तें त्वंपद च कीं ॥ २९ ॥ त्वंपद दुस्वप्नींचें महदुख । त्वंपदीं सिद्ध स्वतः हारपे सुख । त्वपदीं अमृताचें चि वीख । होऊनि उपतिष्ठे ॥ ३० ॥ त्वपद चतुरांसी बोलतां कोडें । न भुलतां लागों पाहे वेडें । गंधर्वनगरींचीं[1] वर्णितां झाडें । चातुर्य कीं मूर्खता ॥ ३१ ॥ असो ऐसिया शबळ त्वंपदार्थातें । बोलतां अविकप राहावें चित्तें । यालागीं येकात्मतेचे भातें[2] । दिधलें आधीं ॥ ३२ ॥ आतां शुद्ध त्वंपदार्थ सर्वेश्वर जो बोलिला । तो चि अविद्योपाधीं शबळ जीवत्वीं कल्पिला । जैसा घटोपाधीं प्रतिबिंब वर्णिला । मुख्य सूर्य ॥ ३३ ॥ तैसा पिंडोपाधीं जीव । आणि ब्रह्मांडोपाधीं शिव । तयासी पिंडब्रह्मांडाचा उद्भव । आइक बापा ॥ ३४ ॥ जे मूळमाया विवर्तरूपिणी । तयेचीं रूपें जालीं त्रीणि । मूळमाया माया आणि । अविद्या ते ॥ ३५ ॥ जे स्वरूपोन्मुखा ते मूळमाया । जे प्रपंचोन्मुखा ते माया । जे प्रपचरूप च होऊनिया । राहिली ते अविद्या ॥ ३६ ॥ येणें त्रिरूपें येकी प्रकृति । पुरुप आत्मा येसिया श्रुति । तो येक चि परि उपाधिभेदें सर्तीं[3] । त्रिधा वोलिजे ॥ ३७ ॥ मूळमायोपाधिभिन्नत्वें आत्मा । मायोपाधि तो चि ईश्वर जो प्रत्यगात्मा । अविद्योपाधि जीवात्मा । ऐसें च कीं ॥ ३८ ॥ त्रिरूपी पुरुप येक अनंग । त्यासी प्रकृतीसी अगसग । तयांचा सहवास रस सरग । असे ऐसे ॥ ३९ ॥ पुरुप आपुलिया निजसत्तां । प्रकृतीचा असे खेतों । आणि प्रकृतीचिया

---

१ आकाशामध्यें ढगाच्या निरनिराळ्या आकृति दिसतात त्यास गंधर्वनगरी ह्मणतात. खपुष्पासारखा च हा दृष्टांत आहे. २ भरती किंवा मजुरी. ३ वेत्ता असा दुसरा पाठ आहे.

वृत्ता । येणें च साकल्य ॥४०॥ प्रकृति पुरुषाचें अर्धांग । आभासमात्र भिन्न भाग । जेविं अर्धनटेश्वराचें अंग । एक चि दोहीं रूपीं ॥ ४१ ॥ प्रकृति अस्वतंत्र्यें नेणे पुरुषासी । पुरुष स्वकीयत्वे जाणे तिसी । ऐसिया सहवासें येकमेकांसी । रूप आरंभिलें[१] ॥ ४२ ॥ इच्छामात्रें ते सुंदरा । अपृथकीं प्रथका जाली मनोहरा । पुरुषवीर्यें कुमरा । प्रसवली महत्तत्त्वासी ॥ ४३ ॥ पंचविसां तत्वांचें अधिष्ठान । ह्मणोनि महत्तत्व हें अभिधान । तें त्रिगुणाचें जन्मस्थान । प्रथम स्वशक्तीसी ॥ ४४ ॥ महत्तत्वापासूनि सत्व रज तम गुणत्रय । ज्ञानशक्ति क्रियाशक्ति द्रव्यशक्ति त्रय । यापासूनि सर्व ही अन्वय । तत्त्वोत्पत्तीचा ॥ ४५ ॥ इंद्रियज्ञानें बोलिजे ज्ञानशक्ति । इंद्रियक्रिया ह्मणिजे क्रियाशक्ति । विषयद्रव्यें द्रव्यशक्ति । हे नामाचे अर्थ ॥ ४६ ॥ ज्ञानशक्तीसी सत्वगुण येक । तेथूनि जालें अंतःकरणपंचक । मन बुद्धि चित्त अहंकार आणिक । अंतःकरण तें ॥ ४७ ॥ क्रियाशक्तीसी रजोगुण । त्यापासूनि दशेंद्रियें आणि पंचप्राण । ते प्रसिद्ध चि परंतु कोण कोण । स्पष्ट ही सांगों ॥ ४८ ॥ श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा घ्राण । वाचा पाणि पाद शिश्न गुद दशेंद्रियें जांण । प्राण अपान व्यान उदान समान प्रमाण । ऐसीं पंधरा तत्त्वें ॥४९॥ तमोगुणाचीं पंचमहाभूतें स्थूळ । पृथ्वी आप तेज वायु व्योममंडळ । ह्मणोनि शब्द स्पर्श रूप रस गंध हे गुण केवळ । निवडूनियां घेतले ॥५०॥ ऐसे पंचवीस तत्वप्रकार जाले । परंतु चेतईतैव्य सामर्थ्य मुळींचें चाले । जैसे गवाक्षरश्मी वेगळाले । प्रभा एक सूर्याची ॥५१॥ सर्वेश्वराचेनि इच्छाबळें । द्विधा जालीं तत्वमूळें । अर्द्ध अपचीकृतें विमळें । हिरण्यगर्भप्रभूचें ॥ ५२ ॥ अर्द्ध भागाचा पंचीकृत प्रकार । करावयासी सर्वेश्वर । सत्वरजोतत्वाचा संभार । मेळवी तमोगुणीं ॥ ५३ ॥ विषयो

---

१ संपूर्णता. २ पुरुषाचें सहाय्य असल्याखेरीज. ३ पंचमहाभूतांचा संयोग ज्यांत आहे असें तत्त्व. ४ अंतःकरण पंचक, पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें, पंचप्राण, आणि पंचमहाभूतें मिळून पंचवीस तत्त्वें. ५ चेतना देण्याचें. ६ घान्यातून येणारा कवडसा.

सर्वासी कारण मूळ । एणें च अतःकरण प्राण इंद्रियें सफळ । ह्मणोनि विषयरूप पचभूतीं सकळ । मिळतीं जालीं ॥ ५४ ॥ अत करणपचक सत्वगुणाचें । तें आकाशीं मिळालें साचें । प्राणपचक रजोगुणाचें । तें वायूसी अनुरूप ॥ ५५ ॥ ज्ञानेंद्रियपचक रजोद्भव । तेजीं मिळालें सगौरव । तैयांच्या चि कर्म इद्रियाचा प्रादुर्भाव । आपीं मिळाला ॥ ५६ ॥ भूतपचकाचेनि विषयपचकें । अवलबूनि राहिजे भूमिके । हा स्वतत्र च तमोगुण आइकें । प्रवेश वास्तंव्यता ॥ ५७ ॥ त्रिगुणाचीं निउनाधिक तत्वें होतीं । ते समान वाटूनि घेतले भूतीं । पाचाचीं पचवीस पूर्वी समान नव्हतीं । ह्मणोनि ते चि साधिलीं ॥ ५८ ॥ ऐसिया पाचाचिया पचवीस कळा । याचा परस्परानुप्रवेश-मेळा । तो पचीकृत प्रकार लिळा । ईश्वर करिता जाला ॥ ५९ ॥ एकएकाचा एकएक स्वकीय गुण असे । तो सहज चि स्वस्थानीं वसे । परकीय परस्परें प्रवेशती कैसे । आइक विचक्षणा ॥ ६० ॥ आकाशाचा मुख्य गुण । तें स्वस्थानीं राहिलें अत करण । मनोरूपें वायूसी केलें सक्रमण । बुद्धि तेजीं चित्त आपीं अहकार धरेसीं ॥६१॥ वायु समानाशें तत्काळीं । सचरला नभमडळीं । हें साक्षित शारीरकभाष्यीं समूळीं । पचीकरणीं प्रसिद्ध ॥६२॥ व्यानाशें राहिला स्वस्थानीं । उदानाशें दहनीं अपानाशें जीवनीं । प्राणाशें माजिअवनी । प्रवेशला वायु ॥६३॥ तेज श्रोत्राशें मिळालें व्योमीं । त्वचाशें वायूसी नेमीं । चक्षुरूपें स्वभूमि । वसनिली तेजें ॥ ६४ ॥ जिव्हारूपें मिळालें नीरा । घ्राणरूपें सेविली वसुधरा । एव तेज प्रवेशप्रकारा । निरोपिलें तुज ॥ ६५ ॥ वाचाशें गगनीं मिळालें आप । पवनीं प्रवेशलें पाणिरूप । पादरूपें केला साक्षेप । जन्मस्थानप्रवेशीं ॥ ६६ ॥ शिश्नरूपें स्वस्थानीं राहिलें । गुदरूपें पृथ्वीमाजीं प्रवेशलें । येणें प्रकारें विभागोनि ठेलें ।

---

१ ठावठिकाण २ एकमेकांत मिसळण्याची क्रिया. ३ आकाशापासून वायूची उत्पत्ति, वायूपासून तेज, तेजापासून आप, यावरून आपाचें जन्मस्थान जें तेज त्यात पादरूपानें प्रवेश केला.

सलिल सर्वी ॥ ६७ ॥ शब्दांशें नभीं प्रवेशली धरा । स्पर्शांशें मिळाली समीरा । रूपांशें वैश्वानरा । मिळती जाली ॥ ६८ ॥ रसरूपें मिळाली जळा । गंधरूपें स्वस्थानीं राहिली ईळा । ऐस्या पांचांचिया पंचवीस कळा । परस्परें प्रवेशलिया ॥ ६९ ॥ ईश्वरइच्छामात्रें अवलीळा । तन्मात्ररसें कर्दम जाला । महत्तेजें शोषोनि केला । ब्रह्मांडगोळक ॥ ७० ॥ तेथें अवेवस्थानें आपादमस्तकपर्यंत । वर्णिती वेदपारंगत । वैराजधारणा द्वितीय स्कंद भागवत । तें चि आतां अवधारीं ॥ ७१ ॥ पादतळ तें सप्तपाताळ । पादपृष्ठ तें महातळ । गुल्फद्वय रसातळ । तळातळ जंघायुग्म तें ॥ ७२ ॥ सुतळ ते जानुयुग । अतळ वितळ उरूभाग । सप्तपाताळें चरण सांग । निरूपिलें तुज ॥७३॥ गुद निर्ऋतिलोक । शिश्न प्रजापतिलोक आइक । कटिस्थान पृथ्वी निःशंक । उदर सप्तसागर ॥ ७४ ॥ जठराग्नि वडवानळ । नाडी नदिया शोणित जळ । मांस मृत्तिका केवळ । पाषाण अस्थि ॥ ७५ ॥ सप्त सिंधूंचे सप्त ही रस । त्या चि सप्त धातु परिस । चहूं खाणीचे जीव बहुवस । क्रमीस्थानीं ॥ ७६ ॥ उच्च प्रदेश ते पर्वत । वनस्पती रोमावळी विख्यात । हा देह सादृश्यता संकेत । नाभि नभोमंडळ ॥ ७७ ॥ ज्योतिर्लोक तें हृदय । कंठ महोलोक होय । वदन जनोलोक आयँ । जेथें दों इंद्रियांचा ॥ ७८ ॥ जिव्हा प्रस्थान असे एक । रसग्रहणत्वीं वरुणलोक । शब्दोच्चारणीं अग्निलोक । दशन दंष्ट्रा येमावती ॥ ७९ ॥ घ्राण अश्विनौलोक नीट । सूर्यलोक नेत्रवाट । तपोलोक तें ललाट । मस्तक सत्यलोक ॥८०॥ श्रवण दिशांची पोकळी । अमरावती बाहु शाळी । त्वचा पवनावती विशाळी । विराटाची ॥ ८१ ॥ तें हें ब्रह्मांड ईश्वराचा स्थूळ देह । हें हिरण्यगर्भाचें गेहं । जेथींचे करणस्थानीं देवतासमूह । ते चि कैसे परिसावें ॥ ८२ ॥ अंतःकरण माधव मन मयंकें । बुद्धि विधाता चित्त

---

१ पाणी, आप. २ इलिका=पृथ्वी. ३ शब्दस्पर्शादि पंचविषय. ४ पायाचे दोन्ही घोटे. ५ मांड्या, पोटऱ्या. ६ गुडघे. ७ एके ठिकाणीं येणें, संयोग. ८ इंद्रलोक. ९ शालीय=मंदिर. १० गृह. ११ मनोमय कोशांतील प्रत्येक स्थानांत. १२ चंद्र.

नाराज्यांचें स्थानक । अहंकार तो त्र्यंबक । . हिरण्यगर्भीचा ॥ ८३ ॥ दिशा श्रोत्र त्वचा मारुत । नेत्र तरणि रसना तोयेकांत । घ्राण अश्विनौ-देव विख्यात । ज्ञानेंद्रियस्थानीं ॥ ८४ ॥ वाणि वैश्वानर पाणि सुरेश्वर। पाद त्रिविक्रम लिंग प्रजेश्वर । गुद निर्ऋति निरंतर । कर्मइंद्रियस्थानीं ॥ ८५ ॥ त्वष्टांडांतर्वर्ती खंज । तो च पंचप्राणस्थानीं सहज । पंचभूतें पंचविषय हें तुज । साम्यतार्थ निरोपिले ॥ ८६ ॥ विराट हिरण्य देहाचें कारण । स्वरूपविस्मृतिरूप माया तृतीय देह जाण । स्वरूपस्मरणपरा महामाया महाकारण । चौथा देह ईश्वराचा ॥ ८७ ॥ जरि स्वरूपीं विस्मृति न संभवे । तरि हा प्रपंच कोठूनि संभवे । ह्मणौनि याचें कारण माया स्वभावें । घडे चि कीं ॥ ८८ ॥ याचें ही मूळकारण मूळमाया । ते कैशी आइक शिष्यराया । तरि ठाव चि स्मरणावांचूनियां। विस्मरणासी नाहीं ॥ ८९ ॥ स्मरणें द्योतिलें विस्मरणासी । ह्मणौनि मूळ-माया कारण मायेसी । स्वानुभवीं स्मरणविस्मरणेंसीं । वाव चि कीं ॥९०॥ जें आपआपणासी भुललें । तयाचें तयासी स्मरण जालें । तें सांगातें चि घेऊनि गेलें । विस्मरणासी ॥ ९१ ॥ स्मरणाचा हि राहे संभ्रमें । तरि तो चि आहे महाभ्रम । ह्मणोनि प्रपंचाचें महाकारण निर्भ्रम । महामाया हे ॥ ९२ ॥ देह च्यारि अवस्था च्यारि । अभिमानी ते हि चत्वारि । ऐसा प्रपंच सर्वेश्वरीं । तो चि विस्तारें सांगों ॥ ९३ ॥ स्थूळ देह ब्रह्मांड देख । अवस्था उत्पत्ति वोळख । तेथें अभिमानी चतुर्मुख । सर्वलोकनिवासी ॥ ९४ ॥ हिरण्यगर्भ सूक्ष्म शरीर । स्थिति अवस्था निरंतर । तेथें अभिमानी शार्ङ्गधर । विकुंठावतीचा ॥ ९५ ॥ माया कारण तनु । प्रळय अवस्था कैंचा जनु । तेथें अभि-मानी पंचाननु । कैळासवासी ॥ ९६ ॥ महामाया महाकारण काया । अवस्था तेथींची तुर्या । तेथें अभिमानी ह्मणऊनियां । प्रत्यगात्मा

१ नारायणाचे. २ सूर्य. ३ वरुण. ४ विश्वकर्मानिर्मित अंडांतर्यामी वास करणारा. ५ स=आकाश, त्यापासून उत्पन्न झालेला वायू. ६ वैभव. ७ निश्चय. ८ ब्रह्मदेव. ९ जन, लोक. १० पंचमुखी महेश.

बोलिजे ॥ ९७ ॥ तो परमात्मा सर्वसाक्षी । सर्वेश्वर सर्वकुक्षी । सर्वगत सर्वलक्षी । नयनेंवीण ॥ ९८ ॥ जो डोळस निश्वनयनें । जो चाळक विश्वचळनें । जया विश्वरूपें निश्वाभिधानें । स्तविती श्रुति ॥ ९९ ॥ पुरुषमय हें विश्व सर्व । जेथें गळती साकारसामर्थ्याचे गर्व[1] । हरिहरब्रह्मादिक गौरव । मिरविती जेथींचें ॥ १०० ॥ पृथकाकारीं अद्वैत स्थिति । हे मूळ अद्वैतींची संपत्ति । का जें हे[2] हि तेथींचिया विभूति । ह्मणऊनिया ॥ १ ॥ केवळ अव्यक्त सुगधाचें तत्त्व । तें चि कस्तुरीचें सुशोभ व्यक्तत्व । तैसें श्रीरामाचें सुंदर साकारत्व । ब्रह्मरूप चि कीं ॥ २ ॥ विशेष माझा ऐसा नेम । श्रीरामाचें स्वरूप आणि नाम । स्मरता समस्त जीवभवभ्रम । अस्ता तरी सुखें असो ही ॥ ३ ॥ ज्ञान हो न हो व्यामोहो । तथापि सगुणीं च दुराग्रहो । किमर्थ तदर्थ सस्नेहो । पारिसोत का सज्जन ॥ ४ ॥ जैसें पाळकाबाळकालागीं । सर्वस्वें जननी च जगीं । तीविगळें त्याचा आंगीं । कैसें सुख सक्रमे ॥ ५ ॥ तैसा मी केवळ अनाथ । मज सर्वभावें येक रघुनाथ । माझा स्वार्थ आणि परमार्थ । अवघें रामा लागलें ॥६॥ हें माझें सत्यानृत । सहवासीं विश्वविदित । तरि तयाविगळें मनोगत । कैसेनि पानिवेल ॥ ७ ॥ येव्हवीं तव्ही अनुभवाची खूण । तत्वता निर्गुण जें तें चि सगुण । कार्यरूपें स्वयें कारण । अन्यत्वें कैचें ॥ ८ ॥ आणि व्यासादिकाची हि उक्ति । येथें प्राधान्य भगवद्भक्ति । भगवत्कृपा ज्ञानशक्ति । ते चि अनिच्युत ॥ ९ ॥ श्रीरामभक्तीवीण उपपत्ति । तितुकिया हि होती विपत्ति । यदर्थीं प्रतिपत्ति । नाना ग्रथीं ॥ ११० ॥ ह्मणऊनि श्रीराम माझा वरदायक । बुद्धिप्रकाशक वाचोवाचक । आणि

---

१ एखाद्या मनुष्यास आपल्या कल्पनाशक्तीचा किंवा सामर्थ्याचा गर्व झाल्यास त्यानें विश्वरचनेचें चातुर्य व परमेश्वराची शक्ति ही अवलोकन केली तर त्याचा गर्व तावडतोब गळून जाईल. २ निरनिराळ्या व्यक्ति. ३ काळसर रगाची ४ अत्यत मोह ५ पाळण्यातील लहान मुलास (पालव=पाळगा) ६ शब्दज्ञान. ७ आपदा ८ ग्रथरचना. ९ वाचेनें बोलविणारा,

सर्वत्र ही हृषीकेश येक । तो चि कीं स्वयें ॥ ११ ॥ येणें मुखें तयाचा अनुभवप्रसाद । परिसोत तन्मय होत्साते तद्विदें । कथानुसंधान शबळ त्वंपद । ईश्वरतनुचतुष्टय सपूर्ण ॥ ११२ ॥ स्वस्ति श्रीसुगमोपाये । रामीरामदासकृते । मनोजये । अध्यात्मविद्यायां शबळ त्वंपदार्थे । ईश्वरतनुचतुष्टय वर्णनं नाम । पंचम प्रकरणम् ॥ श्रीराम ॥

---

॥ श्रीराम ॥

पूर्वप्रकरणप्रासादकळसीं । कथा रत्नप्रभा ऐसी । तेथें ईश्वरतेंनुचतुष्टयप्रतिष्ठेसीं । केलें त्वंपद शबळार्थे ॥ १ ॥ आतां वोलिजेतसे जीवाचें । तनुचतुष्टय साचें । जें त्वपदशबळार्थाचें । मुख्य रहस्य ॥ २ ॥ जयाचिया भवसमधज्ञानास्तव । ईश्वरीं कल्पिले शरीरावेव । मिथ्यारूप मायेसी सत्यत्वें गौरव । ज्याचेन भ्रमेंसभ्रमें ॥ ३ ॥ जयाचेनि डोळसपणें । मिथ्या दृश्याचें वैसविलें ठाणें । सत्यस्वरूप सिद्धस्वतें जेणें । लोपूनियां टाकिलें ॥ ४ ॥ जेथीच्या शहाणपणाची आईटी । देहममतेसी वळकट घातली मिठी । सोडवितां न सोडी देऊनि पाठी । स्वस्वरूपासी ॥ ५ ॥ जें अँविद्येची कृतार्थता । जेणें कृतांतातें समर्थता । पाप पुण्य स्वर्ग नरकता । गर्भवास ज्याकारणें ॥ ६ ॥ असो ऐसिया जीवा तनुचतुष्टयावलव । तें ईश्वरतनुचतुष्टयाचें प्रतिबिंब । पृथकाकारें वोलिजेलि अविलब । श्रवण करीं सर्व ही ॥ ७ ॥ प्रसंगात्मा ईश्वर जो सर्वज्ञ । तयाचा चि अश होय क्षेत्रैज्ञ । तयाच्या देहाचें अंश तत्वज्ञ । ह्मणती जीवाचे देह ॥ ८ ॥ क्षेत्रज्ञ ईश्वराचा अश जाण । जीव प्रतिबिंब हें प्रमाण । ह्मणऊनि शरीरसमवाचें आरोपण । जीवत्वीं च कीं ॥ ९ ॥ जीव धर्म निःशेष ही नाहीं । याचिलागीं तो

---

१ त्याला जाणणारे. २ विराट, हिरण्यगर्भ, अव्याकृत आणि मूळप्रकृति हे ब्रह्मांडाचे चार देह आहेत. ३ स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण असे पिंडाचे चार देह आहेत. ४ भ्रांति किंवा वैभव याचें साह्यानें. ५ दृश्य वस्तु ही मिथ्या असून सत्य भासू लागली. ६ आइती=सामग्री. ७ अज्ञान. ८ यमलोकांतील लोकसत्ता माटली. ९ त्वपदाचें लक्ष्य तें, कूटस्थ. १० जीव.

ईश्वर पाहीं । साक्षिभूतत्वें वर्ते देहीं । जीव कर्मातीत ॥ १० ॥ घटोपाधीं घटाकाशत्व घडे । परंतु घटधर्मीं गुंतणें न घडे । तैसें क्षेत्रो-पाधीं क्षेत्रज्ञ जोडे । परि तत्कर्मी अलिप्त ॥ ११ ॥ सूर्य चि घटीं बिंबला दिसे । त्यासी बोलिजे प्रतिबिंब ऐसें । तें वेगळें होईल कैसें । कोणें प्रकारें ॥ १२ ॥ तथापि प्रतिबिंबधर्म काय । मुख्य बिंबीं[4] बोलों तऱ्ही ये । येवढें विशाळ मंडळ[5] सामाये । कैसें घटामाझारीं ॥ १३ ॥ घटोपाधीं क्षुद्रत्व चांचल्य धर्म । तेथें प्रतिबिंब बोलिजे हें वर्म । तैसें जें जें कांहीं देहकर्म । तेथें जीव चि बोलिजे ॥१४॥ ऐसें क्षेत्रज्ञ जीवाचें लक्षण । जे पूर्वापर वर्णिती विचक्षण । आतां देहचतुष्टयाचें निरोपण । आइक बापा ॥ १५ ॥ पंचीकृतें पचभूतांचा भूगोळ । तदंश जीवाचा देह स्थूळ । जड जडाचा अंश केवळ । तथापि रचना ही सांगों ॥१६॥ पंचभूतात्मक अन्नपड्रस । त्याचें शुक्र शोणित हा विश्वास । तें चि कैसें तो विळास । परिस आधीं॥१७॥ पुरुष अथवा स्त्री । जें अन्न पडेल जठरपा-त्रीं । त्याचा पाक अहोरात्रीं । होय जठराग्निमेळें ॥१८॥ पुरुषदेहीं त्रीणि प्रकार होत । उत्तम भागाचें बोलिजे रेत । मध्यम पदार्थाचें शोणित । कनिष्ठाचे मळ होती ॥१९॥ आणि स्त्रियांचा देहीं । उत्तम भागाचें शो-णित पाहीं । कनिष्ठाचे मळ आतां आणिख ही । विस्तारें सांगों ॥२०॥ पुरुषाची जठराग्निमूस । तेथें पडती जे अन्नरस । त्याचे प्रकार बहुवस । एकापासूनि येक ॥ २१ ॥ रसापासाव होय रक्त । त्यापासाव मास जें विभक्त । तया पासाव मेद महामुक्त । बोलती स्वयें ॥ २२ ॥ मेदापा-साव अँस्थि होती । तयापासाव मज्जा बोलिजेति । तयापासूनि उत्पत्ति । शुक्राची होय ॥ २३ ॥ तयाचिपरी स्त्रियांचा शरीरीं । अनुक्रमें होती

---

१ कर्म आणि धर्म यापासून जीव अगदीं अलिप्त आहे. २ घटाचे धर्म, जे आपटणें, फुटणें वगैरे, ते घटामधील जें आकाश त्यास लागू होत नाहींत. ३ तत्=त्या क्षेत्राचे. ४ बिंब आणि प्रतिबिंब यात वरवर पाहणारास भेद दिसत नाहीं, परतु यावरून प्रतिबिंबाचे जे चचलत्व वगैरे गुणधर्म आहेत, तेच बिंबाच्या ठिकाणीं आहेत असें म्हणता येईल काय ? ५ सूर्यमंडळ. ६ मागील प्रकरणातील ओवी ६१ ते ७० पहा. ७ हाडें. ८ नाड्या, शिरा.

पुरुषापरी । परतु वीर्य नाहीं ह्मणऊनि सुदरी । अर्द्धांग पुरुषाचें ॥२४॥ आता असो हें जन्म धरावया निरावेव । लिंगदेहधारी जो का जीव । तो आधीं पावे पितृदेहाचा ठाव । आहारामाजीं मिळोनिया ॥ २५ ॥ तयाचें होय जें रेत । त्यामाजीं राहे मिश्रित । मातृगर्भी प्रवेशत । यथाकाळीं ॥ २६ ॥ तें जठराग्नीचेनि तेजें । शुक्र शोणित समरसोनि गोळा विरजे । एके अहोरात्रें सहजें । बुद्बुदाकार होय पोकळ ॥ २७ ॥ पक्षें होय अडाकार । मासें करउल्या ऐसें ठोंसर । दों मासीं त्याहूनि थोर । घन अर्बुद होय ॥ २८ ॥ अकुर फुटती तृतीय मासीं । जैसीं फडदरें आळियासी । चौथा करी चेतनेसीं । आणी अगें अगुळिका ॥२९॥ पचम मासीं केश नखें शोणित । आणि अत.करण अतर्गत । षष्ठीं अस्थि सप्तमीं वर्ण उमटत । आणि इद्रियद्वारें उघडती ॥ ३० ॥ अष्टमीं त्वचेचें कचुक । गतजन्म स्मरे बाळक । सोह शब्दाचा घोक । अतरामाजीं ॥ ३१ ॥ मग तो नववा मासीं । अथवा न्यूनपूर्ण दिवसीं । देहो उपजोनि लोळे धरणीसी । तिचा अश तीवरी ॥ ३२ ॥ उत्पत्तीं स्थितीं आणि मरणीं । स्थूळ देहो न सोडी धरणी । भिन्न अभिन्नत्वें कार्यकारणीं । भेद चि नाहीं ॥ ३३ ॥ तया स्थूळ देहाची रचना । विस्तरें आइक विरचना । जेणेंकरोनि तुझिया मना । सर्वज्ञता ये॥३४॥ उदरामाजीं अतें येक । तया प्रमाण एकनीस हस्तक । आणिख आइक पा कौतुक । फौर्यसें अगुळें तेरा ॥ ३५ ॥ अगुळें सात स्नेहाळी जाण । आउट अगुळें पित्ताचें प्रमाण । मूत्रकोष्ठ जाळें निर्माण । नव

---

१ मनुष्य मृत झाला ह्मणजे त्याचा जीवात्मा वासनात्मक सूक्ष्म शरिरांत प्रवेश करून राहतो तो जीवात्मा पचभूतात मिसळून गेल्याकारणानें, धान्याच्या, अर्थात, अनाच्या रूपानें पुरुषाच्या देहात शिरून रेतरूपानें स्त्रीचे ठिकाणीं स्थित होतो, व पुढे सागितल्याप्रमाणें वाढून, पुन्हा जडदेहधारी होतो २ निर्मळ, विकाररहित. ३ आगरखा, आवरण ४ पृथ्वी जडरूप आणि देह हो जडरूप ह्मणून तिचा अश असें ह्मटलें, किंवा जमिनामध्यें उत्पन्न होणाऱ्या धान्यात बीजरूपानें तो होता, ह्मणून त्याला तिचा अश असें ह्मटलें आहे ५ अन्न=आतडा ६ कदाचित् फुफुस या अर्थानें असावें ७ स्नेह—चरबी.

अंगुळें ॥ ३६ ॥ अष्टादश अंगुळें मळकोष्ट । हें तुज सांगितलें स्पष्ट । आणिख ही अंतरींचें खष्ट । किती ह्मणोनि वर्णावें ॥ ३७ ॥ अग्नि प्रदीप्त जठरामांत । कृमी वेगळे चौट शते जत । नाडी बाहात्तरी सहस्र परि विख्यात । चतुर्दश प्रसिद्धा ॥३८॥ तिहीं बाहात्तरीं कोठे केले भीतरीं । पद्‌चक्र पकोळिका नानापरी । दश द्वारें अति कुसरी । नव प्रगट येकें गुप्त ॥३९॥ आणिखें मतें असती तेरा । दोनि प्रगुप्त प्रगट अकरा । ब्रह्मरंध्र नाभिरंध्र अडकूनि एरा । स्तनरंध्रें अधिक नवांसी ॥ ४० ॥ रोमरंध्रें तीर्थसंख्या । केली हे जयाची आख्या । ज्याच्या प्रसाराची व्याख्या । अपार च कीं ॥ ४१ ॥ मुख रेखिलें चारी अंगुळें । बत्तीस दंत अध ऊर्ध्व उणे आगळे । भीतरीं जिन्हा खेळे । अंगुळें आठ ॥४२॥ मुळीं अंगुळें दोनि विचित्र । असे जिन्हेचें मूळ पत्र । लंबिका अधोमुख स्वतंत्र । अंगुळ एक ॥ ४३ ॥ आवठ शतें अस्थिकुटके । सोळा सांदीं सांदिले नेटके । सवा घट रुधिर मांसळेंमोटकें । आऊंट हस्त स्वहस्तें ॥ ४४ ॥ ऐशिया प्रकारीचा हा स्थूळ देहो । येथें मिश्रित जाला भूतसमूहो । तथापि पांचांचे ही अंश पाहा हो । वेगळाले दिसती ॥ ४५ ॥ स्थूळीं मुख्य गुण वसुधेचे । ते केवळ स्थूळत्वीं ही वसती साचे । आगंतुक जे आणिखांचे । ते सूक्ष्मयोगें वर्तती ॥ ४६ ॥ रोम त्वचा मांस नाडी अस्थि । हे धरांश सचेतनीं अचेतनीं ही असती । जळापृथ्वीची येक वस्ति । ह्मणोनि प्रेत ही पाझरे ॥ ४७ ॥ परंतु शुक्र शोणित लाळ मूत्र घर्म । हे जळांश ऐसें जाण धर्म । क्षुधा तृषा आलस्य निद्रा मैथुन हें वर्म । तेजांशाचें ॥ ४८ ॥ चळण वळण आकोचन । प्रसारण निरोधनांशें पवन । भय शोक लोभ मोह चिंता गगन । इहीं अंशीं जाणावें ॥ ४९ ॥ स्थूळीं बोलती पचवीस गुण । त्यांचें सांगितलें विवरण । येणेंप्रकारें जालें निर्माण । स्थूळ शरीर हें ॥५०॥

---

१ पाकळ्या ? २ नाभिरंध्र. ३ ब्रह्मरंध्र, नाभिरंध्र. ४ सांध्याच्या ठिकाणीं. ५ मांसाचे गाठोडें. ६ हा एकदर देह स्वत:च्या हातानें साडेतीन हात आहे. ७ या देहात जडत्वाचा जेवढा भाग आहे तो पृथ्वीचा अंश जाणावा. ८ एकदर स्थावर जगम दृष्टांत.

ऐसें हें स्थूळदेहपद्म । लिंगभ्रमरांचें निज सद्म । हालतां दिसे परि तें विद्म । अंतरस्थाचें ॥ ५१ ॥ स्थूळ देह ह्मणिजे जंड । जितां मेलियां सारखा पोंड । विषईं कारितां दिसे पवाड । ते कळा अंतरस्थाची ॥५२॥ जैसा बहुरूपियांचा बाह्य सांटा । चळतां दिसे नेत्रवाटां । तो जड काय चळेल गोमटा । अंतरस्थ चाळितसे ॥५३॥ स्थूळ सूक्ष्य दोन्ही शरीरें । अनन्य भावें येकाकारें । ह्मणोनि येके स्थूळ देहें चि वावरे । मुळींची वाचा ॥ ५४ ॥ कारण आणि महाकारण । हें देहकार्याचें मूळ जाण । परि इंद्रियांचें स्पष्टतेवीण । देहत्व ते कल्पना ॥ ५५ ॥ तया इंद्रियांची स्पष्टता । स्थूळ देहीं च कीं तत्वता । आणि विषयसुखानुभव स्वतां । एणें च की लाहिजे ॥ ५६ ॥ अव्यक्त इंद्रियें बोलिलीं आधीं । येणेंवीण तयांची काय शुद्धि । बीजगर्भींचा विस्तारविधि । वृक्षदर्शनें प्रमाण ॥ ५७ ॥ तथापि संक्षेपविस्तारस्थिति । बोलावयाची आहे गति । याळागीं चत्वारि देह संतीं । बोलिजेताति ॥ ५८ ॥ स्थूळदेह त्यामध्यें जाला । तो ब्रह्मांडाचा अंश बोलिला । आतां लिंगदेह आरंभला । जो अंश हिरण्यगर्भाचा ॥ ५९ ॥ अपंचीकृत भूताचे अर्द्धभाग देव । ते चि जेथींचे कारणावेव । तयांचे चि अंश स्वयमेव । लिंगदेहीं प्रसिद्ध ॥ ६० ॥ तदंश चि जेव्हां जाले । तेव्हां सांगणें काय वेगळाले । परंतु प्रकरणपुष्टयर्थ बोलिलें । पाहिजे प्रगट ॥ ६१ ॥ श्रोत्र अंश दिशांचा । त्वचा अंश वायूचा । चक्षु अंश सूर्याचा । प्रकाशरूप ॥ ६२ ॥ जिव्हा वरुणाचा अंश जाण । अश्विनौदेवांचा अंश घ्राण । हें ज्ञानेंद्रियपंचक प्रमाण । निरोपिलें तुज ॥६३॥ वाचा वन्हीचा.अंश । पाणि अंश तो सुरेश । पाद उपेंद्र शिश्न प्रजेश । निर्ऋति अंश गुदेंद्रियाचा ॥ ६४ ॥ हें कर्मेंद्रियपंचक । आतां अंतःकरणपचक आइक । दों दों इंद्रियांसी एक एक । चाळक जें ॥६५॥

---

१ स्थूलदेहरूपी कमल हे लिंगदेहरूपी भ्रमरांचें राहण्याचे घर च आहे. २ स्थूल देहाला चलनवलन देणारा अतरात्मा निराळा च आहे. ३ क्रियाहीन. ४ मोल, किंमत. ५ महत्व, थोरी. ६ टोप.

जीवात्मयाचें निर्विकार स्फुरण । ते महाविष्णूचा अंश अंत:करण । तें शब्दोचार आणि करी ग्रहण । श्रोत्रीं वाचे बैसोनिया ॥ ६६ ॥ संकल्पविकल्पात्मक मन । त्यासी चंद्राशाचें प्रस्थान । तें त्वचापाणीं-द्रियीं स्पर्शोन । स्पर्श आणि ग्रहण अनुभवी ॥ ६७ ॥ ब्रह्मयाचा अंश बुद्धि निश्चयात्मक । तयेसी दों स्थानीं जाली बैसक । चक्षुचरणीं करी कौतुक । रूप आणि गमनाचिया ॥ ६८ ॥ चिंतनात्मक चित्त नारा-यणांश । वसनी जिव्हाशिश्नाचे अंतरकोश । दों इंद्रियीं करी प्रकाश । रस आणि रतिसुखाचा ॥ ६९ ॥ रुद्राश देहममतारूप अहंकार । तेणें दों इंद्रियीं घेतलें बिढार । घ्राणीं करी प्राणप्रचार । गुदीं मळोत्सर्ग पैं ॥७०॥ आतां लिंगदेहाची विभूति पंचप्राण । स्थूलदेहीं वर्तती जाण । कोणे स्थानीं वसे कोण । आइक बापा ॥ ७१ ॥ प्राण हृदयीं गुदीं अपान । नाभिस्थळीं समान सर्वांगीं व्यान । कंठदेशीं तो उदान । वास्तव्य करी ॥ ७२ ॥ प्राणाचें कर्म घ्राणविवरीं । प्रवेशनिर्गमाची भरोवरी । जो निघतां चि बाहेरी । प्रेत होइजे ॥ ७३ ॥ अन्यत् जे चौघेजण । तयाचे चि अंश जाण । जैसें एक चि अंत:करण । पंचधा बोलिजे ॥ ७४ ॥ अपान वसे गुदस्थानीं । व्याप्ति करी अधोगमनीं । तत्पर अन्नाचा पाचनीं । प्राणाचेन आधारें ॥ ७५ ॥ समान वसे नाभिमंडळीं । तेथूनि सर्व सूत्रें चाळी । व्यान फिरे सर्व काळीं । सर्व ही शरीरीं ॥ ७६ ॥ उदान वसे कंठमंदिरीं । स्वप्नावस्थेचा विहारी । प्राणा-सि निवासस्थान दुसरें दुरी । तो राजा ह्मणोनिया ॥ ७७ ॥ ऐसें प्राण-पंचक जालें निकें । आतां विषयपंचक आइकें । जें पंचभूतात्मक विवेकें । गुणकर्मधर्में ॥ ७८ ॥ जालें तमोगुणापासोनि आकाश निर्माण । तयाचा एक च शब्दगुण । आकाशापासान वायु तो द्विगुण । शब्द आणि स्पर्श ॥ ७९ ॥ वायूपासूनि तेज जन्मलें । ह्मणूनि

१ श्वासोच्छ्वास करणें २ इडा व पिंगळा या दोन नाड्यांच्या द्वारें प्राण-वायूची आंत जाण्याची व बाहेर येण्याची क्रिया चाललेली असते ती. ३ श्रम, सामग्री. ४ अव्याप्ति, बाहेर टाकणें. ५ बरवें, चांगलें

गुणत्रयें तें आथिलें । शब्द स्पर्श रूप बोलिलें । तये ठाईं ॥ ८० ॥ तेजापासाव जालें आप । तेथें गुणचतुष्टयाचा आरोप । शब्द स्पर्श रूप रस साक्षेप । ह्मणऊनियां ॥ ८१ ॥ आपीं जन्मली भूमिका । ह्मणोनि तेथें देखिजे गुणपंचका । शब्द स्पर्श रूप रस गंध जे कां । पंच हि विषय ॥ ८२ ॥ एकिये भूतीं येक चि आपुला गुण । इतर कार्यरूपें वाढे कारण । परंतु शब्द स्पर्श रूप रस गंध हे जाण । पांचाचे पांच ही ॥ ८३ ॥ पांच ही जे ज्ञान करणें । पंच विषय येच तयां कारणें । कर्मइंद्रियपंचक जाणे । त्याचेनि योगें ॥ ८४ ॥ सर्वेश्वरें आदरिलें । ह्मणोनि सकळीं तत्वीं वरिलें । जें भूतपंचक तयाचें जालें । याळागीं प्रपंचजाळ या नांवें ॥ ८५ ॥ जयाचेनि पंचीकृततत्वें । स्थूळरचना ब्रह्मांड पिंडत्वें । त्याचेन अपंचीकृततत्वें । हिरण्यगर्भ आणि लिंग ॥ ८६ ॥ जैसी पांचा पांडवांची येकात्मता । परंतु स्वभाव दिसती भिन्नता । तैसी पंचभूतीं गुणकर्मधर्मता । एकत्वीं ही पृथकत्वें ॥ ८७ ॥ गुण जे बोलिले विषयपंचक । जेथें प्रपंच होय सार्थक । कर्मधर्माचें कौतुक । दिसे देहद्वयार्थे ॥ ८८ ॥ सछिद्रता[१] स्वधर्में गगन कर्म अवकाशप्रदान । पवनीं चांचल्य धर्माभिधान । कर्म शोषणादिक ॥ ८९ ॥ तेजीं ऊष्णता धर्म आहे । दहनादि कर्म प्रसिद्ध पाहें । आपीं द्रवत्व धर्म पाहें । कर्म क्लेदनादिक ॥९०॥ धरेचा जडत्व हा धर्म । धारणादिक जाण कर्म । ऐसें गुणकर्मधर्माचें वर्म । निरोपिलें तुज ॥९१॥ देह इंद्रियें आणि विषय । अंतःकरण प्राण सर्व भूतमय । ह्मणोनि पंचभूतात्मक होय । विश्वरचना ॥ ९२ ॥ अपंचीकृतें साद्द तत्वबिंबं । जें अळित पंचीकृत कदंबें । जें हिरण्यगर्भीचीं इंद्रियादि स्वयंभें । देवतादि रूपें ॥ ९३ ॥ तया पंचवीसांच्या पंचवीस कळा । तो लिंगदेह कायें तयेसी वेगळा । ह्मणोनि तदंश हे लीळा । बोलिजे महंतीं ॥ ९४ ॥ ईश्वरासी अज्ञान सर्वथा न घडे । अज्ञान ईश्वरें अधिष्ठिलें हें घडे । कां जे अज्ञानेंवीण कैंची जोडे । प्रपंचरचना ॥ ९५ ॥ ह्मणोनं अज्ञान

---

१ सार्द्रता.

कारणदेह ईश्वराचें । तदंश अन्यथाज्ञान कारणशरीर जिवाचें । जेथें या नाथिल्या च प्रपंच जिवाचें । जाणे पैं ॥ ९६ ॥ देहद्वय भिन्न होत्साते येकात्मक । महामाया महाकारण देह केवळ दोहींचा येक । तेथें तयेच्या कारणाचें येकत्वा आलें बीक । ह्मणऊनियां गुणसाम्य ॥९७॥ मुळींचा नाद बीजरूप जो प्रणव । हा सर्व ही तयाचा प्रादुर्भाव । अकार उकार मकार अर्धमात्रेचें गौरव । जीवेश्वर तनुचतुष्टय ॥ ९८ ॥ स्थूळदेहीं विश्व अभिमानी । ब्रह्मयाचा अंश बोलती मुनी । जागृत अवस्था प्रसिद्ध जनीं । उत्पत्तीचा अंश ॥ ९९ ॥ स्थूळ भोग आणि रजोगुण । यांचें स्थान नेत्र हें प्रमाण । हें सर्व ही प्रणवाचा प्रथम चरण । जो अकार बोलिजे ॥ १०० ॥ लिंगदेहीं अभिमानी तैजस । हा प्रसिद्ध विष्णूचा अंश । स्वप्न अवस्था जो प्रतिकोश । स्थितीचा बोलिजे ॥ १ ॥ तेथींचा भोग प्रविविक्त[3] । सत्वगुण ह्मणती महामुक्त । कंठस्थान हें सर्व ही उक्त । द्वितीय चरण उकार ॥ २ ॥ कारणदेहींचा रुद्रांश· प्राज्ञ अभिमानी । सुषुप्ति प्रळयांश बोलती मुनी । आनंदभोग तमोगुण हृदयस्थानीं । वास्तव्य याचें ॥ ३ ॥ हें मिळोनियां सर्व ही । प्रणवाचा तृतीय चरण पाहीं । जयासी मकार हे प्रज्ञा सर्व ही । बोलती योगेश्वर ॥ ४ ॥ महामाया महाकारण शरीर । अभिमानी प्रत्यगात्मा निरंतर । अवस्था तुरिया सुंदर । तये ठाईं ॥ ५ ॥ भोगाभिधान आनंदावभास । शुद्ध सत्वगुण विळास । स्थान मूर्ध्नि या सकळास । अर्द्धमात्रा बोलिजे ॥ ६ ॥ नव्हे मातृका अक्षर । केवळ ध्वनिमात्र उच्चार । तथापि अर्द्धमात्रा योगेश्वर । ह्मणती यातें ॥ ७ ॥ अर्द्धमात्रा ह्मणिजे नादांक । ह्मणऊनिया सर्वत्र व्यापक । आतां असो हें सकळ ही येक । प्रणवाचा विस्तार ॥ ८ ॥ येथें प्रवृत्ति निवृत्ति दोनि पक्ष । प्रवृत्ति प्रपंचरचना जे प्रत्यक्ष । निवृत्ति ह्मणिजे अप्रत्यक्ष । कांहीं नाहीं ॥ ९ ॥ प्रवृत्तीचा ठाईं

---

१ शोभा, तेज. २ स्वप्नदेहाचा अभिमान धरणारा जीव तो. ३ एकटा, निराळा. स्वप्नस्थान किंवा मनोराज्य यातील अस्पष्ट भोग ते. ४ सुषुप्ति अवस्थेंतील नेणिव दशेचा अभिमान धरणारा जीव. ५ तुर्या अवस्थेचें सुख. ६ ॐ या अक्षरांतील अर्धविवास अर्धमात्रा किंवा नादांक ह्मणतात.

गुणत्रयें तें आथिलें । शब्द स्पर्श रूप बोलिलें । तये ठाईं ॥ ८० ॥
तेजापासाव जालें आप । तेथें गुणचतुष्टयाचा आरोप । शब्द स्पर्श रूप रस साक्षेप । ह्मणऊनियां ॥ ८१ ॥ आपीं जन्मली भूमिका । ह्मणोनि तेथें देखिजे गुणपंचका । शब्द स्पर्श रूप रस गंध जे कां । पंच हि विषय ॥ ८२ ॥ एकिये भूतीं येक चि आपुला गुण । इतर कार्यरूपें वाढे कारण । परतु शब्द स्पर्श रूप रस गंध हे जाण । पांचाचे पांच ही ॥ ८३ ॥ पांच ही जे ज्ञान करणें । पंच विषय वेद्य तयां कारणें । कर्मइंद्रियपंचक जाणे । त्याचेनि योगें ॥ ८४ ॥ सर्वे-श्वरें आदरिलें । ह्मणोनि सकळीं तत्वीं वरिलें । जें भूतपंचक तयाचें जालें । यालागीं प्रपंचजाळ या नांवें ॥ ८५ ॥ जयाचेनि पंचीकृततत्वें । स्थूळरचना ब्रह्मांड पिंडत्वें । त्याचेन अपंचीकृततत्वें । हिरण्यगर्भ आणि लिंग ॥ ८६ ॥ जैसी पांचा पांडवांची येकात्मता । परंतु स्वभाव दिसती भिन्नता । तैसी पंचभूतीं गुणकर्मधर्मता । एकत्वीं ही पृथकत्वें ॥ ८७ ॥ गुण जे बोलिले विषयपंचक । जेथें प्रपंच होय सार्थक । कर्मधर्माचें कौतुक । दिसे देहद्वयार्थे ॥ ८८ ॥ सछिद्रता स्वधर्मे गगन कर्म अवकाशप्रदान । पवनीं चांचल्य धर्माभिधान । कर्म शोषणादिक ॥ ८९ ॥ तेजीं ऊष्णता धर्म आहे । दहनादि कर्म प्रसिद्ध पाहें । आपीं द्रवत्व धर्म पाहें । कर्म क्लेदनादिक ॥९०॥ धरेचा जडत्व हा धर्म । धारणादिक जाण कर्म । ऐसें गुणकर्मधर्माचें वर्म । निरोपिलें तुज ॥९१॥ देह इंद्रियें आणि विषय । अतःकरण प्राण सर्व भूतमय । ह्मणोनि पंच-भूतात्मक होय । विश्वरचना ॥ ९२ ॥ अपंचीकृतें सार्द्र[1] तत्वबिंबें । जें अलिप्त पंचीकृत कदबें । जें हिरण्यगर्भीचीं इंद्रियादि स्वयंभें । देवतादि रूपें ॥ ९३ ॥ तया पंचवीसांच्या पंचवीस कळा । तो लिंगदेह कार्ये तयेसी वेगळा । ह्मणोनि तदश हे लीळा । बोलिजे महंती ॥ ९४ ॥ ईश्वरासी अज्ञान सर्वथा न घडे । अज्ञान ईश्वरें अधिष्ठिलें हें घडे । कां जे अज्ञानेंवीण कैची जोडे । प्रपंचरचना ॥ ९५ ॥ ह्मणोन अज्ञान

---

१ सार्द्रता.

कारणदेह ईश्वराचें । तदंश अन्यथाज्ञान कारणशरीर जिवाचें । जेथें या नाथिल्या च प्रपंच जिवाचें । जाणे पैं ॥ ९६ ॥ देहद्वय भिन्न होत्साते येकात्मक । महामाया महाकारण देह केवळ दोहींचा येक । तेथें तयेच्या कारणाचें येकत्वा आलें बीक[1] । ह्मणऊनियां गुणसाम्य ॥९७॥ मुळींचा नाद बीजरूप जो प्रणव । हा सर्व ही तयाचा प्रादुर्भाव । अकार उकार मकार अर्धमात्रेचें गौरव । जीवेश्वर तनुचतुष्टय ॥ ९८ ॥ स्थूळदेहीं विश्व अभिमानी । ब्रह्मयाचा अंश बोलती मुनी । जागृत अवस्था प्रसिद्ध जनीं । उत्पत्तीचा अंश ॥ ९९ ॥ स्थूळ भोग आणि रजोगुण । यांचें स्थान नेत्र हें प्रमाण । हें सर्व ही प्रणवाचा प्रथम चरण । जो अकार बोलिजे ॥ १०० ॥ लिंगदेहीं अभिमानी तैजेस[2] । हा प्रसिद्ध विष्णूचा अंश । स्वप्न अवस्था जो प्रतिकोश । स्थितीचा बोलिजे ॥ १ ॥ तेथींचा भोग प्रविविक्त[3] । सत्वगुण ह्मणती महामुक्त । कंठस्थान हें सर्व ही उक्त । द्वितीय चरण उकार ॥ २ ॥ कारणदेहींचा रुद्रांश प्राज्ञै[4] अभिमानी । सुषुप्ति प्रळयांश बोलती मुनी । आनंदभोग तमोगुण हृदयस्थानीं । वास्तव्य याचें ॥ ३ ॥ हें मिळोनियां सर्व ही । प्रणवाचा तृतीय चरण पाहीं । जयासी मकार हे प्रज्ञा सर्व ही । बोलती योगेश्वर ॥ ४ ॥ महामाया महाकारण शरीर । अभिमानी प्रत्यगात्मा निरंतर । अवस्था तुरिया सुंदर । तये ठाईं ॥ ५ ॥ भोगाभिधान आनंदावभास[5] । शुद्ध सत्वगुण विलास । स्थान मूर्ध्नि या सकळास । अर्द्धमात्रा बोलिजे ॥ ६ ॥ नव्हे मातृका अक्षर । केवळ ध्वनिमात्र उच्चार । तथापि अर्द्धमात्रा योगेश्वर । ह्मणती यातें ॥ ७ ॥ अर्द्धमात्रा ह्मणिजे नादांक[6] । ह्मणऊनिया सर्वत्र व्यापक । आतां असो हें सकळ ही येक । प्रणवाचा विस्तार ॥ ८ ॥ येथें प्रवृत्ति निवृत्ति दोनि पक्ष । प्रवृत्ति प्रपंचरचना जे प्रत्यक्ष । निवृत्ति ह्मणिजे अप्रत्यक्ष । कांहीं नाहीं ॥ ९ ॥ प्रवृत्तीचा ठाईं

---

१ शोभा, तेज. २ स्वप्नदेहाचा अभिमान धरणारा जीव तो. ३ एकटा, निराळा. स्वप्नस्थान किंवा मनोराज्य यातील अस्पष्ट भोग ते. ४ सुषुप्ति अवस्थेंतील नेणिव दशेचा अभिमान धरणारा जीव. ५ तुर्या अवस्थेचें सुख. ६ ॐ यां अक्षरांतील अर्धविवास अर्धमात्रा किंवा नादांक ह्मणतात.

पाचवे दिवसीं । व्रतोत्सर्ग केला विवाहासी । तेव्हा संपूर्ण ही ब्रह्मचर्यासी । बुडविलें चि कीं ॥ १६ ॥ जीविकेसाठीं राहिला वेदशास्त्राभ्यास । कदापि केला तरि तो ही लाविला तीसें । तेथें कैंचे पुढें वानप्रस्थ सन्यास । अवघा गृहीं च गुतला ॥ १७ ॥ गृहींच्यासी तऱ्ही कैंची उरी । अवघीं जिवलगें दवडिलीं दुरी । मानूनिया जिवाची सोयरी । जाला स्त्रियेअधीन ॥ १८ ॥ तारुण्यभरें चढला माज । न मनीं लौकिकाची ही लाज । मायेचा तटका तोडिला वाज । निजूनिया ते जाली ॥ १९ ॥ जिणें नवमास वाहिला उदरीं । प्रसूतिवेदना साहिली थोरी । स्वयें पचोनिया अघोरीं । जीवें आपुल्या जीवविलें ॥ २० ॥ जिचें स्तनपानें सर्वांग शोषिलें । याला[्]गीं जिचें शरीर क्षीण जालें । जिच्या आगावरी येणें केलें । मळ मूत्र आणि वात ॥२१॥ याचे पाउलीं खडा रुतता वाटे । जिचा जीव च अवघा येकवाटे । यासी बरें चि जेव्हा न वटे । तेव्हा सर्वांगें वोसेवि ॥२२॥ कामधेनु ही जिची न पवे सरी । ते[५] अपराध करितां सन्हार करी । हे परमापराधें अधिक स्नेह धरी । न प्राथिता कृपाळ ॥ २३ ॥ ऐसी माता ये ससारदुस्तरीं । अनाथा जिवाची सोयरी । तयेसी दुन्हाऊनि दुराचारी । जवळी मानी स्त्रियेसी ॥ २४ ॥ पितयासारिखा स्नेहाळ । आजन्म केला प्रतिपाळ । काढूनि आपुले मुखींचें कवळ । पुत्रामुखीं घातलें ॥ २५ ॥ जेणें जन्म दिधला निज । ह्मणऊनि ह्मणिजे आत्मज । आपुलें सर्वस्व अर्पूनि भोजें । ज्याचे लळे पाळिले ॥२६॥ तया पितयासी जाला पारिखा । होऊनि स्त्रियेचा सखा । बधू बाळपणींचा पाठराखा । तयासी जाला पेशून्य ॥ २७ ॥ मायबापाची करूनि कावडी । पुत्रें श्रावणें वाहिली आवडीं । या असुरें धरूनि स्त्रियेची गोडी । त्यासी बाहेरीं घातलें ॥ २८ ॥ असो ऐसा करिता

---

१ सोडमुज २ उपजीविकेसाठीं ३ दासबोध दशक ३ समास २ पहावा. ४ गलित होत असे ५ कामधेनु ६ पुत्रास पित्याचा अश असें ह्मटलें आहे ७ मोठेपण, सतोष. ८ उणें पाहणारा, द्वेष्टा ९ ज्याला दशरथानें श्वापद समजून बाणानें मारलें तो

घराचार[1] । कैंचा आचार आणि विचार । द्रव्यार्जनीं अनाचार । करितां पुढें न पाहे ॥२९॥ बहु वाढली दुष्ट संतती त्रिविध । पितयासारिखा पुत्र या श्रुति प्रसिद्ध । कुटुंबकर्दमें नानाविध । पाप घडों लागलें ॥ ३० ॥ यदर्थी बृहन्नारदीयपुराणीं । वर्णिली पातकांची खाणी । जेणें ज्या ज्या पावती प्राणी । यातना आणि योनी ॥ ३१ ॥[2] महापातकें[3] अवघीं च्यारीं । ब्रह्महत्या मद्यपान सुवर्णचोरी । गुरुतल्पग आणि यांचा संग धरी । ऐसीं पंचमहापातकें ॥ ३२ ॥ अन्य उपपातकस्थिति । यासमान निवडिली संतीं । ज्या ज्याची जे जे फळश्रुति । ते ते आतां अवधारीं ॥ ३३ ॥ परि हृदय तुझें अति विमळ । भूतकृपाभरें कोमळ । धैर्य अवलंबूनि बळ । आइक बापा ॥ ३४ ॥ यमावतीसी किती नरक । ते चि संक्षेपें आइक । पुढें क्रमें च सांगों पातक । आणि पीडा तयाची ॥ ३५ ॥ ज्वाळ आणि जळत वाळुकाकुंभ । रौरव महारौरव अक्षोभ । कुंभीपाक श्वासनिरोध अतिक्षोभ । काळसूत्रें प्रमर्दन ॥ ३६ ॥ तिखटा लोहपात्राचें वन घोर । ळाळवसाकूप सीताचा पडिभार । वैतरणी नदी वाहे दुस्तर । नाना दुर्गंध कश्मळें ॥ ३७ ॥ मूत्र शोणित पूय रेताचीं कूपकुंडें । अति क्षार अति सीतोदकांचीं उदंडें । तप्त तैल तप्तोदकांचीं प्रचंडें । उसळत असती ॥ ३८ ॥ तप्तकर्दम दुर्गंधकर्दम पुरीष पित्त । श्लेष्म यांचे र्‍हेंदें[4] भरले बहुत । सडलें श्वमांस कृमीसहित । कटुक्षारद्रव्याचे डोंगर ॥ ३९ ॥ शूळ तप्तशूळ नाना शस्त्रें । तप्तस्तंभ तप्तसांडस नाना यंत्रें । शूचिका शूळ कंटक गात्रें । विदारावया कर्वत ॥ ४० ॥ लोहपिंडीं लोहप्रतिमा । धगधगीत ताऊनि ज्वलनोपमा । इंगळाचे ढीग परमाधमा । लोळवावया वरी ॥ ४१ ॥ मत्तगज मत्तमाहिष । महाव्याघ्र महाश्वान कृष्णआशिष[5] । कृष्णवृश्चिक रक्तपिप्पलिका सदोष । तयासी डसवावयासी ॥ ४२ ॥ अग्निवृष्टि शस्त्रवृष्टि शिळा-

---

१ कदंबसमुदाय. २ भक्तिरहस्य प्रकरण ७५ ओंवी २३ पहा. ३ यमपुरीचें व नरकाचें वर्णन भक्तिरहस्य प्रकरण ७५ ओंवी १० ते २१ यांत जास्त विस्तृत रीतीनें दिलेलें आहे. दोन्ही ठिकाणीं शब्द बहुतेक सारखे च असल्यामुळें शब्दार्थ येथें दिले नाहींत. ४ मोठमोठे तलाव. ५ काळा सर्प.

वृष्टि । वृक्षपात मरुत्पात सृष्टीं । असो नाना जाचें करिती कष्टी । पातकियातें ॥ ४३ ॥ ऐसी यातना वर्णिली संक्षेपें । आतां परिस संसारपापें । ज्यांचीं निवडिलीं स्वरूपें । महापातकतुल्य ॥ ४४ ॥ ब्राह्मणदूषण पंक्तिभेद वृथापाक । वेदविक्रय दानसंकल्पीं विकल्पक । धार्मिकद्वेष गोब्राह्मणांचें वर्जणें अन्नोदक । हें ब्रह्महत्येसमान ॥ ४५ ॥ तत्वता कळला नस्तां शास्त्रार्थ । ज्योतिष धर्मनिर्णय प्रायश्चित्त वैद्यकार्थ । देहाभिमानें प्रतिष्ठितां व्यर्थ । ब्रह्महत्येसमान ॥ ४६ ॥ सामर्थ्यें धनमदें विद्यागर्वें । ब्राह्मणासी कदां न बोले बरवें । आत्मस्तुति परनिंदा ये सर्वें । ब्रह्महत्येसमान ॥ ४७ ॥ परपीडासंतुष्ट तत्पर । बाह्यरंगें दंभाचार । हें ब्रह्महत्येतुल्य अतःपर । मद्यपानासम सांगों ॥ ४८ ॥ गणक गणिकागण पतित । निरग्निक देवळक शिवनिर्माल्यरत । यांचें अन्नसेवन सुरापस्त्रीसुरत । सुरापानासमान ॥४९॥ पलांडु लसुण शर्वस्वसेवन । शूद्रादि पंक्तिभोजन । रजस्वलागमन बोलिलीं मद्यपानासमान । आतां आइक स्तेयतुल्यता ॥ ५० ॥ श्राद्धत्याग धर्मकृत्यलोप करणें । यतिनिंदा धान्यहराक्षेहरणें । हें सुवर्णस्तेयता आतां परिसणें । गुरुतल्पगासमान ॥ ५१ ॥ कन्या भगिनी भाउजई सून । उच्चवर्ण अथवा नीच समान । इत्यादि परस्त्रीगमन । आणि रखेंळ ॥ ५२ ॥ अकाळकर्माचरण आणि शास्त्रनिंदा । श्रद्धाहीन गौणबुद्धयां पाहे वेदा । हे गुरुतल्पगसम गा धर्मविदा । बोलिले दोष ॥ ५३ ॥ यांचा सांगाती पांचवा पाहीं । यांसी प्रायश्चित्तें कल्पिलीं रुपेश्वरीं ते ही । आतां ज्या दोषा प्रायश्चित्त चि नाहीं । तें हि परिसावें ॥ ५४ ॥ स्त्रीं शूद्रें केली हरिहरप्रतिष्ठा । तेथें वंदन करिती निष्ठां । ते प्रतिष्ठिते प्रणमिते विष्ठा । भोगिती सर्व यातना ॥ ५५ ॥ अथवा विप्रें प्रतिष्ठिले हरिहर । तया स्त्री शूद्र अनु-

---

१ भक्तिरहस्य प्र. ७५ ओंवी २६ ते ४० पहा. २ या व पुढील ओंवीबद्दल भक्तिरहस्य प्र. ७५ ओंवी ३२ पहा. ३ धान्य व अक्ष=मीठ यांची चोरी करणारा. ४ मुळात अशीं अक्षरें आहेत; ' रजस्वला ' असा अन्य पाठ आहे. ५ भक्तिरहस्य प्र. ७६ पहा.

पर्नीत जनेश्वर । तिहीं दुरूनि च करावे नमस्कार । स्पर्श करितां नरकपात ॥ ५६ ॥ ब्रह्महत्येसी आहे निष्कृति । ब्रह्मद्वेपासी नाहीं कल्पांतीं । विश्वासघातकी कृतघ्न आणि रति । शूद्रस्त्रियांदिकांसी ॥ ५७ ॥ गुरुनिंदा हरिहरनिंदा हरिकथेची निंदा । गुरुद्रव्य देवद्रव्य ब्रह्मस्वापहारकारकासी सर्वदा । आकल्प निरयीं पचिती कदां । सुटिका चि नाहीं ॥ ५८ ॥ मुख्य वेदनिंदक बौध्य । पूर्वापर पाखंडी प्रसिद्ध । ह्मणोनि बौद्धालया जाय तो शुद्ध । नव्हे प्रायश्चित्त नाहीं ॥ ५९ ॥ जयांसी प्रायश्चित्त नाहीं । ऐसे दोप बोलिले जे काहीं । त्यांसी कल्पकोटि शतायुतें पाहीं । महानिरयीं पाचिती ॥ ६० ॥ मग त्रीणि कल्पें कर्मविशेषें । स्थावर शरिरें भोगिती अशेषें । मग विष्टाकृमि होती दोषें । वर्षे शष्ठीसहस्र ॥ ६१ ॥ मग सर्प होय आकल्पवरी । मग सहस्त्रयुगें पशु परोपरी । उपरी उरलेंन पापें मनुष्यशरीरीं । म्लेंछगोळकें कुंडगोळक ॥ ६२ ॥ त्यानतर विप्र होय अकिंचन । पापप्रतिग्रहें मळिन मन । तेणें सर्वे चि अंतीं पावे पतन । नाना निरयांचा ठाईं ॥ ६३ ॥ अप्रायश्चित्त पापाची यातना । निरोपिली तुज विशुद्ध मना । आतां पंचमहापातकी जना । जो जो दंड तो अवधारीं ॥ ६४ ॥ जे तुज सांगितले सर्व जाच । ते प्रत्यकी भोगिती येक येक युग साच । उपरी भूमींचा ठाईं पशु होती नीच । सप्तजन्में गर्दभ ॥ ६५ ॥ दश जन्में श्वान शूकर । विष्टाकृमि शत संवत्सर । मूपक होय त्यानंतर । द्वादश जन्में ॥ ६६ ॥ सहस्र जन्में मृगादि पशुयोनि । शत संवत्सर स्थावर मग गो अभिधानी । मग मनुष्य पावे पापयोनि । होय चांडाळ सप्त जन्में ॥ ६७ ॥ सोळा जन्म शूद्रादि नाना याति । मग वैश्य क्षेत्री वाध्यमान होती । सेखीं दरिद्री विप्र पापकृति । सर्वे चि अंतीं

यातना ॥ ६८ ॥ असूयाविष्ट ज्याचें मन । तो कल्पत्रय रौरवीं पावे पतन । मग मनुष्यजन्म होय हीन । चांडाळ सप्त जन्में ॥ ६९ ॥ गौ अग्नि अथवा ब्राह्मण । यांसी देतां वारी जो कृपण । तो शत जन्म होय सुंकर्ण । सेखीं होय चांडाळ ॥ ७० ॥ त्रीणि जन्में व्याघ्र मग विष्टाकृमि । मग नरक येकवीस युगें नेमीं । निंदक निष्ठुर धार्मिक उपद्रविती भूमीं । त्यांची यातना अवधारीं ॥ ७१ ॥ तापले लोहपिंड घालिती मुखीं । सुया आदळिती नखोंनखीं । अधोमुख स्तंभीं बांधोनि शेखीं । मारिती यमकिंकर ॥ ७२ ॥ पुढें कंठीं बांधोनि पाषाण । शोणितकुंभीं बुडविती जाण । सर्व नरक शतसंवत्सरप्रमाण । मग जन्मे आमिषआहारी ॥ ७३ ॥ जे करिती परद्रव्यापहार । त्यांसी उखळीं वाद्धनि मुसळें करिती चूर । पाषाण ताऊनि त्रीणि संवत्सर । धरविती हातीं ॥ ७४ ॥ सप्त संवत्सर काळसूत्रें भेदिती । स्वकर्में स्मरत आक्रंदती । मग क्रमें चि पचिजेती । सर्व ही नरकीं ॥ ७५ ॥ परस्वसूचकाचा आइक दंड । सहस्र जन्में चारिती लोहपिंड । जिव्हा उपद्धनि निरुछ्वासीं वितंड । कोंडिती कल्पवरी ॥ ७६ ॥ जे परस्त्रीचा ठाईं रत । त्यासी ताम्रस्त्री ताऊनि धगधगीत । ह्मणती आलिंगीं इशी बहुत । सुंदरी दिसताहे ॥ ७७ ॥ असत्य मानूनि संतांचें उत्तर । ह्मणत होतासी कैंचे यमाचे किंकर । आतां भोगीं परस्त्रीसंगसुख सेजार । ह्मणऊनि लोळविती तीवरी ॥ ७८ ॥ आक्रंदे निघातें वोढिती लिंग । परस्त्री माता कीं आतां काये जाला फुंग । करकरा दात खाऊनियां मग । लोहबाला बांधिती ॥ ७९ ॥ त्यानंतर अनुक्रमें । सर्व ही नरक भोगिती श्रमें । आतां परपुरुषीं जे स्त्री रमे । आइक यातना तयेची ॥ ८० ॥ लोहशयनीं लोहपुरुष लाऊनि भाते । धगधगीत ताऊनि वरी

---

१ मत्सरग्रस्त. २ निवारण करतो. ३ श्वान. ४ मांसाशन करणारा. ५ एक प्रकारचा नरकवास. ६ दुसऱ्याचें द्रव्य दाखवून देणारा. ७ वाऱ्याचा शिरकाव होणार नाही अशा अंधार कोठडीत. ८ तांब्याची स्त्री करून. ९ ठोसा देऊन. १० अभिमान, ताठा.

लोळविती तीतें । घेऊनि उल्वणें ह्मणिजे जळतभितें । मारिती पापिणीसी ॥ ८१ ॥ सहस्र वर्षें लोहस्तंभीं बांधिती रांड । मग क्षारोदकपानें करिती दंड । मग सर्व ही नरकजाच वितंड । भोगी अनुक्रमें ॥८२॥ जे वधिती गोब्राह्मण दुश्चित्त क्षेत्री । ते पंचकल्प पचती नरकीं सर्वत्रीं । महानुभावनिंदा आइकती श्रोत्रीं । त्यांचा भोग परिसीं ॥८३॥ लोहगोळे ताविती । कर्णी तयांचे बांधिती । त्यानंतर पचिजेती । कुंभीपाकाचे ठाईं ॥ ८४ ॥ कैंचीं वाक्यें कैंचा ईश्वर । कैंचा मोक्ष कां भजों हरिहर । ऐसे नास्तिक्यवंत जे असुर । आइक यातना तयांची ॥ ८५ ॥ कोटि वर्षे चारिती लवण । करविती आकल्पवरी पुरीषभक्षण । तापलें आप मुखीं दाटिती दारुण । मग रौरवीं युग येक ॥ ८६ ॥ ब्राह्मणासी क्रोधदृष्टीं जे लक्षिती । त्यांचे नेत्रीं सुया सहस्र ताऊनि दाटिती । मग करवतें विदारिती । दंडिती क्षारोदकें ॥ ८७ ॥ वेदमर्यादा गुरुमर्यादा उल्लंघन । विश्वासघात करिती दुर्जन । अश्रोत्री परान्नलोलुप ज्याचें मन । आइक यातना तयाची ॥ ८८ ॥ तयासी चारिती श्वानाचें मांस । श्वानाहातीं तोडविती तयास । प्रत्येकें अब्दप्रमाणें वास । करविती सर्व ही नरकीं ॥ ८९ ॥ पापप्रतिग्रह नक्षत्रपाठक । देवळकान्नभोजी बहुयाचक । भोगूनि विष्ठाभोगादि सर्व ही नरक । सप्तजन्म चांडाळ अति दुःखी ॥ ९० ॥ असत्यरत, निष्ठुर बोलती । त्यांची जिव्हा उपडूनि तेलांत तळिती । ते काळसूत्रें भेदूनि क्षारोदकें दंडिजेती । मळमूत्रकुंडीं ॥ ९१ ॥ मग म्लेंच्छजन्म पावती पृथ्वीवरी । अन्योद्वेगरतें टाकिती वैतरणीभीतरीं । जो पंचमहायज्ञपरित्याग करी । त्यासी लाळ चारिती ॥ ९२ ॥ त्यासी पंचयुगें दुःखभोग मग नीचसेवक । विप्रग्रामक्षेत्रापहारक । त्यासी सर्व कुळासहित सर्व काळ सर्व ही नरक । आणि मृत्तिका भक्षितां ॥९३॥ मग जगीं जन्मती कृमी-भोजी । साठिसहस्र वर्षें शूकरविष्टेमाजीं ।

---

१ अतिशय, पुष्कळ, २ जळतकाष्ट, कोलित. ३ नर्क. ४ दुसऱ्याला दुःख देण्यांत, किंवा दुसरा रागावला असतां, आनंद मानणारे. ५ नित्यकर्म.

अतिथीनिमुखासी च्यारी युगें गाजी । यम महा काळसूत्रें ॥ ९४ ॥ अयोनि वियोनि पशुयोनीसी रेत- । द्राव करिती जे उन्मत्त । ते रेत-भोजी दिव्याब्दासहस्रपर्यंत । वसाकूपीं पचिजेती ॥ ९५ ॥ जो उप-वासदिनीं दंतधावन करी । त्यासी व्याघ्र भक्षिती युगें च्यारी । मृषा महि भोजी तो ऊष्ण कर्दमाभीतरीं । बुडे कोटिकुळेंसीं ॥९६॥ याउपरी विष्टाऱ्हदीं सहस्रयुगें ।चतुर्दश इंद्रावधीं पीडे सर्व ही भोगें । मग मनुष्य-जन्म पावे हीनागें । काणे कुष्ट शतजन्में ॥ ९७ ॥ जो स्वधर्म साडूनि करी पाखाड । आणि तयाचा संग धरी जो अखड । ते कल्पकोटि सहस्रें सर्व दंड । सर्व यातना भोगिती ॥ ९८ ॥ जो स्त्रीशूद्रादिकापासीं वेद पढे । कल्पकोटी सर्व यातना भोगी पुढें । अनाथधनापहार अनाथद्वेष कीजे मूढें । तया धूम्रपान ब्रह्मसंवत्सर ॥ ९९ ॥ उछिष्ट दंतास्थि केश मूत्र मळ । जळीं देवालयीं टाकी त्यासी यातना प्रबळ । शस्त्रघात तैलकाथ कुंभीपाक स्थूळ । यातना अनुक्रमें ॥ १०० ॥ कूटसाक्षी असत्यवादी या खळा । मुखीं डस-विती सर्पांडिया जळा । क्षाराबुदड त्याचें मास त्यास चारिती गोळा । तोडूनिया साडसें ॥ १ ॥ मग बुडविती क्षारकर्दमीं । गजदंतीं मर्दिती भूमीं । मग जन्म पावती पापकर्मी । हीनांग होऊनिया ॥२॥ स्वकाळीं ऋतु नेदी स्त्री असता जवळी । तो ब्रह्महत्येच्या यातना पावे सकळी । सामर्थ्य असोनि अनाचार न वर्जी तरी तत्काळीं । पापार्द्धभोग भोगी तो ॥ ३ ॥ द्वेषें परपातकाची गणना करी । तो तुल्यभाग भोगी असिलें जरी । द्विगुण निर्दोषीं दोष आरोपी तरी । नाना यातना चिरकाळ ॥ ४ ॥ कन्यागामी फाडिती श्वान । मूढावस्था धूम्रपान ।

---

१ विनाकारण, मिथ्यात्वें २ एक ब्रह्मदिवस इ० चौदा इंद्र होतात इतकीं वर्षे ३ एकाक्ष ४ बाडगे ५ खोटी साक्ष देणारा ६ मुळांत अशीं अक्षरें आहेत ' सर्पा एवढिया जळा ' असा अन्य पाठ आहे ७ ज्यादा मनुष्य खरोखर पापी असला तरी त्याच्या पापाची जर गणना केला तर पापी माणसाइतकें च गणना करणाराला पाप लागतें, तर मग, जो खरोखर पातकी नसून त्यावर व्यर्थ आरोप केला तर त्याला दुप्पट पाप लागतें

व्रत नुजवितां टाकी तरी असिपत्रवन । पावोनि जन्मे हीनांग ॥ ५ ॥ जो विघ्न करी सुव्रतजनासी दुर्जन । तयासी करविती श्लेष्मभोजन । न्याय धर्मशिक्षेसी करी पक्षाभिमान । तया निष्कृति नाहीं जाचितां ॥६॥ अभक्षभक्षका पित्तपान करविती । ब्राह्मणावमान वधोद्भव यातना होती । मग दशजन्में चांडाळ होऊनि उपजती । गोमांसाशी जे ॥७॥ पारिखियाचें द्रव्य हरिती । त्याचा धर्म आपण करिती । ते दाते नरकाप्रति जाती । पुण्य त्याचें धन ज्याचें ॥ ८ ॥ प्रत्योपकारदानें चारिती लाळ वक्त्रीं । यतिनिंदका वोडिती सिळायंत्रीं । देवालय आराम तटाक भंगिती त्याचे श्रोत्रीं । जाच आइक बापा ॥ ९ ॥ सर्व नरक बहु पूर्वजांसी बहुकाळ । मग विट्कृमी विड्वराहभोजी कुश्विळ । एकवीस युगें कृमीभोजी येर सकळ । एकवीस कल्पें ॥११०॥ ग्रामनाशक ग्रामदाहक देवापहारक । यांसी ब्रह्मकल्पवरी सर्व ही नरक । अयाज्ययाजक आर्व्हायक देवळक नक्षत्रपाठक । हे ग्रामचांडाळ महत्पापी ॥११॥ हे एकवीस युगें सर्व यातना भोगिती । मग सप्त जन्में चांडाळ होती । उच्छिष्टभोजी मित्रद्रोह करिती यां होती । आचंद्रतारा सर्व यातना ॥ १२ ॥ असो ऐसे बहुत दोष बहुत नरक । त्यांमध्यें बोलिले कांहीं येक । यांपासूनि सुटे निष्कळंक । ऐसा विरळा कळ्युगीं ॥१३॥ हें शबळ त्वंपद विपद्रुमाचें फळ । एणें जीव होताती अति विकळ । यासी प्रायश्चित्तोपाय ही होती विकळ । ते चि बोलिजेलि आतां ॥१४॥ आणि बीजाकारें पुण्याचें ही भोगफळ । जेणें प्राणी होती अति विमळ । सद्गुरुकृपां असिपदार्थैक सकळ । एईल अनुभवासी ॥ ११५ ॥ स्वस्ति श्रीसुगमोपाये । रामीरामदासकृते । अध्यात्म विद्यायां । महावाक्यविवरणे । शबळ त्वंपदार्थे । संसारपातकयातनावर्णनं नाम । सप्तम प्रकरणम् ॥श्रीराम॥

---

१ एक नरक आहे. २ पक्षपातानें न्याय केला तर. ३ ब्राह्मणाचा थुमता अपमान किंवा हेळणा केली तर ब्रह्महत्येच्या यातना भोगाव्या लागतात. ४ गोमांस भक्षक. ५ विट्=शाप देणें. ६ दूत, निरोप पोंचविणारा. ७ औपाधिक जीवपदरूपी विपद्वृक्षाचें फळ

॥ श्रीराम ॥

पूर्व प्रकरणांतीं कथाकौतुक । शबळ त्वंपदार्थ जीवासी संसारपातक । त्यासी प्रायश्चित्त हीं होय निरर्थक । तें चि कैसें बोलिजेतसे ॥ १ ॥ कमळ विकाशे भ्रमरालागीं । तें देवपुजेसी होय उपयोगी । कीं धेनुवत्साचा संयोगीं । गृहस्थासी ही दुभतें ॥ २ ॥ चातकालागीं वर्षे घन । तेणें सुभिक्षें निचेति[१] सभाग्य जन । त्यांचिये पंक्तीसी आकिंचन । ते ही पावती संतृप्ति ॥ ३ ॥ कीं कृषीवळें बाळकांलागि[२] गवादि उपाय । करी तेणें थोरथोरासी ही होय श्रायें[३] । तेवि पूर्वोत्पर बीजाचा विस्तार आर्ये[४] । सद्गुरु करिती शिष्यार्थे ॥ ४ ॥ सर्वत्र गुरुत्व शिष्यत्व एक । त्याहिमध्यें गुरुत्वा शिष्यत्वा कैंचा भिन्नांक । अखंडत्वें परि सेव्य सेवक । भवलीळाविग्रहें[५] ॥ ५ ॥ गुरु ह्मणिजे सकळांहूनि थोरलें । शिष्य ह्मणिजे शेषितां अवशेष जें उरलें । दोहीं अभिधानीं सभरांभरित[६] जें भरलें । तें एक चि स्वस्वरूप ॥ ६ ॥ जैसें पितापुत्रमय येकरूप जन । तैसें च गुरुशिष्यमय सर्व सज्जन । त्यां सर्वांचे मुखींचें आत्मअनुसंधान । सर्वांसी सेव्य स्वानंदें ॥ ७ ॥ सज्जनाचेंन अनुमोदनें । वाचा बोळगे कथानुसंधानें । जालियाँ पातकउपशमनें । तें प्रायश्चित्तें चि कीं ॥८॥ यदर्थी मन्वादिक अष्टादश स्मृतिकार । बोलिले शास्त्रार्थाचा निर्धार । प्रायश्चित्तविधि सविस्तर । तो विहित[७] चि आहे ॥९॥ परंतु कृतयुगादि द्वापारपर्यंत । सर्व हि सदा शुचिष्मंत । प्रमादें पाप घडे किंचित । तें प्रायश्चित्तें विनाशे ॥ १० ॥ आतां कलयुगींचे धर्म । येथें वस्तीसी आले अधर्म । मुख्य जीविकेचें चि मूळ अकर्म । तेथें

---

१ निचित, सपूर्ण, सतृप्त. २ शेतकरी. शेतकरी लोक आपल्या मुलांना कांहीं काम पाहिजे ह्मणून गुरें चारण्यास सांगतात, या त्यांच्या कामामध्यें गावांतील मोठ्या लोकांचीं ही गुरें चारलीं जातात, तेव्हां त्यांचें ही काम होतें. ३ आश्रय. ४ आकार. ५ ज्ञानसंपन्न शिष्य व गुरु यांमध्यें वास्तविक भेद नाहीं परंतु प्रापंचिक जनांच्या समजुतीकरितां सेव्यसेवकत्वाचा भाव ठेवावा लागतो. ६ व्यापक. ७ योग्य.

प्रायश्चित्त कोणेकडे ॥ ११ ॥ वस्त्र शुभ्र किंचित मळे । तें प्रक्षाळिलियां उजळे । जातिवंत चि जें काळें । तयासी तोय काय करी ॥१२॥ मुळींहूनि कर्दमळ काळा कावळा । तो कैसेनि होईल शुभ्र सोंवळा । किं प्रवेशोनि पवित्र रजकशीळा । कोणे तीर्थीं होईल॥ १३ ॥ कलियुगीं जीव दुराच्यारी । निर्दय निरर्थक वैरकारी । दुर्भग दीर्घ तृष्णा संसारीं । विपयसुखाची ॥ १४ ॥ क्षुद्रदृष्टीं नाना वंडें । वेद दूपिती पाखांडें । क्षुद्रभाग्य महापठ उदंडें । अनाचारें ओंथिले ॥ १५ ॥ शिश्नोदरपरायण द्विजजाति । भिक्षु कुटंबी वटु अव्रती । तपस्वी ग्रामवास करिती । संन्यासी अर्थलोलुप ॥ १६ ॥ न्हस्व काया महा आहार । गतन्हि अपलें फार । कटुभापी वहुसाहसी चोर । परमापराधी ॥१७॥ वेप धरूनि तपस्वियाचा । जीवनोपाय करितां प्रपंचाचा । अधर्मी फंड घालूनि धर्माचा । उच्चासनीं वैसती ॥१८॥ सदां दुर्भिक्ष अवर्षण । क्षुधा भयें पीडे मन । नृपैंराक्षेसें भक्षायमान । उद्विग्न सर्वदा ॥ १९ ॥ पुण्यशून्य पापकारी । सत्योपहत असत्यधारी । त्यक्ताचार अनाचारी । करिती पिंडपोपण ॥२०॥ देहात्मवादी विमूढ । परद्रव्यपरदाराभिलाप दृढ । परघात करणें तेथें काय गूढ । निंदा आणि अपवाद ॥ २१ ॥ नास्तिक स्त्रीदेव कामकिंकर दृश्यविद । असो हा ब्रह्मांड पुराणीं ब्रह्म-

---

१ प्रायश्चित्तानें पापाचा नाश केव्हां होतो याचा उलगडा या ठिकाणीं होतो. द्वापारयुगापर्यंत लोक मूळचे च धार्मिक होते व त्यांची परिस्थिति ही धर्मास अनुकूल होती म्हणून त्यावेळीं लहानश्या प्रायश्चित्तानें ते पापापासून मुक्त होत असत. कलियुगांत मूळची प्रवृत्ति अधर्माकडे व लोकांना मिळणारें ज्ञान नें ही धर्मास प्रतिकूल, इतकेंच नव्हे, हल्लींचें उपजीविकेचें मूळ साधन, कोणाचीही सेवा चाकरी करणें, हेंच मुळीं धर्मवाह्य, निपिद्ध कर्म होत आहे. अशा ठिकाणीं नुसत्या प्रायश्चितानें पापाची निष्कृति होणें शक्य नाहीं. यास पुढील दृष्टांत फार सम्यक आहे. २ मळकट. ३ परिटाच्या कुलांत उत्पन्न झालेला मनुष्य कोणत्या तीर्थांत स्नान केला तर पवित्र होईल? ४ दुर्दैवी. ५ मोठेंपण प्राप्त झालें. ६ समुदाय. ७ या युगांतील राजाला राक्षसाची उपमा दिली आहे. जो राजा प्रजेची काळजी न घेतां प्रजेकडून मिळेल तितकें भक्षण च करीत असतो तो राक्षस नव्हे तर कोण? ८ या जड देहाला च आत्मा म्हणणारे.

नारदसंवाद । आणि दशमस्कंदीं शुकपरीक्षितीचा अनुवाद । आतां प्रत्यक्ष ही दिसताहे ॥२२॥ एवं ज्यांचेन अनाचारप्रवाहभरें । वेदशास्त्रें चालिलीं पुरें । तेथें प्रायश्चित्त कार्पासगाठोडें घरे । कैसें नैमित्य अमित्या ॥२३॥ तथापि जे जे युगीं जो जो धर्म । तेथें तेथें तैसें च ब्रह्मकर्म । युगासारिखें कळाकर्म । तदुपरि ते ब्राह्मण ॥२४॥ चतुर्थांशें जो धर्महेतु उरला । तो जयांचेन योगें आवरला । ज्यांचेन पुण्यें थावरला । बुडतां ब्रह्मकटाहो ॥२५॥ जैसी नाव बुडतां नावाडे । आकलितां न पाहाती येरीकडे । डळमळीत परि थडे । लागे तयाचेनि ॥ २६ ॥ जे समयासारिखे परंतु श्रोत्री । बुद्धिसारखे परि प्रवेशले सच्छास्त्री । यथाशक्त्या ज्यांचिये वर्णीं । वेदें वस्ति घेतली ॥ २७ ॥ सरते समई परि संग्रहिलें सत्य । भरले काळीं वर्जिलें असत्य । ज्यांचे कलियुगीपरि पारपत्य । कीरती सत्ययुगें ॥ २८ ॥ ते दुरितांचें भय धरित । तरी अपेक्ष्य प्रायश्चित्त । जें द्वादशाब्दादिपर्यंत । बोलिलें धर्मविदीं ॥२९॥ तो आचरावयासी प्रायश्चित्तप्रकार । पाहिजे कर्म ज्ञान द्रव्य देश काळ अधिकार । नाहींतरी अंगवैगुण्यें विफळ होय निर्धार । आरंभिलें कर्म ॥ ३० ॥ कर्मवैकल्यासी प्रायश्चित्त यावें । प्रायश्चित्तवैकल्यासी काय यावें । तस्मात् अंगवैगुण्यें स्वभावें । न घडे चि कीं ॥ ३१ ॥ आतां जन्हि सर्व सपूर्ण घडे । तन्हि जडकर्मरूपें प्रायश्चित्तें निशेष पापक्षयो

---

१ श्रीमत् भागवताच्या. २ पुरामध्यें वाहून चाललीं. ३ स्थिर राहिला. ४ ब्रह्मांड. ५ भलतीकडे ६ अग्निहोत्री. ७ ज्यानीं वेद सुखोद्गत केले. ८ पातकाचें. ९ प्रायश्चित्ताचा त्या ठिकाणीं उपयोग होईल. कलियुगात प्रायश्चित्त निष्फल आहे असें वर म्हटलें आहे, तर पुढें प्रायश्चित्तप्रकार कशाला सांगितले आहेत अशी कोणी शंका घेतील, म्हणून येथें म्हटलें आहे कीं, जे पापभीरु काहीं लोक आहेत, त्याच्याकरता च हे प्रायश्चित्तप्रकार सांगितले आहेत. १० ते प्रायश्चित्तप्रकार आचरण्यास कितीतरी अडचळे आहेत । त्यास पुढें सांगितलेल्या कर्म, ज्ञान, वगैरे गोष्टींची अनुकूलता पाहिजे. ११ कमीपणाच्या योगानें. १२ आरंभिलेलें कर्म अपूर्ण होतें. १३ कमतरता १४ आपल्याला माहित झालेल्या पापाचा परिहार प्रायश्चित्तानें होतो, परंतु मनुष्याला नकळत त्याच्या हातून कितीतरी पातकें घडत असतात, म्हणून प्रायश्चित्तानें निःशेष पापक्षय होत नाहीं असें म्हटलें आहे.

न घडे । कळलिया पापा संकल्पोच्चारें परिहार जोडे । न कळतां तव राहिलीं ॥ ३२ ॥ मुख्य पापकंद जे देहात्मबुद्धि । ते वर्तत आस्तां त्रिशुद्धि । पुनः पापांकुर निघतां कोण सिद्धि । जालिया पूर्व प्रायश्चित्ताची ॥ ३३ ॥ प्रायश्चित्त आहे पापानुतापीं । तो पूर्वी च नव्हतां जरि दोष घडे पुनरपि । तेव्हां केले कष्ट ते शून्य कूपीं । काय न पडती ॥ ३४ ॥ असो सपूर्ण प्रायश्चित्तें नवचेत दोष । भूत भविष्य वर्तमान निशेष । ते सुगमोपायें हरती घोष । करिता रामनामाचा ॥ ३५ ॥ हें भक्तिप्रकरणीं पारिसावें समूळ । प्रस्तुत बोलिजे पुण्याचें स्वरूपफळ । येथूनि त्वपदार्चें मूळ । सपूर्ण जालें ॥ ३६ ॥ श्रीराम पुण्यामध्यें श्रेष्ठ याग । जेणें पाविजे स्वर्गभोग । तप तीर्थ व्रत दानप्रसंग । आणि परोपकार ॥ ३७ ॥ पुण्य देश पुण्य क्षेत्र पुण्य काळ । साधूनि पुण्य द्रव्य जें केवळ । तें सत्पात्रीं अर्पिलिया फळ । अनंत रुपतिष्ट ॥ ३८ ॥ पुण्यें साधनें आहेति अपार । विस्तार सागतां नलगे पार । ह्मणौनि सक्षेपें बीजाकार । बोलिलीं येथें ॥ ३९ ॥ बहु पाप वर्णिलें दुःखदर्शनार्थ । कां जे सुखार्थ सेवावा परमार्थ । पुण्य संक्षेपें बोलिलें यथार्थ । पुण्याचें फळ ह्मणोनि ॥४०॥ तैसीं च याची फळाची प्राप्ति । इंद्रपदादि स्वर्गप्राप्ति । दिव्य भोग भोगणें दीप्ति- । मंत धरूनि देहो ॥ ४१ ॥ भोग भोगितां सरे सुकृत । पुनः मृत्युलोका ये मुकृत । ज्याचें अक्षयीं पुण्य तो चि वसत । स्वर्गी सर्वकाळ ॥४२॥ असो स्वर्गपदापासूनि च्युत झाला । पुण्यावशेषेंकरूनि जन्मला । तो चारि चिन्हें घेऊनि आला । लिंगदेह धरूनि ॥ ४३ ॥ दानप्रसंगीं

---

१ निश्चयेकरून. २ कृतकर्मावद्दल पूर्ण अनुताप झाला तर पुढें प्रायश्चित्तानें मनाची शुद्धि होईल. ३ जात नाहींत. ४ पुढें प्रकरण १० यात ५ शबल त्वपदार्थाचें विवरण करताना पातकाचें वर्णन पुष्कळ केलें आहे, व येथें पुण्याचें वर्णन सक्षेपानें केलें आहे, याचें कारण पापाकडे जनाची प्रवृत्ति न व्हावी व पापामुळें जीं दुःखें भोगावीं लागतात तीं पाहून परमार्थाकडे त्याची प्रवृत्ति व्हावी. जी गोष्ट चागली आहे तिचें वर्णन फारसें करावें लागत नाहीं ६ पुण्य ७ पुढें सांगितलेलीं

अति औदार्य । अमृतोपम वाङ्माधुर्य । देवतार्चन ब्राह्मणसंतर्पणें वैर्य । तद्विलक्षण नारकी ॥४४॥ पूर्व पुण्याचा सस्कार । ह्मणौनि पुण्याचा चि अतिभर । तेणें पुण्यें देहीं सुख पावे नर । पुनः पुण्यें स्वर्ग पावे ॥४५॥ असो या सर्वा पुण्याचें फळ । सन्मुख होय जै विमळ । तैं विवेक-वैराग्यें तत्काळ । विषयवासना विटे ॥ ४६ ॥ मग स्वर्गीं अथवा पाताळीं । जे जे विषयसुखाची नव्हाळी । ते तयासी कुरवडी वोवाळी । विरक्तिमाता ॥ ४७ ॥ तया मुमुक्षुबाळकासी कौतुकीं । वैसवी सद्गुरूचा अकीं । तेणें कृपानुग्रहें हस्तक मस्तकीं । ठेऊनि समजाविलें ॥ ४८ ॥ तो तू च कीं बापा स्वयें । तुज बुझाविता पदत्रेयान्वयें । त्यामध्यें पदद्वयातें स्वयें । लक्षिलें तुवा ॥ ४९ ॥ आता बोलिजेलि तृतीयें पद । जेथें अखडैक तदात्मनाद । पूर्वोक्त पदद्वयाचा भेद । वेगळा नुरे ॥ ५० ॥ जितुकी काहीं प्रपचरचना । तितुकी पदद्वयीं च शवळार्थ सूचना । तरी मागुती परिस विवचना । त्वपदार्थाची ॥ ५१ ॥ पुण्य आणि पातकाचें साफल्य । स्वर्ग निरय सतोप वैकल्य । उत्तम अधम जन्मबाहुल्य । गतागतिकरूनि ॥ ५२ ॥ गतशब्दें बोलिजे प्रळय । तयाचा परिस अभिप्राय । उत्पत्ति स्थिति अवस्थाद्वय । पूर्ण जालें एथूनि ॥ ५३ ॥ उत्पत्तिस्थितीसी जाली प्रवृत्ति । आतां तुरियेसी आरभली निवृत्ति[10] । तरी अचळ मनोवृत्ति । करूनिया करीं श्रवण ॥ ५४ ॥ प्रळयशब्दें प्रत्यक्ष नाश । नाश तो ज्यासी पुनः नाहीं प्रकाश । सुषुप्ति ही बोलिजे तदश । परि ते अनोरिसी ॥ ५५ ॥

---

१ श्रेष्ठ २ या लक्षणानीं जो युक्त नाहीं त्याचे कपाळीं नरकवास ठेवलेला. ३ प्रलक्ष ४ प्राप्ति ५ महावाक्य विवरणानें. ६ पैकीं ' तत् ' आणि ' त्वं ' या पदाचा अर्थ तुझ्या ध्यानात आला च आहे ७ ' असि ' पद ८ रहाटगाड-ग्याप्रमाणें जन्ममरणाचे जे फेरे होत आहेत तेणेंकरून ९ वहिर्मुखवृत्ति १० अतर्मुखवृत्ति, मोक्ष ११ निराळी, कारण प्रळयकाळीं शरीर, प्राण याचा सर्व सहार होऊन एक निर्वाण स्थिति असते परतु सुषुप्ति अवस्था ही जिवाच्या आश्रयानें दररोज येते व जाते तिला प्रळयाश ह्मणण्य चें कारण, झोपेची स्थिति ही एक दिवसा-पुरती तरी देहाची प्रळयावस्था च आहे, कारण त्यावेळीं त्याचे सर्व व्यापार वद असतात.

प्रळई होईल अति निर्वाण । पुनः कैंचे शरीर प्राण । सुपुप्ति प्रत्यहातीं होय निर्माण । जीविताचेनि आश्रयें ॥ ५६ ॥ तथापि जागृतीचें परि-अवसान । यालागीं सुपुप्ति पारिदिनाचें निदान । ह्मणोनि प्रळयांश हें मुनिजन । बोलती ईतें ॥ ५७ ॥ विपयसुख निर्विपयसुख । दोहीं पदार्थीसी विन्मुख । तदंश सुपुप्ति मरणांश होय नित्य सन्मुख । साव-धान करावया ॥ ५८ ॥ मरणांतीं नाहीं प्रयत्न । सुपुप्त्यतीं आहे यत्न । जागृतिऐसें लाहे रत्न । पाहे प्रकाशे समासी ॥ ५९ ॥ असो प्रळय मुख्य ब्रह्मांडीं । तदश मृत्यु बोलिजे पिंडीं । कारणीं प्रवेशे कार्य उडी । यथानुक्रमें ॥ ६० ॥ शरीर या नामाचा अर्थ । जिता वाटत होता व्यर्थ । तो ये काळीं स्पष्ट यथार्थ-। पण दाखवी आपुलें ॥ ६१ ॥ स्थूळ देहींचे पंचवीस अंश । ते सूक्ष्मीं करिती प्रवेश । तया सूक्ष्माचा ग्रास । करिती पंचमहाभूतें ॥६२॥ तें पंचमहाभूतें । त्यक्त करिती शरीरातें । आपुलिया अधिष्ठानातें । कवळिती क्रमें ॥६३॥ भूतचतुष्टय सृष्टिकाजीं । मिळालें होतें पृथ्वीमाजीं । तें स्वकीय कळा समाजीं । तत्काळ चि हारपे ॥ ६४ ॥ तेवि लोपती इलेच्या सूक्ष्म कळा । परंतु प्रेतत्वें पडलें देखिजे स्थूळा । त्वचा रोम अस्थि सिरा मांसाचा गोळा । पडे तिचा तीवरी ॥ ६५ ॥ तैसें चि आपुलाला अधिष्ठानीं । केवळांशें जाती मिळोनि । मिश्रांशें हि निवडती निदानीं । ते चि परिस पृथ्वीचे ॥ ६६ ॥ घ्राणीं होईल गंधत्याग । आणि प्राणा श्वासाक्षरां वियोग । गुदीं जाणवेल मळोत्सर्ग । प्रयाणकाळीं ॥ ६७ ॥ अहकार साडितां विढार । विकळ होय कलेवर । अंतीं प्रगटे जें घर्मनीर । तो भूमिनाश बोलिजे ॥ ६८ ॥ अहंकार प्राण घ्राण गुद गंध । येणें पचांशें पृथ्वी-नाश प्रसिद्ध । नाशतां जळांश पंचविध । जळनाश तो आइकें ॥६९॥ शरिरीं चित्तवियोग होतां । स्मरण न राहे तेव्हां तत्वता । कदाचित्लुक

१ प्रत्येक दिवसाच्या अतीं ह्मणजे रात्रीं २ 'रामासी' असा अन्य पाठ आहे. ३ अयथार्थ. ४ या शरिरातून प्राण निघून गेल्यावर ह्या शरिराचें पुढें काय होतें तें पहा. ५ लिंगदेहात. ६ पृथ्वीच्या. ७ अपचीकृत. ८ पचीकृत. ९ प्राण्याला मरणाचे वेळेस कशा प्रकारच्या भावना होतात त्या पहा.

तें ही शिश्नतां । द्रवीं पाहे ॥ ७० ॥ जिव्हा मोडे पडे कोरडी । मधु घालितां न लगे गोडी । जळांश नाशतां वाडी । वोस होय अपानाची ॥७१॥ अंतकाळीं ऊष्मा होय शरीरीं । तो तोयनाश जाणावा चतुरीं । असो रस शिश्न जिव्हा चित्तनाशें करी । आपापहार प्रसिद्ध ॥ ७२ ॥ विकळ होतां चि बुद्धि । देहीं सर्वथा नाहीं शुद्धि । कैंचें स्वकीय परकीय विधि । वोळखी च मोडली ॥७३॥ नयनीं न सुझे रूप । विझे मुनीळ तेजाचा दीप । चंद्री लागे होय विद्रूप । जठराग्नि विझोनि जाये ॥७४॥ पादेंद्रियीं तानें मार्गी लागे उदान । येणें पंचांगें तेज पावे निदान । बुद्धि उदान चक्षु पाद रूपमान । निरशलियां ॥ ७५ ॥ शैत्य वेसे जें सेवटीं । ते चि जाणावी तेजाची आटी । आतां वायुप्रयाणाची परिपाठी । ऐसी असे ॥ ७६ ॥ मग मन करी धरी विकल्प । तेव्हां कैंचा शरीरसंकल्प । त्वचेसी न कळे मृदुकठिणरूप । स्पर्श कांहीं ॥७७॥ मुख्य व्यानें जो सर्वगत । तेणें सहज चळती सर्व मारुत । पाणि इंद्रिय नाश पावत । जें वायूचा अंश ॥ ७८ ॥ मन व्यान त्वचा पाणी स्पर्श । हें कळापंचक पावे विमर्श । तो मरुत्पात देहशून्यत्वें आतां आकर्ष । आइक व्योमपंचकाचा ॥७९॥ टाव पुसेलिया अंतःकरणपंचकाचा । समूळ आटेलि शब्द वाचा । श्रुति श्रवणीं नुमटे सुहृदांचा । कोळाहळ नाइके ॥ ८० ॥ समान सांडील नाभिमंडळ । प्रेत होऊनि पडेल केवळ । अंतःकरण समान श्रोत्र वाचा शब्दनाशें प्रबळ । आकाशनाश बोलिजे ॥ ८१ ॥ ऐसियां पंचवीसां कळांसहितें । नाश पावती देहस्थ पंचभूतें । यानंतरें तत्काळ प्रेतें । होऊनि पडतीं शरीरें ॥ ८२ ॥ एव स्थूळ आणि लिंग । देहद्वयासी बोलिला भंग । तथापि वासनात्मक तें अभंग । कारणयोगें ॥ ८३ ॥ सूक्ष्म देह नव्हतां

१ दुसऱ्याचा चेहरा डोळे चांगले असून सुद्धां समजत नाहीं, ओळखतां येत नाहीं. २ दिवा असून अंधार वाटतो. ३ डोळे ताठरणें. ४ तणावा. ५ आटणें, नाहींसें होणें. ६ शरीरभावना, कल्पना. ७ आपादमस्तक शरीरांत व्यापलेला व सर्व नाडींस अन्नरस पोंचविणारा पंचप्राणांतील पहिला वायू. ८ झाला नाहीं तर.

वेगळें । मरण कैसें पाविजे स्थूळें । आणि या स्थूळेंवीण निराळें । सूक्ष्म जगीं ¹त्यानें कीं ॥ ८४ ॥ हो कां ²विष्णुदूतीं अथवा येमदूतीं । यथाचरणें नेइजे स्वर्गा कां निरयाप्रति । दिव्यदेहीं कां प्रेतशरीरीं घातल्यावीण गति । नाहीं सुखा अथवा दुःखाची ॥ ८५ ॥ अतएव स्थूळदेहाचेनि मरणें । लिंगदेहासी ही लागे वारणें । परि ³अज्ञान कारणदेहाचें नुठे धरणें । तोंवरी हें न विनाशे ॥ ८६ ॥ जरि मरणें च लिंग भंग होय । तरि आत्मज्ञानाचें प्रयोजन काय । आणि संन्यासादि साधनोपाय । कासया करणें ॥ ८७ ॥ जें अज्ञानपूर्वक अन्यथाज्ञान । तो मूळकंद असतां वर्तमान । सूक्ष्म स्थूळ विस्तारभान । वाढे मोडे पुनःपुनः ॥८८॥ स्थूळ पिकाची होता मोडणी । सूक्ष्म बीजा होय फळझाडणी । परंतु पुन्हा मांडतां चि पेरणी । सिद्ध असे ॥८९॥ धान्य सुंडीमाजीं आवरे । वेगळें होतां च विश्व वावरे । बीजमात्र जें मुंडा थावरे । तें पेरिल्या पिके ॥ ९० ॥ तेविं मी जीव शुभाशुभकारी । देहद्वयातीं वासनामात्र उरे बीजाकारी । सूक्ष्मत्वें सर्व हि वर्ते तीमाझारी । वारी कोण उभारितां ॥ ९१ ॥ ह्मणसी अंतःकरणाची स्थिति मोडली । तेथें वासना हे कोठें उरली । तरी ते असे भरली । अज्ञानगर्भीं ॥ ९२ ॥ दिनांतें दैंन्यदिनें देहनाश । तो तुज निरोपिला सावकाश । आतां जया प्रळयाचा अंश । तो ब्रह्मांडलये बोलिजेतो ॥९३॥ जीवप्रपंच आणि ईश्वरप्रपंच।

---

१ उत्पन्न होईल काय ? २ प्राण्याच्या मरणसमयीं त्याच्या पुण्य अथवा पापाचरणाप्रमाणें विष्णुदूत अथवा यमदूत येऊन प्राण्याचा जो वासनात्मक सूक्ष्म देह तो स्वर्गास किंवा नरकाप्रत घेऊन जातात व तेथें जे दिव्यदेहाचे किंवा प्रेतशरिराचे सांगाडे असतात त्यात, त्याच्या कर्मानुसार, त्याला घालून त्याजकडून सुख किंवा दुःखरूपी कर्मफळ भोगवितात. ३ सत्य स्वरूपाविषयीं अज्ञान हाच कारणदेह, तो जोंपर्यंत नष्ट होत नाहीं तोंपर्यंत, या सूक्ष्म देहाचे फेरे चुकत नाहींत, ह्मणजे सायोज्यता प्राप्त होत नाहीं. ४ मरणातीं पुनर्जन्म नाहीं तर. ५ अवस्तूचे किंवा विपरीत ज्ञान. ६ कणसाची गरी किंवा गर्जा. ७ धान्य ठेवण्यास पेंढ्याचा करितात गोल तो. ८ दैनंदिन=दररोजचा. ९ मरण हा च पिंडाचा प्रळय.

ऐसें बोलिलें आहे साच । परि येथें असे उच नीच । अतिशयेंकरूनि ॥ ९४ ॥ ईश्वरप्रपंच इच्छामात्रें । जीवासी बांधलें कर्मसूत्रें । जीवासी नाना योनीं यातना यंत्रें । ईश्वर आनंदविग्रही ॥ ९५ ॥ जीव मिथ्या नाशवंत बोलती । ईश्वर सत्य शाश्वत स्तविती श्रुति । जीव प्रळयें नाश पावती । ईश्वर तो अविनाश ॥९६॥ पिंडें जीवासी च नाश बोलिला । ब्रह्मांडें ब्रह्मयासी असे कल्पिला । तत्र दिनांतीं दैन्यदिनांश वर्णिला । तो च अवधारीं ॥ ९७ ॥ एणें च सूर्यें आयुर्गणना । चतुर्युग सहस्रावधी दिनमाना । ते संख्येच्या अर्ते रात्रिमाना । तितुका चि अवधी ॥ ९८ ॥ ब्रह्मा अनिमिषें तेथें कैंची निद्रा । जे बोलावे दृढासन अगोचर मुद्रा । त्याची हे चि रात्री गा शिष्येंद्रा । जे रचना च राहे ॥९९॥ ब्रह्मदिनांतें अल्प जो कल्पक्षय । तेथें ही पृथ्वी होय जळमय । ज्यासी स्वयें ऋषी मार्कंडेय । देखता जाला ॥ १०० ॥ तेणें स्थूळ रचना सर्व संहारे । सूक्ष्म देवताचक्र परतें फिरे । अपंचीकृतें हिरण्यगर्भ कारणीं उरे । ब्रह्मयासहित ॥ १ ॥ तेथें सूक्ष्मबीज जीवाची पुडवटी । साटवे मायामांदुसेचा पोटीं । जेवि सर्व संस्कारें बाहुलियांची पेटी । खेळांत ठेवी कुमारिका ॥ २ ॥ चतुर्युगसहस्र ब्रह्मशर्वरी । तवं जीव स्तब्धले अज्ञानांधकारीं । पुनः प्रबोध जालियां विस्तारीं । पूर्वापरि कुमारिकान्यायें ॥ ३ ॥ ऐसीं द्वयअष्टादशें सहस्रवेळां । गतागत पावे सकळ । तवं ब्रह्मयासी च केवळ । अंत आरंभे ॥ ४ ॥ तेव्हां शत वर्षें होय अनावृष्टि । तेणें मरे सर्व जीवसृष्टि । द्वादशादित्य अग्निवृष्टि । करिती तये काळीं ॥ ५ ॥ रुद्रानेत्रानळज्वाळीं । स्वर्गरचनेची होय होळी । शेषास्यहुताशें पाताळीं । होय भडका ॥ ६ ॥ नेत्रानळ वक्रानळ । मंडळा-

---

१ इच्छामात्रेंकरून साकार देह धरणारा. २ दैनदिनप्रलय= चार युगें सहस्र वेळां गेलीं म्हणजे जो ब्रह्मांडांत नित्य प्रलय होतो तो. ३ अविलंब, सत्वर. ४ वर सांगितलेला काळ हा च ब्रह्मयाचा एक दिवस, (दासबोध ६-४-२ पहा) व तितका च अवधी ब्रह्मदेवाची रात्र असते. त्या रात्रीं ब्रह्मदेव झोंप घेत पडत नाहीं तर आसनस्थ असतो, म्हणून सृष्टिरचनादि व्यापार बंद असतो; तेथून प्रळयास आरंभ होतो व पृथ्वी जलमय होते. ५ सूक्ष्म पंचतत्वें. ६ पुडी. ७ रात्र. ८ ब्रह्मा जागा झाल्यावर.

नळ आणि अनळ । एकरूप होऊनियां सकळ । जाळिती सृष्टि ॥७॥ रक्षा जालियां ब्रह्मांडाची । वृष्टि होईल प्रळयमेघांची । एकि दाटी जळधरांची । गजशुंडेचें प्रमाण ॥ ८ ॥ तये अतिवृष्टीचा जळीं । विरेल ब्रह्मांडभस्माची डिग्वोळी । मग तें मेहुडें निराळीं । विरोनि जाईल ॥९॥ तयाचें नाम चि प्रलयघन । जीमूतादि ज्यासी शृंखळाबंधन । प्रळयकाळीं मुक्त होऊन । जळमय करिती ॥ ११० ॥ येथें आक्षेपिती बहुश्रुत । ब्रह्मांड चि अवघें भस्मभूत । तेथें मेघ चि कैसे वांचत । वृष्टि करावया ॥ ११ ॥ जेव्हां देहमात्र तितुकें जळालें । तेव्हां प्रळयमेघ चि काय पळाले । ब्रह्मांडाबाहेरी वांचोनि आले । तेथील जळ घेऊनि ॥१२॥ ऐसिया प्रश्नाचें प्रत्योत्तर । बहुत ऋषिमत तितुकें साचार । आपुलालिया अनुभवें विचार । महापुरुषीं केलासे ॥ १३ ॥ तो स्वतःसिद्ध निरोपिलासे । येकासी ऐसा ही प्रतिभासे । जे या ब्रह्मांडाबाहेरी असे । उदकाचें आवरण ॥ १४ ॥ ब्रह्मांड भस्मत्वें नीच जालें । आवरणोदक चहुंकडूनि उचंबळलें । सहज चि बुडोनियां गेलें । ऐसें चि कीं ॥१५॥ असो जळें लंघिली मर्यादा । देखोनि तेज प्रवर्तलें द्वंद्वा । तेणें जळ शोषिलें हें समर्यादा । वायूसीं न साहवे ॥ १६ ॥ तेणें परमावेशें झडपिलें । तत्काळ तेज विझोनि गेलें । हें देखोनि गिळूनि ठेलें । वायूसी गगन ॥ १७ ॥ गगन ग्रासी तमोगुण । तमाचें रजोगुणीं होय समर्पण । तें भूतपंचकाचें कारण । मिळालें स्वकार्येंसीं ॥ १८ ॥ पंचदश तत्वेंसीं सत्वगुणीं । रजोगुण प्रवेशला तत्क्षणीं । सत्वगुण पंचकेंसीं स्वकारणीं । महत्तत्वीं मिळाला ॥ १९ ॥ हिरण्यगर्भ सार्द्ध अपंचीकृत तत्वांचें । तें देवताचक्र निरसिलें साचें । परंतु जैसें मरणदुःख जीवाचें । तैसें तें नव्हे ॥ १२० ॥ हरिहर ब्रह्मादि सनक उत्पन्नज्ञानी । इंद्रादि देव ग्रह गण सिद्ध खेचर जे सम्यग्विज्ञानी । संतोषें शरीरें सोडूनि निदानीं । स्वरूपीं सिद्ध चि समरस ॥ २१ ॥ जये-

---

१ टोंग, पर्वत. २ मेघ. ३ की. ४ विन करप्यास. ५ हें वायूचें विशेषण.

स्मरिलें अनुसंधान ॥ १६ ॥ मावळतां पूर्व प्रकरण उष्ण किरण। सरलें संताप पदद्वंद्व विवरण। उगवलें तृतीय पद इंदुमंडळ पूर्ण। अर्थेपीठिका पौर्णिमे ॥ १७ ॥ ते पदद्वयीं असे पार्थक्यें । तयांसी तादात्म्यभावें जें ऐक्य। तें च तृतीय पदें हें महावाक्य। संक्षेपविस्तरें परिसावें ॥ १८ ॥ तत् त्वं आणि असि। ह्मणिजे तें तू च आहेसि। हा संक्षेप जाला आतां विस्ताराशी। आइक बापा ॥ १९ ॥ तत्पदाचेनि अनुवादें। ब्रह्म शुद्ध शबळ भेदें। शुद्ध तें निर्गुण श्रुतिसंवादें। शबळ मायाकवळित ॥ २० ॥ ब्रह्मविवर्त मूळमायेसी अधिष्ठितां। शुद्धांसी च बोलिजे शबळता। तैसें च त्वपद परिसें आतां। भेदद्वयें ॥ २१ ॥ जो तत्पदार्थ शबळ। तो चि त्वंपदार्थ शुद्ध केवळ। तो चि त्वपदार्थ शबळ। आइक व्यतिरेकअन्वयें ॥ २२ ॥ महावाक्य संक्षेपीं सांक्षेप। ब्रह्म जें तू चि आहेसि आपेंआप। तुझा ठाईं प्रपंचमिथ्यारोप। तूं वेगळा तयेसी ॥ २३ ॥ हें चि जाणावयाकारणें। पदद्वयेंपरिशोधन करणें। व्यतिरेक ह्मणिजे वेगळेंपणें। वोळख आपणयां आधीं ॥ २४ ॥ जया स्थूळासी तू जाणसी। तो स्थूळ देहो चि तू नव्हेसी। कुड्यंतर्वर्ती कळेवरासी। वेगळा चि कीं ॥ २५ ॥ स्थूळ देहो स्थूळ भोग अवस्था जागृति। विश्वअभिमानी रजोगुण नेत्रस्थान इति। प्रणवाची प्रथमार्द्धमात्रा अकार दृश्य तुजप्रति। तूं द्रष्टा भिन्न तयाचा ॥ २६ ॥ एका स्थूळ देहाचेनि वेगळेंपणें। इतरा लागे च ना निरशणें। तथापि प्रत्येकें च याकारणें। बोलिलें चि बोलो ॥ २७ ॥ जो तू स्थूळ देहो चि नव्हेसि आगें। तया आतील सूक्ष्म काय होय सागें। केंवि

---

१ ध्यान. २ या ग्रथाचें हें प्रकरण, हीच कोणीएक पौर्णिमा, तेथें 'असि' पदरूपी पूर्ण चद्रबिंब उदय पावलें, त्यामुळें पूर्व प्रकरणातील पदद्वद्वरूपी उष्ण किरणाचा लोप झाला. ३ निराळेपणा. ४ मागें प्रकरण ४ यातील संख्या २८ ते ३७ पहा. ५ महावाक्याचें थोडक्यात विवरण करण्याचा प्रयत्न करावयाचा असेल तर पुढील प्रमाणे त्याचा अर्थ करावा. ६ पदद्वयापासून मोकळें किंवा अलिप्त होणें. ७ कुडाच्या अतरात असलेला.

लागेलि संन्यासियामागें । गृहांतील हिरण्य ॥ २८ ॥ तेवि हिरण्यगर्भाच्या पंचविसां कळांचें । लिंगदेह देवतांशादिमय साचें । तुज द्रष्ट्या दर्शन यां सर्वांचें । तें चि आइक ॥ २९ ॥ निर्विकार प्रथम स्फुरण । तयासी बोलिजे अंतःकरण । तें जयाचें तो वेगळा आपण । आत्मा तूं च स्वयें ॥ ३० ॥ संकल्प विकल्प लागती करावे । तन्मय मन तें तुजहूनि परावें । तें चि जरि तूं तरि तें जेणें धरावे । तो वेगळा कोण सांग पां ॥ ३१ ॥ निश्चयात्मक बोलिजे बुद्धि । निश्चयासी तवं नाहीं आपुली शुद्धि । तयासी कर्ता जो तूं त्रिशुद्धि । तो वेगळा चि कीं ॥ ३२ ॥ चिंतनात्मक चित्त पाहीं । चिंतेता स्वयें चि होत नाहीं । ज्याचे सत्तेनें कीजे तो तूं कांहीं । तें चि नव्हसी ॥ ३३ ॥ मी ऐसें ह्मणसी ज्यासी ज्यासी । तो तूं वेगळा त्या त्या पदार्थासी । अहंता धरिसी आणि सोडिसी । तो तूं अहंसाक्षी होसी अहंता च केविं ॥३४॥ हें अंतःकरणपंचक दर्श्य तूतें । तूं द्रष्टा तें चि नव्हसी जाण निरुतें । येणें दर्शेंद्रियद्वारा भूतमय विषयपंचकातें । वेइजे तें ही नव्हसी तूं ॥३५॥ वाचां शब्द बोलणें आणि श्रोत्रीं आइकणें । यें दोन्हीं कारण कल्यें एकें अंतःकरणें । पाणिइंद्रियाचें करणें त्वचां स्पर्श जाणणें । हें दोन्हीं येका मनाचीं ॥ ३६ ॥ नयनीं रूपगृहणसिद्धि । चरणीं पथिगमनविधि । या दोहीं इंद्रियांचे येकि बुद्धि । करी व्यवसाय ॥३७॥ रसनां जाणणें रसप्रकार । शिश्नेंकरूनि सुरतव्यवहार । ये दों इंद्रियीं चमत्कार । चित्तें येकें ॥ ३८ ॥ घ्राणेंकरूनि गंधगृहण । गुदेंद्रियीं मळोत्सर्ग जाण । हें इंद्रियद्वयाचें कारण । कर्त्ता एक अहंकार ॥ ३९ ॥ या इंद्रियविषयांचें तुज ज्ञान । ज्ञाता तूं वेगळा यांपासून । ये अर्थावबोधीं अनुमान । करावा चि नलगे ॥ ४० ॥ आतां प्राणपंचक अवधारीं । समान वसे नाभिमंदिरीं । तेथूनि पसरे सर्व शरीरीं । स्रवती जेणें नाडिका ॥ ४१ ॥ व्यान सर्वशरीरगामी । आपादमस्तक व्यापक

१ सन्यास्याने गृहाचा च त्याग केल्यावर त्यांतील सुवर्णाचा निराळा त्याग करावा लागत नाहीं. २ चिंतन करणारा. ३ मुळांत हा शब्द गळाला आहे.

नेमीं । जो वातप्रकोपकामीं । कारणस्य ह्मणऊनिया ॥ ४२ ॥ कंठस्थान उदानाचें । उजृंभणादि व्यापार तयाचे । कौतुक दाखवी स्वप्नावस्थेचें । साचासारिखें ॥ ४३ ॥ अपान सदा अधोगमनी । मळोत्सर्ग करी गुदस्थानीं । निरंतर आहाराचा पाचनीं । प्राणयोगें ॥ ४४ ॥ प्राणाचें हृदय जाण मंदिर । श्वासरूपें कारभार । प्रवेशनिर्गमप्रचार । हरे आयुष्य त्याचेनि ॥ ४५ ॥ जे जे बोलिले पंचप्राणधर्म । हें त्याचें त्यासी तों नेकळे कर्म । जो तू जाणसी सर्व ही मर्म । तो चि प्राण हे केविं घडे ॥ ४६ ॥ अंतःकरणपंचक प्राणपंचक । इंद्रियदशक आणि विषयपंचक । हें लिंगदेह पंचवीस कळात्मक । तू द्रष्टा वेगळा तयेसी ॥ ४७ ॥ लिंगदेह स्वप्नावस्थ तैजसअभिमानी । प्रविविक्तभोग सत्वगुण कंठस्थानीं । हा द्वितीय चरण उपकार जाणसी ह्मणोनि । जाणता तो तू वेगळा ॥ ४८ ॥ स्थूळ लिंग देहद्वयाचें कारण । जें प्रपंचस्मृतीचें धारण । तया अज्ञानात्मक अन्यथाज्ञानाचा जाण । जाणता नेणू ह्मणविसी ॥ ४९ ॥ तंव शिष्य विनवी सप्रेम लीळा । जी जो मी देहद्वयविलक्षण साक्षी वेगळा । तो मी कोण कैसा कोठें निराळा । हें मज चि माझें न कळे की ॥ ५० ॥ देहद्वयाचेनि दृश्यपणें । द्रष्टया आपणावेगळें जाणे । परंतु देहद्वयनिरासीं नेणें । मज चि मी स्वामी ॥ ५१ ॥ ऐसें आइकोनि सद्गुरु सर्वेश्वर । शिष्यगजेंद्रकरुणाकर । प्रेरी स्वप्रकाशवाक्यदर्शनधार । संशयनक्रविमोचना ॥ ५२ ॥ बा रे तुवा सज्ञानें च अज्ञान नाथिलें । अज्ञानें कासया आहे अरलविलें । जें तुज आतां चि दृश्य

---

१ जांभई येणें वगैरे २ गाढ झोंप लागण्यापूर्वीची जी जिवाची अवस्था असते, तींत कल्पनारूपानें मनाचे जे व्यवहार चाललेले असतात ती स्वप्नावस्था ३ श्वासोच्छ्वासरूपी क्रिया ४ ही क्रिया बंद पडली तर किंवा प्राणाच्या अभावीं प्राणी जिवंत राहू शकत नाहीं. ५ पंचप्राणाच्या ज्या क्रिया सुरू असतात त्या, मी या क्रियेचा कर्ता अशा जाणीव बुद्धीनें नसतात ६ स्वप्नदेहाचा अभिमान धरणारा जीव तो ७ स्वप्नस्थान किंवा मनोराज्य यांतील अस्पष्ट भोग ते ८ स्थूल सूक्ष्म देहाव्यतिरिक्त. ९ सुदर्शन चक्र १० हे चरण आमच्याजवळील मूळप्रती प्रतीत गळालेले आहे

जालें । तुझेनी च प्रश्नें ॥ ५३ ॥ मी मज नेणें येणें अर्थें । तुझें जाण-पण [1]द्योतिलें यथार्थें । नेणणें चि मी नेणे ह्मणेलियें व्यर्थें । दुराग्रह वचनें ॥ ५४ ॥ नेणपणातें जाणतोसी । तो तू तुझा तुज चि पासीं । आपुलें अतर्क्यत्व प्रगटिसी । मीपणें नेणें ह्मणोनियां ॥ ५५ ॥ ज्यासी देहद्वयावलंबें द्रष्टेपण । तो देहेद्वयनिराशें आवघा चि आपण । जैसें घटमठाचें फिटतां आवरण । आकाश अपरांपर ॥५६॥ तेथें जें मिथ्या भांवावलेंपण । तें तुझें देह जाण कारण । तूं तवं तयाचा आहेसि जाण । प्रकाशत्वें ॥५७॥ कारण तनु अवस्था सुषुप्ति । [2]प्राज्ञ अभिमानी आनंद [3]भोगावाप्ति । तमोगुण हृदयस्थान हे व्याप्ति । तृतीय मात्रा मकार ॥ ५८ ॥ यां सकळांतें जो जाणता । तो तूं हे चि केविं होसी स्वतां । महाकारण शरीर आतां । निर्धारीं आपुलें ॥ ५९ ॥ मी नव्हें स्थूळ लिंग कारण शरीर । मी नव्हें दृश्य वाच्य प्रपंच नश्वर । अदृश्य अद्वैत निराकार । निर्विकार आत्मा तो मी ॥ ६० ॥ जैसें मेघपटळीं गगन । तैसा मी प्रपंचा सबाह्य सघन । चराचर जळचरां आत्मजीवन । [4]अनंतांभोधि भरलासे ॥ ६१ ॥ निरसूनि निःशेष प्रपंचमान । केवळ स्वरूपाचें अनुसंधान । ह्या व्यतिरेकें बोलती मुनिजन । अद्वैतबोधें ॥ ६२ ॥ असो व्यतिरेकत्वें ब्रह्मस्मरण । हें तुझें शरीर महाकारण । जेथें अभिधानत्रयाचें धारण । मूळमाया ब्रह्मविवर्त गुणसाम्य ॥ ६३ ॥ अहं ब्रह्म स्मरणरूपा मूळमाया । हें [5]सर्गोत्सर्गीं आलें परिचया । ब्रह्म चि पासूनि ह्मणोनियां । ब्रह्मविवर्त बोलिजे ॥६४॥ मी ब्रह्म हें ही सरे अनुमोदन । याचें सूक्ष्मरूपें उरे [6]वेदन । जैसें जालियां लक्ष्यभेदन । निवालेंपण हस्ताचें ॥ ६५ ॥ तयासी बोलिजे गुणसाम्य । तें मूळमायेचें

---

१ प्रकाशलें, स्पष्ट झालें. 'मी कोण आहे हे माझें मला कळत नाहीं' असें म्हटल्यानें तू कोणी तरी आहेस हें, व तुला कळत नाहीं हें ही, तूं जाणलेंस असें उघड झालें. २ सुषुप्ति अवस्थेंतील नेणिव दशेचा अभिमान धरणारा जीव. ३ निरंकुश सुखाची प्राप्ति. ४ अनंत+अंभोधि=सागर. ५ सर्ग=उत्पन्न होणें, व उत्सर्ग=त्यागणें. ६ स्फुरण.

शुद्धत्व अनुपम्य । जैसें तुर्येचें प्रपकपण अगम्य । त्यासी च बोलिजे उन्मनी ॥ ६६ ॥ असो हे मूळमाया महाकारणकाया । येथींची अवस्था सिद्ध तुरिया । हा शुद्धसत्वगुण प्रत्यगात्मया । अभिमान येथीचा ॥ ६७ ॥ येथीचा भोग आनदावभास । मूर्धि स्थान या सकळास । हा प्रणवाचा चतुर्थ चरण जयास । अर्धमात्रा बोलिजे ॥ ६८ ॥ जो तू जाणसी या सकळा । तो तत्वता याहूनि वेगळा । जैसा गोंडाळा आणि जळा । सम्मंधी च भेदु ॥ ६९ ॥ निराकार ह्मणिजे ज्यासि नाहीं आकार । साकार ह्मणिजे जें कदां नव्हे निराकार । या दोहींसी येकाकार । हें कहि च न घडे ॥ ७० ॥ यदर्थी नेति नेति श्रुतिवाक्यें । आत्मा विवचिती पार्थक्यें । आता महदद्वैतबोध येक्यें । परिसें अन्वयार्थें ॥ ७१ ॥ मुख्य अद्वैत ऐसें पाहीं । जेथें तत्वता द्वैत चि नाहीं । दृश्य प्रपचभास जो काहीं । तो हि ब्रह्मस्वरूप ॥७२॥ मुळीं ब्रह्म तव एक । तेथें भासलें विश्व अनेक । तें तन्मय जेसें हस्तपादादिक । एका चि देहाचे ॥ ७३ ॥ कीं एका च बीजाचा अकुर । स्थूळमाने जाला तरुवर । तेथें शाखोपशाखाचा विस्तार । तन्ही वृक्ष तो येक च कीं ॥ ७४ ॥ येथें आक्षेप साक्षेपपूर्वक । करावया उदित कित्तीएक । ब्रह्मीं अद्वैतीं हा दृष्टातविवेक । केसा घडों शके ॥७५॥ बीजत्वीं होतें स्थूळरूप । तारे विरुढोनि जाला पादप । ब्रह्म निरश जें अरूप । तेथें विस्तारला कायसा ॥७६॥ प्रपच मिथ्याभूत जो निरशिला । तो चि ब्रह्मरूप कैसा जाला । येसिया प्रश्नाचा वहिलों । परिहार दीजे ॥ ७७ ॥ ऐसा देखोनि अन्य पक्ष तर्कसपर्क । उदेला वेदात सिद्धातवाक्यअर्क । जेथें नाना दर्शनभेद तारातर्क । लोपोनि जाती ॥७८॥ तें चि परिसावें सादर । ब्रह्म अनुपम्य शब्दातेंपर । तथापि ही न पवती चतुर । शब्दोपमे वेगळें ॥७९॥

---

१ तुर्या अवस्थेचें सुख. २ शेवाळें. ३ पृथकत्वानें. ४ उत्कठित. ५ मोठा वृक्ष. ६ सत्वर ७ निरास ८ अज्ञानप्रवेश, किंवा अधकाराची छ्या ९ सूर्य. १० अगउपाग भेद. ११ शब्दातपर असा दुसरा पाठ आहे.

एथें प्रत्यक्ष प्रमाण उपमान अनुमान । जहत् अजहत् जहदाजहत् लक्षणाभिधान । इतुकीं प्रकारीं स्वस्वरूपसमाधान । पावती योगेश्वर ॥ ८० ॥ प्रत्यक्ष ह्मणिजे अनुभव आपैसा । सूर्यविवर्त सूर्यरूप जैसा । ब्रह्मविवर्त ब्रह्मरूप तैसा । प्रसिद्ध चि कीं ॥ ८१ ॥ फेनबुद्बुदतरंगाकारीं । निराकार च साकारलें.वारी । तेविं ब्रह्म चि प्रपंच नातरी । साकार निराकार जैसें घृत सीत ॥ ८२ ॥ प्रमाण विशेषोंचिया श्रुति । आतां आइक उपमेची स्थिति । दृष्टांत एकांगें वर्तती । द्रष्टांताळागीं ॥ ८३ ॥ दृष्टांतें जाणावें जया अर्थासी । द्रष्टांत ऐसें ह्मणावें त्यासी । जरि सर्व साम्यता घडे उभयांसी । तरी उभयत्व कैंचें ॥ ८४ ॥ जो पदार्थ दृष्टीसी न पडे । तो जाणावया दृश्याची उपमा घडे । अंतसीकुसुम ऐसी कां न घडे । विष्णूची अंगकांति ॥ ८५ ॥ पुष्पीं नाहीं स्वप्रकाशता । काय दूषणीं घडेल एतावता । कां ब्राह्मण केवळ अग्नि च ह्मणतां । काय तापों बैसावें ॥ ८६ ॥ ह्मणोनि विजातीय तो चि दृष्टांत होय । स्वजातिलें चि व्यर्थ जाय । नीळा चि ऐसा नीळ ह्मणतां काय । उपमेसी आलें ॥ ८७ ॥ तें चि दृष्टांतीं दूषण संभवे । जेथे विरुद्धता अर्थभावें । आम्रफळ ऐसें मधुर जाणावें । जैसें वृंदावन केवळ ॥ ८८ ॥ ऐसीं दृष्टांताचीं लक्षें लक्षणें । नेणिजेती जेणें विलक्षणें । तयासी तेणें विचक्षणें । बोलोनि काय फळ आहे ॥ ८९ ॥ जें बोलिलें तें आइकतां ही पाहिजे आलें । तरी च वरें नाहीं-तरी येकेंवीण एक व्यर्थ गेले । असो ऐसें दृष्टांतासी रूप केलें । आतां अनुमान आयिका ॥ ९० ॥ दुरी पर्वतीं देखिला धूम । तेथें अग्नि आहे ऐसा नेम । हा अनुमान च परि विरामें । न पवे कदां ॥ ९१ ॥ तेविं

---

१ कोणत्याही गोष्टींत सार काय आणि असार काय हें ओळखतां येत नाहीं ह्मणून त्या सर्वांचा त्याग करणें ही जहल्लक्षणा, त्या सर्वांचें ग्रहण करणें ही अजहल्लक्षणा व सारअसार किंवा नित्यअनित्य ओळखून असाराचा त्याग व साराचें ग्रहण करणें ही जहदजहल्लक्षणा. वेदांत शास्त्रांत पहिल्या दोन्ही त्याज्य व तिसरी ग्राह्य लक्षणा मानली आहे. २ आपला आपण, तत्काल. ३ दृश्याचा अंत. ४ जवसाचें फूल, नाजुक, बारीक. ५ असंख्य. ६ शेवट.

इद्रिय स्पष्ट विषयासारिखें । स्वरूप न देखती ओरिखे । पारि अनुमानें आस्तिक्य तें अनसारिखें । होईल कैसें ॥ ९२ ॥ ऐसें प्रत्यक्ष प्रमाण उपमान अनुमान । यांचें केलें निवेदन । आतां लक्षणत्रयाचें वर्णन । श्रवण करावें ॥ ९३ ॥ जहत् ह्मणिजे जे वाक्य बोलिजे । तेर्थीचा वाच्यार्थ त्यक्त कीजे । लक्ष्यार्थ विवंचूनि घेइजे । तो चि कसा परिसावा ॥ ९४ ॥ बोलिजे गगेमाजीं गोठणें । तेथें आप त्यागावें आपण । तीरीं जाणावें पावोनि खूण । अनुभवाची ॥ ९५ ॥ आतां अजहत्वाचें व्याख्यान । अर्थ अधिक जो वाक्याहून । तो लक्षावा अनुभऊन । तो चि कैसा ॥ ९६ ॥ शोणो[3] धावती ह्मणजे तांबडें धावें । शब्दार्थ इतुका चि कीं स्वभावें । तेथें आरक्तवर्णें लागें कल्पावें । अश्व आपणें ॥९७॥ जहदाजहत् तें ऐसें । तेथें त्याज्य काहीं चि नसे । तत्वता वस्तूसी वळखावें जैसें । सोय देवदत्तः ॥ ९८ ॥ जो देवदत्त देखिला विजनीं । तो जरी भेटला जवळीं च जनीं । तरि तो चि वळखावा जनविजनीं । चाड चि नाहीं ॥ ९९ ॥ असो इहीं चहूं परीक्षणीं तिहीं[6] लक्षणीं । स्वस्वरूपावबोध अनुमवें क्षणीं । हें प्रश्नपरिहाराचा गवेषणीं । निरोपिलें प्रसगें ॥ १०० ॥ तरि तें ऐसें प्रश्नोत्तर । सर्व ब्रह्म जैसा बीजरूप अकुर । हें कैसें घडेलि याचें प्रत्योत्तर । देइजेतसे ॥ १ ॥ बीज काय आहे वृक्षाऐसें । तरि तें निराकार नव्हे कैसें । ब्रह्म निरंश होय परि शून्य नसे । बीजस्थानीं का नव्हे ॥ २ ॥ प्रपच मिथ्या जैसें गंधर्वनगर हरिणनीर । परि हा चि कचुक आहे विचार । तो कैसा वेगळाले त्रिप्रकार । ते चि परिसावे ॥ ३ ॥ मेघाचें दळ आणि मृगजळ । दिसत चि मिथ्याभूत केवळ । तैसें चि मिथ्या प्रपचजाळ । हें प्रथम कचुक ॥ ४ ॥

---

१ आर्षपणाने. २ गगेवर गुरें बसलीं आहेत असें ह्मटलें ह्मणजे गगेच्या पाण्यावर असे न समजता गगेच्या तीरावर असे समजणें, याप्रमाणें वाच्यार्थ टाकून लक्ष्यार्थ गृहण करणें ती जहल्लक्षणा समजावी ३ रक्तवर्ण. ४ अरण्यात. ५ प्रत्यक्ष, प्रमाण, उपमान, अनुमान. ६ जहत् अजहत्, आणि जहदजहत्. ७ प्रश्नोत्तररूपानें, गवेषण=शोध. ८ आकार किंवा प्रमाण रहित. ९ आगरसा किंवा आवरण.

मेघरूप कुरंगाप मिथ्याभूत । परतु मेघ आणि सूर्यप्रकाश शाश्वत । तेविं विश्वाभास मिथ्या ब्रह्म सदोदित । हें कचुक दुसरें ॥ ५ ॥ अन्यथाभास मिथ्यत्व अधिष्ठानें चि पाहिलें । तेथें मिथ्या ह्मणणें तें ही राहिलें । काय नरत्व नीरत्व जरि दवडिलें । तरी च भेटे घनु भानु ॥ ६ ॥ नराकारें नीराकारें । काय तेथें आहे दुसरें । हें अर्थ कचुक तिसरें । ऐसें जाणावें ॥ ७ ॥ जैसा त्र्यंबक त्रिपुरें एक शरें छेदी । तेविं हें त्रिकचुक एकसरें भेदी । तयासी निज विजयें स्वानदीं पदीं । वैसणें घडे ॥८॥ अन्यथाभास जो नाथिला । प्रपच नामें रूपें नाथिला । तन्मिथ्यत्वें तेथें चि आथिला । अधिष्ठान आत्मा ॥ ९ ॥ प्रपंचासी मिथ्यत्वें निरसावें । तरि तो चि ब्रह्म हें का स्पर्शावें । ऐसें ह्मणशील तरी येथींचें चि विवरावें । अर्थावबोधीं ॥ ११० ॥ प्रपंच ब्रह्मज्ञानें बाधिलो । असत चि मिथ्यत्वें साधिला । परि आभास नवचे उछेदिला मृगजळन्यायें ॥ ११ ॥ ह्मणोनि नानाकारें ब्रह्म निर्विकार । जैसा पुरुषावेवी निरावेवी जळधर । यालागीं समस्त खल्विद ब्रह्म हा निर्धार । करिती श्रुति त्रिशेषींच्या ॥ १२ ॥ प्रपचमिथ्यत्वें ब्रह्म पाहे । तेथें निरसणें हें ही न साहे । प्रपचरूपें चि काय आहे । परब्रह्मेवाचूनि ॥ १३ ॥ निश्चळ राहे तरी च अगाधु । तरगता काय नव्हे सिंधु । जळधर्मे तरगधर्मे प्रबोधु । अधिकारपरत्वें ॥ १४ ॥ ऐसी असे आत्म-सत्ता । सर्व ब्रह्म च आहे तत्वता । येथें च स्वप्नभ्रमवत् प्रपचता । भासे नसत चि जिवासी ॥ १५ ॥ येथें जहत् लक्षणाचा प्रादुर्भाव । ब्रह्मेंवीण प्रपचासी कैंचा ठाव । तथापि मायेचा ठाईं हा स्वभाव । वोळिला पाहिजे ॥ १६ ॥ विश्व मायामय होय साचें । परतु मायेसी स्वातत्र्य कैंचें । तेथें सामर्थ्य आत्मयाचें । ऐसें जाणावें ॥ १७ ॥ हे

१ मेघाचें दळ यातील नरत्व व मृगजळ यातील नीरत्व. २ शिवानें त्रिपुरासुराचा वध केला व त्याचीं मयासुरनिर्मित सुवर्ण, रौप्य, व लोह यांचीं तीन नगरें जाळून भस्म केलीं ३ एकाकी अथवा एकदा. ४ गृहण करावें या अर्थी. ५ बाधक झाला, निरसला. ६ गभीर, खोल.

अजहत् लक्षणाची खूण । आतां जहदाजहत् रहस्य जाण । निराकार साकार स्वयें आपण । अद्वैत आत्मा ॥ १८ ॥ सर्व ब्रह्म एणें बोलें । सर्वांचें सर्वत्व निःशेष गेलें । सर्वत्व जाऊनि सर्व आलें । ब्रह्मत्वासी ॥ १९ ॥ सर्व असतें सर्वत्वेंसीं । तरी ब्रह्म ह्मणणें कासयासी । मृन्मय जाणतां वल्मिकांसी । वल्मिकत्व असतां चि गेलें ॥ १२० ॥ अपरें शब्दें पूर्व शब्दार्थाचा होय लोप । जैसें सिद्धांतीं पूर्वपक्षाचें स्वरूप । कीं अग्निरूप चि जाणतां दीप । नानाकारत्व दिसतां चि गेलें ॥२१॥ कदापि तूं ऐसें ही भाविसी । श्रुति-प्रमाण उभय पक्षांसी । तरी सर्व ब्रह्मावबोधासी । पूर्वपक्ष कां न ह्मणावें ॥ २२ ॥ तरी जें संशयाचें स्थान । त्यासी पूर्वपक्ष हें अभिधान । तरी एक पुसिजेलें वचन । तें आतां सांग पां ॥ २३॥ ब्रह्म आकाशाहूनि विस्तीर्ण अनंत । त्याहूनि बाहेरी न घडे कीं प्रपंचजात । तें ब्रह्मरूप नव्हे तरी येव्हडें वर्ततां समूळ द्वैत । निर्मळ अद्वैत केवीं घडे ॥ २४ ॥ प्रपंच मिथ्या च मुळीं-हूनि नाहीं । तरी हें केवळ असत्य पाहीं । मम माता वंध्या हे कांहीं । चतुरता न ह्मणती ॥ २५ ॥ नसोनि भासे भासोनि नाहीं । ऐसें च हें असे पाहीं । इंद्रियां अगोचर हा कांहीं । अर्थवाद नव्हे यथार्थ चि ॥२६॥ आतां असो जैसें आहे तैसें । केवळ ब्रह्म चि असे । हा च सिद्धांत होय ऐसें । आइक पुढतीं ॥२७॥ द्वैत साक्षेपें अद्वैतता । सगुण साक्षेप निर्गुणता । एणें कैसी अखंडता । साधे ब्रह्मींची ॥२८॥ आणि सर्व ब्रह्म ऐसें जालें जेथें । द्वैताद्वैत सगुण निर्गुणत्वें ठेलें तेथें । सर्वत्व ब्रह्माचेन पंथें । दिसत चि गेलें ॥२९॥ सर्व तें चि सर्व नव्हे ब्रह्म आहे । ऐसा सर्वब्रह्म वाक्याचा अर्थ लाहे । तेथें सर्वत्वाचें पूर्वदशासम्मंधें नव्हे । ह्मणणें ही राहे ब्रह्म च सर्व ॥१३०॥ सर्वत्वें सरलें सर्व । ब्रह्मत्वें उरलें अपूर्व । हें जाणणेंवीण जाणती ते अगर्व । महामुक्त ॥३१॥ तूं ऐसें भाविसील

---

१ मृत्तिकामय. २ वाहळास. ३ उत्तर. ४ अगम्य. ५ स्तुति. ६ प्रयत्न केला ह्मणजे द्वैतापासून च अद्वैताची व सगुणापासून च निर्गुणाची सिद्धि होते.

अंतःकरणीं । विधि निषेध भय प्रपंच साचारपणीं । ब्रह्म चि प्रपंच तरी कर्माचरणीं । विधिकिंकर कां होणें ॥३२॥ याचें प्रश्नोत्तर ऐसें असे । ब्रह्मज्ञासी काहीं च करणें नसे । वर्णाश्रमधर्म अनायासें । प्रवाहरूप ॥३३॥ जैसें आहे तैसें च वोर्वे । ब्रह्मरूप चि आहे अनर्वे । वेगळेंपणें-वीण काहीं नेर्वे । मस्तकेंवीण मस्तकीं ॥३४॥ स्वकर्म करिता साक्षेपें । युगधर्मास्तव जें लोपे । तत्वता वेष्टेना तेणें पापें । जेवि जळत पर्वत खगीं मृगीं ॥३५॥ कर्ता कर्म ब्रह्म जालें । तेथें निउनपूर्ण ब्रह्मत्वा आलें । पाप गेलें पुण्य पालटोनि जालें । परब्रह्मस्वरूप ॥३६॥ आता व्यतिरेकान्वयें आपण । स्वयें च स्वयत्वें वीण । हें असिपदाचें विवरण । संपूर्ण जालें ॥३७॥ येथें प्रश्नप्रत्योत्तरा विश्रांति जाली । गुरुशिष्यत्वें येकत्वा आलीं । सर्व भासता न भासता पुसली । सर्वत्वाची मुद्रा ॥३८॥ हा अध्यात्मविद्या-विचार । मनोजयाचा चतुर्थ प्रकार । जेथें मन चि जालें तदाकार । तेथें जयो चि जयवंत ॥३९॥ हा प्रकरण तृतीय भुवनींचा । कथाकल्पवृक्षा-कुर साचा । एथपर्यंत विस्तार याचा । सेव्य संता सभाग्या ॥ १४० ॥ कल्पवृक्ष ह्मणावया कारण ऐसें । येथें कल्पिली फळाप्ति अनायासें । याचें निज बीजरूप सामरस्यैक रसें । फळ केवळ रामनाम ॥ ४१ ॥ आतां भगवद्भक्तियोगें हा परमार्थ । पाविजे आणि निर्वाहिजे यथार्थ । ते चि वोलिजेलि जेणेंवीण व्यर्थ । ज्ञानचर्चा कलियुगीं ॥१४२॥ स्वस्ति श्रीसुगमोपाये । रामीरामदासकृते । मनोजये । अध्यात्मविद्याया महावाक्ये असिपदवर्णन । नाम प्रकरण ॥ ९ ॥ नवम ॥ श्रीराम ॥

॥ श्रीराम ॥

पूर्व प्रकरणादारभ्य नवपर्यंत । कथार्थ यथार्थपद स्वप्रकाशवत । पावे स्थिरावे बुध बिभीषण शरणागत । श्रीरामभक्तिआश्रयें ॥ १ ॥

---

१ सर्व ब्रह्ममय जर आहे तर कर्मांचा खटाटोप कशाला पाहिजे हा प्रश्न प्रलेव वेदांताचा उपदेश करणाराला होतो त्याचें उत्तर पुढील ओंवींत आहे २ आचार, आकृति ३ मनोजयाचा. ४ मनोजयाचे तीन प्रकार, सत्संग, वासनात्याग आणि प्राण-स्पंदनिरोध, याचें मागें प्रकरण ३ यात विवरण केलें आहे व चवथा प्रकार अध्यात्मवि-चार याचें प्रकरण ४ तें ९ पर्यंत विवरण झालें ५ व्यवस्था लावणें ६ हाहाणा

भगवद्भक्तीच्या आश्रयेंवीण । कली साधन तितुका शीण । युगानुसार करून स्वधर्मरक्षण । ईश्वरभक्ति करावी ॥२॥ कदापि ऐसें ह्मणती कर्माभिमानी । कर्मतात्पर्य राहिलें युगाभिधानीं । कलियुगीं कर्मलोप चि आहे जनीं । तरि काय तैसें चि वर्तावें ॥ ३ ॥ याचें ऐसें असे प्रत्योत्तर । सज्जन सत्कर्मी अति तत्पर । परंतु अवघे तैसे चि असते नर । तरि तें घडों शके हो ॥ ४॥ मुख्य राजा यवन त्याचेनि धर्में । केवळ अधर्म ब्रह्मकर्मे । हें ही असो द्रव्यार्चन चि अकर्मे । जेथूनि पुढें आचरी ॥५॥ आतां ऐसें ही जऱ्ही जालें । तऱ्ही स्वकर्म तों पाहिजे केलें । युगानुसार ऐसें बोलिलें । याच हेतु ॥ ६ ॥ केवळ कर्मे चि तरों ह्मणती कळीं । त्यांची कां न बैसे दातखिळी । काय नारदा व्यासाहूनि आगळी । युक्ति शुक्तिकीटकांची ॥ ७ ॥ तैस्या च हरिभक्तीवीण ज्ञानगोष्टी । ते बोधैलुब्ध होती केवळ कष्टी । जव श्रीराम न पाहे कृपादृष्टीं । तों वज्रघात न निवारे ॥ ८ ॥ एव भगवद्भक्ति कारण सर्वांतें । तरि भगवत ही ह्मणिजे बहु देवातें । जो ज्यासी भजेलि तेणें चि त्यातें । कृतकृत्यता असे कीं ॥९॥ यदर्थी परिस विचक्षण । जेथे जे कामना पुरे जाण । तिहीं त्यासी भजावें त्या निरोपणा । श्रवण करीं सादर ॥१०॥ स्वर्गभोगाची इच्छा जयासी । तेणें भजावें अदितीसुतांसी । राज्यकाम ज्याचा मानसीं । तेणें विश्वेदेवांसी भजावें ॥११॥ आयुःकाम असला जरी । अश्विनौदेवासी भजावें तरी । आरोग्यकाम ज्याच्या अतरीं । तेणें सूर्यासी भजावें ॥ १२ ॥ आधिपत्यकामें परेमेष्टी । येशःकामें यज्ञतुष्टि । प्रजाकाम जयातें शृष्टी । तेणें प्रजापतीसी भजावें ॥ १३ ॥ इंद्रियकामें त्रिदशे-

१ कर्मांचा सकुचितपणा. २ भगवद्भक्ति न करता केवळ कर्मे करून च आह्मी मोक्ष मिळवू असें ह्मणणारे जे आहेत त्याचें त्यापेक्षा तोंड मिटलेलें काय वाईट? नारद व्यासादिकानां जें सागितलें आहे त्यापेक्षां निराळें सागण्याची या शिंपल्यातील किड्याची काय योग्यता आहे? ३ केवळ वेदाती हे नेहमीं असमाधानी च राहणार. ४ मृत्युचें दुःख हा च कोणीएक वज्रघात. ५ मुख्य भगवताचे अश जा देव, देवता, भूतें, दैवतें, यापैकीं कोणाचें ही ज्यानें त्यानें आपआपल्या आवडीप्रमाणें भजन केलें तर तीं इच्छित फल देतात. ६ इद्रास. ७ अमीस. ८ सूर्यपुत्र अश्विनीकुमारास. ९ ब्रह्मदेव.

श्वर । कामकामनेलागीं निशाकर[2] । वोजस्काम जयासी वर । तेणें भजावें मरुद्गणा ॥ १४ ॥ लक्ष्मीकामें शक्तिदेवता । अन्नकामें देवमाता[4] । पुष्टिकामें इळा तत्वता । दांपत्यार्थ उमा सती ॥ १५ ॥ विद्याकामें गणपती । वक्तुत्वकामें सरस्वती । अभिचारकार्थ[5] निर्ऋति[6] । आराध्यदैवत ॥ १६ ॥ असो ऐसे सेव्य सेवकत्वें । बहुत आहेति कामनापरत्वें । भजकें तरी सर्व सामर्थ्यत्वें । भजावें चि कीं ॥ १७ ॥ परंतु जयांचा हस्तीं असे जितुकें । संपूर्ण भजनें पाविजे तितुकें । सर्व ही सामर्थ्य धारिजेतें येकें । इतर तरी वर्णिले च नसते ॥ १८ ॥ एवं प्रपंच बोडंबरीचें[8] फळ । तेथींचे दाते हे सकळ । मुचुकुंदें मागितला मोक्ष केवळ । तो नेदवे चि कव्हणासी ॥ १९ ॥ आसो हे ही आराध्यदेवतें होतीं । कार्यार्थ सकळां ही भजों येती । परि मुख्य इष्टदेवत नव्हती । कैवल्यपदयाचका[10] ॥ २० ॥ तो येक विष्णु जगज्जीवन । आणि भवगजासी जो प्रत्यक्ष पंचानन[11] । हे दोघे एकरूप हें श्रुतिवचन । त्या एकांसी[12] भावें भजावें ॥ २१ ॥ वैष्णवासी जग विष्णुरूप । तेथें शंकर तो ही तद्रूप । तैसें चि शांभवासी शिव विश्वदीप । तेव्हां विष्णु तो ही तन्मय ॥ २२ ॥ देवा अभेदासी जो भेदी । एकदेशित्वें महिमा छेदी । तो भक्त नव्हे प्रमादी[13] । पतित ऐसीं पुराणें ॥ २३ ॥ देवाचें स्वरूप चि न कळे ज्यासी । तेथें बोलणें चि नलगे त्यासी । कलियुगीं मताभिनिवेष[14] बहुतांसी । कोणासी कोणें वारावें ॥ २४ ॥ जैसें लुटितिये राजभारी ग्रंथितस्कर[15][16] । तेथें सावधान असोनी काय करिती

---

१ इद्र. २ चद्र. ३ शरिराची वळकटी. ४ पृथ्वी. ५ जारणमारणादि कर्माकरितां. ६ दुर्गादेवी. ७ ज्या देवतेच्या. ८ गारुडीविद्या. ९ देवदानवांच्या युद्धांत मुचुकुंदानें देवांना साह्य केलें, त्याबद्दल त्यानें देवांजवळ मोक्ष मागितला परतु तो कोणा ही देवाच्यानें देववला नाही. तेव्हां त्यानें विश्रांतीसाठीं झोंप मागितली वगैरे कथा आहे. १० मोक्षपदवीची इच्छा करणाराला मुख्य दैवत होणार नाहीं. ११ भवापासून मुक्ति देणारा जो शिव तो. १२ हरिहरासी. १३ निष्काळजी, गैरसावध. १४ आपआपल्या मताचा फाजील अभिमान. १५ राजसेवक. १६ गठीछोड, उचले.

नर । तैसें म्लेंछदेशीं पाखंडभर । विनोद पाहाती सज्जन ॥ २५ ॥ जरी पूर्वी महाराष्ट्रराजा होता शुद्ध । तरी पाखंडी उछेदिले बौद्ध । सत्य पुरातन प्रतिष्ठिलें प्रसिद्ध । तें तों आतां राहिलें ॥ २६ ॥ अहो वैष्णवीं द्वेपावें शंकरा । आणि शांभवीं निंदावें शार्ङ्गधरा । या येऱ्हडिया दुराचारा । देवीं प्रेरिलें विघ्नांसी ॥ २७ ॥ कर्मरूपें प्रायश्चित्तें नव्हे पापक्षय । ह्मणऊनियां भगवद्भक्तीचा करावा आश्रय । तेथें ही आरभला अतरांय । काय आतां करावें ॥ २८ ॥ आपण जीव तेॱ ईश्वर । आपण अपराधी ते करुणाकर । ते प्रभू आपण किंकर । द्वेष कैसा करावा ॥ २९ ॥ तथापि शिवद्वेष कारितां दक्ष । कोण गति पावला प्रत्यक्ष । त्याचा विष्णु न करी च प्रतिपक्ष । माझा चि भक्त ह्मणऊनियां ॥ ३० ॥ शेखीं शंकरें चि कृपाभरें । जीवविला बस्तांचेनि शिरें । मग हरिहरस्तुति करी आदरें । तेव्हां जाला कृतार्थ ॥ ३१ ॥ तैसा च इद्रशर्मा द्वेपी विष्णूसी । तेणें प्रेतत्व प्राप्त जालें पूर्वजांसी । तो ही हरिस्तवनें सद्गतीसी । पावला ऐसीं पुराणें ॥ ३२ ॥ त्र्यंबककाव्यानीं रुपेश्वरीं । माडिली हरिहरभेदाची कुसरी । तेथें येक जाले शिव मुरारि । हरीश नाम तयाचें ॥ ३३ ॥ तयां दोघांतें एकात्मता । भिन्न होतसाते अभिन्न स्वतां । स्तवनीं बोलिली विषमता । तो अर्थवाद जाणावा ॥ ३४ ॥ लक्ष्मीनाथा आणि गिरिजाकांता । या दोघांसी च आहे समता । ह्मणोनि येकासी च गौणत्वें नेदितां । नव्हे स्तवन दुजयाचें ॥३५॥ तरि मुख निःकळंक कलंकी चद्रमा । ये उपमेस्तंव काय लोपे चद्रमहिमा । स्तुतिप्रेमासी कैंची सीमा । ह्मणऊनि नाहीं

१ मूळ शास्ता च परधर्मी असल्यावर पाखडमताचें निवारण कोण करतो ? २ भ्गतां आपल्यावर निरनिराळीं सकटें, आपत्ति का येतात याचें कारण मतमतांतरें व त्यामुळें माजणारा परस्परातील द्वेष. ३ द्वेषरूपी विघ्न. ४ हरिहर. ५ पक्ष घेऊन भांडणें. ६ बोकडाचें. ७ शिवाला गौण न मानतां विष्णूचें स्तवन होत नाहीं असें नाहीं. ८ मुखाला चद्राची उपमा देतात. परंतु मुख असतें निःकलक व ज्याची उपमा दिली तो चद्र आहे कलंकयुक्त. तरी पण या उपमेनें चंद्राचा महिमा कमी न होतां उलट वाढतो.

दूपण ॥३६॥ याची साक्ष असे पुढें । हरिहरऐक्यवाक्यें विश्वारूढे । परि हें न मनीत पढतमूर्ढें । मताभिनिवेष जयांतें ॥३७॥ मुख्य देहात्मबुद्धि पातक थोर । तेणें जो जो करी दंभाचार । तो तो व्यर्थ जाऊनि पामर । पापाचें फळ भोगिती ॥ ३८ ॥ अग्नि आणि ब्राह्मणद्वारां । आराधावें जगदेश्वरा । तो ब्राह्मण भोजनासी आणूनि घरा । सुशीळा स्पर्श न करिती ॥ ३९ ॥ आणि पादतीर्थ प्राशन न करणें । ये मानखंडणेचें पाप काय ब्रह्महत्येसी उणें । तथापि तीर्थ न सेवावें ऐसें कोणे ग्रंथीं कोणें । बोलिलें आहे तरी ॥ ४० ॥ मुख्य धर्मशास्त्रीं ऐसें च वचन । आधीं तीर्थप्राशन मग वंदन । यासी विपरीत जो दुर्मन । तो ब्रह्महा हें प्रसिद्ध ॥ ४१ ॥ जें पदांबुजांबु वंदितां केवळ । सर्व तीर्थस्नानाचें फळ । त्याच्या आचमनाचा काय विटाळ । उदरामाजीं होंनये ॥ ४२ ॥ असो जया अनन्य भाव चि नाहीं । तो कायएक पाखंड न करी पाहीं । रामदास निचंई न शोभे पाहीं । वेगळेंपणें वेगळा चि पडे ॥ ४३ ॥ श्रुत्यर्थ विपरीत लाविती । स्वमतप्रशंसा दाविती । ते स्वयें चि संतांहूनि विपरीत होती । ह्मणिजे केवळ असंत ॥ ४४ ॥ हराभिधानीं हरिपद वाखाणी । तेथें ऐक्य दाखवी मुळींची वाणी । शिवत्व प्रगट जाणतां ही चक्रपाणी-। द्वेषें पडे वेगळा ॥४५॥ अततंतनु ह्मणिजे आतंपता कीं लासणें । येणेंवीण तरले ऐसीं श्रुतिपुराणें । आतां याचिया मतविशेपणें । कोण गेला वैकुंठा ॥ ४६ ॥ पात्रें च

---

१ चांगले शिकलेले, पढलेले असून मूर्खपणा करतात ते. २ जड देह हाच अतरात्मा अशी बुद्धि असणें. ३ ब्रह्महत्या करणारा. ४ पदकमलाचें तीर्थ. ५ खरोखर. ज्याचा श्रुतिवचनावर, धर्मशास्त्रावर पूर्ण विश्वास नाहीं तो रामाचा दास असें ह्मणवून घेण्यास खरोखर पात्र नाहीं; पाखडमतानें तो अभक्त, दुर्जन असाच राहील. ६ ज्यानें तप्तमुद्रा धारण केल्या नाहींत तो किंवा ज्यानें प्राय-श्चितानें किंवा देहदडानें आपली काया अमर करून घेतली नाहीं तो. ह्मणजे हें शरीर अशुद्ध आहे, त्याच्या शुद्धीला उपाय काय, तर सूर्यकिरणांमध्यें शरीर ताप-वणें किंवा डाग देणें ह्मणजे तप्तमुद्रा ठोकणें. परतु श्रुति पुराणें सांगतात कीं तप्त-मुद्रेशिवाय अन्य साधनानें देहशुद्धि होऊन जन तरले आहेत.

समर्पूनि भगवच्छेप केलें । वेगळ्या नैवेद्यें काय नाहीं जालें । तरी श्राद्धान्नामधूनि अल्प वेंचलें तें उरलें । अनुछिष्ट कीं ॥ ४७ ॥ ठेवितां चि पात्रें तो न खरेंवडी । समर्पे हिरवें करपलें खरवडी । आपण उत्तम चि सेवी तो खरेंवडी । कोणिया भक्ताची ॥ ४८ ॥ यथाशास्त्र स्वधर्माचरण । जें तें सकळांसी ही प्रमाण । जे करिती अनर्गळपण । ते ही सर्वत्र च आहेति ॥ ४९ ॥ असो हें प्रसंगें आलें वाचें । दिसे उचित ही ज्यासी त्याचें । संतां सर्व स्वरूप रामाचें । तेथें कैंचा हरिहर भेदु ॥ ५० ॥ अवचट रामनाम येतां वाणीं । वेश्या विमानीं वाहिली पापिणी । तैसा च अनकळित शिवस्मरणीं । विमानीं भिल्लु वाहिला ॥ ५१ ॥ जैसें विष्णुभजनें तरले बहुत । तैसें चि शिवभजनें असंख्यात । यमधर्म ही दूतां उपदेशित । हरिहरदास त्यजावे ॥ ५२ ॥ कदापि ऐसें ह्मणती अभक्त जन । दास हें अनुचित विप्राभिधान । तरी हा आक्षेप चि अज्ञान । करी जयाचा तयासी ॥५३॥ अहो शूद्र सेवक जैसा तिहीं वर्णास । तैसें मनुष्यदास्य अनुचित ब्राह्मणांस । तें दूपण योजील हरिभक्तांस । तो चतुर कीं मूर्ख ॥५४॥ विप्र दास व्हावया ईश्वराचे । संचित पाहिजे कीं जन्मोजन्मींचें । नारदादि ह्मणविती जयाचे । दासाचे दास ॥ ५५ ॥ एके चि ग्रंथीं कीं एके चि वचनीं । जे साक्षी त्याहावी विवंचूनि । ग्रंथांचें सार शोधूनि । तें ग्रंथज्ञ जाणती ॥ ५६ ॥ एक चि अनुमत तें विकळ । तो ग्रंथ नव्हे सबळ । जैसा एक चि गुफिल्या वाळ । चामीकर नव्हे ॥ ५७ ॥ कीं एक चि गृह तो नव्हे ग्राम । कीं एक चि वृक्ष तो नव्हे आराम । नांतरी

१ निराळें काढून ठेवलें. २ हातानें स्वच्छ करित नाहीं. ३ खरवड, खरपुडी. ४ भक्ताची खरवड=अगदीं कनिष्ठ प्रतीचा भक्त. ५ मनसोक्त आचरण. ६ पिंगलानामें. ७ भक्तिरहस्य प्रकरण ४७ यांतील कथा. ८ वर्णानां ब्राह्मणो गुरुः असें वचन असतां व प्रत्यक्ष भगवतानें ब्राह्मणपद आपल्या वक्षस्थलावर धारण केलें अशा प्रकारची ब्राह्मणाची योग्यता असतां त्यानें आपणास दास हें उपपद लावून घ्यावें हें चमत्कारिक तर खरेंच, परंतु जे ब्राह्मण हरिभक्त आहेत त्यांना प्रत्यक्ष श्रीरामाचे किंवा श्रीरामाच्या दासाचे दास ह्मणवून घेण्यांत कमीपणा नाहीं, उलटें भूषण च आहे. ९ फसवून, किंवा साधक बाधक प्रमाणयुक्त. १० शुद्ध सोनें.

एका चि तंदुला नाम । राशी कैसी घडे बा ॥ ५८ ॥ सर्व संमतें अनुकूळ जयासी । तो चि सिद्धांत सेव्य सज्जनासी । इतर स्वनिश्चय ज्याचे त्यासी । काय गोड न वाटती ॥ ५९ ॥ ग्रंथासी कोण दूपण कोण भूपण । हें न सांगतां जाणती विचक्षण । परतु वुझानयाँ सर्वसाधारण । वोलिजेतसे परिसावे ॥ ६० ॥ वाक्यतात्पर्य नेणें का उपेक्षी । देत अर्थी मिथ्या कां विपरीत साक्षी । तें महद्दूपण ऐसें लक्षीं । जरी वक्ता ईश्वर ॥ ६१ ॥ विष्णुं विपरीत वाखाणी श्रुति । बोध करावया वौद्धाप्रति । तो जैनशास्त्रसिद्धांत सतीं । काय प्रतिष्ठिजेलि ॥ ६२ ॥ आतां पूर्वपक्ष जो मिथ्याभूत । तेथें वेगळालें वहुऋपिमत । सिद्धांतीं सर्वसाम्यता येत । तरी तें नव्हे दूपण ॥ ६३ ॥ यदर्थी जैसा मेघाकारींचा नर । एक ह्मणती वृद्ध येक ह्मणती कुमार । परी तो मिथ्याभास मेघ साचार । तेणें बोधें सार्थक ॥ ६४ ॥ थोडियाचिमाजीं वहुत अर्थ । स्पष्ट खष्ट यथार्थ । सुगमोपायें करिता कृतार्थ । हें ग्रथासी भूपण ॥ ६५ ॥ अपुनरुक्त अक्षर 'मित्री वर्ण कोमळ । पदत्रासँ साहित्य रसाळ । अन्यकथाकौतुकीं भूपण सकळा । परमार्थ स्वयंप्रकाश ॥ ६६ ॥ असो एवं प्रकारें दोपशमनी । भगवद्भक्ति प्रदीप्त हुताशनी । गानें नाचावें हरिहरकीर्तनीं । गुणकर्मे आणि नामें ॥ ६७ ॥ येथें सस्कृत प्राकृत पाहीं । एकेंवीण एका गति चि नाहीं । पुराणीं गायनीं देशीवीण कांहीं । बोध नव्हे जनासी ॥ ६८ ॥ गोदेसी मिळे जे जे नदी । ते तन्मयत्वें घाली पुण्य गंवादी । तेवीं हरिहरकथा देशभापापदीं । तन्मयत्वें पावन ॥ ६९ ॥ हरिहरनामें तां सस्कृतें । तेथें सायोज्यता सर्वे

---

१ वुद्धिमान, शाहाणे २ साधारण लोकाची समजूत होण्याकरिता. ३ मुद्दाम त्याग करितो. ४ बौद्धावतारात प्रत्यक्ष विष्णूनें बुद्धाना उपदेश करण्याकरिता श्रुतींचा अर्थ विपरीत भासवून जेनमत स्थापित केलें ह्मणून सताना तो विपरीत अर्थ स्वीकारावा काय ? ५ वाकडा. ६ या ठिकाणा ' मनी ' असा अन्य पाठ आहे ७ पदन्यास. ( दासबोध १-७ १७ ची टीप पहा ) ८ सर्व दोप दहन करणारी होळी च ९ याचा रूढ अर्थ, पातीने, भागीदारीनें असा आहे.

भापांतें । आतां गुणकर्म कळावयातें । अवश्यें देशी प्रमाण ॥ ७० ॥ देशीमाजीं निपिद्ध यावनी । ते चि अग्राह्य हरिहरकीर्तनीं । परि ते ही देशी नव्हे मार्गाभिमानी । संस्कृत चि तयाचें ॥ ७१ ॥ तान मान वंधन कळा । प्रेमेंवांचूनि त्या अवकळा । होऊनियां सकळां वेगळा । निर्लज्य कथा करावी ॥ ७२ ॥ कळावंत ही होती संत । पूर्वापर जे विख्यात । तें हि यथार्थ चि परि वहुत । कठिण आहे ॥ ७३ ॥ अगाध गडगडीत कल्लोळीं । परि तो चि येक मर्यादा सांभाळी । वोहाळा उचंवळती अल्प जळीं । तयासी उर्मी नावरे ॥ ७४ ॥ हेतुमात्रें कळाभिमानें । सप्रेम सत्कथा चि न माने । तो कळीचेन दूतें मनेंमत्तेनें । तरतां तरतां वुडविला ॥ ७५ ॥ *कळेचें घेऊनियां सोंग । अवकळी रिघाली त्याचें आंग ।* वाह्यरंगें प्रसंगें अंतरंग । श्रीराम जेणें दुऱ्हाविला ॥ ७६ ॥ तो कामकळावंत जगा वोळगे । गायन करूनि भीक मागे । निपेधाचें पात्र निजांगें । होऊनि ठेला ॥ ७७ ॥ कारिकेसी सवळ प्रसिद्ध वचन । जे ब्राह्मणासी निपिद्ध गायन । तें जें करावयासी उदंरपोपण । ऐसें तात्पर्य वाक्याचें ॥ ७८ ॥ परमेश्वरभक्तिरंगें केवळ । देवर्पि गाती नाचती प्रेमळ । जेणें ब्रह्मवर्चस्व होय विमळ । तेथें कैंचा निपेध ॥ ७९ ॥ नामविक्रय न करावा । प्रेमभावें राम गावा । अन्य प्रकारें करावा । जीविकेचा उपाय ॥ ८० ॥ नामविक्रय जो करी । तो

---

१ तैसें प्राकृतीं अद्वैत । सुगम आणि सप्रचित । अध्यात्म लाभे अकस्मात । तरी अवश्य घ्यावें ॥ ( दासवोध ७-१-२७. ) २ यावनी ह्मणजे फारशी भापेचा उगम संस्कृतापासून आहे असा अर्थ ध्वनित होतो. ३ *श्रीहरिवीण जे कळा । ते चि जाणावी अवकळा । देवास साडून वेगळा । प्रत्यक्ष पडिला ॥* ( दासवोध १४-५-३१) ४ गभीर अशा समुद्रास लाटा येऊ लागल्या ह्मणजे मोठा गडगडाट होतो, परंतु तो आपली मर्यादा कधीं हि उल्लंघन करीत नाहीं आणि लहान ओहोळास थोडें जास्त पाणी आलें कीं अनावर होऊन गावेंची गावें वेचिराग होतात. ५ जे फक्त गाणें ऐकण्याकरितांच कीर्तनास जातात त्याची स्थिति अशी होते. ६ ‘ मदोन्मत्तानें ’ असा दुसरा पाठ आहे. ७ गायनादि कलाचे. ८ दुश्चिन्ह. ९ धि:कार करण्यास योग्य. १० पोटासाठीं गाऊ नये । मोलें कीर्तन करू नये । ( दासवोध. १४-१-५५ )

चि पाप पदरीं भरी । श्रोता तरे भवसागरीं । भावें कथा ऐकता ॥८१॥ जैसा द्विज जो स्वयें कुश्चिळ । तो आपुलें भोगील चि कर्मफळ । परतु पुजील जो सप्रेमळ । त्या पुण्यदायक ॥ ८२ ॥ आता पाप न करावें आणि करूं नेदावें । तस्माद्दायके न देयमिति स्मृतिभावें । मार्गी आलियासी जरी नेदावें । तरी ते मरती उपवासी ॥ ८३ ॥ तेथें युक्ति करावी आपण । जे हा भ्रष्टला परि हा होय ब्राह्मण । ब्रह्मबुद्धया कीजे ब्रह्मार्पण । येणें भावें चुकवावें ॥ ८४ ॥ नट काय न करिती गायन । ते कां न ह्मणावे पावन । त्याचें भावार्थी उदरपोषण । ह्मणोनि अत्यजातुल्य ते ॥ ८५ ॥ पक्षी काय नसती तीर्थी देउळीं । दुबळे काय उपवासी न मरती दुकाळीं । भगवद्भाव नसता हृदयकमळीं । फळ कैसेनि पावती ॥ ८६ ॥ जव भावार्थाचें नव्हे बळ । तोंचिवरी विधिविधानपाल्हाळ । व्याधादि प्रसिद्ध प्रेमळ । भावार्थें चि तरले कीं ॥ ८७ ॥ हरिहरस्मरणाचें येव्हडें बळ । अनचट घडता तरती खळें । हा महिमा देखोनि प्रेमळ । अधिकाधिक होइजे ॥८८॥ स्वमींच्या रामस्मरणें दोपपर्वत । जागृतीचे जळती असख्यात । तेथें भावार्थें जे प्रत्यक्ष स्मरत । ते कैसे हो न तरती ॥ ८९ ॥ कळो हरिहरनामसकीर्तन । करिता सुगमोपायें तरती जन । तें अशेप करावया वर्णन । युक्ति शक्ति असेना ॥ ९० ॥ गुणनिधीचे अल्प गुण । वर्णिता ठाकों पाहे तितुकेंपण । तैसा नव्हे हो नारायण । यथाशक्त्या स्मरावा ॥ ९१ ॥ ब्रह्मायुषी कोटिवक्त्र अयुत महतें । सादर वर्णितां हरिगुण अनत । आजन्मवरी ही परि

---

१ ब्राह्मणानें गायनावर पोट भरावें हें निषिद्ध आहे, हें पातक त्याला घडू नये अशा इच्छेनें त्याला जर आपण काहीं च दिलें नाहीं तर ब्राह्मण उपाशी मरेल हा विचार केला पाहिजे २ भक्तिरहस्य प्रकरण ४७ पहा ३ दुष्ट ४ परब्रह्मस्वरूपाची चिरतन प्राप्ति होण्याकरिता मुख्य मनोजय झाला पाहिजे. त्या मनोजयास चार उपाय सागितले आहेत, त्यात 'अध्यात्मविचार' हा सुलभ उपाय सागितला आहे, परतु याला ही नामसकीर्तनाचा जोड पाहिजे ५ श्रीहरीचे गुण वर्णन करण्याकरिता दहा हजार महत ब्रह्मयाचें आयुष्यपर्यंत कोटि मुखानीं जरी वर्णन करीत बसले तरी वर्णन सपूर्ण होणार नाहीं.

पारगत । नव्हेति ऐसीं पुराणें ॥ ९२ ॥ ऐसा समर्थ जो सर्वेश्वर । तो व्यस्ते नामोच्चारें करुणाकर । पावला ह्मणोनि दृढ निर्धार । धरा हो नामीं तयाचा ॥ ९३ ॥ प्रथम केवळ नामधारी । त्याचा राम अधिकारी । अनाथदीनाचा कैवारी । भक्ति ज्ञान वैराग्य देतसे ॥ ९४ ॥ जैसा जैसा हा कीर्तनसीळ । तैसतैसी बुद्धि होय विमळ । सर्वत्र प्रकाशे केवळ । स्वरूप श्रीरामाचें ॥ ९५ ॥ काम चि रामें जाला जेथें । वैराग्य विश्रांति पावलें तेथें । निराकार साकारलें येथें । भक्ति निजांगें निवाली ॥ ९६ ॥ सर्व ही पर्वकाळ करूनि येकेवळा । ब्रह्मया ऐस्या पात्रा पुण्यसीळा । ब्रह्मांडशत दानपुण्यफळा लीळा । करिता रामनामस्मरण ॥९७॥ अहो रामस्मरणें राम चि होइजे । तेथें फळश्रुति किती ह्मणऊनि बोलिजे । यालागीं धन्य सभाग्य कृतकृत्य जे । भावें रामीं विनटेले ॥ ९८ ॥ काय करावे कष्टसाध्य मंत्र अन्य । नश्वरफळद विधानलोपें देती दैन्य । एक होत्साता शाश्वतफळद धन्य । उघडा मंत्र श्रीराम ॥ ९९ ॥ जेणें दिग्वधन जालें मुक्त । जेणें विधिनिषेध केले भक्त । जो आचांडाळ-विप्रपर्यंत युक्त । तो उघडा मंत्र श्रीराम ॥ १०० ॥ जो नवविध-भक्तीचें मूळ । जो चतुर्विधमुक्तीचें फळ । जो सर्व साधनाची सिद्धि केवळ । तो उघडा मंत्र श्रीराम ॥ १ ॥ जयाचें वर्णिता महिमान । न शक्तोमि ह्मणे चतुराननें । शेषा सहस्रमुखीं पडे मौन । तो उघडा मंत्र श्रीराम ॥ २ ॥ तारकब्रह्म हें नाम ज्याचें । काशी मुक्तीक्षेत्रें हें गौरव त्याचें । जें कंठरत्न उदास सदाशिवाचें । तो उघडा मंत्र श्रीराम ॥ ३ ॥ चतुर्वेदपारायणातुल्य फळ नेम । श्रीभगवताचें ह्मणता सहस्रनाम । तत्तुल्य एक चि रामनाम । हें शिर्वभाष्य प्रसिद्ध ॥ ४ ॥

---

१ उफराटें, उलटें २ कामवासना ज्याचे ठिकाणीं पूर्ण नष्ट झाली ३ एकोपा, एकत्र ४ मग्न झाले, रंगून गेले. ५ राममंत्राशिवाय इतर मंत्र साध्य होण्यास विधानयुक्त नियम पाळावे लागतात, व त्यात खंड पडला तर साध्य वस्तूच्या ऐवजीं उलट दैन्य प्राप्त होतें, तसें रामनाममंत्राचें नाहीं ६ ब्रह्मा कुंठित झाला ७ वाराणसी मुक्तिक्षेत्र । रामनामें करूनि । (दासबोध ४ ३-१५) ८ राम रामेति रामेति रमे रामे मनोरमे । सहस्रनाम तत्तुल्यं रामनाम वरानने ॥ रामरक्षास्तोत्र.

ऐसें जया रामाचें गौरव । तो श्रीराम स्वयें परम शांभव । सदाशिव स्वतां महा वैष्णव । अतएव हरिहरा येकात्मता ॥ ५ ॥ आपुली स्तुति आपणांसी प्रिय । आपणासी आपण न भजे काय । तैसें हरिहर प्रेम-उपाय । परस्परें भक्तीसी ॥ ६ ॥ एन्हवीं तरी स्थिति ऐसी । देव होऊनि यजावें देवांसी । दुजेंपण साच असतां अनन्यतेसी । ठाव चि नाहीं ॥७॥ अनन्य ह्मणिजे नाहीं दुसरें । हें वाक्यतात्पर्य तरी च खरें । जरि देवा-हूनि भक्त वेगळा नुरे । भजन कारितां ही ॥ ८ ॥ मुळींचहूनि भक्त अंश देवाचा । तरी च भजनें देव होय साचा । मध्यें च भजनभाव भिन्न कैंचा । केवळ तया दोघांसी ॥ ९ ॥ भेदेंवीण ही भजन घडे । देवभक्तत्व वोडेंकोडें । जैसें, राममंत्रत्व उघडें । तैसें चि हें निरोपण ॥११०॥ शब्दाचें स्तवन शब्दें चि कीजे । तेथें वस्तुता काय आहे दुजें । कां हस्तकें मस्तका पुष्पीं त्रुंबिजे । तेथें कैंचें पारिखें ॥ ११ ॥ अभे-दभक्ति सम्यक्ज्ञान विवेकवैराग्य । हे त्रिपुटी सामरस्या आणी तो चि योग्य । तो पर्णेवीणें स्वसंवेद्य सभाग्य । व्हावया मूळ रामनाम ॥ १२ ॥ हा माझा मज जैसा जाला अनुभव । तैसा च सर्व सज्जनांचा जाणवला भाव । पुढें ही होतील जे महानुभाव । ते भगवद्भक्त या कलियुगीं ॥ १३ ॥ जरि सर्व धर्म लोपती कळींत । तन्ही बीजाकारें रक्षील भग-वंत । त्याचेन विस्तारें पुनरागत । होईल सत्ययुग मागुतें ॥ १४ ॥ जवं जवं जीवांची होय मळिन मति । तवं तवं ग्रंथार्थ यथार्थ न प्रकाशती । मग जे सद्ग्रंथ लोपले ह्मणती । ते चि स्फुरद्रूपें सज्जनीं ॥१५॥ आतां नामात्मक रूप रूपात्मक नाम । दोहींसी दोंपणीं चि नाहीं भेद-भ्रम । तैसें देवा भक्ता अखंडैक प्रेम । तें अति यत्नें करावें ॥ १६ ॥ सिद्धत्व आणि साधकत्व । या दोहींसी ही येकदेशित्व । तेथें अखंडैक प्रकाशत्व । तुझेन स्वयंत्वें ॥ १७ ॥ कांहींत्वें तूं कांहीं नव्हेसी । अज्ञत्वें

# स्फुट कविता



## १

## कुळकर्ण कथा

॥ श्रीराम ॥

सहजीं सहज काजा । तुज वंदिजे गणराजा । म्हणोनियां जी सहजा । निरुपाधी माझा नमस्कारु ॥ १ ॥ सरस्वती तुझा वचनीं । स्तवीन तुजला वेदजननी । जैसी कुळदेवीचा दत्तधनी । कुळदेवीलागी पूजिजे ॥ २ ॥ तू अळकारक्ष्मीचा विस्तारु । तू निराकार वस्तूचा आकारु । असो शब्द तितुका तुझा पसरु । तुज नमस्कारु मौन्यें चि ॥ ३ ॥ आता वंदिजे श्रीगुरु तुह्मासी । ह्मणोनि अवलोकिलें तुमच्या पदासी । तेणें विसरलों मीपणासी । ठाय वदनासी असेना ॥ ४ ॥ मग प्रत्यावृत्ती करी । पाहों ठेलों निज निर्धारीं । तव सर्वत्र जगदाकारीं । तू निराकारीं सचलासी ॥५॥ ऐसियासी जी रघुनाथा । तुज कैसें वदू आतां । तुझिये निजपदीं सलीनता । हें चि सर्वथा वदन ॥ ६ ॥ नमन सत सज्जन श्रोतयातें । तुह्मी ज्ञानसिंधु उचबळते । तुमचिया अनुभवाचिये सांते । उणें तें ही कैंडेना ॥ ७ ॥ ऐसें जाणोनि माझिया चित्ता । निर्भय वाटलें जी सर्वथा । काहींयेक बोलावयाची आस्ता । अकस्मात उद्भवली ॥ ८ ॥ तुह्मी साक्षात ईश्वरमूर्ती । ज्ञानसिद्धि पुढें तिष्ठती । माझीं अज्ञानवचनें गगावती । भावास्तव अंगिकारा ॥ ९ ॥

---

१ साथे, संगतीनें २ कैंडणें=हरकत करणें. ३ आस्था. ४ गंगावती नांवाची एक वनस्पती आहे, पण तो अर्थ येथें काहीं च लागत नाहीं गगावती भाव=गंगे प्रमाणें शुद्ध, निर्मल भाव, असा अर्थ येथें करावा

आमची जे कां वृत्ती । ते चि कथा परमार्थी । उभय अनुभवाची स्तुति । सागेन निनती अवधारा ॥ १० ॥ परिसा भवपाडेपणें । पदीं परमार्थनिरूपण । करितां श्रवण मनन । समाधान सकळिकां ॥ ११ ॥ काया हें चि नगर गोमटें । सुदर रमणीय माहामोटें । तेथींचे शूंद्र अलत गांटे । खळ खोटे दुर्जन ॥ १२ ॥ येक डोळ्याचे दुर्जन । देखोन परदारा आणि धन । अभिळासीं आस्ता परिपूर्ण । सर्वकाळ तयांची ॥१३॥ येक कान गोहें मोटे । ऐकोन मातुकाचे साटे । खरे च ह्मणोनियां खोटे । वाढविती कुतर्क ॥१४॥ येक नाकाडींये हुगे । हुगत चालती मार्गे । वसले ठाइं न न्हाती उगे । कळह करिती परिमळा ॥ १५ ॥ येक परंज खादाड मोटी । खाऊनि सागे कुरठ्या गोठी । अवदानें गिळीत चि परी पोटीं । तृप्ति नाहीं तयेचे ॥१६॥ येक त्वचेचे उन्मत । बोलतां आगेंसीं आदळत । वळें च सकळांतें पीडित । मृद भोगीत उपभोग ॥ १७ ॥ येक हातागळे ठाइंचे । चोरी करणें ब्रीद त्याचें । हरण करावया परधनाचें । सर्वकाळ उदित ॥ १८ ॥ येक पळंगे सदा पळती । येके ठाइ न राहाती । निज कामीं न वैसती । नगर पळविती अवघें चि ॥ १९ ॥ येक सदाचा परद्वारी । सर्वकाळ व्यभिचार करी । धरितां न धरे दुराचारी । तेणें नगरी बुडविली ॥ २० ॥ येक परजहागीर भेडी । हागोनि करी नरकाड । भय अभय तन्हीं गोहाडी । तिनें वसविजे सर्वदा ॥ २१ ॥ येक चाहाड फितनेखोर । सर्वांसी चाळक सूत्रधर । येकक्षण ही नव्हे स्थिर । दारोदारीं हिंडतसे ॥ २२ ॥ तेणें राजाज्ञेतें भगिलें । स्वामीकार्य तितुकें राहिलें । मध्यें च डोंबाळें मांडिलें । पीक नेलें अवघें चि ॥ २३ ॥ ये रीतीं प्रजा वर्तत । आतां पाटीळ जे कां मुळाइत । त्याचे नगरींची हे समस्त । ते निल्यात पाच जन ॥ २४ ॥ त्याचें मूळ अत्यत वाढलें । पाचाचे पचवीस जाले । त्यांत

१ श्रेष्ठाकडे जार वगैरे गांवाची कुळकर्णीपणाची वृत्ति होती हें सर्वश्रुत च आहे २ कुळकर्णीपणा ३ इंद्रियाना उद्देशन हा शब्द आहे. ४ गाटा=हट्टी, स्वच्छंदी ५ गोहो=वस्ताद ? ६ परजणारी तरवारींची धार, जिभेला उद्देशून. ७ गोष्टी ८ पळपुटे, पाय. ९ आग.

पांच राजवटे निघाले । विपट पडिलें त्यांहिमधें ॥ २५ ॥ वलुते सकळ सांगतां सांग । गाथा वाढेल पडेल व्यंग । अपूर्ण कामी क्रोध मांग । तैसा वृत्तीविभाग वलुतेयां ॥ २६ ॥ आतां परिसा कुळकर्णी । ज्यालागीं जाली कथा करणी । जो सकळ करणीचा मुख्य धनी । वेरें वाईट तयाचें ॥ २७ ॥ त्याचें पाहातां मिरासी कुळ । तो या सकळांचें ही मूळ । परि या कारवारें आळ । आला जीवपणाचा ॥ २८ ॥ आतां स्वामी ज्याचेनि हे वागे । त्याचें नांव रूप कोण्ही न संगे । कागदीं-कागदीं समजती अवघे । खुणा चि दाविती दुरूनी ॥२९॥ तयासी जीहीं देखिलें । त्यासी बोलावया नाहीं उरलें । तथापि प्रत्यावृत्तीचेनि बोलिलें । शब्दासी न कळे ह्मणोनी ॥ ३० ॥ तो सचिदानंद सेजेवरी । कीं सचिदानंद तयामाझारी । ठाणें त्याचे इछेकरी । गडावरी बसलेसे ॥ ३१ ॥ गांवीची झाडाझडती । कुळकरण्यास तेथें मागती । संचित-प्रारब्धक्रियमाणेंसीं झाडा पाहाती । बाकी काढिती हिशोबें ॥ ३२ ॥ ज्याचे बाकीस भेंडोळें पडे । त्यासी स्वामीपासीं जाणें घडे । येर श्रमताती बापुडे । जातां येतां सर्वदा ॥ ३३ ॥ ह्मणोनि जाणते कुळकर्णी । चाळक परज हातीं घेऊनि । सर्वस्व अर्पिती स्वामीलागूनि । नाहींतरी निदानीं अडकिजे ॥ ३४ ॥ असो राजाज्ञेचीं पत्रें होतीं । तें कुळकर्णी याची प्रजांप्रती । परज शेवटीं सांगितली होती । ते न थारे ऐकतां ॥ ३५ ॥ ऐसे कष्ट करितां रात्रदिवस । नाहीं कुळकर्णीयास उमेस । वेतन मागतां कासावीस । निजद्रव्यास नेंदवे ॥ ३६ ॥ हे गांवीची स्थिति गति । ठाणांतरीं अत्यंत पीडा करिती । तलवेचरी तलबा येती । वेचु ग्रंथीं असेना ॥ ३७ ॥ येक दूतांसी देखोनि द्वारीं । सीघ्र प्रवेशती विवरीं । त्यांसी ही न चुके चि परी । काळांतरीं विटंबिजेती ॥३८॥ येक देखोनि दूतांचा यावा । प्रजा घोस करूं आदरिती गांवा । पळऊनियां सामर्थ्यें ठेवा । नुसतीं डिंबें चि मिरवती ॥ ३९ ॥

---

१ वलुतें घेणाऱ्यास. २ शब्दज्ञान मात्र सर्वांना होतें. ३ स्वेच्छेनें. ४ शून्य. ५ विश्रांति. ६ तलब=हक्काची मागणी.

येकांसी अकस्मात धरून नेती । अपराध स्मरोनि दंडिती । निरय-कुंडामाजीं पचविती । अथवा घालिती चर्मकारागृहीं ॥ ४० ॥ ऐसीं देखोनि पर वेवस्ता । या थरासी गोष्टी न येता । झाडापाडा केला तत्वता । कडकड वाहो करूनी ॥४१॥ आमचा हिशेब तत्वता । गत-वर्षी च क्रमला होता । कांहीं बाकी होती ते आतां । झाडूनि शून्य घातलें ॥ ४२ ॥ आता देहीचे कुळकर्ण । प्रारब्धगोत्रजावरी टाकून । आह्मी आह्मांस वोळखून । समाधानें राहिलों ॥ ४३ ॥ रामीरामदास विनवी सता । येथून सरली कुळकर्णकथा । निउंन पूर्ण श्लोकार्था । क्षमा सर्वथा करावें ॥ ४४ ॥ ॥ ७ ॥

२

# सरवदा

॥ श्रीराम ॥

येकाग वीरा हनुमतासी दुवा । ते महामाये भगवतीस दुवा । सताचे सभेस दुवा । धर्माचे सभेसी दुवा ॥ १ ॥ राजमुद्रा देवमुद्रा ज्ञानमुद्रा ते धुरेस दुवा केला हो या पाहान्यामधें ॥ २ ॥ वेदात सिद्धात धादात तें चि मज पिंगळ्याचें बोलणें ॥ ३ ॥ मासा धरा मासा । वेल धरा बैल । वांदी धरा वादी । ढवळा धरा ढवळा ॥४॥ मासा तो कोण तो । पाण्यातील मासा तो मासा नव्हे । वजनांतील मासा तो मासा नव्हे । पाण्यावीण तळपे तो मनमासा धरा हो ॥५॥ बैल तो कोण तो । वुणव्याचा चौपाइ तो बैल नव्हे । वीणकराचा दुपाइ तो बैल नव्हे । काळ तिपाइ बैल धरा जो फिरता चि न राहे ॥ ६ ॥ ढवळा तो कोण, तो ढवळा । कापुर ढवळा तो ढवळा नव्हे । पारा ढवळा तो ढवळा

---

१ झाडपवाडा=तपासणी. २ न्यून ३ सर्वदा, सरोदा, डाकोचा, बुडबुडा जोशी, पिंगळा जोशी, दैव सागणारा. ४ दासी

न्हे। सत्वगुण ढवळा धरा त्यासी दु खाचा डाग न पडे ॥ ७ ॥ वादी ते कोण ती हो। घरची वादी ते वादी न्हे। दारीची वादी ते वादी न्हे। कल्पना वादी धरा जे दारोदार फिरवी ॥ ८ ॥ दुसऱ्याचें चि होईक वरळे। आणि आपलें आपणासी न कळे। त्या सर्वयाचें तोंड काळें। नामाचें उपराळें मागायासाठीं ॥ ९ ॥ सभेसी देखोनि चालों। आणि मन राखोनि बोलों। तरी सर्वदा काशाला जालों। जरी भीड धरू ॥ १० ॥ ये थोरले घरीचा धनी। त्यासी होईल जीवहानी। मार्गे सर्वदे गेले भाकुनी। आता मज पिंगळ्याची ही वाणी। ऐका गा ये राय हो ॥ ११ ॥ स्थूळीं पचवीस गुण। ते सूक्ष्मीं होती लीन। सूक्ष्मातें ग्रासून। भूतें उरती ॥ १२ ॥ पाठीं पच महाभूतें। साडितील या देहातें। तें मी सागेन तुमतें। ऐका गा ये राय हो ॥ १३ ॥ घ्राणीं होईल गधत्याग। गुदीं जाणवेल मळोत्सर्ग। स्वासाक्षरा नियोग। प्राण होईल ॥ १४ ॥ ते क्षिति आपीं नासेल। तें आप आगीं दिसेल। त्यास यमधर्म हा बोल। आहे गा ये राये हो ॥ १५ ॥ तें जळ तेजीं रिघेल। चितनियोगें भ्रम होईल। हे मी पिंगळा बोल। बोलोनि जातों ॥ १६ ॥ शिश्न होईल रेतव्यक्त। कदाचित द्रवेल शुक्रीत। रस तो ही नितुळेल श्रोणीत। जळ गेलिया ॥ १७ ॥ पाठीं तेज होईल वळी। तें रक्तमेदासी नितुळी। मग रिघेल तये वेळीं। वायोचिया वाटा ॥ १८ ॥ तेव्हा शुद्ध बुद्धि विरेल। प्राणी आगें घुमारेल। सर्व स्मरू निसरेल। बैसेल गळका ॥ १९ ॥ चद्री लागेल नयनीं। रूपें सांडवेल प्राणी। ताठा पडेल चरणीं। उदान बैसेल ॥ २० ॥ वातवियोग होईल शरीरा। समान साडील निढारा। लवों राहाती नाडी शिरा। सर्वांगींच्या गा ये राय हो ॥ २१ ॥ तेव्हा स्पर्श तो ही चळेल। सीत ऊष्ण न कळेल। धुगधुगी ते ही राहेल। अनिळ निघता वेळीं ॥२२॥ तो वायो कल्पूनि आकाश। साडील देहाची आस। तेव्हा उरेल

---

१ भविष्य २ आधिक्य, उफाळा, शिरून

निशेप। आपण चि सर्व ॥ २३ ॥ तें गगन सर्वासार। जेव्हां निघेल बाहेर। तेव्हां खुंटती व्यापार। व्योमपंचकाचे ॥ २४ ॥ तेव्हां शब्द वाचा आटेल। श्रुती श्रवणीं जुमटेल। समूळ अंतःकरण तुटेल। ज्यानें-सहित ॥ २५ ॥ ऐसें नाशलियां गगन। देह होईल अचेतन। स्थूळ लिंग कारण। विसर पावतील ॥ २६ ॥ पंचवीसां तत्त्वांसहितें। नाश पावती पंचभूतें। पाठीं उरतील प्रेतें। होऊनि देहे ॥ २७ ॥ ऐसें हें सर्व ही सरेल। परी अविनाश वस्तु येकी उरेल। तें सज्ञान जाणतील। प्रगट न करा गा ये राय हो ॥ २८ ॥ शेंभर वर्षे पाऊस जाईल। तेणें सर्व जीव जन मरेल। सूर्य बाराकळीं तपेल। तेणें पर्वतासहित पृथ्वी जळेल ॥ २९ ॥ पोळतील शेपाच्या फडा। तो गरळ वमील भडभडां। तेणें पाताळें जळती धडधडां। ऐसी ब्रह्मांडाची राखोंडी होईल ॥ ३० ॥ पाऊस पडेल सोंडाधारी। तेणें बुडेल हे धरत्री। आगीन प्रगटेल अंबरीं। तो करील चोहरी[2] त्या पाण्याची ॥ ३१ ॥ तेथें सुटेल वावधांण[3]। तेणें विझेल तो आगीन। वायोसी गिळील गगन। गगनास राहील खाऊन। तामस अहंकार ॥ ३२ ॥ राजस उडवील तामसास। सात्विक बुडवील राजसास। माया दडवील सात्विकास। ते मायेचा घांस महन्माया करील ॥ ३३ ॥ महन्माया रिघेल गुणसाम्यीं। गुणसाम्य धरील स्वरूपाची भूमी। तेथें कैंचे आह्मी तुह्मी। हें मज पिंगळ्याचें वोंहीक[4] ॥ ३४ ॥ ईंबीन[5] मोटें गा ये राय हो। शांति करा हो शांति करा हो। त्याग करा हो त्याग करा हो। उतीम पाहारा जातो गा ये राय हो ॥ ३५ ॥ धुरेची रास कोण वावाची रासि कोण। मेखे[6] कीं वरैखांब[7]। मिथुन कीं करोर्क[8]। सींह कीं कन्या। तुळ कीं इरेंचीक[9]। धन कीं मकर। कुंभ कीं मीन ॥ ३६ ॥ मीनाचा मारोग वरा। लाभ मोटा गा महींद्रा। सा पुस्तकें निघालीं डेरां। त्यांत थोर-ल्याचा सकुन पाहे मज पिंगळ्याच्या हातें ॥ ३७ ॥ बुद्धिकांडी खोवितां

---

१ अग्नि. २ नाश. ३ जोराचा वारा. ४ भविष्य, ग्वाहिक, साक्ष ? ५ विप्र. ६ मेष. ७ वृषभ. ८ कर्क. ९ वृश्चिक.

बरवी । निघाली रका राज्यपदवी । तुझी हारपली सापडेल ठेवी । परि मज सर्वथाले निसरु नको ॥ ३८ ॥ रामीरामदास सर्वदा । भाकून गेला निजपदा । त्याच्या नेमाचिया शब्दा । जतन करा गा ये राये हो ॥ ३९ ॥ ७ ॥

३

## नामस्मरण

॥ श्रीराम ॥

ऐका सज्जन श्रीमंत । महिमा नामाचा अद्भुत । सच उद्धरले पतित । नलगे धन साधन विद्या ॥ १ ॥ धनेंवीण न घडे याग । विद्येवाचूनि नाहीं योग । तरि हें आहे जी कळयुग । येथ महिमा नामाचा ॥ २ ॥ रामा कृष्णा नारायणा । लक्ष्मीकांता क्लेशहरणा । गरुडध्वजा दीनोद्धरणा । स्मरता हरती पातकें ॥ ३ ॥ महिमा नामाचिया पुरे त्राणा । येवढें पातक नाहीं जाणा । अनेक भयें निवारणा । प्रायश्चित्तें सूचिलीं ॥ ४ ॥ असो नाहीं सिद्ध पाप । पापाणिया केले साक्षेप । साहे नामाचा प्रताप । येवढें पाप करवेना ॥ ५ ॥ कळी पातकाचा सिंधु । हरिकीर्तन सेतुबंधु । सुखें तरावया साधु । परमेश्वरें योजिले ॥ ६ ॥ कृतायुगीचे जे प्राणी । करिती कळयुगाची सिराणी । येथें कीर्तनें चक्रपाणी । मोक्ष देतो निज भक्ता ॥७॥ भावें करिता नामस्मरण । भक्त तरती नवल कोण । पुत्रासी ह्मणता नारायण । अजामीळ उद्धरला ॥८॥ वाल्मीक केवळ कैवर्त । ब्रह्महत्यारा वज्रचित्त । रामनाम ह्मणतां विपरीत । मुनीमाजी अग्रवी ॥९॥ माहापापी दुराचारी । बाधोन नेता यमकिंकरीं । मस्तक फोडिला मुद्गलावरी । ऐसा नेला सन्मुख ॥ १० ॥ त्याचें पाहाता जन्मार्चित । नाहीं अणुमात्र सुकृत । दुष्कृताचे पर्वत । आकल्प निरई पचावा ॥ ११ ॥ तव करुणा आली येमधर्मा । कोण

१ आधारास, शचीस २ श्रेष्ठता ३ धीवर. ४ उफराटें. ५ अग्रणी

उद्धरी या अधमा । स्मरला नाहीं पुरुषोत्तमा। तो पावला श्रीराम ॥१२॥ तें दीन कांपे थरथरा । आंगीं फुटल्या शस्त्रधारा । भ्रमें बोले विकळ गिरा । ह्मणे राम काये मी नेणे॥१३॥ तेणें तुटलीं भवबंधनें । हरिगण वर्षले सुमनें । विमानीं वाहिला सन्मानें । सोडऊनि नेला वैकुंठा॥१४॥ अवचट नाम येतां वाचे । येवढा महिमा आहे साच । प्रेमें गर्जत रंगीं नाचे । वैकुंठ ये त्यापासीं ॥ १५ ॥ कथे घालावें लोटांगण । भक्तां धावें आलिंगन । ज्याच्या स्पर्शें जनार्दन । अभ्यंतरीं प्रवेशे ॥ १६ ॥ नाम वाचें रंगीं नाचे । नयनीं प्रवाह प्रेमाचे । हर पदरज वंदी त्याचे । हर्षे नाचत कैळासीं ॥ १७ ॥ टाळ मृदांग वैष्णवभार । करताळिका जैजैकार । कारितां कीर्तनाचा गजर । रंगीं तिष्ठे श्रीरंग ॥ १८ ॥ हरिकथेस करी उछेद । ऐसा कोण भाग्यमंद । तया रुसला गोविंद । निरंई पचित येमदूत ॥ १९ ॥ करी भक्तांचा मानभंग । तेणें भंगिलें हरीचें लिंग । वैकुंठभुवन जें अभंग । तेणें तें हि भंगिलें ॥ २० ॥ भक्तासंकटीं घाली उडी । द्वेषियाचें मूळ तोडी । दगाघातें मस्तक फोडी । आपले जोडी तयांचें ॥ २१ ॥ मधुकैटभेसीं घेतली झोंबी । जीवें मारिला निरालंबी । कुशें छेदिल्या हि तनु अवलंबी । मग जीत चिपुरिला ॥ २२ ॥ हिरण्याक्ष दांतीं तोडिला । हिरण्यकश्यप नखीं फाडिला । रावण कुंभकर्ण विभांडिला । अति तिक्षण शरधारीं ॥ २३ ॥ सहस्रार्जुनाचीं कुठारवरि । केलीं करचरणाचीं कांडोरीं । तर्पण केलें त्याच्या रुधिरीं । कौंस परिवारें मारिला ॥ २४ ॥ भक्तकैवारें दैत्य मारी । याची काये नवलपारि । लक्ष्मी थापिली सिंधुतीरीं । अश्विनौदेवांकारणें ॥२५॥ भक्तांस अनुमोदन देती । भक्तसंकटें निवारिती । त्यांचा साहाकारी श्रीपति । भुक्तिमुक्तीचा दाता ॥ २६ ॥ रामीरामदास ह्मणे प्रेमें । जे गर्जती हरीच्या नामें । त्यांचीं हरि हरी जन्मकर्में । पुरुषोत्तम ते स्वयें ॥२७॥

---

१ प्रतिमा. २ वरोबरीचे, प्रतिस्पर्धी. ३ आश्रयरहित. ४ दुष्ट. ५ जिंकिला. ६ फरशानें. ७ तुकडे. ८ निवारण करतो.

अभिशापशब्दें छळियेलें । रेखा वोढूनि निघाला दुःखें वो त्रिजटे ॥५॥ भिक्षुक होऊनी आला गुंफेद्वारीं । तो हो निशाचर दुराचारी वो त्रिजटे। उचलूनी घेतलें मज स्कंदावरी । आणूनी ठेविलें अति दूरी वो त्रिजटे ॥ ६ ॥ रक्षण राक्षेसी अति भयंकरा । मानवांचा नाहीं येथें थारा वो त्रिजटे । विषादें रघुराजें मज उपेक्षीलें । निंदिलें म्यां त्याच्या सोहदरा वो त्रिजटे ॥ ७ ॥ तवं ते त्रिजटा सीते आश्वासीत । अविलंबें पावसी रामचंद्रा वो सखिये । रामीरामदास स्वामी विसंभेना । रामें प्रेरियलें महारुद्रा वो त्रिजटे ॥ ८ ॥

## ७

## जोगवा

॥ श्रीराम ॥

येकलो जोगवा जोगवा जोगवा देईं निज ठेवा ॥ ध्रु ॥ भाव भक्ति परडी जाण । कंठीं वेदांतदरुपण ॥ १ ॥ वैराग्याची उजळुनी दिवी[४] । स्नेहें जाळिला सर्व ही ॥ ३ ॥ नेघे विषयांची वेरडी । कामनेची नाहीं आवडी ॥ ३ ॥ सलोकतेची नेघे चोळी । स्वरूपतेची नलगे जाळी ॥ ४ ॥ समीपतें चि नेघे पापँ । सगुण सायोज्य नलगे दीप ॥ ५ ॥ देईं स्वसायोज्यतेतें । भवदारिद्र विरे जेथें ॥ ६ ॥ रामीरामदासीं दिधलें । पुढती मागणें वो सरलें ॥ ७ ॥

## ८

## मायानिरास

॥ श्रीराम ॥

सजनीं गुज गोष्टी । ते तूं सामावीं पोटीं । समदुःखी ते चि घोंटी । इतरा करिते चावटी ॥ ध्रु ॥ भर्ता मी येक पिंडी । त्याची माया हे कुंडी । तिनें केली विघडाविघडी । मी वो जाळीयें सांडी

१ देवीच्या नांवानें गोंधळी वगैरे लोक भिक्षा मागतात ती. २ टोपली, पाटी. ३ गळ्यांतील माळ. ४ दिवली, दिवटी. ५ तेल. ६ धान्याची भेसळ, खिचडी. ७ लचांड, उपाधि. ८ वारंवार विवरण करतो. ९ वाचाळपणा. १० शरीर.

॥ १ ॥ स्वामी हा मज नेणे । मी वो त्यासी न जाणे । अहंकारें छेळिलें इणें । न ये कीं येथें ही क्षणें ॥ २ ॥ मग म्यां वो ऐसें केलें । मायरानें शोधिलें । तेणें त्या साधियेलें । दोहीं ऐक्य जालें ॥ ३ ॥ आतां मी वो जेथें जायें । तेथें सरसा चि आहे । विजनीं तैसा जनीं माये । शंका नाहीं करूं काये ॥ ४ ॥ याचें वो नाम मज । घेतां वाटतें लाज । पाहाविना रूप सहज । रामीरामदासीं गुज ॥ ५ ॥

## ९

## सहजानंद

॥ श्रीराम ॥

संतो लागला हो ध्यास लागला हो ॥ ध्यास लागतां रामीं । विराम सकळ कामीं । वर्णाश्रमधर्मी । तुरे चि उरी ॥ देह गेह जाण । ठकलें मीतूंपण । अहं सोहं पूर्ण । मावळलें ॥ संचित प्रारब्ध जाण । निरसूनि क्रियमाण । जनीं जनार्दन । कोंधाटला ॥ नवल निज ध्यास । देखण्याचा अवकाश । विवेंचीण प्रकाश । सदोदित ॥ तेणें तेजें कोंदली सृष्टि । दिपोनि ठकली दृष्टि । दृश्यादृश्य पारपाठीं । तन्मय जालें ॥ ऐसें आब्रह्मस्तंभवरी । सबाह्यअभ्यंतरीं । निज तेज अंबरीं । कोंदाटलें ॥१॥ निजध्यासें मन । बुद्धिसहित जाण । इंद्रियें संपूर्ण । सम जालीं ॥ तेणें सर्वांगीं देखणेंपण । नसोनि दृश्यमान । अदृश्याचें परिमाण । निरसूनि-यां ॥ ऐसें पाहाणें पाहातां । पाहाणें चि न ये हाता । पाहाणें तत्वता । तन्मये जालें ॥ २ ॥ रामीरामदास । ब्रह्मानंदें निजध्यास । जन वन विजनास । ऐक्य जालें ॥ जागृति सुषुप्ति जाण । स्वप्न हि निरसिलें पूर्ण । तुर्या ताटस्त उन्मनी जाण । मुक्त केल्या ॥ ऐसा सहजीं सहज-बोध । नित्य नवा निजानंद । देह पडतां हि आनंद । न भंगे कदा ॥३॥

---

१ मायेचें मूळ ठिकाण.